

# अमरवाणी

हर्षः, कामश्च, दर्पश्च,
धर्मः, क्रोध, श्शमो, दमः
अर्था देतानि सर्वाणि
प्रवर्तन्ते...... ॥ १ ॥

[आनंद, काम, गर्व, धर्म, क्रोध, शम व दम ही सर्व पैशात असतात, म्हणजे ज्याच्या जवळ पैसा असतो अशा व्यक्तीत असतात.]

पीडाकर ममित्राणाम्
यत्स्यात् कर्त्तव्यमेव तत् ॥ २ ॥

[शत्रूला ज्याचा त्रास होतो ते सर्व करण्या योग्य असते.]

अयुध्यमानं, प्रच्छन्नम्,
प्रांजलिं, शरणागतम्,
पलायतं, प्रमत्तं वा,
न त्वं हन्तु मर्हसि ॥ ३ ॥

[युद्ध करण्यास सिद्ध नसलेल्याचा, लपून बसणाऱ्याचा, हात जोडणाऱ्याचा, शरण मागणाऱ्याचा पळून जाणाऱ्याचा, झिंगलेल्याचा तू वध करता कामा नये.]

न रणे शक्यते जेतुम्
विना युद्धेन वाग्बलात् ॥ ४ ॥

[युद्ध करून विजय मिळवायला हवा, वाग्वीर होऊन नाही.]



# कावळा आणि घुबड

[ ५३ ]

**का**ळोख पडण्याच्या सुमारास अरिमर्दन अनुयायांसह कावळ्यांची शिकार करण्यासाठी वडाजवळ येऊन म्हणाला– "कावळ्यांचा राजा आणि मंत्री दोघांचे खूप भांडण झाले आहे. ते इकडून निघून जायच्या विचारात आहेत. म्हणून आपण त्यांच्यावर हल्ला चढविला तर ते फारसा विरोध करू शकणार नाहीत."

म्हणन घुबडांची धाड वडाच्या झाडा-वर येऊन पडली. परंतु त्या वेळी झाडावर एकदेखील कावळा नव्हता. झाडा-खाली घायाळ होऊन कण्हत पडलेला स्थिरजीवी फक्त दिसला. त्याला ठार करायला घुबडे धावली तेव्हा तो म्हणाला– "मला मारू नका. आपल्या राजाकडे घेऊन जा. त्याला कित्येक गोष्टी सांगणार आहे."

घुबडांनी ते अरिमर्दनला जाऊन सांगितले. त्याने स्वतःच स्थिरजीवीला जवळ जाऊन विचारले– "काय हो, तुम्ही कावळ्यांच्या जातीतील वडीलधारे आणि तुमच्यावर हा प्रसंग कसा आला?"

स्थिरजीवी म्हणाला– "राजा, एक काल त्या दुष्ट मेघवर्णाने, तू त्याच्या बऱ्याच अनुयायांना ठार केलेस म्हणून रागाने तुमच्या गुहेवर हल्ला करण्याचा विचार केला होता. बलदंड शत्रूशी वैर वाढविण्यात अर्थ नाही, तू त्याच्याशी संधी करून घे, असे मी सुचविले. तो त्यामुळे चिडला व मला राजद्रोही म्हणून मारहाण करून या अवस्थेत सोडून निघून गेला. जातांना म्हणाला– 'तुझी मित्रमंडळी घुबडे आहेत त्यांच्याच-कडे जा.' असे सांगून हरणांच्या डोंगराकडे आपल्या सर्व अनुयायांसह निघून गेला."



ते ऐकून अरिमर्दन म्हणाला–"मूर्ख आहे तो! त्याने तुझी अशी दुर्दशा केली त्याबद्दल मी त्याची व त्याच्या कावळ्यांची चांगली खोड मोडतो."

"राजा, यापुढे त्याच्याविषयी स्वामिभक्ती माझ्या मनात उरली नाही, ती तुला मिळेल. मी स्वतः तुला कावळ्यांच्या वस्तीत घेऊन जाऊन कावळ्यांचा संहार करायला तुला मदत करतो." स्थिरजीवी म्हणाला.

अरिमर्दनाने आपले मंत्री रक्ताक्ष, क्रूराक्ष, दीपाक्ष, वक्रनास, प्राकारकर्ण यांचा सल्ला घेतला की तशी त्याची मदत घ्यायची किंवा नाही.

"तुमचं मत काय?" असे विचारता रक्ताक्ष म्हणाला–"त्या गाढवाला ठार करून फेकून द्या, कोठेतरी! जखमी होऊन मरायला टेकलाच आहे. सहज ठार करतां येईल. चांगला बरा झाला तर पळून जाईल व आपल्यासमोर ह्याचा एक प्रश्न उभा राहील. मुलाला ठार करणाऱ्या सापाशी ब्राह्मण स्वार्थवश समेटाच्या गोष्टी करायला गेला. त्या ब्राह्मणाला नकार देणाऱ्या सापाप्रमाणेच तुम्ही याचा सल्ला अगर सहाय्य नाकारले पाहिजे."

"ऐकू दे तरी, ती गोष्ट." अरिमर्दन म्हणाला. तेव्हा रक्ताक्ष "ब्राह्मण आणि सांपा"ची गोष्ट सांगू लागला :

"हरिदत्त नावाचा एक ब्राह्मण होता. त्याच्या मालकीचे थोडेसे शेत होते. त्यात पीक वगैरे बेताचेच होई. बायको व एक मुलगा यांच्या उदरनिर्वाहाला पुरेल एवढे देखील निघत नसे. एकदा तो ब्राह्मण आपल्या शेताची राखण करायला गेला असता एका झाडाखाली विश्रांतीसाठी थोडा आडवा झाला. झोप मोडतांच शेतातल्या वारुळातून एक साप बाहेर येत असलेला त्याला दिसला.

"अस्सं, हा माझ्या शेताची राखण करणारा नागसाप आहे वाटतं? मी त्याची पूजा आराधना केली नाही म्हणून आपल्याला [illegible] मनात विचार करून हरिदत्त धावत घरी गेला आणि एका पणतीत दूध आणून त्याने सापाच्या बिळाजवळ ठेवले आणि हात जोडून म्हणाला–"नागराजा मी दारिद्र्य भोगतो आहे. माझ्यावर कृपा कर."

साप ते दूध पिऊन तृप्त झाला. दुसऱ्या दिवशी हरिदत्त तेथे जाऊन पाहतो तर पणतीत एक सोन्याचे नाणे होते. आपण दूध पाजल्याबद्दल नागराजाने आपल्यावर ही कृपा केली, असे त्याला वाटले.

त्यानंतर तो दररोज एक पणतीभर दूध आणून ठेवी आणि साप ते पिऊन त्यात एक सोन्याचे नाणे आणून ठेवी.

एकदा त्या ब्राह्मणाला परगावी कामनिमित्त जावे लागले तेव्हा त्याने दररोज दूध बिळाजवळ ठेवून नागराजाची पूजा करण्याचे काम आपल्या मुलाला सांगितले.

"बिळात खूप सोन्याची नाणी असणार. हा दुष्ट साप फक्त एकेकच आणून देतो." असा विचार करून साप दूध प्यायला आला तेव्हा मुलगा त्याला काठीने मारायला गेला. साप मेला की बीळ खणून सर्व मोहरा आपल्याला काढून घेता येतील असे त्याला वाटले होते.

परंतु काठीचा वार चुकला आणि साप चवताळून मुलाला चावला. मुलगा तत्काळ जागच्या जागी मेला. घरी परतल्यावर ब्राह्मणाला ते सर्व कळले. त्याने मुलाची अंत्येष्टी वगैरे उरकल्यावर पुन्हा दूध नेऊन बिळासमोर ठेवून म्हणाला–"नागराजा! तुझी काहीच चूक नाही. तुला ठार करण्यासाठी जाऊन माझ्या मुलाने स्वतःच मृत्यूला बोलावणे दिले."

साप ब्राह्मणाला म्हणाला–"अरे ब्राह्मणा! मी तुझ्या मुलाला ठार केले तेव्हाच मी तुझ्याशी जोडलेले नाते कायमचे तुटले. यापुढे आयुष्यभर माझ्यावर भक्ती दाखविणे तुला शक्यच नाही. तुझ्या व माझ्यामध्ये तुझ्या मुलाचे प्रेत आडवे पडले आहे. तेव्हा तू आल्या वाटेने परत जा. मी हे बीळ सोडून आजपासून जात आहे."



## १९१. तीन हजार वर्षांचा इतिहास

बैरूट येथील शिलांवर ३,००० वर्षांचा इतिहास लिहिलेला आहे. इजिप्त, असीरिया, ग्रीस, रोम, फ्रांस वगैरे देशांचे सैन्य या स्थानावरून गेले आहे. काहींनी येथे मूर्ती कोरून ठेवल्या तर काहींनी शिलालेख लिहून ठेवले. घासून अस्पष्ट झालेले हे शिल्प इ. स. पू. ९ व्या शतकातील असेरिया देशाचा राजा असरनाजिरपाल तृतीय याच्या काळातले असावे असे सांगतात.





# माया सरोवर

[ २३ ]

[जयशील व सिद्धसाधक यांना नदीच्या परिसरात मकरकेतू व देवशर्मा भेटले. त्यानंतर थोड्या वेळाने एक हंसरथ आकाशातून उतरला. त्या रथातून मायासुरेश्वर व कांचनमाला घसरून अरण्यात पडली होती. त्यांचे कसे रक्षण करावयाचे या विचारात ते सर्व असता जलवृकराक्षस हंसरथावर हल्ला करायला आले. पुढे–]

हंसरथाला वेढा घालून त्यावर हल्ला करायला जलवृक राक्षसांना येत असलेले पाहून जयशीलने दूर फेकून दिलेली तलवार चटदिशी उचलली व म्हणाला–"हेच का राक्षस ते? यांची तोंडे लांडग्यांची असली तरी शरीरे माणसांचीच दिसत आहेत. विचित्रच प्राणी दिसत आहेत!"

मकरकेतूने आपल्या हातातला भाला वर उचलून धरला आणि घाईघाईने नदीत उतरायला धावला, परंतु तितक्यात थांबून मागे वळून जयशीलला म्हणाला– "जयशीला! हे जल राक्षस हंसरथ बळकावण्याच्या विचारात दिसत आहेत. यांना ठार करायला आमच्या मदतीला येतोस का?"

जयशीलाने काही न बोलता आपली तलवार शांतपणे म्यानेत ठेवली व थोडासा रागानेच म्हणाला–"आमच्या कनकाक्ष



महाराजांच्या मुलांना तुझा तो मायासरोश्वर अपहरण करून घेऊन गेला. त्यांचे रक्षण करण्याची जबाबदारी घेऊन मी आलो आहे. मला इतर कामे करण्याची इच्छा नाही. आतां या संकटात सापडलेल्या त्या दुष्टावर सूड उगविण्याची इच्छा सुद्धा माझ्या मनात आहे. त्या हंसांच्या रथात तो नाही, हे त्याचे नशीब, त्याला कोण काय करणार?"

ते उत्तर ऐकून मकरकेतूचा देह आपादमस्तक हादरला. तो गयावया करीत देवशर्माला म्हणाला–"वैद्यदेव! जयशीलच्या मनात आमच्या विषयी एवढे का वैर आहे? मला खरे नाही वाटत. तुम्ही

कन्येच्या अंगाला कोणी स्पर्श देखील केलेला नाही. दोघे किती सुखी आहेत. शिवाय मायासरोवरेश्वर किती प्रेमादराने त्यांच्याकडे लक्ष देतो आहे!"

"जयशीला! थोडा राग आवर व पहिल्याने तलवार उपसून पुढे हो. मायासरोवरेश्वरावर सूड उगवायची ही वेळ नाही." देवशर्मा म्हणाला.

दुसऱ्या क्षणाला जयशीलाने तलवार उपसली. लगेच सिद्धसाधक "जय महाकाळ!" असा घोष करीत वनमाणसाच्या खांद्यावर उडी मारून बसला. पापणी लवायच्या आत सर्वजण ओरडत नदीत उतरले आणि वृकराक्षसांवर तुटून पडले.

तिकडे हंसरथात मायासरोश्वराचा अंगरक्षक, रथ वृकराक्षसांच्या हातात पडू नये या साठी पाण्यातच दूर नेण्याचा प्रयत्न करू लागला होता. जलग्रहावर बसून भाला फिरवीत येत असलेल्या मकरकेतूला पाहून आणि वनमाणसावर भाला घेऊन येत असलेल्या सिद्धसाधकाला पाहून वृकराक्षस घाबरूनच गेले. ते पळून जात असता जलग्रहाने त्यांना सोंडेने धरून नदीकिनाऱ्यावर फेंकायला सुरवात केली. जयशील पाण्यात पोहोत

जात होता.

दहा पंधरा मिनिटांच्या अवधीत अनेक वृकराक्षस ठार झाले. कित्येक जखमी होऊन पाण्यात गटांगळ्या खाऊ लागले. जलग्रहाने किनाऱ्यावर ज्यांना फेंकून दिले होते त्यांपैकी काहींचे पायच मोडले होते तर काहींची डोकीच फुटली होती. ते किनाऱ्यावर तडफडत होते. त्यांना पाण्यात पोहणेच अशक्य झाले होते.

सिद्धसाधक ज्या वनमाणसावर बसला होता ते एका वृकराक्षसाला दोन्ही हातांनी उचलून पाण्याबाहेर आले. त्याच्या पाठोपाठ मकरकेतू, सर्पनख व सर्पस्वरही बाहेर आले. एकटा जयशील हंसरथावर

चढला व तलवार दाखवून त्यातल्या अंगरक्षकाला दरडावून म्हणाला–"अरे सरोवरेश्वराच्या अंगरक्षका! रथ किनाऱ्याला लाव रथाबरोबर आकाशात उडून जायचा तू प्रयत्न केलास तर पहिल्याने तुझे डोके धडावरून खाली पडेल, लक्षात असू दे!"

ते ऐकून अंगरक्षक संतापून डोळे वटारून म्हणाला–"महाशक्तिसंपन्न अशा मायासरोवरेश्वराच्या अंगरक्षकाला आजपर्यंत इतक्या अपमानकारक शब्दात विचारण्याची हिंमत कोणी केली नव्हती."

"मी केली आहे! पाहू दे तरी तुझा पराक्रम! खड्गयुद्ध करतां येते का तुला?" असे म्हणत व त्याच्याकडून काही उत्तर





न आलेले पाहून जयशीलने तलवार खाली ठेवली आणि आपल्या डाव्या हाताने अंगरक्षकाची मान घट्ट पकडून उभा राहिला.

अंगरक्षकाचे डोळेच बाहेर आल्यासारखे झाले. "तू कोण आहेस, मला माहीत नाही, पण शूरसाहसी नक्कीच आहेस. शिवाय शक्तिवानही आहेस. माझी मान सोड आधी!"

जयशीलने त्याला सोडले व म्हणाला– "आतां गुपचुप आपला रथ किनाऱ्यावर ने. तुझ्या मालकाविषयी तुझ्याजवळ मला बरेच बोलावयाचे आहे."

अंगरक्षकाची पुढे काही बोलण्याची छातीच नव्हती. त्याने हंसांना खुणावले व

साऱ्या खांद्यावरून खाली उडी मारून आणि वनमाणसाच्या हातातल्या जलवृक-राक्षसाचे दोन्ही कान धरून त्याला जमिनीवर ठेवीत म्हणाला–"अरे पाण्या-तल्या लांडग्या! खबरदार! पळायचा प्रयत्न केलास तर जागच्या जागी तुला मी ठार करीन."

नंतर हंसरथाजवळ जाऊन म्हणाला– "जयशीला! खरं सांगू! वनमाणसासह या हंसरथात बसून हिमालय पर्वतात जावे आणि तेथे तपश्चर्या करीत बसावे असे मला वाटते आहे. आमचे दोघांचे वजन उचलण्या इतका हा रथ बळकट असेल का रे?"

ते ऐकून स्मित करीत जयशीलने रथातल्या अंगरक्षकाकडे एकदा पाहिले. अंगरक्षक रथचक्रांकडे लक्षपूर्वक पाहल्या-सारखे करून म्हणाला–"हा रथ म्हणजे सामान्य नाही. याचा महिमा फार मोठा आहे. हे हंस फक्त शोभेसाठी जोडलेले आहेत. सरोवरेश्वरांच्या मनात आले तर हा रथ सात खालचे आणि सात वरचे असे जे चवदा लोक आहेत त्यात कोठेही जाऊ शकेल."

"अस्सं! इतका मोठा महिमा असलेला रथ गरुडागिधाडांची धाड आल्याबरोबर

तो तुझा महाप्रतापी मायासरोवरेश्वर त्या वेळी रथातच होता ना? मग तो रथातून खाली कसा पडला रे? आतां या फुकटच्या गप्पा सोड. हा भाला खुपसून तुला क्षणर्धात येथे लोळवीन!" असे म्हणत सिद्धसाधक आपला भाला अंगरक्षकावर उगारून उभा राहिला.

जयशीलने त्याला मध्येच अडवून शांत केले व म्हणाला–"साधका! अरे रथातून खाली अरण्यात एकटा माया सरोवरेश्वरच पडला नाही, तर राजकन्या कांचनमाला सुद्धा पडली आहे. तिचा जीव देखील धोक्यात आहे. ही गोष्ट विसरून चालणार नाही."

मकरकेतू उतरलेले तोंड करून दुःखाने सुस्कारा सोडीत म्हणाला–"जयशीला! आमच्या राजाच्या शोधार्थ व रक्षणार्थ आम्ही या रथात जावे म्हणत आहो. ते कोणत्या भयंकर संकटात सापडले आहेत, देवच जाणे!"

"आम्ही सुद्धा निघतो आहो. प्रथम राजकन्या कांचनमालेचा शोध आम्हांला काढावयाचा आहे. जर तिच्या जिवाला काही अपाय झाला असेल तर त्याची जबाबदारी तुमच्या त्या सरोवरेश्वर महा-राजांवरच आहे. त्यांचे डोके एक भेट



म्हणून कनकाक्ष महाराजांकडे मी नेऊन देणार आहे!" जयशील म्हणाला.

इतका वेळ मान खाली करून स्वस्थपणे सर्व ऐकत उभा राहिलेला देवशर्मा चटदिशी मान वर करून म्हणाला–"जयशीला! मी तुला पूर्वीच सांगितले आहे की सूड उगवायची ही वेळ नव्हे. लगेच निघून सरोवरेश्वर आणि कांचनमाला दोघे अरण्यात कोठे आहेत, अजून जिवंत आहेत की नाहीत, याचा शोध लावणे हे पहिले काम आहे!"

"होय रे बाबा! त्या सरोवरेश्वराचे काय झाले ते होऊ दे, परंतु राजकन्या कांचनमाला सुखरूप आहे की नाही हे पाहणे आमचे प्रथम कर्तव्य आहे. काय



म्हणतोस साधका? मग निघू या का?" जयशील म्हणाला.

सिद्धसाधकाने एकदा चहूकडे दृष्टी फिरवून पाहिले व म्हणाला—"या भयंकर अरण्यात ती दोघं कोठे पडली असतील, शोध लावणे म्हणजे सामान्य गोष्ट आहे का?"

साधकाने ते म्हटल्यावर हंसरथावरून नदीकिनाऱ्यावर उतरून अंगरक्षक, साधक होता त्या बाजूला भीत भीत वनमाणसाकडे पहात गेला व म्हणाला—"अहो! आमचे महाराज आणि कांचनमाला नावाच्या राजकन्या अरण्यात पडल्या ती जागा मला चांगली माहीत आहे. त्या जागेजवळच [illegible] आणि एका जागी एकही झाड नाही. तेथून पांढरा धूर आकाशात उडत आहे."

"बरोबर! अंगरक्षकाच्या मदतीने तेथ-पर्यंत आपल्याला पोचता येईल. तरमग चढा रथात!" असे म्हणत देवशर्मा रथ होता त्या बाजूने निघाला.

"वैद्यदेव! रथात सर्वांना जागा कशी काय पुरेल हो? सिद्धसाधक आणि त्याचे वाहन वनमाणूस यांना रथात कसे काय न्यायचे? मकरकेतू आपल्या जलग्रहावर बसून हंसरथात चढला तर रथ हे सर्व वजन घेऊन आकाशात उडू शकेल का?" जयशीलने विचारले.

देवशर्मा सर्वांकडे एकदां नजर फिरवून म्हणाला—"जे लोक वाहनांवर आहेत त्यांनी आपापल्या वाहनांवरच आले पाहिजे. काय साधका? काय रे मकरकेतू?"

मकरकेतूने उत्तर न देता फक्त सिद्ध-साधकाकडे पाहिले. सिद्धसाधक चिडल्या-सारखा दांत ओठ चावीत मकरकेतूकडे पहात म्हणाला—"आम्ही तुमच्या आधी इतक्या वेगाने या दाट अरण्यात कसे पोचतो पहा. परंतु वाटेत या मकरकेतूने काही प्रकार केला तर मात्र याला ठार करून माझ्या वनमाणसापुढे फराळ करायला टाकीन."

[illegible] आता मित्र झालो आहो." मकरकेतू हंसण्याहसविण्याचा खूप प्रयत्न करीत म्हणाला.

"या गप्पा मी खूप ऐकल्या आहेत! राजकन्या कांचनमाला आणि युवराज कांचनवर्मा आम्हांला सुरक्षितपणे भेटेपर्यंत तुमचा हा मायासरोवरेश्वराचा घोळका आम्हाला शत्रूच वाटणार." सिद्धसाधक म्हणाला.

त्यानंतर मकरकेतू आणि सिद्धसाधक या दोघांशिवाय बाकी सर्व हंसरथात चढले. अंगरक्षकाने त्यांना कोणत्या दिशेने यावे हे सांगितले व म्हणाला—"एक मोठा डोंगर आहे आणि उंच ढगाला शिवणारी झाडे आहेत, ती जागा लक्षात असू द्या!"

हंसरथ आकाशात उडू लागला. तो दृष्टीआड झाल्यावर सिद्धसाधक वन-माणसाच्या खांद्यावर चढला व मकर-केतूला म्हणाला—"काय रे केतू! निघू या का?"

मकरकेतू मानेने होकार देत जलग्रहावर चढला. इतक्यात साधकाच्या वाहनाने धरून आणलेला वृकराक्षस साधकाच्या पायां पडून म्हणाला—"महाप्रभो! मला आपल्या सेवकासारखा बरोबर घ्या. आज-पासून मी आपला दास झालो आहे."

ते ऐकून सिद्धसाधक फुलून गेला. म्हणाला—"अरे पाण्यातल्या लांडग्या! फार



चांगले बोललास. परंतु तू माझ्या या वनमाणसाच्या बरोबर इतक्या वेगाने येऊ शकशील का?"

"मालक! मला पंख नाहीत हे खरे असले तरी जमिनीवर पक्ष्यांसारखे वेगाने मला पळता येते." वृकराक्षस म्हणाला.

"शाबास!" असे म्हणत साधकाने वृकराक्षसाची पाठ थोपटली आणि वनमाणसाला चलायला खूण करणार इतक्यात तेथे गिद्धांचा सेनापती काही अनुयायांसह आला. "ओहो! वीर गिद्ध सेनापती का? कसे काय एकदम इकडे आलात?" साधकाने विचारले.

गिद्धा सेनापती नदी किनाऱ्यावर घायाळ होऊन तडफडत पडलेल्या वृकराक्षसांकडे पहात व साधकाला दाखवीत म्हणाला– "प्रभो! आम्ही येथे घडलेल्या सर्व गोष्टी त्या टेकडीच्या आडून पाहिल्या. लांडग्यांची तोंडे असलेल्या या माणसांना काय करावे म्हणता? यांना काही औषधोपचार केल्याशिवाय सोडून देणे बरोबर होईल का?"

[illegible] परलोकी पाठव. परंतु सावध बरे का! कारण जरा श्वासोच्छ्वास सुरू झाला की हे तुम्हाला धरून खायला मागेपुढे करणार नाहीत. असे दुष्ट राक्षस आहेत हे!" सिद्धसाधक म्हणाला.

सिद्धसाधकाचे बोलणे पुरे व्हायच्या आत गिद्धांच्या सेनापतीने नदीच्या पलीकडेच्या जंगलाकडे पहात म्हटले–"मालक! त्या बाजूला पहा. वर आकाशात तो पांढरा धूर उडतो आहे, दिसला का तुम्हांला? वणवा तर पेटलेला नाही?"

"तो वणवा नाही रे! तो धूर निघतो आहे त्या आगीत मायासरोवरेश्वर नावाच्या एका दुष्टाचा देह सजीव जळतो आहे. वनमाणसा! त्या दिशेने धाव, पळ!" असे म्हणत वनमाणसाला खुणावले.

वनमाणूस हुंकार करून सर्व अरण्य निनादून सोडीत जोराने पळू लागले. त्याच्या पाठोपाठ जलवृकराक्षस आणि जलग्रहावर बसून मकरकेतू निघाले.





# गरिबाचे बोल

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हा प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला– "राजा, कोणती तरी मोठी सिद्धी प्राप्त करून घेण्यासाठी एवढे कष्ट सहन करीत असशील तर तशा सिद्धींची प्राप्ती तपश्चर्या करून किंवा योग करूनच प्राप्त होऊ शकतील असे समजून घाबरून जाऊ नकोस. त्या सिद्धी एखाद्या सामान्य गरीब माणसात सुद्धा असू शकतात. त्याचे उदाहरण म्हणून एका लक्षाधीशाचे सर्व जीवित एका गरीब माणसाने कसे पालटून दिले ती कथा मी तुला सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

एका गावात एक गरीब माणूस रहात असे. त्याला स्वतःच्या नात्यातला असा



कोणी नव्हता. तो त्या गावच्या तलावात दररोज स्नान करून शेजारच्या शिवालयात जात असे. देवाच्या दर्शनाला येणारे भक्तलोक त्याच्या समोर नारळ फोडून त्याच्या वाटचा, केळी वगैरे फळे व पैसे आणून ठेवीत. तो जे मिळे ते खाऊन भूक भागवी व कधी मिळाले नाही तर उपाशी-राही. परंतु त्याने चुकूनही त्या गोष्टीचा उल्लेख कोणासमोर केला नाही.

एकदां एक लक्षाधीश शंकराच्या दर्शना-साठी त्या देवळात आपल्या बायकोबरोबर आला. त्या दंपतीला मूलबाळ काही नव्हते. त्या लक्षाधीशाने त्या गरीब माणसाच्या समोर एक केळे ठेवले. त्या

तरी विचार करून त्या लक्षाधीशाला ते केळे परत देत म्हणाला–"हे केळे आपण आपल्या पत्नींना खायला द्या. त्यांना पुढल्या वर्षी मूल होईल."

तो लक्षाधीश संतानप्राप्तीसाठी कोणा-चाही आशीर्वाद घ्यायला तयारच होता. त्याने ते केळे आपल्या बायकोला खायला सांगितले आणि गंमत अशी की दुसऱ्या-वर्षी त्या बाईला मुलगा झाला.

हा सर्व त्या गरीब माणसाचा अनुग्रह आहे, असे मान्य करून तो श्रीमंत त्या गरीब माणसाच्या दर्शनास आला.

त्याला पाहतांच गरीब माणसाने विचारले–"मुलगा रडू लागला ना?"

लक्षाधीश त्या गरीबाच्या आशीर्वादाची प्रशंसा करीत म्हणाला–"आपल्या कृपेने मला पुत्रप्राप्ती झाली. आपण जे मागाल ते मी यथाशक्ती देण्याचा प्रयत्न करीन."

"मला कशाची गरज नाही, मला काही नको. तू अन्यायाने एवढे वैभव संपादन केले आहेस. तुझ्यामुळे कित्येक लोग गरीब झाले आहेत. तू चोरबाजार करून गैरवाजवी व्याज घेऊन, खोटे दस्तावेज तयार करून अनेक अत्याचार केले आहेस. तू तो अन्याय बंद कर. तुझा मुलगा सुखी होईल. नाही तर तुझे कर्म!" तो गरीब माणूस म्हणाला.

सारखे वाटले. त्याने अन्याय करून गिळंकृत केलेली इस्टेट ज्याची त्याला परत केली, गैरवाजवी वसूल केलेल व्याज परत केले. चोरबाजार बंद केला आणि प्रामाणिकपणे व्यापार करून सुखासमाधानाने पुढील आयुष्य घालवू लागला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, मला हे सांग, त्या गरीबाच्या शब्दात इतकी मोठी सिद्धी कशी आली? तो जो प्रसाद मिळे त्यावर भागवी म्हणून का? या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

राजा विक्रमादित्य म्हणाला–"त्या गरीब माणसात काही महिमा होता असे म्हणायला काही प्रमाण दिसत नाही. तसे असते तर त्या गावातील लोकांनी त्याच्या कीर्तीचा खूप प्रसार केला असता. पण

एवढे खरे की निःस्वार्थबुद्धीने आयुष्य घालविणाऱ्या व्यक्तीचे शब्द खरे होतात त्या श्रीमंताला मुलगा झाला ही बोला-फुलाला गाठ पडली. परंतु श्रीमंताला तो गरीब सिद्धपुरुष कां वाटला? कारण हजारो स्त्रीपुरुष पुत्रसंतती व्हावी म्हणून किती व्रते अनुष्ठाने व नवस करतात तरी त्यांना संतानप्राप्ती होत नाही. परंतु कोणत्या तरी साधूने दिलेले फळ खाल्यावर मूल झाले की त्यांना तो साधू सिद्ध पुरुष असावा असे वाटू लागते. त्याप्रमाणे य गरीब माणसाच्या शब्दात तो महिमा असल्याचे श्रीमंताला वाटले, एवढेच. त्य महिमेवर विश्वास उत्पन्न झाल्यानंतर मुलाच्या सुखासाठी त्या श्रीमंताने न्याय-बुद्धीने व प्रामाणिकपणाने पुढील आयुष्य घालविले, त्यात आश्चर्य काहीच नाही."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# खिळयांच्या खुणा

राजू नावाचा मुलगा फार खोडकर म्हणून गावात प्रसिद्ध होता. बापाने त्याला खूप मारले, रागावला परंतु त्याच्यात काही बदल झाला नाही. त्याच्या विरुद्ध कित्येक तक्रारी येत. त्याच्या बापाने प्रत्येक तक्रारीच्या वेळी देव्हाऱ्याच्या खोलीच्या दरवाज्याला एक खिळा मारून ठेवायला सुरवात केली. सर्व दार खिळयांनी भरून गेले.

एकाएकी राजूत बदल झाला. त्याचा खोडकरपणा तर नाहीसा झालाच, तो चांगली कामे सुद्धा करू लागला. तो दुसऱ्यांना मदत सुद्धा थोडी फार करू लागला. त्याच्या प्रत्येक चांगल्या कामाबद्दल त्याच्या बापाने एकेक खिळा उपटून टाकायला सुरवात केली. एका वर्षाच्या आत सर्व खिळे उपटले गेले.

शेवटचा खिळा काढून टाकला त्यादिवशी राजू रडत बापाचे पाय धरून म्हणाला–"बाबा! तुम्ही सर्व खिळे उपटून काढून टाकलेत, परंतु त्यांच्या खुणा तशाच राहून गेल्या!"

बाप म्हणाला–"होय बाबा! वाईट कामें माणसाने बंद केली तरी त्यांची आठवण राहून जाते. म्हणून वाईट काम कधी कोणी करू नये."






# उत्तम आरोग्याचे गुपित

कुबेर नावाच्या एका तरुणाला सर्व नवनिधी प्राप्त होत्या, परंतु त्याच्या भाग्यात आरोग्य नव्हते. त्याने निरनिराळी औषधे केली, परंतु त्याला मुळीच गुण पडला नाही. म्हणून तो नेहमी दु:खी कष्टी असे.

कुबेराचा चरक नावाचा एक मित्र होता. तो काही कामासाठी परगावाहून मित्राला भेटायला आला आणि त्याच्याचकडे काही दिवस राहला. आपल्या मित्राची प्रकृती पाहून त्याला फार वाईट वाटले. त्याने वैद्यकशास्त्राचा तसा मोठा अभ्यास केला नसला तरी सामान्य औषधपाण्याची त्याला चांगली माहिती होती. त्याने कुबेराची तब्येत सुधारून देण्याचे मनाशी ठरवून त्याला माहीत होती तेवढी वैद्यक परीक्षा केली आणि त्याला काही आजार नसल्याची खात्री झाल्यावर कुबेराला त्याची दिनचर्या विचारली.

कुबेर दररोज शौचमुखमार्जन आटोपून सकाळी थोडी न्याहारी करीत असे. नंतर आपल्या इस्टेटीचा हिशोब वगैरे पहात असे. मधे फळांचा रस पेलाभर पीत असे. त्यानंतर थोडा वेळ विश्रांती घेऊन जेवत असे. जेवण झाल्यावर वामकुक्षी करी. झोपून उठल्यावर इस्टेटीची कामे पाहणाऱ्या कारकून नोकरांच्या कामाची तपासणी करी आणि वडिलांबरोबर स्वत:च्या कामाविषयी बोले. रात्री भोजन झाल्यावर झोपायच्या आधी पुन्हा फळांचा रस पिई.

कुबेर आपली दिनचर्या सांगून चरकाला म्हणाला–"मला काही तरी भयंकर रोग असावा असा संशय वाटतो आहे. औषधपाणी करून काही गुण पडण्यासारखा दिसत नाही. फळांचा रस मला आवडतो. जेवणावर वांछाच उरली नाही. आपलं



आयुष्य असेच जाणार का असे वाटून मी हताश झालो आहे."

चरक हसून म्हणाला—"हताश निराश होण्याचं कारणच काय? तुला औषधाबरोबर थोडी हवापालट करून घेण्याची सुद्धा गरज आहे. एक महिनाभर तू आमच्या गावी येऊन रहा. तुझी प्रकृती चांगली सुधारेल, याची मला खात्री आहे."

कुबेर वडिलांची परवानगी घेऊन चरकच्या गावी गेला. त्या गावातील लोक सुखवस्तू व कलेची आवड असणारे होते. म्हणून त्या गावात नित्य काही तरी मनोरंजनाचे कार्यक्रम चालू असत. कुबेराला त्या कार्यक्रमांमुळे आनंद वाटे. त्यांत

संध्याकाळ केव्हा होते याची वाट पाहू लागला.

त्याचा वाढत चाललेला उत्साह पाहून चरक त्याला म्हणाला—"आमच्या गावाचे हवापाणी तुला मानवल्यासारखे वाटते आहे. काल रात्री मला एक गोसावी भेटले. मी त्यांना तुझ्या आजाराविषयी मी सांगितले तेव्हा ते म्हणाले की शेजारच्या जंगलातल्या एका खेड्याजवळ एक औषधी मुळी आहे आणि ती सेवन करणाऱ्याने स्वतः ती उपटून काढावी लागते. तिचे सेवन केल्यास तुझी प्रकृती छान सुधारेल. तुला हरकत नसेल तर आपण लगेच निघू या."

"काळोख पडायच्या आत आपण परत येऊ ना?" कुबेरने विचारले.

"कां नाही येऊ शकणार? त्याचे प्रमाण काही तासांच्या आतच कळेल." चरक म्हणाला.

दोघे मित्र जंगलात पाऊलवाटेने पायी चालू लागले. चरक झपाझप चालत होता, परंतु कुबेर मधूनमधून दम घ्यायला थांबत होता.

"काय रे, तू माझ्याच वयाचा आहेस ना, मग माझ्याबरोबर चालू शकत नाहीस, हे कसं काय रे?" चरकने विचारले.

मी सुद्धा चालू शकलो असतो." कुबेर म्हणाला.

"तुझ्या प्रकृतीसाठीच तर जात आहो. तू झपाझप चालला नाहीस तर परत लौकर येता येणार नाही." चरक म्हणाला.

ते ऐकल्यावर मनाचा धीर करून कुबेरसुद्धा जोराने चालू लागला. दोघे बरेच अंतर चालून गेल्यावर चरक एक वनस्पती पाहून तेथे थांबला व म्हणाला—"हाच तो वनस्पती, याचीच मुळी स्वतःच्या हाताने तू उपटायची आहेस."

कुबेरने ते रोपटे दोन्ही हातांनी घट्ट धरून ओढल्याबरोबर ते मुळासकट उपटले गेले. ते शेजारच्या तलावात नेऊन धुतल्यावर चरकने त्याचे मूळ कुबेरला चावून खायला सांगितले व म्हणाला—"आतां आपण परत जायला हरकत नाही."

परत जायचं अंतर आठवूनच कुबेरच्या अंगावर शहारे आले. शिवाय त्याला भूकसुद्धा लागली होती.

"मित्रा! मला कडकडून भूक लागली आहे. पाऊल पुढे पडत नाहीसे झाले आहे. काही तरी खायला हवं आहे बुवा!" कुबेर म्हणाला.

"म्हणजे औषधाचा परिणाम लगेच झाल्यासारखा दिसतो आहे तर! हे मला माहीत असते तर बरोबर खायला काही तरी घेतले असते. तसे आतासुद्धा काही बिघडले नाही म्हणा! जवळच



पारध्यांची एक वस्ती आहे. तेथे काही खायला मिळणार नाही का?" चरक म्हणाला.

पारध्यांची वस्ती तशी जवळ नव्हती. तरी गत्यंतर नव्हते, कुबेर तितके अंतर चालून गेला. पारध्यांच्या नायकाने त्यांना प्रेमाने आपल्या घरी बोलावले आणि वऱ्याच्या तांदुळासारखे कसले तरी गवताचे धान्य शिजवून खायला वाढले. कडकडून भूक लागली होती म्हणून काय खात आहो, हे कुबेरला कळलेच नाही आणि तो पोट भरून जेवला.

जेवण झाल्यावर दोघांना झोप आली. पारध्यांच्या नायकाने त्यांना झोपायला चटाया अंथरून दिल्या. दोघे झोपून उठले तोपर्यंत सूर्यास्ताची वेळ झाली होती. दोघे घरी पोचले तेव्हा कुबेर चरकाला म्हणाला— "तुझा औषधोपचार फार गुणकारी आहे बुवा. काय झोप लागली होती म्हणून सांगू? शरीर कसे हलकं हलकं वाटतं आहे!"

आणि झोपला तर सकाळी उजाडल्यावरच उठला. इतकी शांत झोप लागली होती.

तेव्हा चरक त्याला म्हणाला— "आता तुझी प्रकृती सुधारली आहे, म्हणून खरं काय ते सांगतो. चांगली भूक लागायला उपासाशिवाय दुसरे औषध नाही. चांगली झोप यायला शारीरिक श्रम आणि व्यायाम यांच्याशिवाय दुसरा मार्ग नाही. मनात उत्साह रहायला मनोरंजन आवश्यक आहे. तुला ही गोष्ट पहिल्यानेच सांगितली असती तर तू मान्य केली नसतीस म्हणून औषधाचे नाव सांगून तुला आपल्या गावी बोलावून घेऊन आलो. यापुढे एक लक्षात ठेव, चांगली भूक लागल्याशिवाय काही खाऊ नकोस आणि थोडा व्यायाम करीत जा."

कुबेराला ते सर्व आश्चर्यच वाटले. परंतु घरी परत आल्यावर चरकाने दिलेल्या सल्ल्याप्रमाणे वागल्यानंतर आरोग्याचे गुपित त्याला कळले. त्याने स्वतःच गावात मनोरंजनाचे काही कार्यक्रम सुरू केले.





# मैत्री धर्म

भूपती नावाला साजेल असाच एक मोठा शेतकरी होता. खूप मोठे शेत आणि मळे होते त्याचे, परंतु घर मात्र त्या मानाने सामान्य होते. त्याच्या मुलाचे नाव होते गजपती.

दोघे एकदा राजधानीत कसला तरी उत्सव होता, तो पहायला गेले. दोन दिवस त्यांनी राजधानीभर हिंडून तेथील वैभव आणि उत्सव पाहिला. तिसऱ्या दिवशी एका मोठ्या हवेलीसमोर येऊन उभे राहिले. इतकी मोठी इमारत गावात दुसरी नव्हती. हे घर कोणाचे असे विचारतां माणिक्यवर्मा नावाच्या एका श्रीमंत माणसाचे असल्याचे कळले.

"माझ्या बरोबर सोने वाटून घेतले होते, तोच माणिक्यवर्मा की काय?" असे भूपती थोडे मोठ्यानेच पुटपुटला. गजपतीला ते चांगले ऐकू आले. त्याने विचारले— "कोणी हो तुमच्या बरोबर सोने वाटून घेतले?" तेव्हां भूपतीने जुनी गोष्ट सांगितली ती अशी :

बालपणी भूपती अगदी गरीब, म्हणजे अनाथ पोरकाच होता. कोणी सांगेल ते काम करी आणि जे चार पैसे मिळत त्यावर त्याचा उदरनिर्वाह चाले. माणिक्यवर्मा हा त्याचा अगदी 'जीवश्च कंठश्च' मित्र. गावाबाहेर एक पडके घर होते. ते एका जमीनदाराचे होते. वीज पडल्याने कोसळले. त्या जमीनदाराच्या कुटुंबातली सर्व लहान थोर माणसे त्यात मरण पावली. वाचला तो एकटा जमीनदाराचा म्हातारा बाप. कारण तो त्यावेळी गावात नव्हता. परतल्यावर सर्व दृश्य पाहून त्याला भ्रम झाला.

म्हातारा काही काळ जगला. गावात येऊन मुलांना म्हणे— "तुम्हांला सोने हवे








आहे का रे, पोरांनो?" त्याला पाहून मुले भिऊन पळून जात. एकेकदा ते त्या म्हाताऱ्याच्या अंगावर दुरून दगड फेकीत.

भूपती व माणिक्यवर्मा मात्र त्या म्हाताऱ्याशी सहानुभूतीने वागत. कधी कधी त्या पडक्या घरात जाऊन म्हाताऱ्याशी गप्पा मारीत. एकदां ते त्या म्हाताऱ्याकडे गेले असतां म्हातारा शेवटच्या घटका मोजीत असल्यासारखा दिसला. दोघांनी थोडे पाणी आणून त्याच्या तोंडात दोन दोन थेंब टाकून त्याला पाणी पाजले. म्हातारा एक आवंढा घेत म्हणाला– "मुलांनो! परसांत कडुलिंबाच्या झाडाच्या मुळात सोने पुरून ठेवले आहे. खणून घ्या!" एवढे म्हणून म्हाताऱ्याने प्राण सोडला.

काही दिवस लोटल्यावर, भूपतीने व माणिक्यवर्माने त्या झाडाच्या मुळात थोडे खणून पाहिले. आणि दररोज थोडे थोडे खणल्यावर दहा दिवसांनी एक जुन्या-काळातला हंडा सापडला. तो भरून मोहरा होत्या. त्या दोघां मित्रांनी समसमान वाटून घेतल्या.

त्याच्या वाट्याला आलेले सोने वापरून माणिक्यवर्माने राजधानीत व्यापार सुरू केला. भूपती खेडेगावात जाऊन राहिला आणि शेत विकत घेऊन एक शेतकरी झाला. अशा तऱ्हेने दोघे मित्र आपापल्या व्यवसायात परस्परांना विसरून गेले व त्यानंतर दोघांच्या भेटी गाठी कित्येक वर्षे झाल्या नाहीत.



वर्मांचीच असल्याचे लौकरच कळले. माणिक्यवर्माने भूपतीला दुरून पाहतांच ओळखले आणि नोकरांना पाठवून घरात बोलवून घेतले.

भूपती व गजपतीने सर्व वाडा हिंडून फिरून पाहिला. दोघे चकित झाले. त्या घरातले वैभव पाहून गजपतीला बापाचा फार राग आला व म्हणाला–"बाबा! तुम्ही माझ्यावर फार मोठा अन्याय केलात. तुम्ही सुद्धा व्यापार केला असता तर आपणही असेच सुखी झालो असतो. आपलं जीवित पाहून मला तर स्वतः-वरच राग येतो." असे म्हणत तो बाहेर निघून गेला.

मुलाने असे बोलावे याबद्दल भूपतीला फार वाईट वाटले. मित्राला त्या मनः-स्थितीत पाहून माणिक्यवर्माने विचारले– "काय झालं रे, एकाएकी तुला?" भूपतीने मुलगा म्हणाला ते सांगून टाकले.

"मुलांना कळत नाही, म्हणून असं बोलतात. तू मनाला लावून घेऊ नकोस." असे भूपतीला सांगून त्याला बरोबर जेवायला बसवून झोपायला पाठवून दिले.

काही वेळाने गजपती परतला. त्याचे डोळे लाल व तोंडावर संतापल्याची चिन्हे साफ दिसत होती. माणिक्यवर्माने त्याला बोलवून जेवायला वाढविले आणि जेवण झाल्यावर विचारले–"काय रे झालं तुला एकाएकी संतापायला?"



"माझ्या वडिलांनी माझ्यावर केवढा मोठा अन्याय केला आहे म्हणून सांगू? तुमच्या बरोबर त्यांनी व्यापार केला असता तर आम्ही सुद्धा तुमच्यासारखा वाडा बांधून चैन केली असती." तो म्हणाला.

माणिक्यवर्मा म्हणाला–"बाबा रे, असे मुळीच म्हणू नकोस! तुझ्या बापाने केले त्यात मला दूरदर्शीपणाच दिसून आला. व्यापार म्हणशील तर तो जुगारीसारखा आहे. व्यापार कधी फायद्यात तर कधी तोटयात. केव्हां खड्डयात पडावं लागेल सांगता येत नाही. माझ्या वांटयाला आलेले थोडे सोने देऊन मी आपल्या वडील भावाला व्यापार करायला सांगितलें. परंतु त्याला ते आवडले नाही. त्याने माझ्या जवळचे सोने अर्धे वांटून घेऊन जहाजांतून माल पाठविण्याचा धंदा सुरू केला. दुर्दैवाने समुद्रात जहाज पोचल्यावर मालासकट जहाज बुडाले. माझ्या जवळून आणखी थोडे धन मागून घेऊन त्याने इमारती ल[illegible] लागली आणि सगळी वखार जळून राख झाली. मात्र मला व्यापारात फायदा झाला. शेतीची गोष्ट निराळी आहे. व्यापारात नफा व्हायला नशीब लागतं. आज कुबेरासारखा श्रीमंत उद्या भिकारी होऊ शकतो. व्यापार करणाऱ्याला सारखी काळजी असते. संसारसुख असे मुळीच मिळत नाही. तुला कसली काळजी. हे सर्व तुझ्या बापाच्या दूरदर्शीपणाचे फळ आहे!"

गजपतीचे डोळे उघडले. आपल्या अज्ञानाबद्दल त्याला फार लाज वाटली.

दुसऱ्या दिवशी भूपतीने माणिक्यवर्माला विचारले–"काय रे, काल तू माझ्या मुलाला आपल्या थोरल्या भावाची गोष्ट सांगितलीस म्हणे! कोण रे तो? मला कसा तो माहीत नाही?"

"तुझ्याशी असलेल्या मैत्रीधर्माचे पालन करण्यासाठी मी हे खोटे बोललो! तुझ्या मुलाचे मन पालटले असावे!" माणिक्य-वर्मा म्हणाला.





# जसा बाप तसा बेटा

फार पूर्वी अवंती राज्याच्या गादीवर धीरदत्त नावाचा एक प्रजावत्सल राजा राज्य करीत असे. त्याच्या राज्यात चोरी नावाची गोष्टच नव्हती. सर्वत्र बंदोबस्त होता. धीरदत्ताच्या मुलाचे नाव राजशेखर असे होते. धीरदत्ताने उतारवय झाल्यावर विचार केला की मुलाला गादीवर बसवून आपण मोकळे व्हावे.

राज्याभिषेक व्हायच्या आदल्या दिवशी राजशेखरला एका गोष्टीबद्दल फार आश्चर्य वाटले. आपल्या राज्यात लहानमोठ्या चोऱ्यासुद्धा कशा होत नाहीत? वडील कोणत्या गोष्टींची काळजी घेतात? ते कळावे म्हणून तो स्वतःच चोरी करण्याचे ठरवून रात्री वेष पालटून एका श्रीमंत माणसाच्या घरात शिरला. हातात आला तेवढा माल उचलून तो त्या घराबाहेर पडला. आपण इतकी मोठी चोरी करून निर्विघ्नपणे कसे काय सुटलो, हे त्याला कळेना. बंदोबस्त मग काय झाला? याविषयी वडिलांना सावध करून ते काय म्हणतात ते समजून घेण्याचे त्याने ठरविले.

तो पहाटे मांजराच्या पावलाने घरी जात असतां कोणाचा तरी बळकट हात त्याच्या मनगटावर पडला. त्याने मागे वळून पाहिले तर त्याला चोरासारखी एक व्यक्ती चोरटया आवाजांत म्हणाली–"पाहरेकरी आहेत. मीसुद्धा एक चोरच आहे."

राजशेखरच्या मनात आता आणखी एक विचार आला. त्याला कैद करून आपण वडिलांपेक्षा जास्त हुशार आहो, असे कां दाखवू नये!

"माझे नाव वीरभद्र. तू माझ्या गुप्त जागी चल, चोरी केलेल्या मालातला माझा वाटा मला देऊन टाक आणि आपल्या वाटेने चालू लाग." चोर म्हणाला.



"चल तर!" राजशेखर म्हणाला.

दोघे मिळून गावाच्या वेशीवर असलेल्या दोन मोठ्या गुहात पोचले. वीरभद्र राजशेखरला एका गुहेत घेऊन गेला. तेथे मशालीच्या उजेडात भितीला टांगलेल्या तलवारी, भाले वगैरे शस्त्रे राजशेखरला दिसली, परंतु चोराचा एकही साथीदार किंवा अनुयायी दिसला नाही.

राजशेखरने चोराला विचारले—"तुला कोणी साथीदार, अनुयायी नाही वाटते?" वीरभद्रने लगेच टाळी वाजविली. त्या पाठोपाठ बाजूच्या गुहेतून सुमारे वीस जण बाहेर आले आणि त्यांनी राजशेखरला कैद केले. तो तर हतबुद्ध झाला.

[illegible] राज्यात चोरी करणे इतके सोपे वाटले का तुला? माझ्या राज्यात झालेली हीच पहिली चोरी. तुला दोन दिवसात काय ती चवकशी करून कडक शिक्षा करतो."

तो आवाज आपल्या वडिलांचा असल्याचे ओळखून राजशेखरला आनंदच झाला. ते आपली चवकशी कशी काय करणार? काय शिक्षा देणार, पाहू या तर असा विचार करून त्याने आपली ओळख दिली नाही. राजाच्या शिपायांनी त्याला तुरुंगात नेऊन एका कोठडीत बंद केले. तुरुंगाचा अधिकारी राजशेखरच्या ओळखीचा होता. आपल्या खऱ्या वेषात प्रगट होऊन राजशेखर स्वतःला सोडवून राजवाड्यात गेला.

सूर्योदय झाला. त्याच दिवशी राजशेखरचा राज्याभिषेक होता. तो निर्विघ्नपणे पार पडल्यावर वीरदत्त मुलाला बोलवून म्हणाला—"कधी झाले नाही ते काल झाले. काल एक चोर पकडला गेला तेव्हापासून माझे मन अस्वस्थ झाले आहे. म्हणून यापुढे आपल्या राज्यातील चोरांविषयी तू जास्त काळजी घेण्याची गरज आहे."

ती गोष्ट ऐकून राजशेखर त्या दिवशी रात्री घोड्यावर बसून राजधानीभर फिरून जागोजागी नेमलेले शिपाई राजधानीच्या [illegible] की नाही, हे पाहण्यास निघाला.

तो थोडेच अंतर चालून गेला असेल, त्याला चोरांच्या टोळीने गाठले. राजशेखर तलवार उपसून स्वतःच्या रक्षणार्थ सिद्ध झाला. आजपर्यंत नमुन्यालासुद्धा चोर नसता, अकस्मात इतके चोर कसे काय उत्पन्न झाले आणि तेसुद्धां नेमके आपल्या राज्याभिषेकाच्या दिवशीच हे कसे घडले, या गोष्टीचे राजशेखरला फार आश्चर्य वाटले.

इतक्यात कोणी तरी व्यक्ती घोड्यावर बसून आली व तलवार उपसून चोरांवर तुटून पडली. चोरांना पाय रोवून स्वरक्षण करणे शक्य नव्हते. चोर पळून गेले. त्या चोरांना धरण्यासाठी राजशेखर त्यांचा पाठलाग करू लागला.

परंतु त्याच्या मदतीला आलेला माणूस म्हणाला—"राजा! आतां तुला ते सापडणार नाहीत. मार खाल्ल्यावर पुन्हा ते या राज्यात राहणेच शक्य नाही."

राजशेखरने त्या व्यक्तीला विचारले—"कोण हो, तुम्ही? तुम्ही या देशातलेच का? तुम्ही मला फार मदत केलीत."

"राजा! मी शेजारच्या राज्यात राहणारा आहे. उदरनिर्वाह चालेना, म्हणून मी या राज्यात आलो. कालपासून मला



माझा मुलगा भेटला नाही, त्याच्या शोधार्थ मी निघालो तेव्हा चोरांनी आपल्याला गाठल्याचे मी पाहिले. कालच मी आपला राज्याभिषेक पाहिला, म्हणून मी आपल्याला ओळखले." तो माणूस म्हणाला.

आपली प्रजा नसली तरी आपली मदत करणाऱ्या परदेशी माणसाचा उचित सत्कार करणे आपले कर्तव्य आहे असे वाटून राजशेखर आपली अंगठी काढून त्या माणसाच्या हातात देत म्हणाला—"उद्या सकाळी दरबारात ये. ही अंगठी दाखवून तू काय वाटेल ते माग, मी तुला देईन."

दुसऱ्या दिवशी दरबार भरला. दरबारात सर्व लोक आले, परंतु वडील न



आलेले पाहून राजशेखरला आश्चर्य वाटले. त्याला कारण कळेना.

इतक्यात तो परदेशी अंगठी घेऊन आला.

राजशेखरने त्याला ओळखून जवळ यायला सांगितले व म्हणाला–"तुला काय हवे ते माग, मी तुला देतो."

"प्रभो! परवां रात्री माझ्या मुलाला चोरी करीत असता आपल्या वडिलांनी कैद करून तुरुंगात टाकले होते. कृपा करून त्याला त्याच्या चुकीबद्दल माफी करावी, अशी माझी हात जोडून प्रार्थना आहे. तो माझा एकुलता एक मुलगा आहे. त्याला सोडल्यास मी त्याला [illegible] तो परदेशी म्हणाला.

राजशेखर ते ऐकून क्षणभर थक्क होऊन पहात राहला. नंतर विचार करू लागला, "परवां रात्री तर आपणच चोरी केली होती. आणखी दुसरी चोरी तर झाली नव्हती. कैद होऊन तुरुंगात पडलेल्या व्यक्तीला हा माणूस 'माझा मुलगा' म्हणतो आहे, याचा अर्थ काय? सभेत वडील हजर असते तर एका क्षणात हा प्रश्न सोडवू शकले असते!"

राजशेखर चटदिशी आपल्या सिंहासनावरून खाली उतरून राजवाड्यात निघून गेला. दरबारात हजर असलेल्या सर्वांना तो प्रसंग विचित्र वाटला.

तेव्हा परदेशी आपला वेष काढून टाकून आपल्या खऱ्या स्वरूपात प्रकट होऊन उभा राहिला ती व्यक्ती म्हणजे धीरदत्त महाराजच स्वतः होते. त्यांनी त्यांचा जयजयकार केला. ते आपल्या आसनावर बसून दरबाऱ्यांच्या इच्छेला मान देऊन म्हणाले– "मीच मुलाच्या योग्यतेची परीक्षा घेण्यासाठी हे सर्व केले होते."

इतक्यात राजशेखर स्वतः त्याने पूर्वी जो चोराचा वेष केला होता तो धारण करून दरबारात आला व म्हणाला– "बाबा! तुम्ही कोठे गेला होता? चला निघू या. आपल्या इच्छेप्रमाणे महाराजांनी मला आतांच सोडले."

कैद्याला पाहताच धीरदत्त सिंहासनावरून उतरून म्हणाला–"तुला सोडवणारा राजा कोठे आहे?"

परदेश्याचा वेष धारण करून येणारा माणूस आपले वडीलच असल्याचे एकाएकी राजशेखरच्या लक्षात आले व म्हणाला– "चोराला तुरुंगातून सुटका देणारा मीच!" असे म्हणत राजशेखरने चोराचा वेष काढून फेंकून दिला. दरबारात तो प्रसंग म्हणजे वर्णनातीतच होता.

धीरदत्ताने आपल्या मुलाला प्रेमाने गाढ आलिंगन दिले.

"आपल्या कारकीर्दीतील राज्यकारभाराची व्यवस्था कशी काय आहे ती कळावी म्हणून मी वेष पालटून चोराची भूमिका केली होती. आपणच मला कैद केले हे कळले असूनही आपण कशी काय चवकशी करतां व शिक्षा कशी देतां हे समजून घेण्यासाठी मी आपली सुटका करून घेतली नाही. आपण किती वाकबगारी दाखवून देशाचे रक्षण करीत आहां ते समजून घेतले. परंतु मध्येच एका परदेश्याचे पात्र कसे आले हे मात्र मला कळले नाही." राजशेखर म्हणाला.

"तुझी हुशारी व कर्तबगारी पाहून माझ्या मनाचे समाधान झाले. तुझी परीक्षा घेण्यासाठीच तुझ्यावर चोराकरवी मी हल्ला करविला. ते सर्व नाटक होते. चोरी करणाऱ्या तरुणाविषयी तू काय निर्णय केला असतास हे पाहण्यासाठीच मी एका परदेश्याच्या वेषात येऊन तुझ्याजवळ त्याला सोडण्याची प्रार्थना केली. तो परदेशी मीच होतो हे तू जसे ओळखू शकला नाहीस तसेच चोरी करणारा तो तरुण तूच हे मी ओळखू शकलो नाही." धीरदत्त म्हणाला.

"पितापुत्र समान समर्थ आहेत! कोणी कोणाहून कमी किंवा जास्त नाही!" या शब्दात सर्व दरबाऱ्यांनी दोघांची वाखाणणी केली.



# देव जेवायला घालील!

एका गावात रामू व भीमू नावाचे दोघे मित्र होते. भीमला कोणी आपला म्हणणारा नव्हता. त्याला मेहनत करून स्वतःचे पोट भरावे लागे. रामू काही काम करीत नसे. आईने वाढले तर खात असे.

भीमू रामूला रागावला हे रे काय? "रामू म्हणाला–"देव जेवायला घालतो, रे!" भीमू म्हणाला–"मेहनत केली नाही तर देव देखील पोटभर जेवायला घालीत नाही."

देव जेवायला घालतो, ही गोष्ट सिद्ध करून दाखविण्यासाठी रामू एके दिवशी जेवल्याशिवाय राहला. भीमू शेजारी बसून राहला. काही वेळाने खरोखरच एक वाढलेले ताट रामूच्या समोर आले. तो त्याला हात लावू लागला तेव्हा ते मागे सरकले. रामू उठून ते उचलून घ्यायला निघाला. त्याला त्या ताटाने खूप त्रास दिला. मनाचा निश्चय करून रामूने खूप धावपळ केली. घाम गळू लागला तरी रामू त्याच्या पाठीमागे धावला आणि कसे तरी त्याने ते पकडलेच.

"काय रे पाहिलेस ना देवाने वाढून दिलेले ताटसुद्धा इतकी मेहनत केल्याशिवाय तुझ्या हातात आले नाही?" भीमू रामूला म्हणाला.





# तिघी वधू

मायापूर संस्थानाच्या सभोवती आणखी तीन संस्थाने होती. त्यांची नावे अनुक्रमे रत्नगढ, कुबेरपूर व सिंहभूम अशी होती. या तिन्ही संस्थानांच्या अधिपतींना मुलगा नव्हता, एकेक कन्या होती. त्यांची नांवे अनुक्रमे नंदिनी, लतिका व स्वप्ना अशी होती. तिघी विवाह योग्य वयाच्या मुली होत्या.

मायापूर संस्थानचे प्रमुख देवाशीष यांना कल्याण नावाचा एकुलता एक मुलगा होता. त्याला राजपुरुषाला योग्य अशा सर्व युद्धविद्या अवगत होत्या. म्हणून सभोवतीच्या तिघां संस्थानिकांच्या मनात त्यालाच आपला जांवई करून घेण्याचे होते. त्यांनी देवाशीषाकडे आपले दूत पाठविले.

देवाशीषासमोर एक मोठा प्रश्न उभा राहिला. आपल्या शेजारच्या राज्य घराण्यांशी वितुष्ट येणे त्याला पसंत नव्हते. ते तिघंही त्याच्याहून जास्त बलिष्ठ होते. त्यांना राग आला तर केव्हाही स्वारी करून त्याचे छोटेसे राज्य जिंकून आपल्या राज्याला जोडतील, ही भीती त्याला वाटत होती. रत्नगढच्या बाबतीत आणखी एक महत्वाची समस्या होती. मायापूरच्या व्यापाऱ्यांना आपल्या मालाची नेआण रत्नगढ मार्गेच करावी लागे. म्हणून रत्नगढशी वैर करणे म्हणजे स्वतःच्या हाताने स्वतःच्या पायावर कुऱ्हाड मारून घेण्यासारखे होते. शिवाय आणखी एक समस्या होती. तिन्ही संस्थानिकांच्या राजकन्या एकीहून एक सुंदर होत्या. परंतु रत्नगढच्या राजकन्येशीच राजकुमार कल्याणच्या मनात लग्न करावयाचे होते. एकदां दोघांची भेटसुद्धा झाली होती. नंदिनीला त्याच्याशीच लग्न व्हावे असे वाटे.

तिथे दूत आपापल्या राजधानीला परतल्यावर देवाशीषने कल्याणला जवळ बोलावून घेऊन त्याचे मत विचारले. म्हणाला–"आपल्याला राजकीय दृष्ट्यासुद्धा विचार करायला हवा. कारण तिथे आपल्याला सारखेच. तेव्हा तिघींशी लग्न करून घेणे हाच एक मार्ग दिसतो."

"त्यांला ते तिघे संस्थानिक मान्य करतील, असे नाही वाटत मला." कल्याण म्हणाला.

"मग काय करावे?" बापाने विचारले.

"आपला निर्णय कळवायला थोडा अवधी मागून घ्या. मध्यंतरी विचार करून मार्ग काढायला पुष्कळ अवकाश मिळेल." कल्याण म्हणाला.

दरबारी जादुगार सोमनाथ राजकुमार कल्याणाचा एक घनिष्ट मित्र होता. तो त्याच दिवशी राजकुमाराला भेटायला आला तेव्हा त्याला उदास मनाने बसलेला पाहून सोमनाथने विचारले–"असा काय रे बसला आहेस?" कल्याणने त्याला सर्व समस्या छान समजावून सांगितली आणि नंदिनीशीच विवाह करण्याची इच्छा असल्याचे देखील सांगून टाकले.

"असं सांग! एका दगडाने दोन पक्षी मारायचे आहेत होय? रत्नगडच्या राजाशी तुम्हांला मैत्री हवी आणि तुझं नंदिनीशी लग्नसुद्धा झालं पाहिजे. शिवाय इतर संस्थानिकांशी वैर नको आहे तुम्हांला. होय ना?" सोमनाथने विचारले.

"तुझ्या इंद्रजालाचा या कामाला काही उपयोग होईल का?" कल्याणने त्याला विचारले.

"हात चलाखी आणि थोडी हुशारी दाखविली तर शक्य आहे. इंद्रजालाच्या सहाय्याने काय होणार नाही रे? पण हे सांग, तुझी नंदिनीशी ओळख आहे का?" सोमनाथने विचारले.

"इतकी दाट ओळख नाही, तरी तिला विचारून तिची मदत घेता येईल." कल्याण म्हणाला.

"आपली युक्ती यशस्वी व्हावी यासाठी ती तू सांगितल्याप्रमाणे करायला तयार होईल का?" सोमनाथने विचारले.

"माझ्याशी लग्न करण्यासाठी ती वाटेल ते करायला तयार होईलसे, वाटते!" कल्याण म्हणाला.

"तर मग तुझा प्रश्न सुटलाच!" सोमनाथ म्हणाला.

दुसऱ्या दिवशी कल्याण आपल्या वडिलांना भेटून म्हणाला–"आपल्यासारखाच तिघां संस्थानिकांचा विधिलिखितावर विश्वास असणार. तेव्हा वधूची निवड करताना थोडा मंत्रतंत्र पूजाविधी वगैरे करावा लागेल. त्यात कुंकवाची परीक्षा एक विधी आहे. तिघां राजांकडे निरोप पाठवून तिघांची त्या गोष्टीस मान्यता असल्याचे विचारून घ्या." त्याने आपल्या वडिलांना योजलेली सर्व युक्ती कशी आहे हे थोडक्यात सांगितले. राजा आनंदाने आपल्या अंबा-





रीत बसून लव्याजम्यासह तिघां संस्थानिकांना जाऊन भेटला. सर्वांनी मान्य केले.

ठरल्याप्रमाणे तिघे संस्थानिक आपापल्या राजकन्येला घेऊन सहकुटुंब सहपरिवार एका पुरोहितावरोबर मायापूरच्या देवालयाच्या मोठ्या आवारात दाखल झाले. देवालयात तोरणे बांधून पताका बांधल्या होत्या. कल्याण नवऱ्यामुलाचा पोशाख घालून आला होता. तिघी राजकन्या नवऱ्यामुलीचा पोशाख करून आल्या होत्या. नंदिनी, लतिका व स्वप्ना एका बाजूला उभ्या होत्या व कल्याण दुसऱ्या बाजूला उभा राहिला.

देवळातल्या पुजाऱ्याने पूजा आटोपून आरतीच्या तबकात तेलात भिजविलेले कुंकू आणले. त्याने तिघा राजकन्यांचा उजवा तळहात ओल्या फडक्याने स्वच्छ पुसला आणि घट्ट मूठ वळवून घ्यायला सांगितले. त्यानंतर कल्याणचा तळहात स्वच्छ पुसून त्याला कुंकू लावले व म्हणाला–"या तिघींपैकी ज्या राजकन्येच्या भाग्यात या राजकुमाराशी विवाह करण्याचे लिहिले आहे तिच्या तळहाताला या कुंकवाचे बोट लागेल." असे सांगून कल्याणच्या हातावरचे कुंकू बोटाने पुसून काढले. नंतर राजकन्यांकडे वळून म्हणाला–"मुलींनो! उघडा पाहू मुठी."

लतिका व स्वप्नाचे तळहात तसेच स्वच्छच्या स्वच्छच होते. नंदिनीच्या तळहाताला मात्र कुंकवाचे बोट होते. तिघां संस्थानिकांनी पुढे येऊन नंदिनीचे अभिनंदन केले. लतिका व स्वप्ना निराश झाल्या. तरी त्या आपल्या आईवडिलांबरोबर लग्नसमारंभाला हजर होत्या.

नंदिनीच्या तळहाताला कुंकवाचे बोट कसे लागले? तिने आपल्या नखांना मेंदी लावली होती. मधल्या बोटाच्या नखाला थोडे कुंकू लावून ठेवले होते. मेंदीच्या तांबड्या रंगामुळे तेथे कुंकू लावून ठेवले असूनही दिसले नाही. मूठ वळवितांच ते कुंकू तळहाताला लागले. हे काम तिच्या करवी कल्याणनेच करविले.



# वाक्पटुत्व

मंगळगिरी नावाच्या गावी रामशास्त्री नावाचा एक ज्योतिषी रहात असे. त्याला दरबारी कवी व्हावे असे वाटू लागले. राजाला भेटून त्याने मनातली इच्छा व्यक्त केली.

परंतु राजाचा ज्योतिषावर तितका विश्वास नव्हता. ज्योतिषी म्हणून नोकरी मिळावी म्हणून जे कोणी येत त्यांना तो विचारी–"मी तुम्हाला नोकरी देणार आहे की नाही हे प्रथम सांगा!" ते म्हणत, "हो देणार आहांत, महाराज!" तेव्हा राजा म्हणे–"चुकलं! मी नोकरी देण्याच्या विचारात मुळीच नाही. तेव्हा चालू लागा."

त्यांनी ते देण्याचं मनात नसल्याचे सांगावं तर तो म्हणे–"तुम्हांला मी नोकरी दिली तर तुमच्या ज्योतिषाचाच तो अपमान होईल नाही का?" म्हणुन ते उत्तर कोणी देत नसे.

परंतु बोलण्यात रामशास्त्री चांगले चतुर होते ते म्हणाले–"आपण मला नोकरी देण्याच्या विचारात नाही."

"तुमचं म्हणणं खोटं ठरलं. मी तुम्हांला नोकरी द्यायचं ठरविलं आहे. परंतु तुमचं ज्योतिष खोटं ठरलं म्हणून तुम्ही आल्या वाटेने चालू लागा कसे!" राजा म्हणाला.

"माझं म्हणणे खोटं ठरलं नाही. आपण मला कोठे नोकरी दिलीत? माझं ज्योतिष खोटे ठरवायचे असेल तर मला नोकरी द्यावी लागेल. नाही तर ज्योतिषाची गोष्ट आणि मला नोकरी देण्याचा विचार मनात खरोखरच होता तर द्या!" रामशास्त्री म्हणाला.





# डोळे उघडले

एका गावात विठोबा नावाचा एक शेतकरी धान्याचा व्यापार करीत असे. त्याला तिघे भाऊ होते. ते भात शेती करून चार पैसे वाचवीत. त्यांनी थोडे थोडे करून पैसे वाचविले व आणखी शेत विकत घेतले. इतर कोणाचं बरं झालेलं विठोबाला पहावत नसे.

विठोबाकडे कारकुनाचे काम करणारा पांडोबा त्याला म्हणाला—"तुम्ही मला देता तेवढ्या पगारात माझं भागत नाही. मला थोडे कर्ज दिलेत तर मी सुद्धा धान्य-व्यापारात उतरून स्वस्तात धान्य विकत घेईन व ते तुम्हालाच अगदी थोडे कमिशन घेऊन विकीन. तुम्ही ते जास्त किमतीत विकून जेवढा नफा होईल तो घ्या."

ते ऐकून विठोबा त्याला म्हणाला—"काय रे माझ्यासारखे श्रीमंत व्हायचं आहे वाटतं तुझ्या मनात? तू श्रीमंत झालास तर माझ्याकडे कारकुनाचं काम कोण करील रे?"

विठोबाला काय उत्तर द्यावे, पांडोबाला सुचलं नाही. म्हणून तो काहीच बोलला नाही.

एकदा विठोबा व पांडोबा दोघे शेजारच्या गावी धान्याच्या खरेदीला गेले, तेथले काही हमाल त्यांना म्हणाले—"तुम्ही येथेच थांबा, आम्ही शेतकऱ्यांना भेटून धान्याचे भाव ठरवून येतो. आम्हांला तुम्ही एका खंडीला चार रुपये दिलेत तरी पुरतील."

विठोबा हसून म्हणाला—"तुम्ही सुद्धा माझ्यासारखे श्रीमंत व्हायचं ठरविलं आहे वाटतं? ते काही नको. तुम्ही धान्याची पोती, पडावापर्यंत पाठीवर आणून पोचती करा म्हणजे झालं."

[illegible] परंतु [illegible] पैसे सुद्धा कदाचित मिळणार नाहीत असा विचार करून गप्प राहले. विठोबाने चार पडाव भरून धान्य त्या गावात खरेदी केले, ते पडावात घालून पाठीमागून घेऊन यायला पांडोबाला सांगून विठोबा आपल्या गावी परत निघून गेला.

दोन दिवसांनी पांडोबा विठोबाच्या घरी जाऊन डोळ्यात पाणी काढून रडत ओसरीत उभा राहिला. विठोबाने बाहेर येऊन पांडोबाला रडत उभा असलेला पाहून विचारले—"असा कां रे उभा? काय झालं तरी काय?"

"काय बोलू म्हणतां? मी चारही पडावांत धान्य घालून येत होतो. ऐन खोल पाण्यात पोचलो असेन आणि वादळ आलं आणि चारही पडाव बुडाले हो! मुलांचं पुण्य होतं म्हणून मी जिवंत परतलो." पांडोबा म्हणाला.

ते ऐकताच विठोबाच्या मनात 'धस्स' झालं. त्याने कर्ज काढून मोठ्या प्रमाणात व्यापार करावा म्हणून धान्य खरेदी केलं तर सर्व माल पाण्यात बुडून गेला.

तो आपल्या वडील भावंडांकडे गेला आणि त्याच्यावर जो प्रसंग आला होता तो कपाळावर हात आपटून सांगून खाली बसला. ते त्याला म्हणाले—"काय रे, कर्ज



काढून व्यापार करायला आम्ही तुला सांगितलं होतं का? इस्टेटीतला आपला वाटा घेऊन तू काय वाटेल ते कर."

विठोबाने आपल्या वाट्याचे घरदार सर्व विकून कर्ज फेडले आणि स्वतःला दिवाळखोर म्हणून घेतलं नाही, एवढेच.

उभं राहायला जागा नाही अशा स्थितीत विठोबाला पांडोबाने आपल्या घरी आश्रय दिला. विठोबाची बायको "मी कशाला राहू झोपडीत कोणाच्या आश्रयाला?" असे सांगून माहेरी निघून गेली.

"मला चार मुलं आहेत. आता आपण हमाली किंवा मोल मजूरी केल्या शिवाय पोट भरणे शक्य नाही." असे सांगून








पांडोबा विठोबाला बरोबर घेऊन एका गवंड्याकडे गेला. त्या गवंड्याने दोघांना टोपल्या उचलून न्यायचे काम दिले.

विठोबाला ते काम करणे आवडलं तर नाहीच, ते विशेष फायद्याचं सुद्धा वाटलं नाही. म्हणून तो गवंड्याला म्हणाला—"मला सुद्धां गवंड्याचं काम करावंसं वाटतं आहे. मला ते शिकवता का?"

गवंडी हसून म्हणाला—"म्हणजे तू हे काम शिकून माझी बरोबरी करणार आहेस होय? तुला टोपल्या उचलून न्यायचं काम आहे ना रे?"

तेव्हा विठोबाला त्याने असंच उत्तर मागे एकदा दिलं होतं, ते आठवलं आणि त्याचे डोळे उघडले.

काही दिवसांनी ते बांधीत होते ते घर बांधून झालं. विठोबाला कळू दिल्याशिवाय पांडोबाने त्याच्या सासुरवाडी बातमी पाठविली की व्यापारात विठोबाला खूप फायदा झाला; नवीन घर बांधलं आहे. गृहप्रवेशाला विठोबाच्या मंडळींना घेऊन यावे.

[illegible] विठोबाला व त्याच्या बायकोला दोघांना आंघोळ करून यायला सांगून पाटावर बसायला सांगितले. भटजींनी येऊन मंत्रजागर केला. विठोबाच्या नातेवाइकांनी अहेर वगैरे केला.

हे सर्व काय चाललं आहे, हे विठोबाला कळत नव्हते. सर्वांची जेवणे वगैरे आटोपल्यावर पांडोबा विठोबाजवळ बसून म्हणाला—"हे घर तुमचंच. तुमचे पडाव बुडले बिडले नाहीत. तुम्ही तेव्हा मला म्हणाला होतात ते मला फार लागलं. तुमचे डोळे उघडावे म्हणून मी हा सर्व उद्योग केला."

"होय बाबा, कान धरला. तू सुद्धा माझ्या बरोबरीने राहलं पाहिजेस." असे सांगून विठोबाने पांडोबाला व्यापारात झालेल्या मिळकतीतला अर्धा वाटा दिला, विठोबात तो बदल झालेला पाहून त्याच्या वडील भावंडांना सुद्धां आनंद झाला.





# परोपकारी छोटू

रामपूरच्या गावकऱ्यांवर एकदम चोरांची भीती आणि भुतांचे भय अशी दोन संकटे येऊन कोसळली. गावाच्या एका टोकाला एक जुना राजवाडा होता. त्या वाड्यात भुतांनी आपला अड्डा केला आहे, अशी गावात बातमी पसरली. म्हणून काळोख पडल्यावर कोणी घराबाहेर पडण्याचे धाडस करीत नसे. म्हणून तो वाडा चोरांना फार सोयीचा होता.

या दोन संकटांना कसे तोंड द्यायचे या चिंतेत गावकरी असताना छोटू आपल्या कुत्र्याला बरोबर घेऊन त्या गावी आला. छोटूला स्वतःचे गाव नव्हते की नात्यातला कोणी, त्याला आपला म्हणणारा नव्हता. तो गावोगाव हिंडे आणि ज्या गावात तो चार दिवस मुक्काम करी त्या गावातल्या लोकांना त्याच्या कडून होईल ती मदत करून घेत असत. रामपूरचे गावकरी घाबरून गेलेले पाहून आणि आर्थिक दृष्टचाही त्यांचं फार नुकसान होत असलेले पाहून ते गाव सोडून जायला त्याचे मन त्याला सांगेना.

त्याने त्या भुतांच्या वाड्यातच मुक्काम ठोकला आणि संबंध वाडा आत चांगला फिरून पाहिला. वाडा जुनाट होता खरा, परंतु त्यामुळे त्याला किंवा त्याच्या कुत्र्याला एकही भूत दिसलं नाही की त्यांचा त्रास झाला नाही. गावकऱ्यांना भुतांची भीती वाटते आणि चोरांचाही सुळसुळाट आहे तर या दोन्ही मध्ये काही तरी परस्पर संबंध असला पाहिजे असे त्याला वाटले. म्हणून दोन्ही प्रश्न एकदम सोडविता येतात का हे पाहण्याचा त्याने विचार केला.

दुसऱ्या दिवशी तो त्या गावाच्या पाटलाकडे गेला आणि म्हणाला—"चोरांचा समाचार काय तो मी घेतो आणि मी सांगतो तशी गावात दवंडी पिटविण्याची व्यवस्था



करा. काळोख पडल्यावर कोणी घराबाहेर येऊ नये, गावभर मी गस्त घालतो आणि बाहेर कोणी दिसेल त्याला मी चोर समजून पकडतो."

त्या प्रमाणे छोटू आपल्या कुत्र्याला बरोबर घेऊन रात्रभर उजाडेपर्यंत गावात गस्त घालू लागला. रात्री कोणी हिंडताना आढळे त्याला पकडून त्या जुन्या वाड्यात चोर म्हणून कैद करून ठेवी आणि उजाडल्यावर सोडून देई. अशा तऱ्हेने दररोज एक रात्र भुतांच्या वाड्यात दोघां तिघांना रहावे लागे.

छोटूच्या या प्रयत्नामुळे त्या गावातल्या लोकांना दोन तऱ्हेचे फायदे झाले. तो

टाकायची हिमत होईना आणि दुसरा फायदा हा झाला की रात्रभर भुतांच्या वाड्यांत राहून आल्यावर भुते नसल्याची खात्री झाल्याने गावकऱ्यांच्या मनातली भुतांची भीती पार नाहीशी झाली.

तरी छोटू निरपराध लोकांना चोर म्हणून कैद करून ठेवतो अशी काही विघ्नसंतोषी लोकांनी पाटलाकडे तक्रार केली. पाटलाने चवकशी केली तेव्हा छोटू म्हणाला—"गावकऱ्यांच्या मनातून भुतांची भीती काढून टाकण्यासाठी मी हे सर्व करीत आहे. भुतांची भीती गेल्याशिवाय चोरांची भीत जाणार नाही."

तेवढ्याने पाटलाच्या मनाचे समाधान झाले व छोटूने गावातल्या चोऱ्या बंद केल्या याबद्दल त्याची पाठ थोपटली व जाहीर सत्कारही केला.

हे झाल्यावर एके दिवशी रात्री दोघे जण तरुण भुतांच्या वाड्यात छोटूला भेटायला येऊन म्हणाले—"काय हो, तुम्ही गावातल्या सर्व चोऱ्या बंद केल्यात म्हणे घरंदाज संभावित चोराचा बंदोबस्त नाही करणार का?"

घरंदाज संभावित चोर कोण आहे हे कळू तर दे?" छोटूने विचारता त्या दोघांनी त्यांच्या वडिलांचा उल्लेख करून त्यांच्यावर आलेल्या संकटाची गोष्ट सांगितली. त्यांच्या बापाचे नाव गोपू होते. त्याने जिवंतपणी कुलकर्ण्याकडून चार हजारांचे कर्ज काढले आणि कर्ज रोखा लिहून दिला. नंतर त्यांनी सर्व कर्ज फेडले, परंतु कुलकर्ण्याने कर्जरोखा परत दिला नाही. नंतर गोपू काही दिवसांनी मरण पावला. मरताना त्याने मुलांना बोलावून सांगितले की कुलकर्ण्याकडून तो कर्जरोखा परत घ्या.

कुलकर्ण्याने कर्जरोखा गोपूच्या मुलांना परत तर दिला नाहीच, त्याच्या आधारे तो गोपूचे घर बळकावून त्यात राहू लागला. गोपूच्या मुलांना रहायला घर राहिले नाही.

"तुम्ही म्हणता आहां ते खरे की खोटे पहिल्याने पाहून त्या कुलकर्ण्याचा बंदोबस्त मी करतो. तुम्ही जा." असे सांगून त्या दोघां तरुणांना छोटूने घरी पाठवून दिले आणि रात्री गस्तीला निघाल्यावर कुलकर्ण्याच्या घराच्या भिंतीला भोक पाडून ठेवून दिले.

दुसऱ्या दिवशी छोटू पाटलाला घरी भेटून म्हणाला—"तुम्ही एकदा कुलकर्ण्यांना बोलावता का?"

कुलकर्ण्याने आल्याबरोबर छोटूला पाहून विचारले—"काय रे, तू गावातल्या चोऱ्या



सर्व बंद केल्यास, होय ना? काल रात्री आमच्या घराच्या भिंतीला कोणी भोक पाडलं की!"

"ते माणसाचे काम असणे शक्य नाही, कुलकर्णीसाहेब! भुतांचे काम असले पाहिजे." छोटू म्हणाला.

"भुतांचे! तुला कसे कळले रे?" कुलकर्ण्याने विचारले.

"मी भुतांच्या वाड्यात तर राहतो." छोटू म्हणाला.

"होय! पण ती भुते तुला त्रास देत नाहीत का?" कुळकर्ण्याने विचारले.

"त्यांना त्रास दिला किंवा त्यांचा काही अपकार केला तरच ती आपल्याला त्रास

देतात. मी त्यांचे कधी काही वाईट केले तर ना? परंतु दररोज गोपूचे भूत येऊन कोणी तरी त्याच्याशी विश्वासघात केल्याचे मला सांगते. ते तुम्हांला एकदा भुतांच्या घरात बोलावून घेऊन या म्हणाले." छोटू म्हणाला.

कुलकर्ण्यांचे तोंड एकदम फिक्के पडले. त्यांची वाचाच बंद झाली.

"तशी भुते स्वभावाने चांगली असतात! आज रात्री तुम्ही माझ्या बरोबर चला. गोपू तुम्हांला काय म्हणतो ते तुम्ही जरा ऐका." छोटू म्हणाला.

"होय, कुलकर्णी काका! भुतांशी बोलण्याची संधी मिळते आहे, हातची जाऊ देऊ नका," पाटील म्हणाला.

"नको हो! मला तो गोपू गळा दाबून ठारच करील. त्यानेच माझ्या घराच्या भिंतीला भोक पाडले असावे," कुलकर्णी म्हणाला.

"त्याला तुमच्या वर इतका राग असण्याचे कारण हो काय?" पाटलाने विचारले.

पैसे फेडले. परंतु त्याने लिहून दिलेला कर्जरोखा परत करण्याच्या आत तो मरण पावला. मी लोभाला बळी पडून तो कर्जरोखा दाखवून त्याचे घर बळकावले. त्याची मुले उघडी पडली. तो माझ्यावर सूड उगवणार!" कुलकर्णी म्हणाला.

"असं सांगा! तरमग त्याचे घर त्याच्या मुलांना देऊन नुकसान भरपाई म्हणून एक हजार रुपये देऊन मोकळे व्हा! तुमच्या वाटेला जाऊ नकोस म्हणून गोपूच्या भुताला मी सांगतो." छोटू म्हणाला.

कुलकर्ण्याने गोपूकडून लिहून घेतलेला कर्जरोखा पाटलाच्या हवाली केला आणि गोपूच्या मुलांना त्यांच्या घराचा मालकी हक्क सोपवून नुकसानभरपाई म्हणून एक हजार रुपये दिले.

ही गोष्ट घडली त्याच्या दुसऱ्याच दिवशी छोटू आपल्या कुत्र्याला घेऊन रामपूरहून दुसऱ्या गावी पर्यटन करीत निघाला.





# व्यर्थ मानवजन्म

फार पूर्वी तक्षशिला विद्यापीठाचा पाठ्यक्रम संपल्यानंतर आपल्या विद्यार्थ्यांना संबोधन करून एका वृद्ध अध्यापकाने निरोपाचे भाषण करताना असा उपदेश केला—"मानवजन्म हा प्राणिमात्रातला सर्वश्रेष्ठ जन्म आहे. त्याचा दुरुपयोग करता कामा नये. मनुष्य मरण पावला तरी मरणापूर्वी त्याने देशाचे, समाजाचे, इतर नातेवाइकांचे, आणखी काही नाही तर निदान स्वतःचे तरी हित होईल असे करण्याची गरज आहे. परंतु व्यर्थ मरून व्यर्थ जन्मला व मेला असे म्हणवून घेऊ नये."

"गुरुवर्य! व्यर्थ प्राणी कोणाला म्हणावयाचे?" असे एका विद्यार्थ्याने विचारले.

"त्याविषयी मी एक गोष्ट सांगतो." असे सांगून त्या वृद्ध शिक्षकाने ही गोष्ट सांगितली :

"फार पूर्वी सुनंद नावाचा राजा अंगदेशाचा राजा होता. तो एक योग्य राजा असूनही नियती विरुद्ध झाल्याने त्याच्या राज्यात अराजक पसरले. ती संधी साधून त्याच्या शत्रूने त्याच्यावर स्वारी केली.

"तो योग्य खरा व पराक्रमी ही तसाच होता, परंतु त्याला शत्रूबरोबर युद्ध करीत असता राज्यात राहून राजद्रोह्यांशीही दोन हात करावे लागले. परंतु तो हिंमत न हारता प्रयत्न करू लागला. त्याने हातात शस्त्र धारण करू शकणाऱ्या प्रत्येक नागरिकाला सैन्यात भर्ती करण्यासाठी त्याने खूप प्रोत्साहन दिले.

त्याच्या राज्यात दोन निष्णात धनुर्धारि होते. त्यांना सैन्यात भर्ती केले तर फार उत्तम होईल असा सल्ला सेनापतीने राजाला दिला. त्या दोघांना शत्रू ज्या वाटेने येणार त्या वाटेवर झाडांवर बसवून









ठेवले तर ते शत्रूकडील प्रमुख प्रमुख वीरांना निवडून त्यांना बाण मारून ठार करतील, असे सेनापतीला वाटत होते.

राजाचे शिपाई त्या दोघां धनुर्धरांच्या शोधार्थ निघाले. त्या दोघांना ती गोष्ट आधीच कळली होती. त्यांनी विचार केला की राजाच्या सैन्यात भर्ती होऊन राजाची गुलामगिरी करण्यापेक्षा स्वच्छंदपणे रानात राहून शिकार करणे जास्त बरे. त्यांना शिकार खेळण्यात जो आनंद व स्वतंत्रता वाटे ती राजाच्या पदरी नोकरी करून युद्ध करण्यात वाटत नव्हती.

ते दोघे शिकारी राजाच्या शिपायांची नजर चुकवून राजधानीतून पसार झाले आणि अरण्यात निघून गेले. दिवसभर ते खूप भटकले, परंतु जंगलात संध्याकाळ झाली तरी एकही शिकार मिळाली नाही. परंतु काळोख पडू लागला, तेव्हा एक हरणाचे पाडस झाडीत पळतांना त्यांना दिसले. दोघांनी नेम धरून एकदम बाण

असल्या कारणाने ते हरणाचे पाडस तत्क्षण मरून पडले.

नंतर त्या दोघांत, ही शिकार कोणाची या गोष्टीवरून भांडण सुरू झाले. प्रत्येक त्याची शिकार म्हणून तावातावाने सांगू लागला. 'माझाच बाण पहिल्याने लागला, म्हणूनच ते मेले, असे दोघे म्हणू लागले.' आणखी काही वेळ दोघांचे असेच भांडण होत राहिले.

होता होतां दोघांना त्वेष चढू लागला व दोघे हातघाईवर आले. दोघांनी आपापले खंजीर उपसले आणि परस्परांना मारून जागच्या जागी ठार झाले.

वृद्ध आचार्य येथवर कथा सांगून म्हणाले—"ते दोघांचा जन्म व्यर्थ नव्हे का? त्या दोघांनी हे शौर्य जर रणांगणावर दाखविले असते तर देशासाठी राष्ट्रासाठी ते मरण पावले म्हणून अमर झाले असते व त्यांना वीरगती सुद्धां प्राप्त झाली असती."






राम अयोध्येहून वनवासाला निघाला तो चैत्रशुद्ध पंचमीच्या दिवशी. चवथीला, म्हणजे चैत्रशुद्ध चवथीला चवदा वर्षे पुरी होणार होती. त्याच्या दुसऱ्या दिवशी म्हणजे पंचमीच्या दिवशी तो भरद्वाजांच्या आश्रमात येऊन पोचला होता. त्याने भरद्वाज मुनींना प्रणाम केला व म्हणाला—"मुनीश्वर! मी अयोध्या नगरीचा वृत्तांत आपणांस विचारीत आहे. तेथे सर्व सुखरूप आहेत ना? राज्यात सर्वत्र सुख व शांतता नांदत आहे ना? भरत प्रजेचे पालन चांगल्या प्रकारे करतो आहे ना? आमच्या तिन्ही मातोश्री खुशाल आहेत ना?"

भरद्वाजमुनी म्हणाले—"भरताने गेली चवदा वर्षे स्नानसुद्धा केले नाही. सर्व अंग मातीने माखलेले आहे. केस वाढले आहेत आणि त्यात जटा पडल्या आहेत. तुझ्या पादुकांना दररोज नमस्कार करून तो राज्यकारभार चालवीत आहे. तुझ्या येण्याची तो वाट पाहतो आहे. सर्व खुशाल आहेत."

मुनीश्वरांनी रामाला ती रात्र आश्रमातच राहून दुसऱ्या दिवशी पुढे जाण्यास आग्रह केला.

राम हनुमंताला पुढे पाठविण्याचे ठरवून त्याला बोलावून म्हणाला—"तू शृंगवेरपूरला जा आणि तेथे गुह निषादाला भेटून मी विजय मिळून येथपर्यंत आल्याचे सांग. तो माझा आप्तसखा आहे. त्याला ही वार्ता ऐकून फार आनंद होईल. तो



तुला पुढे अयोध्येपर्यंतची वाट सांगेल व भरताविषयी काही महत्त्वाच्या सांगण्यासारख्या गोष्टी असतील त्याही सांगेल. नंतर तू भरताला जाऊन भेट व माझी कुशलवार्ता कळवून मी वनवास पुरा करून सीता व लक्ष्मणाबरोबर परत येत असल्याचे सांग. तू सीताहरणापासून रावणसंहारापर्यंत जे घडले तो वृत्तांत सविस्तर वर्णन करून भरताला सांग. त्याचा त्याच्या मनावर कसा काय परिणाम झाला हे त्याच्या चेहऱ्यावरून तुला कळेल. मी शत्रूचा नाश करून मोठी कीर्ती संपादन करून फार पराक्रमी अशा आपल्या स्नेह्यांबरोबर येत असल्याचे ऐकून त्याच्या मनात कसे विचार उत्पन्न होतात हे लक्षपूर्वक पाहून तू परत आले पाहिजेस. वाडवडिलांनी मिळवून दिलेले राज्य उपभोगायला मिळाले असतां ते सोडण्याचा प्रसंग आला की मन फार दुःखी होते. इतके दिवस त्याने राज्य केले, त्याला आणखी पुढे राज्य करण्याची इच्छा आहे असे वाटल्यास त्यालाच राज्य करू दे! परंतु ते सर्व तू आम्ही अयोध्येच्या जवळ पोचण्यापूर्वी येऊन सांगितले पाहिजेस."

अशी रामाची आज्ञा होताच हनुमानाने मनुष्यरूप धारण केले आणि आकाशमार्गे अयोध्येच्या दिशेने निघाला. तो शृंगवेरपुरला पोचताच गुहाला भेटला व म्हणाला—"रामाने आपली कुशलवार्ता तुला कळवायला सांगितली आहे. आज तो सीता व लक्ष्मण यांच्याबरोबर भरद्वाज आश्रमात रात्रभर राहणार आहे. उद्या सकाळी पुढच्या प्रवासाला निघणार आहे. लौकरच तुझी व रामाची भेट होईल." असा रामाचा निरोप सांगून लगेच आकाशमार्गे हनुमान नंदिग्रामी पोचला.

नंदग्रामाच्या चारी बाजूला वृक्षवनस्पती खूप होते. नंदनवनाला लाजविणारी त्यांची शोभा होती. तेथून अयोध्या दोन घटकांच्या वाटेवर होते. तेथे भरत एक आश्रम बांधून अजिनवस्त्रे धारण करून होता. [illegible] पूर्ण झाली तरी राम अद्याप आला कसा नाही, या गोष्टीच्या विचारात तो गढून गेला होता. सर्वांग धुळीने व मातीने माखलेले होते. जटा वाढलेल्या होत्या. तो फक्त कंदमुळे व फळेच खात होता. त्याच स्थितीत तो मंत्र्यांशी, राजपुरोहितांशी व सेनापतीशी मंत्रणा करीत असे आणि राज्यकारभार पहात असे. त्याच्या हाताखाली काम करणारे सर्व अधिकारी भगवी वस्त्रे धारण करूनच सर्व कामे करीत असत.

हनुमानाने भरताला भेटल्याबरोबर प्रणाम केला व म्हणाला—"रामाने तुला आपली कुशलवार्ता कळवायला सांगितले आहे. तुझ्या मनातले दुःख व औदासिन्य दूर करण्यालायक एक वार्ता सांगतो. लौकरच तुझी व रामाची भेट होईल. रामाने रावणाचा वध केला आणि सीतेची प्राप्ती करून इच्छिलेली कामे पूर्ण झाल्यावर तो आपल्या महापराक्रमी मित्रांसमवेत आणि सीता व लक्ष्मणाबरोबर येत आहे."

ती शुभवार्ता ऐकून आनंदातिरेकाने भरत बेशुद्ध होऊन पडला. शुद्धीवर आल्यावर तो हनुमानाला म्हणाला—"बाबा रे! तू किती सुखवार्ता घेऊन आलास? तू माणूस आहेस की देव आहेस मला माहीत नाही. तुला ही शुभवार्ता आणल्याबद्दल



मी एक लक्ष गाई, शंभर गांवे, सर्व वस्त्राभरणे आणि चवदा सुंदर कन्या तुला बक्षिस म्हणून देतो."

नंतर भरताने विचारल्यावरून हनुमानाने चित्रकूट सोडल्यापासून घडलेल्या सर्व गोष्टी सविस्तर त्याला सांगितल्या.

तो वृत्तांत ऐकून भरताला परमानंद झाला. तो शत्रुघ्नाला म्हणाला—"सर्व पुरुषनागरिकांना स्नान करून पवित्र होऊन राजधानीत जेथेजेथे चौक चौरस्ते आहेत त्यांतील मंडपांतील सर्व देवांना सुगंधी फुले वाहून त्यांची आरास करायला आणि वाजंत्री वाजवून त्यांची यथायोग्य पूजा करायला सांग. रामाला सामोरे जाण्या-





साठी सर्व मंगलवाद्ये वाजवीत चारण व भाट यांना चलायला सांग. सर्व प्रजेने वाजत गाजत रामाच्या स्वागतासाठी गेले पाहिजे.

शत्रुघ्नाने सहस्त्रावधी नोकरवर्गास बोलावून त्यांना कामे सांगितली. म्हणाला–"तुम्ही नंदीग्रामापासून अयोध्येपर्यंतची वाट स्वच्छ करा. कोठेही खाचखळगे किंवा झाडेझुडपे असतां कामा नयेत. काही जणांनी रस्त्यावर थंडगार पाणी शिंपडून त्यावर फुले घालून ठेवावी. उजाडायच्या आत अयोध्येतील सर्व राजमार्ग, रस्ते व गल्लया व घरे तोरणे व पताका बांधून सजवून तयार झाली पाहिजेत. आयो-

पडला पाहिजे. हळद, कुंकू, शेंदूर गुलाल इत्यादींच्या दुतर्फा रांगोळया घालून सर्व रस्ते सजवून ठेवा."

सर्व रणिवास, मंत्री, सेनापती, सैनिक त्यांच्या स्त्रिया, ब्राह्मण, क्षत्रिय, गणनायक सर्व रामाच्या स्वागतासाठी अयोध्येहून निघाले. काही लोक हत्तींवर तर काही जण रथात बसून निघाले. सैनिकांच्या हातात निरनिराळ्या प्रकारची शस्त्रास्त्रे होती. धृष्टी, जयंत, विजय, सिद्धार्थ, अर्थसाधक, अशोक, मन्त्रपाल आणि सुमंत्र नावाचे मंत्री निघाले. दशरथाच्या राण्या रथात बसून आधीच नंदीग्रामी येऊन पोचल्या.

भरताने रामाच्या पादुका डोक्यावर उचलून घेतल्या आणि रामाच्या स्वागतार्थ निघाला. त्याच्याबरोबर ब्राह्मण, व्यापारी, प्रमुख नागरिक व स्तोत्र पाठ करणारे निघाले. भरताबरोबर राजचिन्हे–छत्र, चामर व सुवर्णाचा राजदंड होता.

बराच वेळ झाला तरी राम येत असलेला समोर न दिसल्यामुळे आतुरमनाने भरताने हनुमानाला विचारले–"माकडचेष्टा करण्याच्या हेतूने राम येतो आहे असे तू सांगितलेस का रे? राम तर येत असलेला दिसत नाही."

...नी रामाला व सहस्त्रावधी वानरांना फार मोठी मेजवानी दिली. त्यांच्या आश्रमातली सर्व झाडे फुलांफळांनी वांकलेली आहेत. वानर ती पाहून भुरळून गेले. त्यांचा आवाज तुम्हांला ऐकू येत असेल. आतां ते गोमती नदी पार करून येत असावेत असे वाटते आहे आणि ते पहा, पुष्पकविमान! दूर आकाशात दिसत आहे. हे कुबेराचे विमान आहे, यात राम बसून येत आहे. त्याच्याबरोबर सीतामाता, लक्ष्मण, वानरांचा राजा सुग्रीव आणि राक्षसांचा राजा बिभीषण आहेत."हनुमानाने या शब्दात भरताच्या मनाचे समाधान केले. त्या पाठोपाठ "तो पहा राम आला!"

या आवाजाने सर्व आसमंत दुमदुमले. रामाच्या दर्शनाला आलेले सर्व लोक आपापल्या वाहनावरून खाली उतरले.

राम तर आलाच, त्याच्या समोर उभा राहून रामाला साष्टांग प्रणिपात करून भरत म्हणाला–"तू वचन दिल्याप्रमाणे आपले वचन पालन करून आम्हां सर्वांना आनंदित केलेस."

रामाने भरताला विमानात चढायला हात पुढे करून चढविले. भरत सर्व वानरवीरांना प्रेमाने भेटला. तो सुग्रीवाला म्हणाला–"तू आम्हां चार भावंडांचा पांचवा भाऊ झालास. उपकारकर्ता बंधू होतो. नंतर बिभीषणाला म्हणाला–"तू आम्हाला फार फार सहाय्य केलेस!"





शत्रुघ्नाने रामलक्ष्मणांना प्रणाम केला व सीतेच्या पाया पडला. राम मातेला भेटला व तिच्या पायां पडला. नंतर त्याने सुमित्रा, कैकेयी आणि वशिष्ठमुनींना नमस्कार केला. सर्व नागरिकांनी अत्यंत उत्साहाने रामाचे स्वागत केले.

भरताने रामाच्या पादुका स्वतःच्या हाताने रामाच्या पायात घातल्या. तो रामाला म्हणाला—"इतके दिवस मी तुझ्या राज्याचा सांभाळ केला, आतां हे मी तुला तुझ्या हाती देत आहे. तू परत अयोध्येला आल्याचे प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहण्याचे पुण्य मला लाभले. माझा जन्म सार्थक झाला. माझी सर्व इच्छा पूर्ण झाली."

आला होता. तो विमानातून उतरला आणि विमानाला परत कुबेराकडे जायला अनुज्ञा दिली.

रामराज्याभिषेकाचा मुहूर्त ठरला. राम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न सर्व भावंडांनी क्षौर करविले. भरत, लक्ष्मण, सुग्रीव, बिभीषण आणि रामाने क्रमाने सर्वांनी मंगलस्नाने केली. राम पुष्पमाला धारण करून, स्वच्छ पीतांबर नेसला आणि सिंहासनावर बसला. शत्रुघ्नाने राम, लक्ष्मण व भरताला, पुष्पहार, केयूर व इतर आभूषणे घातली. दशरथाच्या राण्यांनी सीतेला वस्त्राभूषणे घालून तिला तयार केले.

सुमंत्र नावाचा सारथी रामासाठी रथ तयार करून घेऊन आला. राम त्यात बसला. सुग्रीव, हनुमान स्नानाहि आटोपून, व सुंदर वस्त्रे परिधान करून अयोध्येला निघाले.

दशरथाचे सर्व मंत्री आधीच पुढे अयोध्येला गेले. त्यांनी वशिष्ठमुनींचा सल्ला घेऊन राज्याभिषेकाची सर्व तयारी केली.

रामाने प्रजेला, सुग्रीवाने कशी मदत केली व त्यामुळे त्याची मैत्री कशी वाढली, हनुमानाने किती सहाय्य केले व तो कसा

महाबला आहे, वानरांनी युद्धात कसा पराक्रम गाजविला आणि बिभीषण रावणाला सोडून आपल्या बाजूला येऊन कसा मिळाला, हे सर्व सांगितले. प्रजेला ते सर्व ऐकून आश्चर्य वाटले. रामाने दशरथाच्या महालात प्रवेश केला. रामाच्या महालात अंत:पुर व उद्यानात सुग्रीव व त्याच्या परिवाराची उतरण्याची व्यवस्था करण्यात आली.

सुग्रीवाने चार सुवर्णकलश चार वानर-प्रमुखांना देऊन आज्ञा केली–"उद्या सूर्योदयाच्या आधी तुम्ही चारही समुद्राचे जल भरून येथे अभिषेकाच्या वेळी हजर झाले पाहिजे."

जांबुवान, हनुमान, वेगदर्शी व ऋषभ कलश घेऊन पांचशे नद्यांचे पाणी घेऊन आले. त्याचबरोबर चारही समुद्रांचे पाणी सुद्धा घेऊन आले.

त्यानंतर शास्त्रोक्त पद्धतीने रामाचा राज्याभिषेक मोठ्या थाटामाटाने झाला.

...विण्यात आले. मंत्र्यांनी रामाचा अभिषेक केला. त्यानंतर ऋत्विजांनी, ब्राह्मणांनी, कन्यांनी व नागरिकांनी आणि एकामागून एक वीर पुरुषांनी रामाचा अभिषेक केला.

रामाच्या डोक्यावर शत्रुघ्नाने शुभ्र छत्र धारण केले. सुग्रीवाने चामर हाती धरले. बिभीषणाने दुसरे एक चामर हाती धारण केले.

आपल्या राज्याभिषेकाच्या शुभप्रसंगी रामाने ब्राह्मणांना सवत्स गोदान, सुवर्णदान व वस्त्रदान केले. त्याने सीतेला एक मोत्यांचा हार दिला व म्हणाला–"तुला वानरांपैकी जास्त चांगला वाटेल त्याला तो तू दान कर." सीतेने तो हनुमानाला लगेच दिला. त्यानंतर रामाने इतर वानर प्रमुखांना पारितोषिके वाटली.

बिभीषण लंकेला परत गेला. त्यानंतर रामाने भरताला युवराज म्हणून मानून राज्यकारभार पहायला सुरवात केली.





# चांदबीबी

चांदबीबी ही अहंमदनगरच्या सुलतान हुसन निझाम शाह (१५५४-१५६५) याची मुलगी. ती अत्यंत रूपवती होती. तिचे सर्व बालपण जनानखान्यातच गेले असूनही तिची हुषारी, शौर्य व साहस त्या पोरवयात स्पष्ट दिसू लागले.

सोलापूर शहरावर कोणाचा अधिकार असावा यावरून अहंमदनगर आणि विजापूरच्या सुलतानांचे परस्परांशी वैर वाढू लागले. परंतु ते वाढत राहणे कोणाच्या हिताचे नाही असा विचार करून अहंमदनगरच्या सुलतानाने आपली मुलगी चांदबीबी हिचा विवाह विजापूरचा सुलतान आदिलशहा याच्याशी करून दिले व हुंडा म्हणून सोलापूरनगरही देऊन टाकले.





सुलतान आदिल शाह याचा १५८० मध्ये खून झाला. त्याला मूलबाळ नव्हते, म्हणून नऊ वर्षे वयाचा इब्राहिम नांवाचा त्याचा पुतण्या सुलतान झाला. चांदबीबी त्या मुलाच्या वतीने त्याची संरक्षिका म्हणून राज्यकारभार पाहू लागली. तिचा कारभार पाहून सर्व तिच्या हुशारीची वाखाणणी



परंतु लोभी सरदारांना चांदबीबीची कारकीर्द आवडली नाही. कारण प्रजेकडून पैसा उकळणे त्यांना शक्य होत नव्हते. त्यांनी लहानग्या सुलताना-बरोबर चांदबीबीचा खून करण्या-साठी कारस्थान रचले. ते कळतांच चांदबीबी तिच्या संरक्षणात असलेल्या सुलतानासह आपल्या माहेरी, अहमद-नगरला निघून गेली.

त्या वेळी चांदबीबीचा भाऊ मूर्तजा अहंमदनगरचा सुलतान होता. तो अगदी सरळ व भोळाभाबडा होता. त्याच्या हुसेन नावाच्या मुलाच्या हाती त्याचा खून झाला. हा हुसेन फार क्रूर होता. म्हणून सरदारांनी बंड केले व त्याचा खून करून त्याच्या धाकटया भावाला सुलतान केले. ह्या सर्व दुर्दैवी घटनांमुळे चांदबीबीला फार काळजी वाटू लागली.





अहंमदनगर राज्यात चालू असलेल्या या अराजकतेच्या बातम्या दिल्लीचा मोंगल बादशाह अकबर याच्या काना-पर्यंत पोचल्या. अहंमदनगर जिंकण्यास हीच उत्तम संधी आहे असा विचार करून अकबराने मोंगलांचे एक मोठे सैन्य अहंमदनगरावर स्वारी करण्या-साठी पाठविले अहंमदनगरच्या सैन्यात हुशार सेनापती नसल्याचे कळल्यावर

आणि पहिल्याने त्याचे बुरूज पाडा-यला सुरवात केली. बुरुजांचे रक्षण करण्यासाठी व मोंगलांचे सर्व बेत हाणून पाडण्यासाठी चांदबीबीने शिकस्तीचे प्रयत्न केले. तरी मोंग-लांचे सैन्य फार मोठे होते व एक बुरूज फोडण्यात ते यशस्वी झाले. परंतु सूर्यास्ताची वेळ झाल्यामुळे ते किल्ल्यात प्रवेश करू शकले नाही.





चांदबीबीने प्रसंग ओळखला आणि किल्ल्यात स्त्रीपुरुष जितके होते. त्यांची मदत घेऊन रात्रीच्या रात्री मोडलेला बुरूज पुन्हा बांधून काढला आणि पुन्हा किल्ल्याच्या रक्षणार्थ सैन्य उभे केले.

सकाळी मोंगल जागे झाल्यावर पाह-तात तर बुरूज पुन्हां पहिल्यासारखा भक्कम उभा होता. शिवाय चांद-बीबीने मोक्याच्या जागी तोफा आणून उभ्या केलेल्या त्यांना दिसल्या.





तरी उजाडल्यावर मोगल सैन्याने पहिल्यापेक्षा जोराने किल्ल्यावर हल्ला चढविला. काही वेळ युद्ध झाल्यावर चांदबीबीला किल्ल्यातला दारूगोळा संपत आल्याचे कळले. तिने किल्ल्यातले सोने, चांदी व तांब्याची नाणीच नव्हे तर दागिने सुद्धा वितळवून त्याचे गोळे तोफेत घालून शत्रूवर तोफांचा भडिमार केला.



मोंगलांचा आणखी एक प्रयत्न अयशस्वी झाला. त्यांच्या सैन्याचे फार मोठे नुकसानही झाले. आतां किल्ला जिंकणे अशक्य आहे, असे समजून मोंगलांचा सेनापती चांदबीबीशी तहाच्याची बोलणी करून परत निघून गेला.



चांदबीबी जिवंत असेपर्यंत अहंमदनगर जिंकणे अशक्य आहे, असे मोंगलांना वाटले. तरी आणखी काही काळ लोटल्यावर एका मोठ्या सैन्यानिशी मोंगलांनी किल्ल्याला वेढा दिला. युद्ध सुरू झाले त्याच वेळी किल्ल्यातल्या काही विरोधी लोकांनी चांदबीबीचा खून केला. तोपर्यंत भारतात शूर वीर नारीपैकी एक प्रमुख म्हणून चांदबीबीचा

# गोष्ट मथळा चढाओढ

## या गोष्टीला उत्तम मथळा सुचवून रु. २५ मिळवा !

?

एका गावातले चार जण तीर्थयात्रेस निघाले. त्यांच्यापैकी एक जण फार मोठा गप्पिष्ट होता. ते दिवसभर पायी प्रवास करीत आणि रात्री कोणाच्या तरी पडवीत नाही तर ओट्यावर झोपत. एके दिवशी ते रामपूर गांवी गौरी नावाच्या एका बाईच्या ओट्यावर झोपले.

दुसऱ्या दिवशी ते आणखी एका गावी पोचले. त्या गावातल्या लक्ष्मी नावाच्या बाईला भेटून म्हणाले–"बाई ! आम्ही तीर्थयात्रा करीत या गावी आलो आहो. तुमच्या घराच्या पडवीत झोपायला परवानगी देता का ?"

लक्ष्मीने त्यांना तशी परवानगी तर दिलीच. त्याच बरोबर तिने त्यांना पांघरायला घोंगडी व प्यायला पाणी आणून दिले.

ते पाहून तो गप्पिष्ट प्रवासी म्हणाला–"बाई ! तुमच्या सारखी सुशील बाई क्वचित पहायला मिळते. रामपूरच्या गौरीबाईंनी पडवीत पडून रहायला भाडे वसूल केले होते हो !"

गौरी लक्ष्मीची मोठी बहीण होती. म्हणून ती म्हणाली–"तरमग गौरीची पडवी सोन्याची होती वाटते आणि माझी तेवढी मातीची आहे का ? तुम्ही तिला दिलेत तेवढे भाड्याचे पैसे मलासुद्धा द्या." असे सांगून तिने त्यांच्याकडून भाड्याचे पैसे वसूल केले.

★ ★ ★

वरील गोष्टीला उपयुक्त होईल असा एक सुंदर मथळा विचार करून एका कार्डावर स्वतःच्या पत्त्यासह लिहून "गोष्ट मथळा चढाओढ", 'चांदोबा', चंदामामा प्रकाशन, २ व ३ अर्काट रोड, वडपळणी मद्रास ६०००२६ या पत्त्यावर पाठवा.

१० जानेवारी १९७८ च्या आत पोस्टकार्ड पोंचले पाहिजे. त्या कार्डावर 'फोटो चढाओढ परिचय' देता कामा नये.

चढाओढीचा निकाल मार्च १९७८ च्या चांदोबात जाहीर करण्यात येईल.

---

नोव्हेंबर महिन्यातल्या चढाओढीचा निकाल (मथळा) "अनुनभवी"

नांव : जयंत नारायण आठल्ये, मु. पो. राजापूर, जि. रत्नागिरी



# अमरवाणी

भूयो विनय मास्थाय
भव नित्यं जितेन्द्रियः
कामक्रोधसमुत्थानि
त्यजेथा व्यसनानि च ॥ १ ॥

[ तू नम्रपणे व इंद्रियनिग्रह करून रहावेस आणि काम, क्रोध आदि षड्रिपूंमुळे उत्पन्न होणाऱ्या व्यसनांचा त्याग केला पाहिजेस. ]

परोक्षया वर्तमानो
वृत्या प्रत्यक्षया तथा,
अमात्यप्रभृती स्सर्वाः
प्रकृतिश्चानुरंजय ॥ २ ॥

[ तू प्रत्यक्षपणे किंवा परोक्षपणे अमात्यादिकांस आज्ञा देत प्रजेला संतुष्ट ठेवीत रहा. ]

तुष्टानुरक्त प्रकृति यः
पालयति, मेदिनम्
तस्य नंदंति मित्राणि
लब्धामृत मिवामराः ॥ ३ ॥

[ प्रजेला संतुष्ट ठेवून जो पृथ्वीवर राज्य करतो त्याला भेटल्यावर त्याच्या मित्रांना, देवांना अमृतप्राप्तीच्या वेळी जसा आनंद झाला तसा आनंद होतो. ]



# कावळा आणि घुबड

[ ५४ ]

रक्ताक्ष सापाची गोष्ट सांगून म्हणाला– "आपण स्थिरजीवीचा वध करून वडाचे हे राज्य काबीज करून येथे निर्भयपणे राहू या."

त्यानंतर अरिमर्दनने क्रूराक्षाचे मत विचारले. क्रूराक्ष म्हणाला–"मला रक्ताक्षाचा सल्ला मुळीच मान्य नाही. आपल्याकडे आश्रय मागायला आलेल्या असहाय्य कावळ्याचा वध करणे मला मुळीच कबूल नाही. आपल्याला शिबि राजाची गोष्ट माहीत नाही का? दोघां पक्ष्यांची गोष्ट ऐकली नाही का?"

"ती कोणती बुवा गोष्ट?" अरिमर्दनने विचारले.

तेव्हा रक्ताक्षने गोष्ट सांगितली.

प्राचीनकाळी शिबी नावाचा एक मोठा दयाळू व प्रजावत्सल राजा होता. तो एक चक्रवर्ती राजा होता व कित्येक मांडलिक राजे त्याच्या दरबारात होते. तो दानशूर ही होता. त्याची कीर्ती देवलोकापर्यंत पोचली. इंद्र विचार करू लागला–"शिबीसारखा दानवीर कोणी नाही म्हणतात. परंतु इतका दानधर्म करण्यात त्याचा हेतू काय बरे असेल? फक्त कीर्तीलाभ व्हावा म्हणून हा दानधर्म करीत असावा की खरोखरी निरुपद्रवी व असहाय्य लोकांविषयी कीव वाटल्याने हा दान करतो?"

त्या शंकांचे निरसन व्हावे यासाठी त्याने यमाला बोलावणे पाठविले आणि दोघांनी मिळून एक योजना आंखली.

एके दिवशी राजा शिबी स्नानसंध्यादी आटोपून दरबारात येऊन बसला. तेव्हा इंद्र एका कबूतराचे रूप घेऊन राजोद्यानात



उडत फिरत राजाच्या दरबारात आला. यम ससाण्याचे रूप घेऊन त्याचा पाठलाग करीत त्याच्या पाठोपाठ आला. दमल्यामुळे धापा टाकीत घाबरून गेलेले कबूतर घाबऱ्या डोळ्यांनी शिबि राजाकडे पहात त्याच्या पायांवर येऊन पडले व म्हणाले–"राजा! मी तुझ्या आश्रयाला आलो आहे. या ससाण्याच्या हातून मला वाचव."

पाठोपाठ ससाणा आलाच होता. म्हणाला–"राजा, मी उपाशी आहे. माझे खाद्य तू हिरावून घेऊ नकोस."

"महाराज! आपल्या आश्रयाला आलेल्याचे रक्षण करण्याची जबाबदारी आपल्यावरच आहे." कबूतर म्हणाले.

"राजा! मी ऐकतो की आपल्याकडे जो कोणी येऊन भीक मागतो त्याला आपण ती देतां! हे कबूतर माझा आहार आहे. मला खायला मिळाले नाही तर मी मरेन." ससाणा म्हणाला.

राजा म्हणाला–"शहाणे, समजूतदार लोक आश्रयाला आलेल्या प्रत्येकाचे रक्षण करतात. मी माझ्याकडे जेवढे मांस शिजून तयार आहे ते सर्व द्यायला तयार आहे. तुम्ही त्या कबूतराला सोडा."

ससाणा म्हणाला–"इतर कोणी शिकार करून मारलेल्या प्राण्याचं मांस ससाणे खात नसतात. जिवंत प्राण्याचेच मांस आम्ही भक्षण करतो. म्हणून आपण या कबूतराच्या वजनाचे आपले मांस काढून दिलेत तर आम्हांला मान्य होईल व मी कबुतराला सोडून देईन."

ते मला मान्य आहे. मी आपले मांस देतो." असे सांगून राजाने आपल्या खजिन्यातून तराजू आणायला आज्ञा केली.

ते ऐकून सभेत हजर असलेले मांडलिक राजे व दरबारी भयभीत होऊन म्हणाले–"महाराज! हा ससणा आपला जीव घेण्यासाठी आलेला कोणी राक्षस असावासा वाटतो." परंतु राज्याने त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले.

तेवढ्यात तराजू आणण्यात आला होता. राजाने एका पारड्यात कबुतराला ठेवले व आपल्या मांडीचे मांस कापून दुसऱ्या पारड्यात टाकले. तरी कबुतराचे पारडे खालीच राहिले. नंतर राजा स्वतःच त्या पारड्यात बसला. तो अपूर्व त्याग पाहून देव दुंदुभी वाजवू लागले व आकाशातून पुष्पवृष्टी होऊ लागली. आकाशवाणी झाली–"शाबास! शाबास!"

त्या पाठोपाठ इंद्र व यम स्वस्वरूपात प्रगट होऊन म्हणाले–"राजा! तुझा त्याग अपूर्व आहे. तुझे प्राणिमात्रावरचे अपूर्व प्रेम आम्ही प्रत्यक्ष पाहिले. तुला एकट्याला सत्याची पारख आहे. तुझं शरीर पूर्ववत होवो!" असे सांगून दोघे अंतर्धान पावले.

**आत्मार्पण करणाऱ्या पक्ष्याची गोष्ट**

एक पारधी जाळे टाकून पक्षी पकडण्यासाठी वाट पहात बसला होता, त्याच वेळी वादळ येऊन पाऊस पडला व पारधी ओलाचिंब झाला आणि एका झाडाखाली आसऱ्याला जाऊन बसला.

त्या झाडावर एक पक्ष्यांचे जोडपे बसले होते. मादी कोठेतरी बाहेर गेली होती. नर मादीची काळजी करीत होता. इतक्यात मादी परतली. तिला दीन स्थितीत बसलेला पारधी दिसला. पारध्याने त्या पक्ष्यांना भुकेने व थंडीने त्याचा जीव कासावीस झाल्याचे सांगून वाचवायला सांगितले.

नर पक्ष्याने आपल्या घरट्यातून पाने व काटक्या खाली टाकून त्यांची शेकोटी तयार केली आणि पारध्याला हात शेकून घ्यायला सांगितले. पारधी म्हणाला–"आपल्या उपाशी अतिथीला खायला काही नसलेले पाहून नर पक्षी विस्तवात उडी घेत म्हणाला–"मला खाऊन आपली भूक मिटव."

"आपल्या पतीशिवाय मी कशी जिवंत राहू शकेन?" असे म्हणत मादीने त्या आगीत उडी टाकली. त्या आत्मत्यागी पक्ष्यांना न्यायला स्वर्गातून सुवर्ण रथ आला.

ते दृश्य पाहून पारध्याच्या मनात बदल झाला. त्याने पक्ष्यांचे मांस खायचे सोडले आणि जंगलातून जात असतां दावानल पाहून त्यात उडी टाकली व देहत्याग केला.



# १९२. समुद्राने निर्मिलेली गुहा

या चित्रातली गुहा अॅल्यूशियन द्वीपसमूहातील टनगा नावाच्या बेटावरची आहे. फार प्राचीन काळी सत्ययुगात अग्निपर्वत फुटून लाव्हा वाहून ७० फुटाचा हा थर जमला. तो थंड झाल्यावर तो आकुंचन पावून त्याला भेगा पडल्या. त्यानंतर सहस्रावधी वर्षांनी समुद्राच्या लाटांचे धक्के खाऊन ही गुहा झाली. ही ७५ फुट खोल आहे.





# माया सरोवर

[ २४ ]

[हंसरथावर हल्ला चढवायला आलेल्या अलवृक राक्षसाचा समाचार घ्यायला जाऊन जयशील व त्याच्या अनुयायांनी त्यांना ठार केले. मायासरोवरेश्वर, राजकुमारी कांचनमाला रथातून अरण्यात पडले त्या जागी पांढरा धूर वर येत आहे हे पाहून सर्व त्या दिशेला निघाले. पुढे–]

हंसरथ उलटला त्यावेळी त्यातून माया-सरोवरेश्वर, कांचनमाला व सारथी घसरून खाली पडले. परंतु ते जंगलात एकाच जागी पडले नाहीत, निरनिराळ्या जागी पडले. मायासरोवरेश्वर जेथे पडला तेथे त्याला एक विचित्रच अनुभव आला.

तो पडला त्या जागी नरभक्षक जातीचे लोक रहात होते. त्या जातीच्या लोकांना गेला एक आठवडाभर एकही जनावर शिकारीला मिळाले नव्हते. कारण दूर रानातून वाघांच्या धाडी त्या प्रदेशावर गेले काही दिवस होत होत्या. म्हणून त्या प्रदेशातली जनावरे आपल्या बिळातून गुहा वगैरे अगर दडण्याच्या जागेतून बाहेर उघड्यावर येत नव्हती. जी हरणे व इतर निरुपद्रवी प्राणी उघड्यावर आले त्यांचा पाठलाग करून वाघांनी त्यांचा फडशा उडविला होता. ती शिकार करीत असतांना



ते वाघ ज्या डरकाळ्या फोडीत त्या ऐकून सर्व जनावरे शेजारच्या डोंगरापलीकडे पळून गेली होती.

नरभक्षक जातीच्या नायकाचे नाव बिबळ्या होते. त्याला त्याच्या काही विश्वासपात्र अनुयायांकडून त्याच्या जातीतले बरेच लोक ती वस्ती सोडून दूर पळून जायच्या विचारात असल्याचे कळले. त्याला त्या गोष्टीबद्दल फार वाईट वाटले. कारण त्या जातीचे पूर्वज त्याच जागी जन्मले आणि वाढले होते आणि त्यांनी त्या जागी आपली वस्ती कायम केली होती. तेव्हा आपले अनुयायी वस्ती सोडून पळून गेले तर त्याचे सर्व पाप आपल्या डोक्यावर येणार असे त्याला वाटले. शिवाय लांब पारंब्या असलेल्या वडाच्या झाडाखालच्या देवीचा आपल्यावर कोप होईल असेही वाटले. त्या देवीला दरवर्षी एक नरबली देऊन तिचा प्रसाद त्या जातीच्या लोकांना देण्याचा प्रघात कित्येक पिढ्या चालू होता.

बिबळ्याने असा विचार करून काय वाटेल ते करून आपल्या अनुयायांनी वस्ती सोडून जाऊ नये असे काही तरी करण्याचे ठरविले. त्यासाठी देवीने त्याला आवश्यक शक्ती देण्याची कृपा करावी अशी देवी-जवळ प्रार्थना करण्यासाठी तो त्या देवीच्या देवळाकडे धावला.

ते देऊळ फार जुने होते. त्याला दरवाजा वगैरे काही नव्हते. पावसाळ्यात वाऱ्यापावसापासून स्वतःचे रक्षण व्हावे यासाठी जंगली जनावरे आसऱ्यासाठी त्या देवळात येऊन बसत.

त्या दिवशी बिबळ्याने सूर्योदयाच्या वेळी त्या पडक्या देवळात एक अद्भुत दृश्य पाहिले. त्या देवीसमोर एक मोठा अजगर एका लांडग्याला विळखा घालून गिळण्याच्या खटपटीत होता आणि लांडगा त्या अजगराचे तोंडच आपल्या जबड्यात धरून बसला होता. दोघांची खटपट स्वतःचा जीव वाचविण्यासाठी चालू होती.

ते दृश्य पाहून बिबळ्याचे सर्व अंग आपादमस्तक थरारले. तो पळून जाण्याचा विचार करू लागला. तरी साहस करून त्याने देवीला साष्टांग नमस्कार केला आणि उठून उभा राहून म्हणाला–"देवी, तुझा महिमा विचित्र आहे. आम्ही तुझे सर्व भक्त, गेला एक आठवडा उपाशी आहो आणि आमच्यावर तुझी कृपा झाली नाही. हे अद्भुत दृश्य दाखवून तू आम्हांला कोणत्या गोष्टीची आज्ञा देत आहेस?".

ते विचारल्यावर एका क्षणार्धात देव-ळाच्या भिंतीतील दगडाच्या खाचीतून एक रानमांजर तोंड बाहेर काढून ओरडले–"म्यांव, म्यांव!"

"हे तर आणखीच जास्त अद्भुत! याचा गूढ अर्थ म्हाताऱ्या मांत्रिकालाच माहीत असणार!" असे म्हणत बिबळ्या त्याच्या जातीचे लोक जेथे जमा झाले होते तिकडे धावला.

त्यावेळी त्या नरभक्षी जातीचे स्त्रीपुरुष व मुलेबाळे एका उघड्या जागेवर जमा होऊन जंगलातली कंदमुळे व फळे खाऊन जगता येईल का या गोष्टीचा विचार करीत त्यासाठी खटपट करण्या ऐवजी परस्परांशी भांडायला तयार झालेले दिसले.

बिबळ्या धावत येऊन ओरडला–



आपला मांत्रिक देवीचा पुजारी कोठे आहे?"

सर्वांची नजर त्यांच्या नायकाकडे वळली. त्याचा आवाज ऐकून त्यांना वाटले की देवीच्या देवळासमोर हरणांचे कळप किंवा रानडुकरे येऊन बसली असावीत. काही तरुण उभे राहून विचारू लागले–"सरदार! देवीच्या देवळात हरणे आणि रानडुकरे जमा झाली आहेत का? आम्ही तीर कमान व भाले घेऊन येऊ का? कदाचित देवानेच आपल्या भक्तांवर अनुग्रह करून या जनावरांना पाठविले असणार! चला, तर तिकडे आपण सर्व



नायकाने मांत्रिक कोठे दिसतो का पाहण्यासाठी एकदा नजर फिरवून पाहिली. परंतु तो कोठे दिसला नाही म्हणून ओरडला–"मूर्ख आहात! मी तुम्हांला काय विचारले आणि तुम्ही काय बडबडता आहा? पुजारी, मांत्रिक कोठे आहे? मी देवळात जे दृश्य पाहिले त्याचा अर्थ त्याला विचारावयाचा आहे. त्याला हुडकून घेऊन या!"

मांत्रिक त्या वेळी दूर एका झाडाखाली उपाशी मरगळलेल्या स्थितीत डुलक्या घेत बसलेला होता. मुलांनी येऊन त्याला सांगितल्यावर नायकाने त्याच्याजवळ जाऊन सांगितले व म्हणाला–"मांत्रिक! या दृश्याचा काय अर्थ हो? याचा अर्थ असा तर नाही की देवीचा अनुग्रह आपल्यावर झाला आहे आणि आतां आपणा सर्वांना पोटभर खायला मांस मिळणार आहे?"

मांत्रिकाने त्या सर्व गोष्टीकडे दुर्लक्ष केले व म्हणाला–"आपल्या जातीचा मी मांत्रिक आहे व माझे केस पांढरे झाले ते फुकटाफुकटी उन्हात पांढरे झाले नाहीत. आपली देवी असे काही स्पष्ट कधीच सांगत नाही. सर्व गूढच असते, मला असे वाटते की आपल्या जातीच्या लोकांनी इतर रानटी जातीच्या लोकांसारखे, खाण्यालायक जे मिळेल ते खाण्याची संवय केली पाहिजे."

म्हातारा मांत्रिक म्हणाला ते ऐकून बिबळ्या एका तरुण मुलाच्या हातातली काठी आपल्या हातात घेऊन म्हणाला–"तू हे सर्व मूर्खासारखा काय बरळतो आहेस? तू हे विसरलास वाटतं की आपल्या जातीच्या लोकांनी मांसाशिवाय इतर कोणत्याही वस्तूचे सेवन करू नये असा आपला नियम आहे!" असे म्हणत नायकाने काठीचा एक फटका मांत्रिकाच्या पाठीवर ओढला.

मांत्रिक कळवळून उभा राहिला आणि

बिबळ्या! काय झालं ते तर सांगशील की नाही? तू दिलल्या फटक्याने माझी भूक पार नाहीशी झाली आणि नवीन दम आला आहे माझ्या अंगात!" असे म्हणत म्हाताऱ्याने उडी मारली व झाडाची फांदी धरून लोंबकळू लागला.

बिबळ्याच्या आज्ञेने दोघा तिघां तरुणांनी उठून मांत्रिकाला पाय धरून खाली ओढले व तो जमिनीवर आदळण्या-पूर्वी त्याला कंबर धरून जमिनीवर उभे केले. नंतर बिबळ्याने देवळात त्याने पाहिलेले दृश्य पुन्हा सविस्तर वर्णन करून सांगितले. या वेळी मांत्रिकाने जास्त लक्षपूर्वक सर्व ऐकून घेतले आणि काही वेळ आकाशाकडे दृष्टी करून काही तरी विचारात गढल्यासारखा बसून राहिला. नंतर लगेच वाकून जमिनीवरची थोडी धूळमाती हातात घेतली आणि ती मंत्रवून सर्वांवर उडवीत म्हणाला–"येथे उघड्या जागेवर विस्तव पेटवून एका मोठ्या मडक्यात किंवा रांजणात पाणी तापवा! काही जण देवळाकडे धावत जा आणि तेथून तो अजगर, लांडगा आणि रानमांजर घेऊन या कसे!"

"रानमांजर इतका वेळ त्या दगडात बसून आपली वाट पहात बसले असेल असे



नाही मला वाटत. अजगराने व लांडग्याने आतापर्यंत परस्परांचा जीव घेतला असेल, तरी मी त्यांना आणवतो." बिबळ्या म्हणाला.

"रानमांजर सापडले नाही तर ते ज्या दगडावर 'म्यांव म्यांव' करीत बसले होते तो दगड आणविला पाहिजे. तो दगड देखील उकळत्या पाण्याच्या रांजणात टाकला पाहिजे." म्हातारा मांत्रिक डोळे वटारून म्हणाला.

"देवीने आपल्या देवळात अजगर आणि लांडग्यांचे ते दृश्य आपल्याला दाखविण्याचे कारण काय? त्याचा अर्थ आपल्याला शिकारीला लौकर रानटी श्वापदे सापड-



तील असा आहे काय?" विवळ्याने भीत भीत विचारले.

तो प्रश्न ऐकून म्हातारा मांत्रिक एक उडी मारून आपल्या झिज्या स्वतःच ओढीत आणि अंगात आल्यासारखा डोलत ओरडला–"मी कोण? मी देवी आहे. माझ्या अनुग्रह असेल तर तुम्हांला जनावरांचे मांसच काय, नरमांसही खायला मिळेल, तर उठा, चला!"

त्यानंतर काही जणांनी उठून झाडीत जी थोडीशी उघडी जागा होती तेथे एक मोठा खड्डा खणला व त्याच्या काठावर दगड ठेऊन त्यांच्यावर एक मोठे रांजण ठेवले आणि त्यांत पाणी भरले. नंतर त्यांनी त्याच्या खाली जाळ पेटवून वाळक्या काटक्या तोडून घालू लागले. थोड्या वेळाने पांढऱ्या धुराचे लोट आकाशापर्यंत उडू लागले.

त्याच वेळी आकाशांत उडत असलेल्या हंसरथावर गिधाडांनी हल्ला चढविला. त्यांनी आपल्या बळकट चोचींनी रथ धरून ओढायला सुरवात केली. त्यामुळे रथ कलंडला आणि त्यांतून मायासरोवरेश्वर, कांचनमाला आणि रथाचा सारथी घसरून खाली पडले. एकटा अंगरक्षक रथांत राहू शकला.

परंतु तिथे वाऱ्याच्या धक्क्याने म्हणा किंवा इतर कारणांनी म्हणा एकाच जागी न पडतां निरनिराळे जाऊन पडले. पिंजारलेल्या केसात हात घालून स्वतःच्या झिज्या ओढणाऱ्या मांत्रिकाने मायासरोवरेश्वराला खाली पडतांना पाहिले आणि ओरडला– "वाहवा! उपाशी तडफडत असलेल्या आपल्या भक्तांवर देवीने अनुग्रह केला आहे, तो पहा, देवीचा प्रसाद, एक माणूस आकाशातून खाली पडत आहे. रांजणातले पाणी लौकर तापवा. माणूस, अजगर, लांडगा आणि रानमांजर या सर्वांचे मांस शिजल्यावर पहिल्याने नैवेद्य दाखवून मग प्रसाद घ्यायचा. त्यानंतर आपल्याला भरपूर मांस खायला मिळेल."

[illegible] वर करून पाहिले आणि आनंदाने टाळ्या वाजवून नाचू लागले. हंसरथातून मायासरोवरेश्वर खाली पडला हे त्याचे दुर्दैव, परंतु त्यांहीपेक्षा त्याचे मोठे दुर्भाग्य म्हणजे तो त्या नरमांसभक्षी रानटी जातीच्या घोळक्याच्या मध्यभागी सरळ त्या रांजणात येऊन पडला. तो पाण्यात गटांगळ्या खात वर येऊन रांजणाचे काठ धरून बसला. त्याने चारीबाजूला नजर फिरवून पाहिले, सर्व नरमांसभक्षी लोक नाचत बागडत होते. त्याने जिवाची आशाच सोडली.

म्हातारा मांत्रिक स्मित करीत रांजणाजवळ येऊन हातवारे करीत म्हणाला– "अरे वा:! आपल्या देवीने साध्या माणसालाच नाही, चांगल्या गलेलठ्ठ माणसाला पाठविले आहे आणि कसा सरळ रांजणात आणून टाकला आहे!"

मांत्रिक म्हणाला ते ऐकून मायासरोवरेश्वराला कळले की तो फक्त रानटी जातीच्या मध्येच येऊन पडलेला नसून नरमांसभक्षी रानटी लोकांच्या मध्ये येऊन पडला आहे. 'आपल्या सारख्या समर्थ व्यक्तीची अशी दुर्गती व्हावी! नाही!' तर पुढे काय करावे या विचारात तो असता रांजणातले पाणी गरम होऊ



लागलं आणि त्याचं अंग भाजू लागलं होते.

मायासरोवरेश्वर रांजणाबाहेर उडी मारून येण्याच्या खटपटीत असल्याचे पाहून मांत्रिक एक जळत असलेले लाकूड त्याच्या अंगाजवळ नेत म्हणाला–"काय रे! आमच्या देवीने अनुग्रह करून तुला आमच्याकडे पाठविले आणि तू जर का बाहेर निघण्याचा प्रयत्न केलास तर रांजणाखालच्या निखाऱ्यात टाकून तुला आम्ही भाजून खाऊ! खबरदार!"

ते ऐकून मायासरोवरेश्वराला त्याचे मरण अगदी जवळ येऊन ठेपले असल्याचे स्पष्ट दिसले. तरी उकळत्या पाण्यात









शिजून मरण येणे हे भयंकरच आहे! काय वाटेल ते करून रांजणाबाहेर आलेच पाहिजे. तेवढ्यात त्याला एक युक्ती सुचली. त्याने एक मोठे गुपित मांत्रिकाला सांगण्याचे सोंग केले आणि बारीक आवाजात त्याला म्हणाला–"तू या रानातल्या देवीचा पुजारी आहेस ना? तरमग हे गुपित तुलाच सांगितले पाहिजे. तुझ्या देवीने माझ्याबरोबर आणखी दोघांना आकाशातून पाठविले आहे.

नरमांसभक्षी मांत्रिक ते ऐकून आश्चर्य करीत विचारू लागला–"असं का? मग ते दोघे कोठे आहेत?"

"ते चुकून दुसऱ्या जागी उतरले असावेत. तू मला बरोबर नेलेस तर मी त्यांचा शोध काढून त्यांना धरून आणायला मदत करीन." मायासरोवरेश्वर म्हणाला.

मांत्रिकाला ते सर्व खरे वाटले. त्याने लगेच मायासरोवरेश्वराला बाहेर काढवून एकाला देवीच्या देवळात बिबळ्या गेला होता त्याच्याकडे ती बातमी कळवायला पाठविले

मायासरोवरेश्वराबरोबर जंगलात निघाला.

संध्याकाळपर्यंत त्यांनी जंगलांत कांचनमाला व सारथ्याचा शोध केला. एकाएकी त्यांना एका झाडाखाली सारथ्याचा चाबूक दिसला.

'माझा सारथी, कांचनमाला वगैरे या झाडाच्या फांद्यांत कोठे तरी अडकले असावेत. ते जिवंत आहेत की नाहीत? त्यांना वांचविले पाहिजे.' असा विचार करीत मायासरोवरेश्वराने मान वर करून पाहिले. परंतु त्याला वर झाडावर कोणी दिसले नाही. मात्र वर आकाशात हंसांचा रथ उडत असलेला दिसला.

त्याच वेळी धुराचे लोट पाहून त्या दिशेने सिद्धसाधक व मकरकेतूसुद्धा नरमांसभक्षक जातीच्या वस्तीकडे येत होते. साधक आपले वाहन वनमाणसावर 'जय महाकाल' असा घोष करीत येत होता. तो घोष ऐकून मायासरोवरेश्वर आणि त्याच्याबरोबरचे इतर लोक भयशंकित झाले.



# ऋणमुक्ती

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हा प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! मला माहीत नाही की तू आयुष्याचा वीट आल्याने असा विरक्त होऊन इतके कष्ट सहन करू लागला आहेस की आणखी काही कारणाने! परंतु विरक्त व्यक्तीला सुद्धा, त्याच्या कपाळावर लिहिलेले असूनही मरण येत नाही. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला गोपालक याची गोष्ट सांगणार आहे. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

महंतीपूर नावाच्या गावी गोपालक नावाचा जन्मत:च एक गरीब दरिद्री माणूस भीक मागून आपला उदरनिर्वाह करीत असे. त्याच्या जन्मपत्रिकेत काय लिहिले

होते नकळे. परंतु त्याला एक वेळ पोटभर खायला मिळे तर कधीकधी तीनतीन दिवस तेही मिळत नसे.

एकदा रामानंद नावाचा एक ज्योतिषी आपल्या शिष्यांसमवेत काशीच्या वाटेवर महंतीपूरला आला. त्या गावच्या लोकांनी त्या ज्योतिष्याला आपले भविष्य विचारून घेतले. ते कळल्यावर गोपालकने रामानंद यांच्याकडे जाऊन त्यांना त्याच्या या दारिद्र्याचे कारण विचारले आणि ते कसे दूर होईल हे देखील विचारले.

"बाळ! तुझ्या कपाळी सुख लिहिलेले नाही. म्हणून मला वाटते की तुझे दारिद्र्य कधी संपणेच शक्य नाही." रामानंदांनी गोपालकाला लक्षपूर्वक त्याचा हात पाहून त्याचे भविष्य सांगितले.

"तरमग निदान एवढे तरी सांगण्याची कृपा करा की माझ्या कपाळी मरण केव्हा लिहिलेले आहे? मला या जगातून केव्हा सुटका मिळेल?" गोपालकने विचारले.

"मुला! शेजारच्या शहरात रामगुप्त सोमगुप्त आणि भीमगुप्त नावाचे तीन व्यापारी आहेत. त्यांच्यावर तुझे प्रत्येकी एक सुवर्णमुद्रा इतके ऋण आहे. तू ते ऋण वसूल करून ते सर्व उपभोगल्यावर तुला मरण येईल." रामानंद म्हणाले.

गोपालक आनंदाने रामानंदांचा निरोप घेऊन शेजारच्या नगरात गेला. तो त्या तिघांना भेटला व त्यांच्यावर एकेक सुवर्णमुद्रा ऋण असल्याचे सांगून ते त्याने परत द्यायला सांगितले. तिघांनी काही एक तक्रार न करितां एकेक सुवर्णमुद्रा दिल्या.

गोपालकने त्या सुवर्णमुद्रा खर्च करून दरिद्रनारायणाला अन्नदान केले आणि विचार करू लागला की आजपासून या जगापासून कायमची मुक्ती मिळेल. कोणत्याही क्षणाला यमाचा निरोप येईल. मरणानंतर माझा हा देह रानटी जनावरांना आपली क्षुधा भागविण्यास उपयोगी पडला तर बरे. असा विचार करून तो जंगलात भटकत फिरू लागला.

दोन दिवस गेले. त्याला भूक लागली होती. वाघ किंवा सिंहदेखील त्याच्या जवळून जात तरी कधी त्यांनी त्याच्याकडे ढुंकूनही पाहिले नाही. परंतु त्याला हे कळेना की ज्योतिष्याचे भविष्य खरे कां होऊ नये? या विचारात देहभान विसरून भटकत असतां तो एका खड्ड्यात पडला.

"अस्सं! तरमग देवाने कदाचित माझ्यासाठी पहिल्यापासून हा खड्डा खणून ठेवला आहे. आतां मरण निश्चित येणार!" असा विचार करून त्याने एकदा चारीबाजूला पाहिले. काळोखात त्याला काहीतरी चकाकत असल्यासारखे दिसले. गोपालकने ते हाताने चाचपत उचलून पाहिले. ते सोने होते. खड्ड्यात गुहा आहे तर, आणि त्यात अलोट सोनेही आहे! असे त्याला वाटले.











गोपालकने सर्व सोने एकत्र केले आणि आपल्या घरी परत येऊन त्याने ते गोर-गरिबांना मदत करण्यासाठी खर्च केले. त्यांचे कष्ट त्याने दूर केले म्हणून त्यांच्या दृष्टीने तो देवपुरुष झाला. गावकऱ्यांना हे कळेना की जन्मापासून गरीब असलेल्या गोपालकाकडे इतके पैसे कोठून आले? त्याने त्याच्या जवळच्या मित्रांना किंवा शेजारपाजारच्यापैकी कोणाजवळही काही सांगितले नव्हते.

एकूण ज्योतिषी म्हणाला ते खरे झाले नाही. गोपालक बरेच दिवस जिवंत राहिला. त्याच्याजवळ अपार सोने होते. तरी तो गोर-गरिबांपासून निराळा न राहता सर्वदा त्यांचे दु:ख दूर करण्याची खटपट करीत राहिला.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला– "राजा! गोपालकाला का मरण आले नाही? ज्योतिष्याचे म्हणणे सर्वस्वी खोटे कसे काय झाले? या प्रश्नांची समाधान-कारक उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील.

विक्रमादित्य म्हणाला–"रामानंद ज्योतिषी म्हणाला ते खोटे झाले नाही. कारण गोपालकाने व्यापाऱ्यांकडून जे आपले ऋण वसूल करून घेतले ते त्याने त्या सोन्याचा उपयोग स्वत:च्या उदरनिर्वाह-साठी केला असता तर कदाचित त्याला मरण आले असते. परंतु त्याची दान देण्याची प्रवृत्तीच ज्योतिष्याचे भविष्य पूर्ण होण्यास तेव्हा आड आली. शेवटी त्याने विचार केला की तो मेल्यावर त्याचे शरीर जळून कोळसा व राख होण्याऐवजी रानटी श्वापदांच्या क्षुधा निवारणार्थ त्याचा उप-योग व्हावा. परिणामी त्याला आणखी जास्त सोने मिळाले. त्याचबरोबर त्याच्या-कडून ऋण घेणाऱ्यांची संख्यासुद्धा वाढली."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला व पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# बलिष्ठ शत्रू

उरगपूर नावाच्या गावी पार्वती नावाची एक भांडखोर बाई रहात असे. तिला गणू नावाचा एक मुलगा होता. गणू लाडातच लहानाचा मोठा झाला. लग्नाचे वय झालं तेव्हा कोणी त्याला मुलगी द्यायला तयार होईना. कारण भांडखोर सासू मुलीला कशी वागवील याची प्रत्येकाला शंका वाटे.

एकदा गणोबा काही कामाने दूरच्या गावी गेले असता त्यांना गावातल्या तला-वावर एक सुंदर मुलगी दिसली. तिला पाहून तिच्याशीच लग्न करण्याचे त्यांनी ठरविले आणि तिच्या पाठोपाठ तिच्या घरी गेले. त्या मुलीनेदेखील गणोबांना पाहिले होते व तो तिला आवडला होता.

तिचे नाव इंदू असल्याचे गणोबांना कळले. गणोबांनी तिच्या आईवडिलांना भेटून तिला मागणी घातली.

इंदूचे आईवडील गणोबांना म्हणाले– "अहो, पण तुम्ही विचार करा बरं का, आमची मुलगी थोडीशी भांडखोर स्वभा-वाची आहे. म्हणून तिचे लग्न आजवर जमले नाही. तुम्हांला आपली मुलगी द्यायला आम्हांला आनंदच होईल.

गणोबांनी आपल्या आईचा स्वभाव कसा आहे हे सांगून टाकले. इंदूच्या आई-वडिलांनी विचार केला, तरमग सासूच्या हाताखाली मुलगी काही दिवस वागली की तिच्या स्वभावात बदल होईल. त्यांनी इंदूचे गणोबांशी लग्न करून दिले.

बायकोला घेऊन गणोबा घरी आले. त्यांना पाहून पार्वती आश्चर्यचकित झाली. परंतु तिला एका गोष्टीचा आनंद झाला की, आपल्या मुलाला मुलगी द्यायला कोणी तरी पुढे आलाच. महिनाभर मुलाला व सुनेला पार्वतीने निश्चितपणे राहू दिले.



परंतु तिला वाटू लागले की परस्पर कामे होत आहेत हे पाहून सुनबाई कामाला हातच घालीत नाही. आपण चाकरी करायची व सुनेने चैन, हे तिला कसे आवडणार? म्हणून तिने लहान मोठी कामे सुनेकडून करवून घ्यायला सुरवात केली. इंदू सासूने सांगितलेली कामे बिनबोभाट करू लागली. एक महिना आणखी गेला.

हळूहळू सुनबाईचे कोडकौतुक कमी होऊ लागले. पार्वती तिच्या प्रत्येक कामात दोष काढू लागली. सुनबाईसुद्धा उत्तरे करू लागली. दोघीत मतभेद वाढत गेले.

एके दिवशी गणोबा शेतावरून घरी परत आल्यावर पाहतात तर सैंपाक झालेला नव्हता. सासूने सुनेवर व सुनेने सासूवर दोषारोपण केले. गणोबा दोघींवर कावले. आई म्हणू लागली की मुलावर सुनेने मोहिनी टाकली आहे आणि सुनबाईने तक्रार केली की नवरा अजून आईचा पदर सोडीत नाही.

त्या दिवसापासून गणोबांना घर म्हणजे नरकवास वाटू लागला. तसा तो स्वभावाने गरीबच होता. आईची व बायकोची बोलणी ऐकून तो गप्प राही.

एकदा गणोबांनी, ते ज्याच्या शेतात काम करीत, त्या मालकाच्या मुलाला सापापासून वाचविले. म्हणून मालक इतका खूष झाला की त्याने आपली बहू दुधी गाय घेऊन जायला गणोबांना सांगितले. गणोबांनी ती गोष्ट घरी जाऊन सांगितली.

पार्वती म्हणाली–"गोमातेला घरी घेऊन येणे शुभकारक आहे!"

इंदू म्हणाली–"नाही, म्हैस हवी, तिच्या दुधाला कस असतो."

शब्दावरून शब्द वाढत गेला आणि खडाजंगीच झाली. गणोबांना वाटले की थोडे शांत झाल्यावर दोघींना समजावून सांगता येईल. परंतु ते होऊ शकले नाही.

दुसऱ्या दिवशी मालकाने गणोबांना विचारले–"काय रे गणू, तू गाय सोडून कां नाही घेऊन गेलास?" गणोबांनी घडलेली गोष्ट सांगितली.

"मी [illegible] बाजारात विकायला पाठवून दिल्या, सांगून तू एक गायच घेऊन जा." मालक म्हणाला.

अशा तऱ्हेने आपल्या समोरचा प्रश्न सहजी सुटल्याचा गणोबांना आनंदच झाला. त्याने घरी जाऊन ती गोष्ट सांगितली. पार्वती आनंदाने म्हणाली–"आपल्या घरी म्हशीला न आणून देवानेच आपल्याला वांचविले."

"म्हैस आणल्याची भीती सर्वांनाच असते का?" इंदूने एक व्यंगबाण सोडला.

गणोबांनी विचार केला, हे भांडण कधी न संपणारे आहे. म्हणाला–"मी जाऊन प्रथम गाय घेऊन येतो."

"गायच आणायची असेल तर काळी गाय घेऊन या. कमीत कमी म्हशीचा रंग पाहून मन भरेल." इंदू म्हणाली.

"हे बघ बाळा! गाईचं येणं हे शुभ आहे म्हणून चांगली दुभती गाय घेऊन ये. हा काळ्या गायीचा काय म्हणून हट्ट? पांढरी स्वच्छ गाय आण." पार्वती म्हणाली.

रंगावरून सासूसुनेमध्ये वाद झाला.

"तुम्ही काळ्या रंगाला नाव ठेवता, स्वतःकडे पहा!" इंदूने समोरचा वार केला.

"तू पांढऱ्या रंगाला नावे ठेवतेस, मग तू कशाला ग पांढरी झालीस?" सासूने तोफ डागली.



"पांढरी असते तर गप्प राहाले असते. मी आहे गोरी." इंदू म्हणाली.

गणोबांनी विचार केला हा वाद संपणारा नाही. त्याने स्वतःचे जेवण वाढून घेतले आणि जाऊन झोपला.

मालकाने दुसऱ्या दिवशी गणोबांना पुन्हा विचारले–"अरे तू गाय घेऊन जायला आला नाहीस?" गणोबांनी घरात झालेला वाद सांगितला.

मालक म्हणाला–"माझ्या घरात सासवासुनांचे भांडण नाही आहे, परंतु माझ्या दोन बायका आहेत, त्या अशाच भांडायच्या. शेवटी मी युक्ती केली आणि घरात शांतता नांदू लागली."

"मालक मला सांगा ना, काय युक्ती केलीत ती!" गणोबा म्हणाले.

"दोघां शत्रूंमध्ये जर ऐक्य व सख्य करावयाचे असेल तर त्यांच्याहून एक बलिष्ठ शत्रू शोधावा लागतो." मालक म्हणाला.

"मी कोठून आणू आणखी एक बलिष्ठ शत्रू?" गणोबांनी विचारले.

मालक स्मित करून म्हणाला—"तो शत्रू तूच आहेस, वेड्या!"

गणोबांच्या डोक्यात प्रकाश पडला की पुढे काय केले पाहिजे. त्या दिवशी संध्याकाळी गणोबा एक तांबडी गाय मालकाच्या घरून घेऊन गेले. सासूसून दोघी ती गाय पाहून गणोबांवर खवळल्या.

"तू आतां किती दिवसांची पाहुणी राहलीस आई? लहानांना शिव्याशाप किती दिवस देणार? थोडा तरी विचार कर!" गणोबांनी थोडयाशा रागातच आईला गप्प केले.

[illegible] घेऊन बोलणार. म्हणून ती आणखी मोठ्याने बोलू लागली.

"तू आपलं काम कर घरात जाऊन. पुरुषांच्या कामात ढवळाढवळ करायला येऊ नकोस. मालकाने गाय घेऊन जायला सांगितलं आणि जी मला आवडली ती घेऊन आलो. यापुढे गायीच्या बाबतीत एक चकार शब्द तोंडाबाहेर काढशील तर तोंड फोडून काढीन." गणोबांनी बायकोला धाक दाखविला.

गणोबा पुढे दोन दिवस आईला दरडावून गप्प करीत राहिले आणि बायकोने जास्त वाद घातला तर तिला एक किंवा दोन देऊन तिचे तोंड बंद केले. तेव्हांपासून दोघी सासूसून शांतपणे नांदू लागल्या. गणोबा घरात रहात तोपर्यंत दोघी ताटाखालच्या मांजरासारख्या वागत आणि ते घराबाहेर पडले की त्यांच्याविरुद्ध परस्परांशी तक्रार करीत. अशा तऱ्हेने घरातले महाभारत थांबले आणि शांतता नांदू लागली



# उत्तम सल्ला

रामराव कित्येक दिवस परगावी राहून आपल्या मित्रमंडळींस भेटून यावे म्हणून आपल्या गावी आले. त्यांचे बालमित्र लखोबा व जिवाजी भेटले. त्यांनी दोघांनी आपल्या घरी येऊन रहायला आग्रह केला. तेव्हा प्रत्येकाच्या घरी दोन दोन दिवस रहायचे रामरावांनी मान्य केले. पहिल्याने ते लखोबाच्या घरी राहले.

लखोबा व त्यांच्या बायकोने उत्तम प्रकारे त्यांचे आदरातिथ्य केले. परंतु कां कोणास ठाऊक, लखोबा रामरावांना कधी एकटे घरात सोडीत नसत. बाहेर कामाला जात तेव्हा बरोबर रामरावांना घेऊन जात. नंतर तिसऱ्या दिवशी शेजारीच जिवाजी रहात त्यांच्याकडे रहायला गेले. तेथे देखील जिवाजी व त्यांच्या बायकोने त्यांचे सर्व प्रकारे आदरातिथ्य केले. परंतु जिवाजीसुद्धा बाहेर जातांना रामरावांना बरोबर घेऊनच कामाला जाई.

त्यातले गूढ कळावे म्हणून रामराव काही तरी कारण सांगून जिवाजीच्या घरी एकटेच परतले. तेव्हा त्यांना दोघां मित्रांच्या बायका परसांत मोठमोठ्याने भांडत असलेल्या दिसल्या. ती गोष्ट त्यांनी दोघां मित्रांना विचारली. दोघांना त्याबद्दल लाज वाटली.

"तुम्ही दोघे घरातल्या मोलकरणींना काढून टाका आणि बायकांनाच सर्व कामे करू द्या. त्यांना भांडायला सवडच मिळणार नाही, कामे करीत राहल्यावर. रिकामपणाचा हा परिणाम आहे." रामरावांनी तो सल्ला दिला आणि तो खरोखरच छान लागू पडला.





# अपात्र दान

एका गावात शंकरशेट व सोनूशेट नावाचे दोन धान्याचे व्यापारी होते. दोघे मिळून व्यापारधंदा करीत. कित्येक वर्षे दोघांचा धंदा निर्विघ्नपणे चालू होता. गावात कधी दोघां भावांचे काही कारणावरून भांडण होई तेव्हा वडीलधारी मंडळी या दोघां व्यापाऱ्यांचे उदाहरण सांगून म्हणत–"तुम्ही शंकरशेट व सोनूशेट-कडे पहा आणि शिका कसं बंधुत्व राखायचं ते."

दरवर्षी दिवाळीला सर्व हिशोब पुरे होत आणि नव्या वह्या सुरू करण्यापूर्वी जो नफा होई, दोघे सारखासारखा वाटून घेत. त्यावेळी शंकरशेट आपल्या वांट्यातले तीनशे पासष्ट रुपये काढून एका पिशवीत निराळे काढून ठेवी. परंतु सोनूशेटने कधी त्याला 'तसे कां करतोस? कशासाठी रे हे निराळे काढून ठेवले आहेस?" असे कधी विचारले नाही. शंकरशेटला आश्चर्य वाटे की सोनूशेट कां विचारीत नाही.

दरवर्षी त्या गावाच्या वेशीवर एक जत्रा भरे व फार मोठा बाजार असे. त्या वेळी व्यापाराबरोबर जुगारीचे व दारूचे अड्डेसुद्धा लागत. जेथे जत्रा भरे तेथून थोड्या अंतरावर एक टेकडी होती. त्या टेकडीवर एक विहीर होती. तिच्या चारी बाजूला मोठमोठी उंच झाडे होती. ती जागा यात्रेकरूंना खायला प्यायला व विश्रांती घ्यायला फार सोयीची होती. दरवर्षी तीनशे पासष्ट रुपयांची पिशवी शंकरशेट त्या विहिरीजवळ कोणाला कळू दिल्याशिवाय ठेवून निघून जात असे. परंतु ती पिशवी कोण उचलून घेऊन जातो हे कधी शंकटशेटला कळत नसे.

परंतु एके वर्षी शंकटशेटने विचार केला की हे गुप्तदान कोणाला मिळते हे तर पाहू या. म्हणून शंकरशेट विहिरीजवळून [illegible] त्याला कोणीतरी आपल्या डोक्यावर पंचा किंवा उपरणे टाकून झाडाआडून निघून जात असलेला दिसला. शंकरशेटने पैशांची पिशवी विहिरीजवळ सोडली जिथे होती, ती त्या जागी नव्हती.

शंकरशेटने तोंडावरून पांघरूण घालून जाणाऱ्याच्या पाठोपाठ जाऊन तोच पिशवी घेऊन जातो आहे का, पाहून खात्री करून घ्यायचे ठरविले व गेला आणि शेवटी त्याला कळले की ती व्यक्ती आणखी दुसरी तिसरी कोणी नसून त्याचा साथीदार सोनूशेटच आहे.

"मित्रा! मला वाटत होते की पैसे कोणातरी गरिबाला मिळतील व त्याला त्याचा उपयोग होईल. परंतु हे तर तुझ्याच हाती लागले!" शंकरशेटने विचारले.

सोनूशेट स्मित करून म्हणाला–"मित्रा! तू हे पैसे फेकूनच दिलेस, मग ते कोणाला मिळोत, त्याचे तुला काय?"

"तुला, मी हे पैसे असे कां फेकतो हे जर कळले असते, तर तू त्यांना चुकूनही हात लावला नसतास." असे सांगून शंकरशेटने आपल्या आयुष्यातली एक गोष्ट सांगितली ती अशी:

"माझ्या लहानपणीच माझे आईवडील वारले. मी गरीब होतो. उदरनिर्वाहासाठी मला लहानपणी पडेल ते काम करावे लागे. एकदा दुष्काळ पडला तेव्हा गावकरी आमचे गाव सोडून निघून गेले. मी त्या वेळी या





गावी आलो. येथे एक मोठा बाजार भरला होता आणि जत्राही भरली होती. असे मी ऐकले की तो संक्रांतीचा दिवस होता. मी चार दिवसांपासून उपाशी होतो, म्हणून भीक मागत होतो. पण काही फायदा झाला नाही. एका मिठाईवाल्याच्या दुकानातले लाडू चोरून खात असता पकडला गेलो आणि मार खाल्ला. भुकेल्या अवस्थेत आपल्या असहाय स्थितीत जीव द्यावासा वाटले. मी याच विहिरीत उडी मारणार होतो. त्याच वेळी माझ्या पायाला काही तरी बोचले. मी वांकून पाहिलं तर ती हिऱ्याची अंगठी होती. माझ्या मनात जगण्याची इच्छा जागृत झाली. ती अंगठी विकून मी एक दुभती म्हैस विकत घेतली. जी प्राप्ती झाली ती खर्च करून मी एक बैलगाडी विकत घेतली. त्यानंतर आपण दोघे भेटलो व आपली मैत्री जमली. धान्याच्या व्यापारात आपल्याला फायदा होऊ लागला. म्हणून ज्या दिवशी या विहिरीजवळ मला अंगठी सापडली होती त्या संक्रांतीच्या दिवशी दरवर्षी मी तीनशे पासष्ट रुपये गुप्तदान म्हणून मी ठेवू लागलो."

ते ऐकून सोनूशेट म्हणाला—"हा तुझा विचार फार थोर असेल कदाचित! परंतु हे रुपये ज्याच्या हाती लागतात तो वाईट मार्गाला लागणेदेखील शक्य आहे, नव्हे का? पाहिजे तर आपण प्रत्यक्ष पाहूच या." नंतर शंकरशेटला बरोबर घेऊन सोनूशेट त्या विहिरीजवळ आला. दोघे एका झाडावर चढून लपून बसले.

सोनूशेटने एक पिशवी विहिरीजवळ टाकून ठेवली. थोड्या वेळाने भगवी वस्त्रे परिधान करून पांढरी दाढी असलेला एक साधू तेथे आला. त्याने आपली गठडी विहिरीच्या कठड्यावर ठेवली आणि हातपाय धुवायला पाणी काढण्यासाठी पोहरा उचलला. त्याच वेळी त्याला सोनूशेटने ठेवलेली पिशवी दिसली.

त्या साधूच्या मनात एकदम बदल झाला. तो रामनामाचा तोंडाने जप करीत [illegible] त्याने एकदा चहूकडे नजर फिरवून कोणी पहात नाही ना, खात्री करून घेतली आणि ती पिशवी उचलून आपल्या पठडीत ठेवली. तो स्वत:शीच पुटपुटला—"दीर्घकाळानंतर या दुर्दैवी जीवितातून मुक्ती मिळाली. आता लग्न करून घेऊन चैनीत पुढील आयुष्य घालवायचे." भूक तहान विसरून जाऊन तो साधू तेथून निघून गेला.

शंकरशेट ते ऐकून थक्क होऊन म्हणाला—"सर्वसंगपरित्याग करणाऱ्या या साधूच्या मनात या वयात लग्न करण्याची इच्छा उत्पन्न झाली!"

सोनूशेटने खुणेने शंकरशेटला मौन रहायला सांगितले व एक चांदीचा रुपया विहिरीच्या कठड्यावर टाकून ठेवला. थोड्या वेळाने दोघे जुगारी परस्परांची निंदा करीत विहिरीजवळ आले.

"अरे, दुभती म्हैस विकत घ्यायला मी पैसे बरोबर आणले होते ते तुझ्या बोलण्यात येऊन जुगारीत उडवून टाकले. आता मी कोणते तोंड घेऊन घरी जाऊ? त्यापेक्षा याविहिरीत उडी टाकून जीव देणे पत्करले." असे म्हणत तो विहिरीकडे धावत निघाला. दुसरा त्याला वांचविण्याच्या प्रयत्नात होता, त्याच वेळी पहिल्याला कठड्यावर रुपया दिसला. लगेच तो त्याने हातात घेतला व म्हणाला—"ऐन वेळी हा रुपया मला मिळाला. कदाचित याच्या मदतीने मी घालवून बसलो आहे ते सर्व पैसे मला



परत मिळतील." असे तो म्हणत जुगारीच्या अड्ड्याकडे निघाला.

"यात माझा अर्धा वांटा आहे!" दुसरा दरडावीत म्हणाला आणि पहिल्याच्या पाठोपाठ निघाला. शंकरशेट सोनूशेटला म्हणाला–"पाहिलेस, सोनूशेट? सर्व घालवून बसल्याबद्दल थोड्या वेळापूर्वी हा रडत होता. परंतु एक रुपया हातात येतांच पुन्हा जुगार खेळायला निघाला.

सोनूशेटने काहीच उत्तर दिले नाही.

आणखी काही वेळाने एक लाकूडफोड्या लाकडांची मोळी घेऊन तेथे आला. सोनूशेटने पैशांची एक पिशवी लाकूडफोड्या व विहिरीच्या मध्ये टाकून ठेवली.

लाकूडफोड्या असे म्हणत पुढे आला– "मी ही लाकडे केव्हा विकणार आणि केव्हा घरी जाऊन कण्हेरी करून पिणार?" तो पाणी काढून पोटभर पिऊन बाजार भरला होता त्या दिशेने निघाला.

"काय गंमत पहा, वाटेत पैशांची पिशवी पडलेली पाहूनही तिकडे दुर्लक्ष करून हा पुढे निघून जातो आहे!" शंकरशेट चकित होऊन म्हणाला.

"पाहिलंस, तुझं गुप्तदान अपात्र माणसांच्या हाती पडून त्यांचं किती नुकसान करीत आहे ते. उतारवयातल्या एका साधूचे मनदेखील पैसा पाहताच पालटले. त्याने त्यात खापरं भरलेली आहेत हेदेखील पाहिले नाही आणि सुखाची स्वप्ने पाहू लागला. त्याचप्रमाणे रुपया मिळताच जुगाऱ्याच्या मनात त्यापूर्वी त्याला जो ज्ञानोदय झाला होता त्याचा लोप झाला. वास्तविक धनप्राप्तीने जे आयुष्य सुधरते तेच फुकटाचे धन मिळल्यास बिघडते. खरा माणूस फुकटात मिळणाऱ्या पैशाकडे ढुंकूनसुद्धा पहात नाही. लाकूडफोड्याला त्याच्या मेहनतीच्या फळाचीच फक्त अपेक्षा आहे." सोनूशेट म्हणाला.

"म्हणजे आजपर्यंत मी गुप्तदान करीत राहालो, ते असेच मातीत गेले का?"

"नाही, मी ते सर्व सुरक्षित ठेवले आहे. तू एक शाळा बांध." सोनूशेटने सुचविले.





# चोर की साधू

छोटू आपल्या कुत्र्याबरोबर लक्ष्मणपूरला पोचला तोपर्यंत संध्याकाळ होऊन गेली होती आणि काळोख पडू लागला होता. त्याला भूक लागली होती व तहानही खूप लागली होती. परंतु सर्व गल्लयांत व रस्तांवर शुकशुकाट झाली होती. पाणी पिऊन तहान भागविण्यासाठी त्याने एका घराच्या दाराची कडी वाजविली. परंतु आश्चर्य असे की आतून ऐकू येणारा बोलण्याचा आवाज एकाएकी बंद झाला.

छोटूला आश्चर्य वाटले. तो पुढल्या घरी गेला आणि दार खडकावल्याशिवाय दाराच्या फटीतून त्याने आत पाहिले. दिव्याच्या अंधूक उजेडात काही जण जवळ बसून व मानेपर्यंत पांघरूण घेऊन फुसफुसल्यासारखे बोलत होते.

"अहो, मला तहान लागली आहे, प्यायला थोडे पाणी देता का?" छोटूने बारीक आवाजात विचारले. तत्क्षण आतले लोक काही बोलल्याशिवाय तोंडावरून पांघरूण घेऊन झोपले. छोटू आपले हसू आवरू शकला नाही.

छोटू विचार करू लागला अजून एवढी रात्र झाली नसूनही लोक कां बरे झोपले आहेत? त्यांना कोणत्या गोष्टीबद्दल धास्ती वाटत असावी? त्यानंतर छोटू गावातल्या निर्जन गल्ल्यातून वाट काढीत देवळात जाऊन पोचला.

देवळातल्या सभागृहात त्याला तिघे जण बोलत असलेले दिसले. त्याला थोडी शंका आली. त्यांना पाहून छोटूचा कुत्रा भुंकू लागला.

त्यांच्या पैकी दोघे मांस खात होते व दारू पीत होते. गांजा पीत असलेल्या माणसाने छोटूला दरडावून विचारले– "कोण रे तू?"



"मला फार तहान लागली आहे, पहिल्याने थोडे प्यायला पाणी द्या. त्यानंतर मी सर्व सांगतो." छोटू म्हणाला.

"मूर्ख! पाणी म्हणजे काय रे? आम्ही दारू शिवाय इतर काही पीत नाही. तुला तहान लागली आहे तर ही घे बाटली. आपला कंठ थोडा ओला करून घे." दुसरा माणूस म्हणाला.

दुसऱ्या दिवशी झोप मोडली तेव्हा गावात छोटूला गडबड दिसली. लोकांची गर्दी उत्साहाने कोठे तरी निघालेली दिसली. छोटूने त्यांना विचारून त्याचे कारण काढून घेतले. त्याला थोडेसे आश्चर्यच वाटले.

त्या दिवशी शुक्रवार होता. म्हणे, त्या दिवशी एक साधू भक्तांना दर्शन देतो. तो साधू त्या गावी येऊन चार आठवडे झाले होते. तो कोणी सामान्य योगी नव्हता. त्रिलोक संचार करणारा महायोगी आणि त्रिकालज्ञानी होता. तो गावाबाहेर एका वडाच्या पारावर उतरला होता. फक्त शुक्रवारीच त्याचे दर्शन मिळे. इतर दिवशी तो ध्यानमग्न होऊन योगसमाधीत असे. शुक्रवारी लोक त्याच्या दर्शनाला येऊन त्याची चरणरज आपल्या मस्तकाला लावीत आणि आपल्या मनातल्या इच्छा पूर्ण होतील की नाही त्या साधूला विचारीत. तो सहा दिवस योगसमाधीत देवांच्या सान्निध्यात राहून शुक्रवारी भक्तांना देवांनी सांगितलेली उत्तरे सांगे.

छोटूला हे सर्व व अविश्वसनीय वाटले. त्याने लोकांना विचारले–"हे सर्व ठीक आहे. परंतु मला हे सांगा की, या गावचे लोक काळोख पडायच्या आत दारे बंद करून कां बसतात?

गावकरी म्हणाले–"गावात चोरांचा सुळसुळाट वाढला आहे. हे चोर राक्षसांहून ही जास्त क्रूर आहेत. ते विनाकारण लोकांना ठार करतात. साधू बुवासुद्धा प्रयत्न करून थकले. कारण चोर रावणाचे वंशज आहेत, म्हणे. म्हणून गावकऱ्यांना खरा. बुवांनी त्यांना [illegible] नका म्हणून बजावून सांगितले आहे. या चोरां-मुळे बुवा आणि देव यांचा परस्परांशी बराच वाद सुरू झाला आहे.

शुक्रवारी गावकऱ्यांबरोबर छोटूसुद्धा बुवांच्या दर्शनाला गेला. तेव्हा बुवा समाधिस्थ होते. हातात रुद्राक्षमाला होती, बाजूला कमंडलू ठेवलेले होते. त्यांचे दोन बलदंड शिष्यही जवळ सेवेला हजर होते. सर्वांना लांबलांब दाढ्या होत्या. सर्वांच्या अंगात भगवीवस्त्रे होती.

लोक एकेक करून बुवांच्या अगदी जवळ जाऊन त्यांना आपलं मन उघडं करून सांगत. बुवा स्मित वदनाने उत्तर देत व पुन्हा डोळे मिटून घेत. छोटू आपल्या कुत्र्याबरोबर तेथे गेला. त्याने बुवांना अत्यंत आदरपूर्वक नमस्कार केला व हात जोडून उभा राहिला. त्याचा कुत्रा बुवांच्या शिष्यांकडे पाहून गुरगुरू लागला. लगेच सर्व शिष्य डोळे मिटून कोणत्या तरी मंत्राचा जप करू लागले. बुवांनी डोळे उघडून छोटूकडे एकदाच तीक्ष्ण नजरेने पाहिले.

"बुवा, माफ करा, मुका प्राणी आहे, त्याला काही कळत नाही." आपल्या थोबाडीत स्वतःच मारून घेत छोटू म्हणाला.



"बेटा, तुला काय हवं आहे?" बुवांनी छोटूला विचारले.

छोटू लाजत भीतभीत म्हणाला–"बुवा! मला लग्न करावयाचे आहे. कित्येक दिवसांपासून मी खटपट करतो आहे, परंतु मला यश मिळत नाही."

शिष्यांनी गुरूला काहीतरी खूण केली. बुवा स्मित करून म्हणाले–"ही तर एक सामान्य गोष्ट आहे. काही हरकत नाही. तुझी इच्छा लौकरच पूर्ण होईल. मी स्वतःच तुझं लग्न करून देईन."

आपापली इच्छा निवेदन केल्यानंतर लोक मौन होऊन आपापल्या जागी जाऊन बसले. बुवा उभे राहून उपदेश करू लागले :



"गावात चोऱ्या होत आहेत, त्यांच्याविषयी मी देवांचा सल्ला घेतला. देवांनी स्वत:वरच सर्व जबाबदारी घेतली आहे व लौकरच चोऱ्या बंद होतील. परंतु पुढल्या शुक्रवारपर्यंत गावकऱ्यांना चोरांचा त्रास सोसावा लागणार आहे. त्यानंतर मात्र चोर येथून पळून जातील आणि या गावाच्या बाजूला फिरकणारही नाहीत. लौकरच गावावरचे हे संकट टळणार आहे. देवांनी हे स्पष्ट शब्दात सांगितले आहे."

त्यानंतर सर्व लोक उठून आपापल्या घरी निघून गेले. छोटूला हे सर्व नाटक वाटले. काहीतरी लबाडी आहे, या गोष्टीची त्याला खात्री वाटत होती.

त्या [illegible] रात्री छोटू त्या [illegible] झाडापासून थोड्या अंतरावर एका दगडाआड लपून बसून राहिला. मध्य रात्रीच्या सुमारास तिघे जण एकेक मोट डोक्यावर घेऊन बुवा होते तेथे आले. आदल्या दिवशीच्या रात्री त्या साधूबरोबर जे लोक होते तेच ते लोक होते. साधूचे शिष्यच होते ते.

त्यांना आलेले पाहताच साधू उठून उभा राहिला. तो बसला होता ते आसन बाजूला सारले. ते एका भुयाराचे झांकण असल्यासारखे होते. चोरांनी आपल्या बरोबर आणलेले सोने, चांदी व धन त्या भुयारात टाकून झांकण बंद केले. नंतर सर्व मांस भक्षण करीत व दारू पीत थट्टामस्करीत रंगून गेले.

ते दृश्य पाहून छोटूचे रक्त खवळले. परंतु घाईगर्दीत त्याने काही केले तर त्यालाच स्वत: मार खावा लागेल हे तो ओळखून होता. म्हणून कानोसा दिल्याशिवाय त्याने तेथून पाय काढला आणि गावात गेला.

त्याने शांतपणे चोरांना कसे पकडावयाचे या संबंधी विचार केला. त्या साधूला चोर म्हटले तर गावकरी आपल्याविरुद्ध उलटतील हे त्याला माहीत होते. म्हणून लोकांचा भाबडेपणा पाहून [illegible] त्याने ठरविले.

उजाडल्यावर त्याने गावात प्रत्येक घरी जाऊन बुवांना भेटायला हिमालयात तपश्चर्या करणारे साधू व थोर योगी येणार असल्याचे सांगून बुवांची आज्ञा गावकऱ्यांना कळवली. त्या योग्यांना व साधूंना कोणत्याही प्रकारचा त्रास होऊ नये यासाठी त्यांच्या उतरण्याची व खाण्यापिण्याची उत्तम व्यवस्था केली पाहिजे. पंडाल व राहुट्या उभ्या केल्या पाहिजेत. म्हणून सर्वांनी पहारी, कुदळी व फावडी घेऊन निघावे. उशीर झाल्यास बुवा रागावतील असेही सांगितले.

गावकरी कुदळी, फावडी, पहारी वगैरे घेऊन येत असलेले पाहून बुवा व त्यांचे शिष्य चकित झाले व थोडे भ्यालेही. सर्वांपुढे छोटू आपल्या कुत्र्याबरोबर होता. त्याला पाहून बुवांचा थरकाप उडाला. पाहतां पाहतां लोक बुवा व त्यांचे शिष्य यांच्या चारीबाजूला उभे राहले. परंतु लोकांना या गोष्टीचे आश्चर्य वाटले की बुवा घाबरल्यासारखे थरथर कापत होते.

छोटूने जास्त वेळ न दवडता बुवांजवळ जाऊन त्यांना दरडावीत म्हटले—"बुवा! तुमचे बिंग फुटले. हे सर्व लोक तुम्हांला व तुमच्या शिष्यांना जिवंत समाधी द्यायला जमले आहेत." असे म्हणत छोटूने बुवांची दाढी धरून ओढली. ती नकली दाढी छोटूच्या हातात आली. त्यानंतर छोटूने साधूच्या शिष्यांची दाढी एकेक करून ओढून काढली.

ते पाहून लोकांचा पारा चढला. सर्वांनी त्या लबाड चोरांना पकडून खूप ठोकून काढले. शेवटी छोटूनेच त्यांना थांबायला सांगितले. बुवांच्या आसनाखालच्या भुयारात जे अलोट धन होते ते त्याने वृद्ध गावकऱ्यांना दाखविले. त्यानंतर सर्वांच्या वस्तू ज्यांच्या त्यांना देवविल्या. तो चोरांचा सरदार साधू आणि त्याचे शिष्य तुरुंगात पडल्यावर छोटू आपल्या कुत्र्याबरोबर लक्ष्मणपूर सोडून दुसऱ्या एका गावी गेला.





# विसराळू बायको व तापट नवरा

माधव नावाचा एक माणूस भयंकर तापट होता व त्याची बायको कमालीची विसराळू होती. बायकोच्या विसराळूपणामुळे माधवला राग येई.

एके दिवशी सकाळी माधवने आपल्या बायकोला हाक मारली. त्या वेळी ती सैंपाकघरात होती व दूध चुलीवर होते. म्हणून तिचे थोडं लक्ष तिकडे होते आणखी थोडं रस्त्यावर भाजीवाली ओरडत होती तिकडे होतं.

बायको न आलेली पाहून माधवचा पारा चढला. तणतणल्यासारखा सरळ सैंपाकघरात जाऊन म्हणाला–"तुझ्या विसरभोळेपणामुळे मला जीव नकोसा वाटू लागला आहे. मी आताच गावाला जातो आहे, आज सकाळी मी जेवणार नाही. रात्री परतायला उशीर होईल. म्हणून माझ्यासाठी सैंपाक करू नकोस."

सत्यभामाने मान हलवून होकार दिला. नंतर थोड्या वेळाने विचारले–"पण होय हो! आज भाजी कसली करू, सांगितले नाही, तुम्ही!"

आतां मात्र माधव संतापला. म्हणाला–"तू फक्त विसराळूच नाहीस, बहिरीसुद्धा आहेस! मी तुला आतां सांगितलं की मी गावाला निघालो आहे." असे म्हणत तो निघाला.

नवरा गेल्यावर सत्यभामाने सैंपाक केला आणि जेवून खाऊन झोपली ती संध्याकाळी उठली. नंतर दाराला कुलूप लावून राधा नावाच्या एका मैत्रिणीकडे गप्पा मारायला निघून गेली. बरीच रात्र होईपर्यंत दोघी गप्पागोष्टीत गंगून गेल्या. तेव्हा राधाने तिला दुसऱ्या दिवशी उजाडल्यावर जायला सांगितलं. म्हणाली–"नाही तरी भावजी गावाला गेले आहेत ना?"

[illegible] ही गोष्ट सत्यभामा पार विसरून गेली आणि राधाकडे जेवून तिच्याकडेच झोपली. दहा अकराचा सुमार असेल माधव घरी आला आणि दाराला कुलूप पाहून चकित झाला. संताप न आवरल्यामुळे तो अंगणात येर-झाऱ्या घालीत राहिला.

मध्यरात्र उलटली तरी माधव अंगणात फिरत होता. त्याच वेळी त्या बाजूने जाणाऱ्या एका चोराने कुलूप लागलेल्या दारासमोर माधवला हिंडत असलेला पाहिले. त्याला वाटले तो सुद्धा कोणी चोरच असावा. त्याच्या खांद्यावर हात ठेवून चोराने विचारले–"तुला आत जायचं आहे ना? मी एका मिनिटात कुलूप उघडतो. कोणी येत नाही ना, तेवढं तू लक्ष ठेव. आत मिळेल ते आपण वाटून घेऊ." असे म्हणत त्याने एका नकली किल्लीने कुलूप काढले आणि आत शिरला.

माधव चोराच्या पाठोपाठ घरात गेला. चोर सरळ तिजोरीच्या खोलीत शिरून ती फोडण्याची खटपट करीत असलेला पाहून माधवने बाहेरून खोलीचे दार लावून कडी घातली. नंतर म्हणाला–"चोरा! तू माझ्या घरात चोरी करायला निघालास नाही का? उजाडू दे. मग कळेल चोरी केल्याचे फळ काय होते ते." असे सांगून तो खोलीत जाऊन झोपला. गर्दीत तो बाहेरचे दार लावायलाच विसरला.



तिकडे सत्यभामेची मध्येच झोप मोडली व नवऱ्याने रात्री उशिरां घरी येणार असल्याचे सांगितले होते. ते तिला आठवले. ती लगेच राधा 'नको नको' म्हणत असता घरी निघाली. दार उघडे पाहून तिला वाटले आपणच कुलूप लावायला विसरलो होतो की काय?

चोराने खिडकीतून बाहेर पाहिले, एक बाई घरात येत असलेली त्याला दिसली. त्याने दाराजवळ येऊन दार उघडायला आतून दार वाजविले.

सत्यभामेला वाटलं आपण चुकून नवऱ्याला खोलीत बंद करून ठेवलं होतं की काय? आणि तिने विचार न करतां दाराची कडी काढली आणि म्हणाली– "म्हणजे तुम्ही घरातच होता का? मला वाटलं तुम्ही गावाला निघून गेलात! मी बाहेरच्या दाराला कडी लावून कुलूप लावण्य.ऐवजी तिजोरीच्या दारालाच कडी लावली वाटतं? माझ्या विसराळूपणाला काय म्हणायचं?"

चोर तिजोरीच्या खोलीचं दार उघडताच जीव घेऊन पळाला. वाटेत सत्यभामा उभी होती, ती धक्का लागून पडली. चोर पळून जातांना तिजोरीतून काढलेला माल व आधी चोरून बरोबर आणलेला माल सर्व खोलीत टाकून गेला होता.

सत्यभामेला कळेना की ती पिशवी कोठून आली व तिच्यातले दागिने पैसे कोठून आले? तिने नवऱ्याला खोलीत झोपलेला पाहिले. जागे करून विचारले–"अहो, तुम्ही का खोलीत ही पिशवी ठेवलीत?"

माधवला वाटलं की बायको रात्री परतली व तिनेच चोराला पळू दिले आणि वर आपली झोप मोडली. एकदम तिने इतक्या चुका केल्या होत्या की तिला खूप बडवूनच काढलं पाहिजे. परंतु तिच्या हातात पैशाची व दागिने भरलेली पिशवी पाहून त्याने बायकोच्या विसराळूपणाची आयुष्यात अगदी पहिल्याने स्तुती केली. कारण त्याने स्वतः चोराला पकडून दिलं असते तर त्याला ती फुकटात मिळालेली पिशवी मिळाली नसती.



# मुका

एक व्यापारी घोड्यावर बसून प्रवास करीत दुपारी एका गावातल्या तलावाजवळ येऊन पोचला. घोड्याला एका झाडाला बांधून ठेवून आंघोळीला तलावात उतरला.

त्याच वेळी दुसरा एक यात्रीकरू आपल्या हडकुळ्या घोड्यावर आला व त्याच झाडाला आपला घोडा बांधू लागला.

ते पाहून पहिल्याने ओरडून सांगितले–"बाबा रे, तू दुसऱ्या झाडाला आपला घोडा बांध, माझा घोडा वाईट आहे. नंतर तुला पश्चात्ताप करावा लागेल" परंतु दुसऱ्याने दुर्लक्ष केले व त्याच झाडाला आपला घोडा बांधून ठेवला. हडकुळ्या घोड्याने खोड काढली आणि दोन्ही घोड्यांची लाथाडी सुरु झाली. हडकुळा घोडा शेवटी मरून पडला.

व्यापाऱ्याकडे दुसऱ्या प्रवाश्याने नुकसान भरपाई मागितली. त्याने नकार दिला. दोघे न्यायाधिशाकडे गेले. न्यायाधिशाने व्यापाऱ्याला विचारले–"तुझं काय म्हणणे आहे?"

काय उत्तर द्यावे व्यापाऱ्याला कळेना. तो इकडे तिकडे पहात उभा राहिला.

न्यायाधिशाने दुसऱ्याला विचारले–"काय रे, हा तर मुका दिसतो आहे. तू याच्याविरुद्ध तक्रार केलीस ना?"

"काय म्हणतां हा मुका आहे? याने ओरडून सांगितले होतं, माझा घोडा वाईट आहे, तू दुसऱ्या झाडाला आपला घोडा बांधून ठेव." त्याची तक्रार न्यायाधिशाने मान्य केली नाही.















# तीन चमत्कार

एका गावात एक जमिनदार रहात असे. त्याची जमिनदारी जवळजवळ संपुष्टात आली होती. त्याला भाग्यवती नावाची एक नात होती. ती रूपवती होती. म्हणून अनेक तरुण तिला मागणी घालू लागले. परंतु जमिनदाराने त्या सर्वांना एक अट घातली. नातीशी विवाह करण्याची इच्छा असणाऱ्याने तीन दिशांना जाऊन तीन अद्‌भुत वस्तू आणून दाखवाव्या अशा वस्तू आणून दाखविणाऱ्या तरुणाशीच नातीचे लग्न करून देईन. काही तरुणांनी प्रयत्न करून पाहिला, परंतु कोणालाच यश मिळालं नाही. म्हणून इतर तरुणांनी तो विचारच सोडून दिला.

त्याच गावात जयंत नावाचा एक तरुण युवक रहात असे. तो अपूर्व साहसी म्हणून गावात प्रसिद्ध होता. त्याने भाग्यवतीशीच लग्न करण्याचे मनाशी ठरविले. तो कंबरेला तलवार टांगून एका घोड्यावर बसून जमिनदाराकडे आला.

त्याला जमिनदार म्हणाला–"तुला माहीतच आहे की माझ्या नातीशी लग्न करायचं असेल तर तीन दिशांना जाऊन तीन अद्‌भुत वस्तू आणाव्या लागतील."

जयंतने विचारले–"त्या वस्तू कोणत्या?"

जमिनदार म्हणाला–"तू सरळ दक्षिणेकडे गेलास तर तुला एक पडके देऊळ लागेल. त्या देवळाच्या आवारात कोठेतरी भुयारात एक अद्‌भुत डफ आहे. तो डफ वाजविला की लगेच समोर आठदहा जण येऊन उभे राहतात आणि त्यांना जो हुकूम द्यावा तो ते बजावतात. तर पहिल्याने तू तो डफ घेऊन ये. नंतर मी इतर दोन वस्तूविषयी सांगेन."

जयंत जमिनदाराचा निरोप घेऊन दक्षिण दिशेला निघाला. तो दहाबारा दिवसांनी दमून भागून आला. त्यापूर्वी अद्‌भुत वस्तूच्या शोधार्थ गेलेला एक ही तरुण परत आला नव्हता, म्हणून त्या तरुणाला आलेला पाहून जमिनदार चकित झाला. त्याने जयंतला विचारले–"तू तो डफ आणलास का?"

जयंतने आपल्या पिशवीतून एक डफ काढून जमिनदाराला दिला. जमिनदाराने तो डफ हातात घेऊन आत बाहेर उलटा सुलटा करून लक्षपूर्वक पाहिला आणि वाजविला. दुसऱ्या क्षणाला कोठून तरी दहा जण धावत समोर आले आणि हात जोडून विचारू लागले– "मालक, काय हुकूम?" "तुम्ही माझ्या बागेत जाऊन काम करा!" जमिनदाराने आज्ञा केली. लगेच ते तेथून निघून गेले.

तेव्हा जयंतने जमिनदाराला दुसरी वस्तू कोणती ते सांगायला सांगितले.

"तू पश्चिमेकडे गेलास तर काही अंतरावर तुला एक पडके ओसाड पडलेले एक देऊळ दिसेल. त्याच्या खाली भुयारात एक गंडा आहे. तो बांधला की म्हातारा तरुण होऊ लागतो. तो गंडा घेऊन ये!" जमिनदाराने वर्णन करून सांगितले.

जयंत पश्चिम दिशेला जायला निघाला. जाताना त्याने मागे वळून पाहिले, खिडकीत भाग्यवती उभी होती व आश्चर्यचकित होऊन त्याच्याकडे पहात होती.



काही दिवसांनी जयंत फाटके जुने कपडे घालून आला आणि त्याने जमिनदाराला एक गंडा आणून दिला.

जमिनदार गंडा हातात बांधून म्हणाला— "तूच माझ्या नातीला योग्य वर दिसतो आहेस! तरमग आता उत्तर दिशेला जा. बरेच दूर जावे लागेल. तेथे एका पडक्या देवळात तुला एक बोलणारा पोपट मिळेल. त्याला घेऊन ये."

जयंतने या खेपेसही निघताना मागे वळून पाहिले. भाग्यवती उत्सुकतेने त्याच्या-कडे पहात असलेली त्याला दिसली.

थोड्या दिवसांनी जयंत आला तेव्हा त्याचं अंग खचंटलेले व क्षतविक्षत झालेलं दिसलं. त्याने बरोबर आणलेला पोपटाचा पिंजरा जमिनदारासमोर ठेवला आणि जमिनदार काय म्हणतो याची वाट पाहू लागला.

"पोपटा, मला शंभर सुवर्णमुद्रा पाहिजे आहेत." जमिनदार म्हणाला.

"उद्या सकाळी आपल्याला शंभर सुवर्ण-मुद्रा मिळतील." पोपट म्हणाला.

जमिनदाराने जयंतला त्या दिवशी रात्री आपल्याच घरी ठेवून घेतले. दुसऱ्या दिवशी सकाळी दार उघडून बाहेर आला तेव्हा त्याला दारात शंभर सुवर्णमुद्रा असलेली एक पिशवी दिसली.

जमिनदाराने खूष होऊन आपल्या नातीचे लग्न जयंतशी करून दिले. जयंत भाग्यवतीला घेऊन आपल्या घरी गेला.

काही दिवसांनी जमिनदार पुन्हा पोप-टाला म्हणाला—"मला एक हजार सुवर्ण-मुद्रा आणून दे!"

"एक हजार मुद्रा कोठून आणू? जयंतने हे सर्व नाटक केलं होतं हो! मी त्याचा पाळलेला पोपट आहे." असे सांगून पोपट उडून गेला.

जमिनदाराने निराश होऊन डफ काढून वाजविला. परंतु तो फुटला आणि कोणी समोर आला नाही.

नंतर जमिनदार हातात बांधलेला गंडा काढून छाती बडवीत म्हणाला—"मी फसलो! लबाडाने फसविले!"





# शिक्षकाचा आत्मा

एका गावात दिगंबर नावाचे एक शिक्षक रहात असत. ते त्या गावाच्या प्राथ-मिक शाळेत शिकवीत असत. इतके चांगले की देवमाणूसच! दिगंबर मास्तरांची मुलगी सुलेखा हिचे लग्न शेजारच्या गावातल्या एका शाळामास्तराशी झालं होतं. ती वर्षातून एकदा आपल्या वडिलांना भेटायला माहेरी येत असे. दिगंबरमास्तर स्वतःसुद्धा मुलीला भेटायला मधून मधून जात.

सुलेखाचे लग्न झाल्यानंतर तिची आई वारली. म्हणून दिगंबर मास्तरांना शाळेच्या कामाबरोबर घरातली कामेसुद्धा करावी लागत. बायको वारल्यावर घरात खर्च थोडा कमी होऊ लागला, म्हणून दिगंबर मास्तरांनी आपल्या पगारातली थोडी रक्कम दर महिन्याला मुलीला एक सोन्याची माळ करायला म्हणून सांगून नकुलेश्वर नावाच्या सोनाराकडे जमा करायला सुर-वात केली. दोन वर्षे रक्कम जमा करीत राहिल्यावर सोन्याच्या माळ पुरती रक्कम होईल हे नकुलेश्वरने मान्य केले.

सुलेखा एकदा वडिलांना भेटायला आली तेव्हा त्यांनी तिला ती गोष्ट सांगितली.

सुलेखा वडिलांना म्हणाली—"बाबा, तुमची तब्येत वयामुळे खालावत चालली असतां माझ्यासाठी सोन्याची माळ करवून द्यायची खटपट कशाला करता? तुम्ही हे पैसे वांचविण्याऐवजी स्वतः नियमित दूध पीत जा."

दिगंबर मास्तरांनी तिला समजावून सांगितले की मुली, तुझ्या लग्नाच्या वेळी इच्छा असूनही तुझ्या अंगावर मी एक तोळाभर सोनेसुद्धा घालू शकलो नाही. तुझ्या आईच्या मनातली ती इच्छा तशीच राहून गेली. म्हणून मी हे ठरविलं आहे."












नकुलेश्वरला पैसे द्यायला सुरवात करून दोन वर्षे होत आली होती. एके दिवशी एकाएकी दिगंबर मास्तरांच्या छातीत दुखू लागले आणि ते बेशुद्ध होऊन पडले. विद्यार्थी घाबरून गेले. सर्व गावकरी धावून आले. सर्वांनी दिगंबरमास्तरांना त्यांच्या घरी पोचते केले. वैद्याने येऊन औषधोपचार केला. मुलीकडे निरोप पाठविण्यात आला. गावकरी पाळीपाळीने शुश्रूषेला हजर रहात. सुलेखासुद्धा दुसऱ्या दिवशी आली.

दिगंबरमास्तर तीन दिवस बेशुद्धावस्थेतच होते. चवथ्या दिवशी दुपारी डोळे उघडून मुलीला काही सांगणार होते.

श्वास वाढला. त्यातच प्राणोत्क्रमण झाले.

सुलेखाने वडिलांच्या इच्छेप्रमाणे त्यांचे घर शाळेला दिले. अंत्येष्टी क्रिया वगैरे आटोपल्यावर गावकऱ्यांनी सुलेखाला भेटून सहानुभूती दर्शविली व तिचे सांत्वन केले. परंतु नकुलेश्वर आला नाही. सुलेखाला स्वत:च त्याच्या घरी जावे लागले.

नकुलेश्वर आजारी पडल्याचे सोंग करून व छातीत दुखत असल्याचे सांगून सहानुभूतीच्या स्वरात म्हणाला—"मुली! दिगंबरदादा गेले आणि हे गाव पोरकं झालं. मी स्वत: तुझ्याकडे चवकशीला यावे म्हटलं, परंतु मीच खाट धरली आहे."

"नकुल काका, नाही आलात त्यात काही चुकलं नाही. तुमचीच तब्येत बिघडली त्याला तुम्ही तरी काय करणार? बाबा गेल्यावर बराच खर्च झाला. बाबांनी तुमच्याकडे गेली दोन वर्षे जे पैसे जमा करून ठेवले आहेत, तेवढे द्याल का?" सुलेखाने विचारले.

"कसले पैसे? तुझ्या वडिलांनी माझ्याकडे जमा केले होते? त्यांनी तर मला काहीच दिलं नाही, मुली! हे काय तू नवीनच म्हणते आहेस? गावकऱ्यांसमोर मला उगाच बदनाम करू नकोस. तू चांगली मुलगी आहेस अशी माझी समजूत

होती. परंतु काळाबरोबर माणससुद्धा बदलतात हे मला आजच कळलं." नकुलेश्वरने साफ नकार दिला.

"गेल्याच महिन्यात बाबांनी मला सांगितलं की तुमच्याकडे पैसे जमा करायला लागून दोन वर्षे पुरी झाली आहेत आणि सोन्याची माळ घ्यायची आहे. ते ती तुमच्याकडून घेऊन मला देणार होते. मग त्यांनी सांगितलं ते सर्व खोटे म्हणता का? माझे बाबा एवढे खोटे कसे हो बोलतील?" सुलेखाने विचारले.

"मला ते सर्व काही माहीत नाही. पण मी एवढेच सांगतो की तुझ्या बाबांनी मला मुळीच काही दिलेले नाही." नकुलेश्वरने साफ नकार दिला.

सुलेखाबरोबर गावातली काही वृद्ध मंडळी नकुलेश्वरच्या घरी गेली होती. त्यांनीदेखील नकुलेश्वरला समजावून सांगितले की मृतात्म्याचे धन दाबून ठेवणे हिताचे नाही. तरी नकुलेश्वरने नाकारले.

त्यांच्याबरोबर सोमनाथ नावाचा एक जादुगार होता. तो भुतांना बोलवी व कोणाच्या मानेवर बसले असेल तर सोडवी. तो पुढे येऊन म्हणाला—"ठीक आहे, कोणी साक्षीदार दिगंबर मास्तरांच्या बाजूने आज सांगायला नाही की त्यांनी नकुलेश्वरला



पुरावासुद्धा नाही. दिगंबर मास्तर एकाएकी परलोकी गेले. म्हणून हा प्रश्न थोडा अवघडच आहे. तरी एक उपाय आहे. मी मृतात्म्याला बोलावून त्याच्याकडून साक्ष देवव शकेन. ते तुम्हांला आहे का मान्य?"

सर्वांनी होकार दिला. नकुलेश्वरनेदेखील होकारार्थी मान हलविली.

ठरलेल्या दिवशी सर्व गावकरी दिगंबरमास्तरांच्या घरासमोर एकत्र जमले. संध्याकाळची वेळ होती. सोमनाथ, बरोबर एक मातीचे मडके व झांकण घेऊन आला आणि म्हणाला—"तुमच्या पैकी कोणी तरी एकाने परसातील लिंबाच्या झाडावरून

दिगंबर मास्तरांच्या परसांत एक लिंबाचे झाड होते. वर्षभर त्याला फळे लागत. मास्तर दररोज एकदोन लिंबे तोडीत. मास्तरांच्या इच्छेप्रमाणे त्या लिंबाच्या झाडाजवळच दहन-संस्कार करण्यात आला होता.

तिघां चोघांनी जाऊन टोपलीभर लिंबे तोडून आणली. सोमनाथ गावकऱ्यांना म्हणाला–"मास्तरांना जाऊन पाचच दिवस झाले आहेत. त्यांचा आत्मा येथेच फिरत असणार. मी त्याला बोलावून त्याला आवडता लिंबाचा रस पाजतो. दिगंबर मास्तरांनी नकुलेश्वरला दिलेल्या पैशाची गोष्ट खरी असेल तर त्यांचा आत्मा या मडक्यात आल्याचा पुरावा आपणां सर्वांना मिळेल. मी तो दाखवीन." असे सांगून सोमनाथने लिंबे कापून त्यांचा रस मडक्यात पिळला. मडक्यावर एक फडके टाकून त्यावर झांकण ठेवले. नंतर तो काहीतरी मंत्र म्हणू लागला.

थोड्याच वेळात मडक्यात हालचाल होत असल्यासारखा आवाज ऐकू येऊ गला. मडक्यातून फेस बाहेर येऊ लागला आणि तो झांकणाला धक्का देऊन पाडण्याच्या खटपटीत दिसला.

सोमनाथ म्हणाला–"मास्तरांचा आत्मा साक्ष द्यायला आला आहे. त्यांचे पैसे नकुलेश्वराकडे आहेत. त्याला आता ही गोष्ट मान्य करावीच लागेल. नाहीतर मास्तरांचा आत्मा नकुलेश्वराच्या मानेवर बसेल. पहा बुवा!"

नकुलेश्वराने मुकाट्याने आपली चूक मान्य केली आणि सुलेखाला तिची सोन्याची माळ मिळाली.

सोमनाथने केलेली जादू अशी होती,–त्याने मडक्यावर एक फडके टाकले त्या वेळी कपडे धुवायच्या सोड्याचा एक खडा मडक्यात टाकला. लिंबाचा रस लागताच उकळी आली आणि फेस वर आला. सोड्यावर लिंबाचा रस पडतांच फेस वर येतोच. म्हणून झांकण उडया मारू लागले. ती जादू काय ती एवढीच.





# औषधाचा शोध

रामपूर गावी अनंतशास्त्री हे एकटेच वैद्य होते. ते एका आठवड्यापूर्वी कोणत्यातरी गावी गेले होते. परत आल्यावर त्यांना कळले की कुलकर्ण्यांचा नोकर दोनतीन दिवसांपासून त्यांच्या घरी चकरा मारीत होता. गेले काही दिवस कुलकर्ण्यांना फणफणून ताप आला होता. म्हणून त्यांचे डोळेसुद्धा उघडत नव्हते. घरी आल्याबरोबर ती बातमी कळली, म्हणून अनंतशास्त्री औषधांची पेटी घेऊन कुलकर्ण्यांच्या घरी गेले.

कुलकर्ण्यांच्या अंगात तेव्हा सुद्धा खूप ताप होता. ते ज्या खोलीत अंथरुणावर पडून होते तिच्या समोर कुलकर्ण्यांची नातेवाईक मंडळी आणि गावातली वडीलधारी मंडळी अनंतशास्त्र्यांची वाट पहात बसलेली होती.

अनंतशास्त्री कुलकर्ण्यांच्या घरात पाऊल टाकतांच सरळ रोगी होता त्या खोलीत गेले आणि त्यांनी आतून दार लावून घेतले. रोग्याला तपासताना इतर कोणी तेथे आत येणे वैद्यबुवांना पसंत नव्हते.

बराच वेळ झाला तरी अनंतशास्त्री खोलीबाहेर आले नाहीत तेव्हा रोग्याची चवकशी करण्यासाठी आलेल्या लोकांना जास्त काळजी वाटू लागली.

इतक्यात वैद्यबुवांनी दार थोडे उघडून कुलकर्ण्यांच्या मोठ्या मुलाला विचारले–"मुला, एक मोठा खिळा पाहिजे. लौकर जाऊन घेऊन ये."

कुलकर्ण्यांचा मुलगा थोड्याच वेळात खिळा घेऊन आला. वैद्यबुवा तो घेऊन आत गेले आणि त्यांनी पुन्हा दार आतून बंद करून घेतले.

त्यानंतर थोड्याच वेळाने हळूहळू खुडबुडण्याचा आवाज ऐकू येऊ लागला आणि हळूहळू दार अर्धवट उघडले गेले.









वैद्यबुवांनी बाहेर डोकावून पाहिले. पा[illegible]लांनी विचारले–"वैद्यबुवा! कुलकर्ण्यांची तब्येत कशी काय आहे हो?"

तिकडे दुर्लक्ष करून वैद्यबुवा एवढेच म्हणाले–"पहिल्याने एक हतोडी मागवून द्या. नंतर रोग्याच्या आजाराविषयी काय ते पाहू."

हतोडी आणली व ती घेऊन वैद्यबुवांनी पुन्हा दार आतून बंद करून घेतले. या खेपेस खोलीतून जोर जोराने आवाज ऐकू येऊ लागला.

थोड्या वेळाने पुन्हा दार उघडले.

कुलकर्ण्यांच्या धाकट्या भावाने घाबऱ्या आवाजात विचारले–"दादाची तब्येत कशी आहे?"

"ते सर्व मी मागाहून सांगेन. पहिल्याने एक कुदळ आणून द्या." वैद्यबुवा घाबऱ्या आवाजात म्हणाले.

बाहेर वाट पहात बसलेल्या लोकांना हे कळेना की आत वैद्यबुवा करीत काय आहेत? त्यांची काळजी वाढतच गेली. काही लोकांनी दाराची कडी वाजवून वैद्यबुवांना बाहेर यायला सांगितले. परंतु आतून काहीच उत्तर आले नाही. आवाज वाढत गेला.

पाटलांचा धीर सुटू लागला. ते ओरडले–"आता वाट पाहण्यात काही अर्थच नाही. दार फोडून आत पहा, काय चाललं आहे ते. कानठळ्या बसू लागल्या आहेत. आतून हा काय आवाज ऐकू येतो आहे? काय चाललं आहे तरी काय?"

काही वेळाने सर्वांनी मिळून दार फोडले. खोलीत जेथे कुलकर्णी खाटेवर झोपले होते त्या खाटेजवळ जमिनीवर बसून वैद्यबुवा आपल्या औषधाच्या पेटीला लावलेले कुलुप फोडण्यासाठी खिळा, हतोडी आणि कुदळीचा प्रयोग करीत होते. ते पाहून सर्व थक्क झाले.

सर्व लोक घाबरलेले तर होतेच, परंतु त्या गंभीर प्रसंगीदेखील वैद्यबुवांवर ओढवलेला प्रसंग पाहून सर्व मोठ्याने हसले.






अयोध्येत उत्साहाने आणि खूप थाटामाटाने श्रीरामाचा राज्याभिषेक झाला. त्यानंतर तो स्वत: राज्यकारभार पाहू लागला. एके दिवशी रामाने सुमंत्राला बोलावून त्याला आज्ञा केली–"राज्यात प्रजेच्या उपयोगाच्या व हिताची कामे मोठ्या प्रमाणात आरंभ करावयाची आहेत. त्यासाठी लागणाऱ्या पैशाची तरतूद करायला हवी."

सुमंत्र म्हणाला–"महाप्रभो! गेल्या चवदा वर्षात प्रजेने कर दिलाच नाही."

रामाने सहानुभूती दर्शवून विचारले–"कदाचित पाऊस पडला नसेल व दुष्काळ पडल्यामुळे प्रजेला अनेक तऱ्हेचे कष्ट सहन करावे लागले असतील!"

सुमंत्र क्षणभर संकोच करून काहीच बोलला नाही. नंतर थोडासा धीर करून म्हणाला–"तसं काही झालं नाही, प्रभो! उत्तम पीक निघाले, पाऊस पाणी चांगले झाले. प्रजेची मनेच पालटली आहेत. श्रीमंत व्यापाऱ्यांनी कर भरले नाहीत. त्यांच्या पावलावर पाऊल टाकून शेतकरी वर्गाने तेच केले. श्रीमंत नागरिक आणखी श्रीमंत झाले आहेत आणि गरीब जास्त गरीब होत चालले आहेत."

"असे होण्याचे कारण? मग भरत काय करीत होता?" रामाने थोड्याशा कठोर आवाजात विचारले.

"प्रभो! भरताने राज्य केलेच कोठे? त्यांनी तर गेली चवदा वर्षे आपल्या



पादुकांची पूजाच केली. त्यांच्या या भोळे-पणाचा गैरवाजवी फायदा घेऊन त्यांच्या समक्ष त्यांचं व प्रभूचं गुणगान करून अनेकांनी पारितोषिकांच्या रूपे पुष्कळ पैसे मिळविले. त्यांना मी आठवण करून दिली की त्यांच्यावर एका राज्याचे शासक म्हणून फार मोठी जबाबदारी आहे. तेव्हा ते म्हणाले–'ज्या लोकांना कर देणे शक्य नाही, त्यांना त्रास देऊ नका. ते सर्व माझे थोरले बंधू रामचंद्र यांचे नागरिक आहेत.' मला आपल्या आज्ञेने राज्य-कारभार पाहणाराची आज्ञा मानणे भागच होते, त्या आज्ञेबाहेर काही करणेच शक्य नव्हते." सुमंत्र म्हणाला.

रामाने सर्व वातमी ऐकून घेतली व म्हणाला–"आतां मी राज्य कसे कर-णार?" तेवढ्यात लक्ष्मण तेथे आला.

सुमंत्राने लक्ष्मणालासुद्धा वस्तुस्थिती समजावून खजिना रिकामा झाल्याचे सांगितले.

लक्ष्मण थोडा वेळ विचार करून म्हणाला–"तर मग मी सांगतो तसे करा. राज्यभर अशी दवंडी पिटवा की सरकार दरबारात एका कोहोळ्या भोपळ्याएवढे सोने जमा करावे. तसे करणारावर अन्याय केला जाणार नाही, असे मी राजाच्या तर्फे प्रजेला वचन देत आहे."

रामाने त्या गोष्टीस मान्यता दिली. त्याप्रमाणे सर्व राज्यभर दवंडी पिटविण्यात आली. लक्ष्मणाला ही गोष्ट चांगली माहीत होती की चवदा वर्षे ज्यांनी कर दिला नाही त्यांना कोहोळ्याएवढेच सोने काय, हत्तीच्या डोक्याएवढे सोने देणेसुद्धा कठीण जाणार नाही. तरी लक्ष्मणाने हनुमानाला बोलाविले व म्हणाला–"तू गुप्तरूपे प्रजेत फिरून पहा तर खरा की या नवीन आज्ञेविरुद्ध प्रजेत असंतोष तर नाही ना? तू या गोष्टीची माहिती मला लौकर येऊन सांग, कळलं?"

त्यानंतर हनुमान गुप्तरूपे प्रजेत हिंडला फिरला आणि लोक काय म्हणतात ते त्याने ऐकून घेतले व लक्ष्मणाला येऊन म्हणाला–"लोकांना कोहोळ्या भोपळ्या-एवढे सोने द्यायला हरकत वाटत नाहीसे दिसते आहे. उलट त्यांना असे वाटू लागले आहे की राम भरताहूनही जास्त भोळा-भाबडा आहे. शिवाय त्यांना या गोष्टीचा आनंद झाला आहे की इतक्या वर्षांच्या कराबद्दल अनेक भोपळ्याएवजी एकाच भोपळ्याएवढे सोने जमा करावयास सांगण्यात आले आहे."

ते ऐकल्यावर लक्ष्मणाच्या मनात दुसरीच एक शंका उद्भवली. प्रजेत काही लोक नक्कीच प्रामाणिक व इमानदार असणार. अशा लोकांविरुद्ध अन्याय होता कामा नये. भोपळ्या एवढे सोने देणे शक्य नसलेल्यांना तेवढे सोने द्यावे लागले तर त्यांना कदाचित जड जाईल. तेव्हा त्यासाठी काहीतरी मार्ग काढला पाहिजे.

त्याने त्या विषयी बराच वेळ विचार केला. त्याला एक युक्ती सुचली. तो हनुमानाला बरोबर घेऊन धर्मदेवतेच्या देवळात गेला. देवळात थोडा वेळ राहल्या-वर लक्ष्मण व हनुमान दोघे बोलत देवळा-बाहेर आले. तोपर्यंत सूर्यास्त होऊन गेला होता आणि काळोख पसरू लागला होता.

उजाडतांच राजवाड्या बाहेरच्या अंग-णात एक मोठा तराजू ठेवण्यात आला.



एका पारड्यात एक लहानसा भोपळा ठेवण्यात आला. लोक सोने भरभरून गाठोडी घेऊन आले. त्यांपैकी एकाने सर्वात प्रथम दुसऱ्या पारड्यांत सोने टाकले. परंतु भोपळा ठेवलेले पारडे वर उचलले गेले नाही. त्याला फार आश्चर्य वाटले. डोके खाजवीत तो घरी गेला आणि या खेपेस सोन्याची एक मोट घेऊन आला. सर्व सोने पारड्यात घातल्यावर दोन्ही पारडी समतोल झाली. ते पाहून इतर लोक घरी परतले आणि आणखी थोडे सोने घेऊन परत आले.

लोकांपैकी एकाने आपल्या सोन्यापैकी थोडे सोने भीतभीत पारड्यात टाकले.



परंतु त्या थोड्याशा सोन्यानेच दोन्ही पारडी समसमान झाली. ते पाहून लोक चकित झाले.

अशा तऱ्हेने कित्येकांनी सोने पारड्यात घातले. तेव्हा त्यांच्या लक्षात एक गोष्ट आली की हा तराजू सामान्य तराजू नसून न्यायी धर्म तराजू आहे. ज्याच्याकडून राजाला जितका कर मिळावयास पाहिजे तेवढाच हा तराजू दर्शवितो. यावरून प्रजेने सरकार दरबारात जितकी रक्कम न्याय्य देणे होती तितकी जमा करायला सुरवात केली. अशा तऱ्हेने खजिना भरला.

ते पाहून रामाला फार आश्चर्य वाटले. रामाने लक्ष्मण व सुमंत्राला आपल्या

हनुमानही सूक्ष्मरूपे मंत्रणागृहात गेला. रामाने दरडावून लक्ष्मणाला विचारले– "लक्ष्मणा! भोपळ्याचे वजन किती असते रे? मग तो कित्येक मण वजनाचा कसा काय झाला? शिवाय त्याचे वजन कमी जास्त कसे काय झाले? हा प्रजेवर अन्याय नाही का? तुम्ही सर्वांनी प्रजेला फसविले आहे. मी म्हणतो ते खरं आहे की नाही?"

लक्ष्मण हात जोडून म्हणाला–"प्रभो! यात लबाडी काहीच नाही. हे सर्व काम धर्मदेवतेच्या आज्ञेप्रमाणेच झाले आहे. या कामात हनुमानाने कमी जबाबदारी बजावलेली नाही. त्याच्या मदतीशिवाय ही कामगिरी पार पडलीच नसती. हनुमान तराजू धरून सूक्ष्मरूपे उभा होता. धर्मदेवतेच्या आज्ञेप्रमाणे ज्या बाजूला जितके वजन दाखवावयाचे तितके तो पायाने पारडे दाबून ठेवीत होता. धर्मदेवतेने काय सांगितले ते फक्त हनुमानालाच माहीत आहे. मी व हनुमानाने धर्मदेवतेला विनंती केली आणि त्याची मदत मागितली होती. जनतेत धर्मबुद्धीने कर देणाऱ्यांची संख्या कमी झाली आहे, कर न भरणाऱ्यांची संख्याच जास्त वाढली आहे. या वेळी न्याय्य तेवढाच कर आम्ही वसूल केला आहे. ही योजना करते वेळी मला व हनुमानाला बराच त्रास सोसावा लागला होता."

राम काही म्हणणार तितक्यात धर्मदेवतेची वाणी ऐकू आली–"श्रीरामा! लक्ष्मण म्हणाला ते सर्व खरे आहे. प्रजेवर कोणत्याही प्रकारे अन्याय झालेला नाही. हे सर्व माझ्या सूचनेप्रमाणे आणि आज्ञेने झाले आहे." त्यानंतर हनुमान आपले सूक्ष्मरूप सोडून प्रगट झाला व त्याने रामचंद्राला प्रणाम केला. रामाने त्याची पाठ थोपटून त्याची प्रशंसा केली.

त्यानंतर थोड्या दिवसांनी राजारामाने आपल्या सर्व प्रजेला एक मोठी मेजवानी दिली. त्या मेजवानीसाठी पंडाल घालण्याचे आणि आवश्यक सामुग्री आणविण्याचे काम हनुमानाने स्वतःच्या देखरेखीखाली करवून घेतले.

सीतेने हनुमानाची कर्तबगारी पाहिली. तिच्या मनात हनुमानाविषयी पुत्रवात्सल्याची भावना होती. लंकेत तिचा शोध सर्वांत प्रथम त्यानेच लावला होता. तिने हनुमानाला जवळ बोलाविले व म्हणाली– "बाळा हनुमाना! आज उजाडल्यापासून तू थोडीदेखील विश्रांती घेतल्याशिवाय मेहनत करीत आहेस. जेवणाची वेळ झाली आहे. पाहुण्यांच्या आतिथ्यसत्काराची



एक पंगती बसतील व त्यानंतर तुला जेवायला बराच उशीर होईल. म्हणून सर्व प्रथम तू खाऊन घे! त्यानंतर मध्ये तुला वेळ मिळणार नाही."

हनुमानाने त्या गोष्टीस होकार दिला व सीतेबरोबर पाकशालेत गेला. सीतेने एक पत्रावळ मांडून हनुमानाचे पान वाढले. त्याच्या पानावर जे पडे ते दुसऱ्या क्षणाला संपत जाई. अशा तऱ्हेने हनुमानाने कित्येक हजार जणांना पुरेल एवढ्या अन्नाचा फडशा उडविला. ते पाहून सीतेला आश्चर्य वाटले. तिने धावत जाऊन ती गोष्ट रामाला कळविली.

राम स्मित करून म्हणाला–"हनुमान



आहे. तोच या रूपे प्रगट झाला आहे. त्याला तू पोटभर खायला घालून कशी काय तृप्त करणार? परंतु ते तुला चातुर्याने साध्य होईल."

त्यानंतर सीता पाकशालेत परत आली व हनुमानाच्या मागे येऊन उभी राहिली. हनुमानाचा खाण्याचा सपाटा चालूच होता. सीता मनात म्हणाली—"महादेवा, सदाशिवा! मी तुला ओळखले. तुझ्या मनाचे मी समाधान करू शकले नाही तर आमची प्रतिष्ठा नष्ट होईल." असे म्हणत तिने पंचाक्षरी मंत्राचा त्रिवार उच्चार केला.

दुसऱ्या क्षणाला पोट भरल्याची खूण म्हणून हनुमानाला ढेकर आली. सीतेने समोर येऊन विचारले—"बाळा! थोडे आणखी वाढू का?"

"माते! आतां माझे पोट भरले!" असे म्हणत हनुमान पाकशालेतून बाहेर गेला.

त्यानंतर सीतेने देवी अन्नपूर्णेचे स्मरण केले. त्या पाठोपाठ सर्व भांडी अन्नाने भरून गेली. प्रजा व वानरांना मेजवानीचे जेवण वाढण्यात आले. वानरांमध्ये अगदी शेवटी एक लहानगे माकड बसले होते. त्याने लोणच्यातला आवळा उचलला. त्याला तो विचित्र वाटला. त्याने तो बोटांनी दाबला. तेव्हा आवळयातले बी एकदम उडून आकाशात गेले.

ते लहानगे माकड उडी मारून म्हणाले—"काय रे, तुलाच उड्डाण करता येते वाटते? मला उड्डाण करतां येणार नाही का? तरमग पहाच माझा प्रताप!" असे म्हणत त्याने उड्डाण केले. त्याला पाहून आणखी एक वानर उड्डाण करू लागला.

अशा तऱ्हेने सर्व वानर एका मागून एक उड्डाण करू लागले. अंगद, सुग्रीव व नील यांनीदेखील उड्डाण केले. हनुमानाला वाटले कदाचित उड्डाण करायला रामचंद्राचीच आज्ञा झाली असावी. त्याने देखील उड्डाण केले.

वानरांची ती गडबड चालू होताच स्वत: राम तेथे आला व हनुमानाला म्हणाला–"सर्व उड्डाण करू लागले तर तू एकदाच उडी मारून स्वस्थ कसा काय बसलास?"

"रामा! इतक्या थोर वीरांची बरोबरी मी कशी काय करणार?" हनुमान नम्रपणे म्हणाला.

तेव्हा जांबुवंत पुढे येऊन म्हणाला–"हनुमानाला स्वत:च्या पराक्रमाची आठवण दुसऱ्याने करून दिल्यावरच तर होते, नाही का?"

नंतर रामाने एक शुभ्र कमळ हनुमानाच्या हातात देत म्हटले–"हे कमळ, आमचे आदिपुरुष सूर्यनारायण यांना समर्पित करावयाचे आहे. सूर्याचे नाव श्वेत पद्मधर असे आहे. ते त्याच्याकडे पोचते करण्याचे काम एकट्या तुझ्या हातूनच शक्य आहे."

हनुमानाने "रामाज्ञा!" असे म्हणत ते श्वेत कमळ घेऊन उड्डाण केले आणि सूर्याच्या रथाला वंदन म्हणाला–"सूर्यदेव! श्रीरामचंद्राने हे आपणांला अर्पण करण्यासाठी मला पाठविले आहे." असे म्हणत त्याने ते कमळ सूर्याच्या चरणांवर वाहिले.

सूर्याने हनुमानाला आशीर्वाद दिला–"चिरंजीवी भव!" नंतर आपल्या हातातले श्वेत कमळ हनुमानाला देत म्हणाला–"तू हे रामचंद्राला नेऊन दे. याच्या प्रभावाने रामाच्या राज्यात सर्वदा सुख व शांतता नांदेल."

ते श्वेत कमळ कधी वाळत नाही. ते ज्या देशात राहील त्या देशात पाऊस पाणी उत्तम होईल. पिके चांगली होतील. आधी व्याधी होणार नाहीत. त्यानंतर हनुमान सूर्याचा निरोप घेऊन रामाकडे परत आला आणि ते श्वेत कमळ त्याने रामाला दिले.

राम आनंदाने रामाला भेटला. हनुमानाने सीतेला व रामाला अत्यंत आदरपूर्वक प्रणाम केला. सीतेने हनुमानाला आशीर्वाद दिला–"चिरंजीवी भव!"





## कित्तूरची राणी

# चेन्नम्मा

कर्नाटक प्रांतातील कित्तूर नामक संस्थानाची चेन्नम्मा ही राणी होती. इतिहासप्रसिद्ध शिपायांचे बंड झाले त्याच्या तीस वर्षां आधी आपला देश बळकावणाऱ्या ईस्ट इंडिया कंपनीच्या लोकांना चेन्नम्माने धूळ चाटायला लावली होती.



मल्लसूर्ज नामक कित्तूरच्या राजाची, राणी चेन्नम्मा ही दुसरी बायको त्याची पहिली बायको रुद्रम्मा हिला एक व चेन्नमाला एक मुलगा झाला. तरी मल्लसूर्जने मृत्युसमयी आणखी एकाला दत्तक घ्यावा असा चेन्नम्माने आग्रह केला.



रुद्रम्माला शासनकार्यात विशेष रुची नव्हती. म्हणून मल्लसूर्ज वारल्यावर राणी चेन्नम्माने रुद्रम्माच्या मुलाचा राज्याभिषेक करवून आपल्या मुलाला त्याचा अंगरक्षक नेमले. परंतु दोघे अकाली निधन पावले. नंतर दत्तक मुलाला चेन्नम्माने राजा म्हणून घोषित केले.



ईस्ट इंडिया कंपनीच्या सैनिकांनी तोपर्यंत देशातल्या अनेक प्रदेशांवर अधिकार केला होता. कंपनीचा एक प्रतिनिधी थॅकरे याने लहानशा सैन्यानिशी राज्यात शिरून कित्तूरच्या किल्ल्यासमोर पडाव टाकून राणीकडे तह करायला बोलावणे पाठविले. परंतु राणीने नकार दिला.

थॅकरेला राग आला. त्याने कित्तूरचा राजा मरण पावला असून गादीला वारस नसल्यामुळे कित्तूरचे राज्य खालसा करण्यात आल्याचे जाहीर केले. नंतर त्याने कित्तूरच्या किल्ल्यावर हल्ला करायला सैन्याला हुकूम सोडला. किल्ल्यातून राणीच्या सैन्याने बंदुकीच्या गोळ्यांचा वर्षाव केला आणि थॅकरेचे ब्लॅक व डिप्टान नावाचे अधिकारी प्राणास मुकले.





ते पाहून थॅकरे संतापला. त्याने स्वतःच किल्ल्यावर हल्ला चढविला. राणी चेन्नम्माने किल्ल्याच्या रक्षणाचे कार्य स्वतःकडे घेतले. तिच्या आज्ञेने नेम मारण्यात पटाईत अशा एका सैनिकाने बंदुकीचा नेम धरून स्वतः थॅकरेला गोळी मारली. थॅकरे घोड्यावरून खाली कोसळला व जागच्या जागी गार झाला. त्याचे सैनिक पाव-

त्या लढाईत ईस्ट इंडिया कंपनीचे अनेक सैनिक राणीच्या हाती कैद झाले. चेन्नम्माने त्यांना छळले नाही की त्रास दिला नाही. उलट किल्ल्यात एका जागी त्यांना सुखरूप ठेवून त्यांना सर्व सुखसोयी करून दिल्या.





ह्या पराभवाने कंपनीचे मालक चिडून गेले. एका टीचभर राज्याच्या राणीच्या हाती पराभव म्हणजे त्यांच्या प्रतिष्ठेला कलंक लागल्यासारखे त्यांना वाटले. म्हणून त्यांनी न्यायाने किंवा अन्यायाने कित्तूर राज्य स्वाधीन करून घेण्यासाठी कंबर बांधली.

कंपनीने देशभर पसरलेले आपले सैन्य एकत्र करून कित्तूरच्या किल्ल्याला वेढा दिला. परंतु किल्ल्यावर हल्ला चढविला नाही. समेटाची बोलणी सुरू केली आणि बंदी केलेल्या सैनिकांना सोडले तर वेढा काढून घेण्याचे वचन दिले.





राणी चेन्नम्माने त्यावर विश्वास करून सर्व इंग्रज बंद्यांना बंदीमुक्त केले. त्यांनी राणीसमोर आपली कृतज्ञता व्यक्त केली आणि आयुष्यभर पुन्हा कधी कित्तूरवर चालून येणार नाही याची शपथ घेतली.

सुटका मिळाल्यावर आपल्या छावणीत येतांच कंपनीच्या सैनिकांनी किल्ल्यावर स्वारी करण्याचे बेत सुरू केले. किल्ल्यात कैद झालेल्या सैनिकांना किल्ल्यात दारूगोळा कोठे ठेवला आहे हे माहीत झाले होते. त्यांनी त्यावरच गोळीबार करायला सुरवात केली. दारूगोळ्याच्या सांठ्यालाच आग लागली. आता राणीला किल्ल्याचे रक्षण करणे असाध्य झाले.





अशा तऱ्हेने दगा करून कंपनीने कित्तूरचा किल्ला काबीज केला. राणी चेन्नम्मा कैद झाली. कंपनीच्या अधिकाऱ्यांनी कंपनीचा अधिकार स्वीकार केल्यास राणीला सुटका मिळेल असे वचन दिले. परंतु राणीने साफ नकार दिला. नंतर राणीला कंपनीने बैलहोनगलच्या किल्ल्यात कैद करून ठेवले. सन १८२९ साली ती कैदेतच

# गोष्ट मथळा चढाओढ

## या गोष्टीला उत्तम मथळा सुचवून रु. २५ मिळवा!

?

श्रीगिरी नामक एका गावी सर्व शेतकरीच रहात असत. बायकापुरुष सर्व शेतावर जाऊन अंगमेहनत करीत. परंतु खंडोबाची बायको म्हाळसाबाईचा मंत्रातंत्रांवर जास्त विश्वास होता. तिला वाटे मंत्रतंत्र करून ताईत गंडा वगैरेच्या मदतीने धनधान्य वाढते. मेहनतीपेक्षा त्यांच्या मदतीनेच जास्त लाभ मिळणे शक्य आहे. म्हणून ती नेहमी देवळात जाई व साधू संन्याश्यांची सेवा करीत फिरे आणि शेतात कामाला जात नसे.

शेवटी एकदा ती एक ढेकूळ घेऊन आली. त्याची पूजा करून ते तिने कणगीत ठेवले व नवऱ्याला म्हणाली—"हे एक धान्याचेच ढेकूळ समजा. हे मला एका साधूने दिले आहे. याच्या मदतीने कणगीभर धान्य मिळेल.

त्याचा परिणाम असा झाला की खंडोबा उन्हे येईपर्यंत दुसऱ्या दिवशी झोपून राहिला. म्हाळसाबाईने त्याला जागे करून विचारले—"अहो, दुपार झाली, तुम्ही शेतावर नाही का जाणार?"

"अग, कणगीत ढेकूळ आहे ना? कणगी नाही का भरणार? मग हाडाची काडे करण्याची गरजच काय?" खंडोबा म्हणाले.

ते उत्तर ऐकून म्हाळसाबाईचे डोळे उघडले. तिने कणगीतले ढेकूळ काढून टाकले आणि मुकाट्याने नवऱ्याबरोबर शेतावर जाऊन काम करू लागली.

★ ★ ★

वरील गोष्टीला उपयुक्त होईल असा एक सुंदर मथळा विचार करून एका कार्डावर स्वतःच्या पत्त्यासह लिहून "गोष्ट मथळा चढाओढ", 'चांदोबा', चंदामामा प्रकाशन, २ व ३ अर्काट रोड, वडपळणी मद्रास ६०००२६ या पत्त्यावर पाठवा.

१० फेब्रुवारी १९७८ च्या आत पोस्टकार्ड पोंचले पाहिजे. त्या कार्डावर 'फोटो चढाओढ परिचय' देता कामा नये.

चढाओढीचा निकाल एप्रिल १९७८ च्या चांदोबात जाहीर करण्यात येईल.

---

डिसेंबर महिन्यातल्या चढाओढीचा निकाल (मथळा) "एकाच माळेचे मणी"



# अमरवाणी

संश्रुत्य शैब्य श्श्वेनाय
स्वां तनुं जगतीपति:
प्रदाय पक्षिणे, राजन्,
जगाम गति मुत्तमाम् ॥ १ ॥

[हे राजा! शैब्य नावाच्या राजाने (वचन दिल्याप्रमाणे) त्या ससाण्याला आपला देह अर्पित केला आणि उत्तम गतीला प्राप्त करता झाला.]

तथा ह्यलर्क स्तेजस्वी
ब्राह्मणे वेद पारगे
याचमाने स्वकी नेत्रे
उद्धृत्य सुमना ददौ ॥ २ ॥

[तसेच अलर्क नावाच्या एका थोर विभूतीने वेदपारंगत अशा एका ब्राह्मणाने याचना करत आपले डोळे काढून दिले.]

सरितां तु पति स्स्वल्पां
मर्यादां सत्य मन्वित:
सत्यानुरोधा त्समये
स्वां वेलां नाति वर्तते ॥ ३ ॥

[सर्व नद्यांचा अधिपती असा जो समुद्र, त्याने वचन दिल्याप्रमाणे कोणत्याही परिस्थितीत आपली मर्यादा, म्हणजे किनारा ओलांडला नाही.]

वचन पालन



# कावळा आणि घुबड

[ ५५ ]

क्रूराक्षने शिबिराजाचा वृत्तांत सांगितल्यावर अरिमर्दनाने दीप्ताक्षाचे मत विचारले. दीप्ताक्ष म्हणाला–"मला वाटते की आपल्या या शत्रूचे मन बदलले आहे, तेव्हा त्याची मदत घ्यावी. फार प्राचीन काळातली एक गोष्ट आहे, एका वृद्ध माणसाच्या तरुण पत्नीच्या गोष्टीप्रमाणे चोरामुळे फायदाच झाला आहे."

"कोणती गोष्ट ती?" असे अरिमर्दनने विचारतां दीप्ताक्षने ती गोष्ट सांगितली.

फार प्राचीन काळी कामातुर नावाचा एक वृद्ध व्यापारी होता. त्याच्या बरोबर चाळीस वर्षे संसार करून त्याची पहिली बायको वारली. त्याने लगेच दुसऱ्या दिवशी एका सोळा वर्षवयाच्या तरुण स्त्रीशी लग्न करून घेतले. त्याने तिच्या आईवडिलांना बरेच धन दिले. परंतु त्या तरुण स्त्रीला आपल्या वृद्ध पतीवर प्रेम करणे तिला शक्य नव्हते.

एके दिवशी रात्री ती स्त्री नेहमीप्रमाणे पतीकडे पाठ फिरवून कुशीवर झोपली होती. तेव्हा पहिलवानासारखा एक तरणाबांड चोर घरात शिरला. त्याला पाहून भिऊन जाऊन तिने आपल्या पतीला घट्ट आवळून धरले. अचानक बायकोत तो बदल झालेला पाहून वृद्ध पती चकित झाला; विचार करू लागला, आजपर्यंत न घडलेली गोष्ट एकाएकी कशी काय घडली? ती मला आलिंगन कां बरे करते आहे? त्याने घरात सर्वत्र एकदा नजर फिरवून पाहिली, तेव्हा त्याला कोपऱ्यात चोर उभा असलेला दिसला.

व्यापारी त्या चोराला म्हणाला–"बाबा रे! आजपर्यंत नुसता स्पर्श झाला

की तोंड फिरवणारी माझी बायको तुझ्या कृपेने मला स्वतः पोटाशी घट्ट आवळून धरून बसली आहे. म्हणून तुला काय वाटेल ते तू उचलून घेऊन जा!"

व्यापारी म्हणाला ते ऐकून चोराचे मन विरघळले. तो म्हणाला—"अहो! मी तुमच्या घरातून सुताचा एक धागा देखील उचलून नेणार नाही. माझ्या येण्याने तुम्हांला फायदा झाला आहे, म्हणून पुन्हां, ज्या दिवशी तुमची बायको आलिंगन द्यायला नाकारील त्या दिवशी येईन."

ती गोष्ट ऐकल्यावर अरिमर्दनाने वक्रनासाला त्याचे मत विचारले. तो म्हणाला—"राजा! त्या कावळ्याचा वध करू नये. तो शत्रू असला तरी आपल्या राजापासून ती असंतुष्ट आहे. तेव्हा त्याची मदत आपण अवश्य घ्यावी. ब्राह्मण, चोर आणि राक्षसीण यांच्या गोष्टीवरून आपल्याला हेच कळते."

"ती गोष्ट एकू दे तरी!" अरिमर्दन म्हणाला. तेव्हा वक्रनासाने ती गोष्ट सांगितली.

एका गावी एक गरीब ब्राह्मण रहात असे. तो भिक्षाटन करून आपला उदरनिर्वाह करी. उन, पाऊस, थंडी भूक लागत असूनही पोट भर खायला न मिळाल्या आणि मुळे त्याचा देह अस्थिपंजर झाला.

एकदा एका श्रीमंताने आपल्या मृत पित्याच्या मृत्युसमयी त्या ब्राह्मणाला



[illegible] खूप खाऊन पिऊन उत्तम गाई झाल्या. खूप दूध देऊ लागल्या.

एका चोराची दृष्टी त्या गायींवर पडली. त्याने त्या उडवायच्या असे मनाशी ठरविले. तो त्या ब्राह्मणाच्या घरी जात असता त्याला एक राक्षसीण दिसली. तिला पाहून चोर भ्याला. त्याने तिला विचारले—"कोण ग बाई तू? येथे काय करते आहेस?"

"मी राक्षसीण आहे. या घरात राहणाऱ्या ब्राह्मणाला खायला आले आहे! पण तू कोण बाबा?" राक्षसिणीने विचारले.

चोर म्हणाला—"मी एक चोर आहे. ब्राह्मणाच्या गायी चोरून न्यायला आलो आहे."

त्यानंतर दोघे मिळून ब्राह्मणाच्या घरी गेले. दोघे एका जागी लपून आपलं कार्य सिद्ध व्हायला संधी पाहू लागले. ब्राह्मण अंथरुणावर पडून झोपताच राक्षसीण त्याला खायचा विचार करून उभी राहिली. तिला पाहून चोर म्हणाला—"थांब ग! तू त्याला खायला धावशील व ब्राह्मण जागा होईल. तेव्हां मला आधी गाईंना पळवून नेऊ दे!"

"नाही! पहिल्याने मला ब्राह्मणाला खाऊ दे! तू गाई सोडायला जाशील आणि त्या 'हम्मा' करून ओरडू लागतील. माझं काम नाही का बिघडणार?" राक्षसीण म्हणाली.

दोघांचा परस्परांशी झाला आणि वाद भांडणाचे रूप त्याला मिळाले. तो ओरडा ऐकून ब्राह्मणाची झोप मोडली.

चोर ओरडला—"अरे ब्राह्मणा! ही राक्षसीण तुला खायला आली आहे!"

"ऐक रे ब्राह्मणा! हा चोर तुझ्या गायी चोरून घेऊन जायला आला आहे!" राक्षसीण म्हणाली.

मग काय, ब्राह्मणाने मंत्र म्हटला आणि राक्षसीण घाबरून पळून गेली. नंतर "चोर, चोर!" म्हणून तो ओरडला. म्हणून चोराला पळ काढावा लागला.













## १९३. प्राचीन थांग शिल्पकला

गेल्या दहा वर्षांत जे खोदकाम झाले त्यावरून इ. स. पूर्वी १६-१४ शतकांच्या मध्यकाळात दास्य समाजाची संस्कृती कशी पसरली होती हे कळले. विशेषेकरून काशाच्या भांड्यांची कारीगिरी अत्यंत उच्च दर्जाला पोचली होती. त्यात पानपात्र, सैंपाकाची भांडी आणि पुजेची भांडी मुख्य आहेत. अधिकांश भांड्यांवर त्यांच्या मालकाचे, म्हणजे गुलामांच्या मालकाचे नाव कोरलेले आहे. या चित्रांत 'टॅंग' वर्गातील भांडे आहे. याची उंची १०० सेंटीमीटर आणि वजन ८२.४ किलो आहे.





# माया सरोवर

[ २५ ]

[मायासरोवरेश्वर आकाशात हंसरथात बसून उडत असता घसरून खाली पडला तो नरमांस भक्षी जातीच्या लोकांनी तापविलेल्या पाण्याच्या रांजणात पडला. त्याने त्याच्या बरोबर खाली पडलेल्याची गोष्ट सांगितली. म्हणून त्यांच्या शोधार्थ सर्वजण निघाले. त्याच वेळी त्यांना सिद्धसाधकाचा "महाकाल की जय" घोष ऐकू आला. पुढे–]

सिद्धसाधकाचा तो "जय महाकाल की" घोष ऐकून मायासरोवरेश्वर जागच्या जागी थबकला. त्याने थरथरत्या अंगाने चहूंकडे दृष्टी फिरवून कोठून आवाज येत आहे, या गोष्टीचा कानोसा घेतला. ते पाहून रानटी लोकांचा मांत्रिक चकित झाला. त्याच्या बरोबर चौघे नरमांसभक्षी देखील त्या आवाजाच्या दिशेने निघाले.

परंतु माया सरोश्वर स्वतःला सावरीत मांत्रिकाला म्हणाला–"तू आपल्या अनुयायांबरोबर परत फीर. तो जयघोष महाकालाच्या एका अनुयायाचा आहे. त्यांच्या मंत्रशक्तीसमोर तुमचे भाले कुचकामाचे आहेत."

ते ऐकून मांत्रिक मोठ्याने हसला व म्हणाला–"आम्ही नरमांस भक्षी मंत्रातंत्रांना भीक नाही घालीत. आमच्या



देवीच्या कृपेने आम्हांला आणखी एक माणूस आमचा आहार व्हायला स्वतःच्या पायाने चालून येत आहे!"

मांत्रिकाचे ते वाक्य पुरे होता होताच त्यांचे जे अनुयायी पुढे गेले होते, परतले आणि घाबऱ्या आवाजात म्हणाले–"पुजारी मालक! आतां वांचणे कठीण. हत्तीसारख्या धिप्पाड वनमाणसावर बसून एक यमदूत घोष करीत याच बाजूला येतो आहे हो!"

आता मात्र माया सरोवरेश्वराबरोबर मांत्रिकाचा देखील थरकांप उडून गेला. त्यांना थोड्या अंतरावर वनमाणसावर बसून धावत येत असलेला शूलधारी सिद्धसाधक त्यांना दिसला.

काढणेच बरे! तुमच्या पैकी एक जण आपला सरदार बिबळ्याच्या शोधार्थ जा आणि त्याला या यमदूताची बातमी जाऊन कळवा. आपल्या जातीचे लोक त्याच्या हातात सापडले तर वाचणे कठीण! सर्वनाश होणार! उशीर झाला तर आपले फार मोठे नुकसान होणार आहे!" असे आपल्या अनुयायांना सांगून मागे पळण्यासाठी मांत्रिक फिरला.

सिद्धसाधकाने पुन्हा एकदा 'जय महाकाल की' घोष केला. पळणाऱ्या नरमांसभक्षी लोकांना पाहून त्याने आरोळी ठोकली–"थांबा! जागचे हललात तर एकेकाला या वनमाणसाचा आहार व्हावे लागेल. बोला, कोण तुम्ही? येथे काय करता आहात? कांचनमाला नावाची राजकन्या हंसांच्या रथातून येथेच पडली. तिला तुमच्या पैकी कोणी पाहिले का?"

सिद्धसाधक म्हणाला ते मांत्रिक किंवा त्याच्या अनुयायांना कळले नाही. मांत्रिक कोणती तरी गोष्ट आठवीत मान वर करून पहात असता झाडांच्या फांद्यांच्या आड लपून पळण्याच्या विचारात असलेल्या मायासरोवरेश्वराकडे बोट दाखवीत सिद्धसाधकाला म्हणाला–"आमच्या देवीने आहार म्हणून आमच्याकडे या माणसाला

तुमच्या त्या राजकन्येची गोष्ट माहीत असेल!"

तोपर्यंत सिद्धसाधक नरमांसभक्षी लोकांना पळू न देण्याच्या प्रयत्नात होता. म्हणून त्याचे लक्ष मायासरोवरेश्वराकडे गेलेच नव्हते. आतां त्याला पाहून धमकावून दरडावीत म्हणाला–"अरे, नरोटी सारखा टोप घातलेला मायासरोवरेश्वर तूच वाटते? तू मोठा शक्तिशाली आहेस, असे मी ऐकले होते. परंतु आता कळलं की तू भितरा व पळपुट्या आहेस! तू चोरासारखा पळू लागलास तर माझा हा भाला तुझ्या छातीच्या आरपार जाईल; लक्षात असू दे!"

ते ऐकून मायासरोवरेश्वर चिडला आणि साधकावर चालून जाण्याच्या प्रयत्नात तलवारीच्या मुठीवर हात ठेवीत, परंतु ती न उपसता म्हणाला–"तुझे रूप व वेष पाहून तू कापालिक आहेस हे मी ओळखले. परंतु तू कोण कुठला हे नाही कळलं. तुझ्यासारख्या क्षुद्र जीवांवर मी आपली तलवार उगारीत नाही. तू आपल्या वाटेने चालू लाग!"

"मी सिद्धसाधक आहे, महाकालाचा भक्त! तुझी बरोबरी करणारा तुझा शत्रू माझा चाकर दास झाला आहे. त्याला



मी राजकन्येच्या शोधार्थ पाठविले आहे. तू द्वंद्वयुद्ध करणार आहेस का? त्याला परत बोलवू?" असे म्हणत साधकाने एक आरोळी देऊन हाक मारली–"अरे जळवृका! कोठे आहेस रे? तुझा हाडवैरी मायासरोवरेश्वर इकडे आहे रे! तू इकडे ये!"

त्याला उत्तर देत जळवृक राक्षस दुरून काटेरी झुडपा आडून उडी मारीत ओरडला–"कोठे आहे, तो दुष्ट मायासरोवरेश्वर? मी आपल्या या दगडी गदेने त्याचे डोके फोडतो. त्याला तेथेच अडवून ठेवा, मी आलोच!"

जळवृक राक्षस असे म्हणत वेगाने धावत येत होता त्याचवेळी एका शाल-

वृक्षाच्या आडून मकरकेतू आपल्या जलग्रह हत्तीला पुढे घेऊन जलवृकाच्या वाटेवर उभा राहिला. जलग्रहाने एकदा चीत्कार केला व आपली सोंड पुढे करून जलवृक राक्षसाला धरण्याचा प्रयत्न करू लागला. परंतु जलवृक उडी मारून बाजूला सरकला, आणि हत्तीच्या मस्तकावर त्याने गदाप्रहार केला. मकरकेतू धमकी देत म्हणाला–"अरे, जलवृक राक्षसा! मी तुला हा पहा, यमसदनाला पाठवितो." असे म्हणत त्याने तलवारीचा वार केला. परंतु जलवृक राक्षस बाजूला सरकला. तरी त्याच्या खांद्याला तलवार लागलीच.

वनमाणसावर बसून सिद्धसाधकाने ते दृश्य पाहिले. आपल्या सेवकावर मकर- [illegible] तो दरडावून म्हणाला–"केतू! जयशील नंतर मला काय वाटेल ते म्हणो, मी या मायासरोवरेश्वराला आणि त्याचा गुलाम तुला आपल्या भाल्याने ठार करतो." असे म्हणत त्याने वनमाणसाला मकरकेतू होता त्या दिशेला जायला खुणावले.

तेवढ्यात चहूंकडून शिट्ट्या व टाळ्या वाजू लागल्या. सिद्धसाधकाने मान वर करून एकदा नजर फिरवून पाहिली. तोपर्यंत चारही बाजूंच्या झाडाझुडपा आडून नरमांसभक्षी जातीचे लोक येत असलेले दिसले. त्यांच्या पैकी त्यांचा नायक बिबळ्या आपल्या खांद्यावर भाला घेऊन पुढे आला आणि मांत्रिकाला म्हणाला–



"[illegible] मोठी कृपा झाली रे? इतकी माणसे एकाच वेळी आपलं भक्ष्य व्हायला चालून इकडे आली? आपलं इष्टदैवत म्हणजे भक्तांचा कल्पवृक्षच आहे!"

बिबळ्या म्हणाला ते साधकाने ऐकले आणि त्याच बरोबर त्याचे अनुयायी आनंदाने पुढे येत आहेत हे ही पाहिले व विचार करू लागला, आपल्या शत्रूबरोबर आपला जीव देखील धोक्यात पडणार की काय? असा विचार करून त्याने चटदिशी आपल्या वनमाणसाला जलग्रह उभा होता त्या बाजूला जायला खुणावले.



मकरकेतू त्यावेळी जखमी झालेल्या जलग्रहाच्या डोक्यावर हात फिरवीत होता. थोड्यावेळाने अत्यंत प्रेमाने त्याने हत्तीच्या पाठीवर ही हात फिरविला. हत्ती बसला होता तो उभा राहिला. मकरकेतू माया-सरोवरेश्वराकडे वळून म्हणाला–"प्रभो! आपण या जलग्रहावर चढावे. हा सिद्ध-साधक कितीही तापट असला तरी मनाचा उदार आहे. वैद्यदेव व जयशील हंसरथावर लौकरच येथे येऊन पोचतील."

नदीच्या काठावर ज्या गोष्टी घडल्या त्या विषयी मायासरोवरेश्वराला काहीच माहीत नव्हते. म्हणून मकरकेतू म्हणाला ते त्याला कळले नाही. तरी जलग्रहावर चढल्यास स्वरक्षण होऊ शकेल असे वाटून एकेक पाऊल पुढे टाकीत तो हत्तीजवळ येऊन पोचला. मध्यंतरी मकरकेतूच्या हातची तलवार लागून जलवृक राक्षस कण्हत एका झाडाच्या बुंधाला टेकून उभा राहिला. थोड्या वेळाने त्याने सिद्धसाधकाला पाहून विचारले–"मालक! काय हुकूम आहे?"

"मला वाटतं तुला लागलेली जखम तेवढी मोठी नसावी. तू पहिल्याने आपली गदा हातात घे!" अशी जलवृकाला आज्ञा करून साधकाने मकरकेतूला विचारले–"आता कळलं का की कोणाकडून कोणाला आता धोका आहे ते?"



"हे नरमांस भक्षक भ्रमात पडलेले आहेत की त्यांच्या जंगली देवतेने त्यांच्या आहारासाठी म्हणून आपणां सर्वांना पाठविले आहे. सर्वात प्रथम आपण यांच्या हातातून स्वत:ला वाचविले पाहिजे." मकरकेतूने तलवारीची मूठ हातात घट्ट धरून सिद्धसाधकाला सावध केले.

लगेच सिद्धसाधक म्हणाला–"मकरकेतू! तुझ्या अकलेसमोर आपली मान वाकते बुवा! कनकाक्ष महाराजांच्या मुलांचा शोध काढून त्यांच्या विषयी निश्चित झाल्याशिवाय मी व जयशील दोघां पैकी एकालाही या नरमांस भक्षकांचे भक्ष्य व्हायचे नाही आहे. मी त्यांची समजूत [illegible] माझ्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले तर बायका-पोरांना सोडून सर्व पुरुषांना एका रांगेत उभे करून निर्दयपणे सर्वांची डोकी छाटून टाकू या!"

मांत्रिक तोपर्यंत डोळे मिटून अंगात आल्यासारखा पिंगा घालीत होता. तो एकदम उडी मारून ओरडला–"हे चंडिके, देवी!" थांबून पुढे म्हणू लागला–"भूक, भूक! अरे, आमच्या इष्टदैवतेने आमच्यासाठी आहार म्हणून पाठविलेल्या माणसांनो! असे पाहता काय? चला, आमच्या रानटी लोकांच्या देवीच्या देवळात! तेथे प्रथम तुमचा बळी देऊन देवीसमोर नैवद्य दाखवू, नंतर तुम्हांला खाऊ."

सिद्धसाधक थोडावेखील न घाबरतां आपले शूल उचलून गरजला–"अरे नरमांस भक्षक हो! आम्हांला तुमचा आहार होण्यासाठी कोणी पाठविलेले नाही. तुम्ही चुकतां आहां! हंसरथातून घसरून या जंगलांत पडलेल्या आपल्या लोकांना शोधीत आम्ही इकडे आलो आहो. त्यांच्यापैकी मायासरोवरेश्वर एक आहे व तो आम्हांला सापडला आहे. आता आम्ही त्याला घेऊन आपल्या वाटेने जातो. तुम्ही आपल्या वाटेने चालू लागा!"

[illegible] हे, त्याचे काय? कित्येक आठवडे आम्ही उपाशी रानात भटकत होतो." बिबळ्या आपला भाला घेऊन सिद्धसाधकासमोर येऊन उभा राहिला.

"आमच्या रानटी देवाने तुला आणि मायासरोवरेश्वर नावाच्या माणसाला आकाशातून सरळ खाली पाठविले आहे. ही गोष्ट आम्ही प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनी पाहिली तर ती खोटी आहे का?" असे म्हणत मांत्रिक अक्राळ विक्राळ तोंड करून ओरडू लागला.

मग काय, वनमाणसाला साधकाने खुणावताच त्याने बिबळ्याला दोन्ही हातांनी धरले व त्याला पिळवटू लागला. त्याला वर उचलून जमिनीवर आदळण्याच्या बेतात तो होता. त्याच वेळी मायासरोवरेश्वराच्या आज्ञेने जलग्रह तेथे आला. त्याने मांत्रिकाला सोंडेत धरून उचलले आणि गरगर फिरवून जमिनीवर दूर फेकण्याच्या बेतात होता. बिबळ्या व मांत्रिक मोठमोठ्याने ओरडून आपल्या अनुयायांना आज्ञा करू लागले–"पाहतां काय? आपल्याला आहार म्हणून देवीने पाठविलेल्या या माणसांना सोडू नका. यांना जखमी करून कैद करा."

"अरे, जलवृक राक्षसा! पाहतोस काय? या नरमांसभक्षकांवर गदाप्रहार करून एकेकाची डोकी फोड." साधकाने त्याला आज्ञा केली.



जलवृक राक्षसाने "सिद्धसाधक महाराज की जय!" असा घोष करीत गदा उचलली आणि नरमांस भक्षकांवर तुटून पडला. उपाशी राहल्याने मरणाची भीती नसलेले नरमांस भक्षक लोक त्याच्याशी दोन हात करायला सिद्ध झाले. जलवृक राक्षस देहभान विसरून नरमांसभक्षकांवर गदाप्रहार करू लागला. नरमांसभक्षक स्वतःचे रक्षण करीत जलवृक राक्षसावर भाल्याने वार करण्याचा प्रयत्न करू लागले. त्या वेळच्या आरडाओरडयाने सर्व आकाश दुमदुमले.

सिद्धसाधकाने पाहिले की जलवृक राक्षस जिवावर उदार होऊन लढा देत आहे. तो त्याची प्रशंसा करीत म्हणाला–"शाबास, जलवृका! तू खरा बहाद्दर मर्दपुरुष आहेस. मी तुझ्या मदतीला येतो आहे!" असे म्हणत वनमाणसाला साधकाने बिबळयाला दूर फेकून द्यायला खुणावले आणि "जय महाकाल की" असा घोष करीत शूल घेऊन नरमांसभक्षकांवर आपल्या वनमाणसाला सोडले.

त्याच क्षणी दहा सशस्त्र घोडेस्वार धावत तेथे आले आणि गरजले–"थांबा! खबरदार कोणी पुढे पाऊल टाकाल तर! ही कनकाक्ष महाराजांची आज्ञा आहे!"

घोडेस्वारांचा आवाज ऐकून सिद्धसाधक व नरमांसभक्षक माणसे जागच्या जागी थबकली आणि आश्चर्यचकित होऊन त्यांच्याकडे पाहू लागली. परंतु मायासरोवरेश्वर आपाद मस्तक थरथर कापत म्हणाला–"मकरकेतु! आपण येथून पाय काढला पाहिजे व मायासरोवर गाठले पाहिजे नाही का?"

ते ऐकून सिद्धसाधक डोळयांनी आग पाखडीत म्हणाला–"अरे दुष्टा! मायासरोवरेश्वरा! तुला येथून पाय हलवू देणार नाही. तू आपल्या हिताची गोष्ट म्हणून समजून जे करायला निघतो आहेस तेच तुझ्या अहिताचे ठरणार आहे! खबरदार!" असे म्हणत साधकाने आपले शूल त्याच्या छातीवर रोवले.

(क्रमशः)





# चुकलेला नेम

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला तेव्हा प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! मला माहीत नाही, तू कोणाला तरी वचन दिल्यामुळे त्याचे पालन करण्यासाठी तर इतके परिश्रम करीत नाहीस ना? परंतु कधी कधी प्रसंगच असा येतो की दिलेले वचन पालन करणे अशक्य होऊन जाते. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला मणिमेखलेची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी पांचाल व मालव देशात परस्पर फार वैर होते. मालव देशाच्या वीरसेन नावाच्या राजाला जयसिंह नावाचा मुलगा होता. पांचालदेशाचा राजा विमला-



दित्य याला मणिमेखला नावाची एक अनुपम रूपवती कन्या होती. त्याने मुलीच्या लग्नासाठी स्वयंवर रचून देशातल्या सर्व राजे रजवाडयांकडे आमंत्रणे पाठविली. गंमत अशी की राजकुमारांबरोबर चाळीशी-उलटलेले सिंहासनाधिपती राजेसुद्धा स्वयं-वराला हजर झाले.

विमलादित्याने आपला शत्रू राजा वीरसेन याच्याकडे आमंत्रण पाठविले नाही. म्हणून वीरसेनाला फार राग आला. कारण वीरसेनाच्या मनात स्वतःच मणिमेखलेशी लग्न करण्याचा विचार होता. म्हणून त्याने आपला मुलगा जयसिंह याला बोलवून आज्ञा केली—"तू आतांच्या आतां पांचाल-

पराभव कर आणि त्याची मुलगी मणि-मेखला हिला कैद करून घेऊन ये. मी तिच्याशी लग्न करणार आहे."

वडिलांच्या आज्ञेप्रमाणे जयसिंहाने पांचाल देशावर स्वारी केली आणि विजयश्री मिळविली. विमलादित्याचा पराभव झाला व तो पळून गेला. परंतु सर्व राजपरिवार जयसिंहाच्या हाती कैद झाला. जयसिंहाने मणिमेखलेला अत्यंत आदरपूर्वक बोलाविले. तिचे रूप सौंदर्य पाहून जयसिंह चकित झाला.

बराच वेळ काय बोलावे हेच त्याला सुचेना. तरी स्वतःला सावरून तो म्हणाला—"राजकुमारी! माझ्या वडिलांच्या मनात तुझ्याशी लग्न करण्याची इच्छा आहे. तेव्हा उद्या तू माझ्याबरोबर मालवदेशात जाण्याची तयारी कर."

मणिमेखलेने काहीच उत्तर दिले नाही. मौन राहिली. तिला परत तिच्या महालात पोचविण्यात आले.

त्या दिवशी रात्री जयसिंहाला झोप लागेना. मणिमेखलेचे रूप सारखे त्याच्या डोळ्यासमोर उभे होते. तो आपल्या निवासस्थानी येरझाऱ्या घालीत फिरत असता एका परिचारकाने मणिमेखलेने पाठविलेले पत्र त्याला आणून दिले.

"शौर्य व साहस दाखवून आपण जी वस्तू जिंकलीत ती स्वतः न घेता दुसऱ्याला देत आहां हे बरोबर नाही."

पत्र वाचून जयसिंहाला वाटले की मणिमेखलेच्या मनात आपल्याशी विवाह करण्याची इच्छा आहे. तो स्वतः मणि-मेखलेच्या प्रेमात गुरफटलेला होता. म्हणून त्याने स्वतःच तिच्याशी लग्न करून घ्यायचे ठरविले. दुसऱ्या दिवशी मालवदेशात परत जाण्याचा बेत रहित झाला आणि जयसिंहाने मणिमेखलेशी विवाह करून घेतला.

त्या दिवशी रात्री जयसिंह राजकन्या मणिमेखलेच्या शयनागारात गेला. मणि-मेखला रतीसारखी सजून जयसिंहाची वाट पहात होती. जयसिंह तिला प्रेमालिंगन करण्यासाठी जवळ गेला. परंतु मणिमेखलेने अचानकपणे कटयार काढून जयसिंहाच्या छातीत भोसण्याचा प्रयत्न केला.

परंतु जयसिंहाने मध्येच तिचा हात धरून मुरगळला. त्यामुळे कटयार हातातून सुटून जमिनीवर पडली. त्याने तिला विचारले—"तू माझ्याशी प्रेमाचे नाटक करून पत्र लिहिलेस आणि विवाह ही करून घेतलास. मग तू असा माझा वध करण्याचा प्रयत्न कां केलास? खरे काय ते सांग. मी तुला दंड देणार नाही."

तेव्हा मणिमेखला गंभीर स्वरात म्हणाली—"युद्धापूर्वी मला माझ्या वडिलांनी सांगून ठेवले होते की यदाकदाचित युद्धात



आमचा पराभव झाला तर तू मात्र प्रतिकार कर. त्यांच्या आज्ञेचे मी पालन करण्याचा प्रयत्न केला. मी पत्र लिहून प्रेम व्यक्त केले, ते खोटे नव्हते, ते खरे आहे ही. आपल्याला उचित वाटेल तो दंड अगर शिक्षा मला करावी."

जयसिंह हतबुद्ध झाला, काहीच ठरवू शकला नाही. तो काही बोलल्या शिवाय तेथून निघून गेला. नंतर तो कोठे गेला हे कोणालाच कळले नाही.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले– "राजा! जयसिंह आपल्या प्रेमिकेला सोडून कसा काय निघून गेला? ती त्याचा वध करायच्या प्रयत्नात होती, म्हणून तिला माफ करण्याला त्याच्या मनाची तयारी नव्हती म्हणून का? मणिमेखलेने सांगितले होते ना, की तिचे त्याच्यावर प्रेम आहे. मग तिला असा सोडून तो का गेला असावा? नंतर तो स्वदेशीसुद्धा परतला नाही? . या सर्व शंकाचे समाधानकारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीत आहेत, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"जयसिंहाने मणिमेखलेचा त्याग केला त्यात काही चूक नाही. जर तिला तिच्या प्रयत्नात यश मिळाले असते तर ती अनाथ झालीच असती. परंतु जयसिंह निघून गेला त्याचे मुख्य कारण तो मणिमेखलेकडून चांगलाच धडा शिकला. तिचे जयसिंहावर प्रेम असून ती प्रेमांध झाली नाही. वडिलांनी केलेली आज्ञा तिला चांगली आठवत होती. त्या आज्ञेचे पालन करण्याचा तिने यत्न केला. याउलट जयसिंहाने मणिमेखलेच्या रूपावर मोहित होऊन वडिलांच्या आज्ञेची अवहेलना केली. म्हणून तो स्वदेशी परतला नाही व अज्ञात स्थानी निघून गेला.

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# अस्पृश्यतेचे भूत

शंका महाराज धीर, साहसी व विवेकवान म्हणून प्रसिद्ध होते. ते जातीने ब्राह्मण होते, म्हणून त्यांच्या दरबारात ब्राह्मणांची संख्या जास्त होती. परंतु त्यांचे सर्व मंत्री क्षत्रिय होते. महाराज शंका यांना शत्रूचे भय नव्हते. परंतु त्यांना व त्यांच्या प्रजेला भीती वाटे ती पुराची. दरवर्षी पावसाळ्यात सुंदरी 'नदी दुथडी वाहू लागे आणि पुराचे पाणी शेतात व गावात शिरून वर्षभराच्या मेहनतीचा सर्वनाश करी. राजाने पुराच्या पाण्यापासून राज्याचे रक्षण करण्यासाठी अनेक प्रयत्न करून पाहिले. परंतु त्याला यश आले नाही.

त्याच गावी राहणाऱ्या एका चांभाराचा लोचन नावाचा मुलगा लहानपणीच कोठे तरी पळून गेला. गावातले काही लोक म्हणत की लोचन कामरूप देशात मंत्रविद्या शिकायला गेला आहे तर आणखी काही लोकांच्या मते तो कर्मपुर गावी यंत्रविद्या शिकायला गेला आहे. पंधरा वर्षांनी तो आपल्या गावी परत आला. त्याच्या चेहऱ्यावर ओज आणि डोळ्यात आत्मविश्वास झळके.

लोचनला परत आलेला पाहून त्याच्या सर्व नातेवाइकांना आनंद झाला. सर्वांनी विचारल्यावर लोचन म्हणाला–"माझी आई माझ्या डोळ्यासमोर पुरात वाहून गेली. तेव्हापासून मी मनाशी ठरविले की काय वाटेल ते होवो, सुंदरी नदीच्या पुराच्या त्रासातून गावाला वाचविण्यासाठी काहीतरी मार्ग काढला पाहिजे. मी पुरावर अंमल करण्यासाठी माहिती काढीत तत्संबंधी शिक्षणासाठी अनेक देशांचा प्रवास केला. शेवटी पुराचे नियंत्रण करण्याचा इंजिनिअर होऊन आलो आहे." त्यानंतर तो राजाला जाऊन भेटला.



परंतु शंकामहाराज विवेकवान असूनही त्यांच्या मनात स्पृश्यास्पृश्यतेच विचार खोलवर रुजलेले होते. अर्थातच राजाला वाटले की एका चांभाराच्या मुलाच्या हाती पुराचे नियंत्रण होण्याची गोष्ट विश्वास करण्यासारखी नाही. म्हणून त्याच्याशी त्या गोष्टीविषयी बोलणे व्यर्थ आहे. राजाच्या या विचाराचे समर्थन त्याचे दरबारी व मंत्री सर्वांनी केले.

परंतु प्रधान धर्मपाल हा जास्त उदार विचारांचा होता. त्याने लोचनला एकांतात भेटून तो पुराचे नियंत्रण कसे करणार, हे विचारून समजून घेतले. लोचनला या कामात यश येईल व तो या विषयाचा तज्ञ [illegible] प्रधानाने लोचनला विचारले–"तू म्हणालास ते मला सर्व मान्य आहे. परंतु महाराजांच्या अधिकारी वर्गाच्या मनात विश्वास उत्पन्न व्हायला तुला एखादा प्रयोग करून दाखविता येईल का?"

"पाहतो, मी विचार करून सांगतो." लोचन म्हणाला.

शेवटी प्रधानाने खूप प्रयत्न करून राजाला या गोष्टीस कबूल करून घेतले की लोचन दरबारात पुराच्या नियंत्रणासंबंधी एक प्रयोग करून दाखवील तो महाराजांनी पहावा व खात्री करून घ्यावी.

राजाने विचारले–"परंतु मला हे सांगा की गंगामाता तो सांगेल तसे वागेल का?"

"महाराज लोचन म्हणतो की पाण्याचा प्रवाह थोपविण्याची कला त्याला अवगत आहे व दरबारात तो त्या कलेचा प्रयोग सर्वांसमक्ष करून दाखविणार आहे." प्रधानाने निवेदन केले.

राजाच्या अनुमतीने लोचन ठरलेल्या वेळी दरबारात आला. त्याच्या हातात सहा इंच उंचीचा व तीन इंच व्यास असलेला एक डबा होता. डब्याच्या झाकणाला अनेक बारीक बारीक भोके होती.

"या डब्यात पाणी भरून झाकण बंद केल्यावर डबा उलटा केला तर झांकणाच्या [illegible] वांनी पहाण्याची कृपा करावी." असे सांगून लोचनने डब्यात पाणी भरले व त्याला ते झांकण लावून डबा उलटा धरल्यावर शतधारा वाहू लागल्या.

नंतर लोचन एकदम ओरडला–"गंगामाते! आतां थांब!" आणि तत्क्षण शतधारा बंद झाल्या.

थोड्या वेळाने लोचन म्हणाला–"गंगामाते! पुन्हा वाहू लाग!" त्या पाठोपाठ शतधारा वाहू लागल्या.

राजाने आनंदाने उठून लोचनला शाबासकी देत जवळ ओढून पोटाशी धरले.

त्यानंतर दरबारातून सुंदरी नदीच्या नियंत्रणासंबंधी अनुज्ञा लोचनला मिळाली. नदीच्या वरच्या मुखापासून डोंगरातून नदी खाली वहात येई, तिच्या वाटेवर अनेक स्थानी मोठमोठे बांध बांधण्यात आले. जागोजागी मोठमोठे तलाव निर्मित झाले. अशा तऱ्हेने राजधानीचे व राज्याचे पुरापासून रक्षण झाले. उलट शेतांना पाटाचे पाणी आणि राजधानीला उन्हाळ्यात भरपूर प्यायचे पाणी मिळू लागले.

लोचनने हे नेत्रदीपक काम करून दाखविल्याबद्दल त्याचा राजदरबारात मान वाढला. राजाने त्याच्या सन्मानार्थ एक मेजवानी दिली. त्या मेजवानीला लोचनच्या पंक्तीला जातिभेद न मानून सर्व दरबारी व मानकरी बसले. सर्वांना मान्य करावे लागले की ईश्वराने सर्व मानवांना जन्म देतांना भेदभाव कधीच दाखविला नाही. मानवांनी ह्या जातीच्या भिंती उभ्या करून मानव जातीचे नुकसान केले आहे.

डब्यातले पाणी लोचनने कसे बंद केले? डब्याच्या बुडाला त्याने एक बारीक भोक करून ठेवले होते. तो ते भोक आपल्या बोटाने बंद करी किंवा उघडे करी. त्यामुळे पाणी वहायचे बंद होई किंवा वाहू लागे. यातले गुपित एवढेच. गंगामातेची कृपा वगैरे गोष्टी लोकांच्या भोळ्या मनाची समजूत घालण्याकरिता होत्या.



# दरबारी गायकाची निवड

कलिंग देशाचे महाराज आपले दरबारी गायक रामशर्मा यांच्या संगीत ज्ञानाचा फार आदर करीत. परंतु दुर्दैवाने रामशर्मांना वेड लागले. म्हणून दुसऱ्या दरबारी गायकाची नेमणूक करणे आवश्यक झाले.

देशातील संगीतशास्त्र विद्वानात रत्नपाल यांची फार ख्याती होती. प्रधानाने रत्नपालाला गायला आमंत्रण पाठविले. विद्वानांचे गायन झाले. त्यात अर्थातच रत्नपालचे ही झाले. परंतु राजाला एकाचे ही गायन आवडले नाही. तो म्हणाला—"रामशर्मांची सर नाही. म्हणून परदेशातून विद्वानांना बोलवावे."

दरबारी लोकांना वाईट वाटले. देशातल्या एका विद्वानाचे देखील गायन महाराजांना पसंत पडू नये आणि परदेशातून विद्वानांना बोलाविण्याची गरज भासावी?

प्रधानाने महाराजांच्या आज्ञेप्रमाणे परदेशातून संगीत विद्वानांना बोलाविले. परंतु त्यांच्या हातात पहिल्यानेच बिदागीची रक्कम ठेवून प्रधानाने त्यांना सावध केले की महाराजांची मर्जी झाली नाही तर महाराज काय करतील कोणास ठाऊक?

त्यांचे गायन ऐकून महाराज म्हणाले—"यांच्याहून तर रत्नपालच पुष्कळ बरा!" त्यानंतर रत्नपालाचीच दरबारी गायक म्हणून निवड होऊन नेमणूक झाली.





# अधर्मशाळा

विमलापूर हे एका इनामदाराचे गाव होते. इनामदारसाहेब प्रजेला पिळून काढीत. प्रजेच्या मनात इनामदाराविषयी प्रेम किंवा आदर थोडासुद्धा नव्हता. परंतु त्याच्या विरुद्ध "ब्र" काढण्याची कोणाची हिम्मत होत नसे.

छोटू आपल्या कुत्र्याला घेऊन विमलापूरला आला. गावात पाऊल टाकताच त्याला एक मोठा वाडा दिसला. त्यावर "धर्मशाळा" असे मोठ्या अक्षरात लिहिलेले होते. [illegible] धर्मशाळेत गेला. नोकराने त्याला हातपाय धुवायला पाणी दिले व विचारले—"तुम्ही जेवणार आहात का?" छोटूने होकारार्थी मान हलविली.

"मग साहेबांना भेटा!" नोकराने व्यवस्थापकाच्या खोलीकडे इंगित केले.

छोटूचे नाव वगैरे लिहून घेतल्यावर व्यवस्थापकाने पाच रुपये द्यायला सांगितले.

"म्हणजे? एका जेवणाला पाच रुपये? बाहेर तर "धर्मशाळा" असे मोठ्या अक्षरात लिहून ठेवलेले आहे!" छोटूने चकित होऊन विचारले.

"हे जेवणाचे म्हणून नाहीत! गावात एक मोठे शिवालय बांधायचे आहे. त्याच्या-साठी हा फंड घेतो. हे धर्मशाळेच्या मुख्य विश्वस्तांच्या आज्ञेने करीत आहो." व्यवस्थापक म्हणाला.

छोटूने धर्मशाळेत जेवणाचा विचार सोडला आणि गावात निघाला. त्याला एका जागी एक विचित्र दृश्य पहायला मिळाले. दोघे धडधाकट तरुण एका घरातून एका गाईला ओढून बाहेर आणीत होते. गाईचा मालक रडत विनवण्या करीत होता "गरिबाची गाय सोडा हो!"

छोटूला त्या माणसाची दया आली. त्याने जवळ जाऊन त्याला विचारले—



"कोण होते हे लोक? तू काय त्यांचे कर्ज घेतले होतेस का?"

"हा इनामदारसाहेबांचा जुलूम आहे. आजपर्यंत धर्मशाळा बांधायला म्हणून गावकऱ्यांना पिळले आणि आता शिवालया-च्या नावावर जुलूम चालू आहे." बिचारा गरीब माणूस म्हणाला.

छोटूला इनामदाराचा संताप आला. "गरिबांवर जुलूम करून धर्मशाळा आणि शिवालय बांधतो आहे?" छोटूने विचारले.

"जे लोक फंडाला पैसे देत नाहीत त्यांच्या घरातून असेच गाय म्हैस ओढून घेऊन जातात. त्याला जर कळलं की आपण दोघे त्याच्या विरुद्ध तक्रार करतो आहो, [illegible] करणार नाही." गरीब घाबऱ्या आवाजात म्हणाला.

"धर्मशाळेचा मालक इनामदार आहे तर? मग तेथे व्यवस्था पाहतो तो कोण?" छोटूने विचारले.

"तो तर इनामदाराचा मेहुणाच, बायकोचा भाऊ आहे! माझी गाय ओढून घेऊन गेले ते इनामदाराचे नोकर आहेत,— लांडगे आहेत, लांडगे!" गरीब माणूस म्हणाला.

छोटूने विचार केला, इनामदार आणि त्याचा मेहुणा दोघे आहेत वाघ आणि त्यांचे नोकर आहेत लांडगे! हे चौघे मिळून गावातल्या भोळ्या भाबड्या गरीब प्रजेवर जुलूम करीत आहेत.

आता त्याच्या मनात विचार आला, यांची खोड मोडली पाहिजे.

हळूहळू छोटूने गावकऱ्यांशी घनिष्टता वाढविली आणि त्यांच्या मदतीने एक नाटक करायचे ठरविले.

एके दिवशी तो इनामदाराला जाऊन भेटला व म्हणाला—"आपण थोर दानी व धर्मात्मा आहां! दहा रुपये घेतले तरी त्यात हरकत नाही. आपण जेवणाची उत्तम सोय धर्मशाळेत केली आहे. त्याबद्दल यात्रेकरू आपलं नाव काढतात!"

[illegible] सरळ बसला व विचारू लागला—"काय म्हणालास? दहा रुपये घेतले?"

"दहा रुपये घेतले तर त्यात काय हो? शिवालय बांधायलाच तर घेतले?"

"तू म्हणतोस ते खरे असेल तर मी त्याची चामडी लोळवितो. मी त्याला फक्त पाच रुपयेच वसूल करायला सांगितले होते! म्हणजे तो माझ्याशी लबाडी करतो आहे!" इनामदार रागाने म्हणाला.

छोटू म्हणाला—"अस्सं होय! दर माणशी पांच रुपये? आणि धर्मशाळेत दररोज पन्नास एक जण तरी जेवतातच! म्हणजे केवढी लबाडी!"

इनामदाराचा पारा आता खूप चढला. "दररोज पन्नास जण जेवताहेत? इतक्या जणांचा हिशोब त्याने मला एकही दिवस दिला नाही?" इनामदार म्हणाला.

"अस्सं! म्हणजे तुम्ही इतका विश्वास टाकलात म्हणूनच तर त्याला फावलं! मला वाटतं तुम्ही एकदा आपल्या एका माणसाला माझ्याबरोबर पाठवावे. त्याची लबाडी प्रत्यक्ष पाहून येईल. मी गेले चार दिवस धर्मशाळेतच तर जेवतो आहे!" छोटूने लोणकढी ठोकली. परंतु इनामदाराला ते सर्व खरे वाटले. त्याने आपल्या एका नोकराला छोटू बरोबर पाठवून दिले. त्या



दिवशी संध्याकाळी छोटूने इनामदाराच्या नोकराला बरोबर नेले आणि धर्मशाळेसमोर एका जागी दोघे लपून आड उभे राहिले.

छोटूने काही तरुणांना यात्रेकरुंचे सोंग करून त्या वेळी धर्मशाळेत जायला आधीच सांगून ठेवले होते. काही लोक हात धुवून ढेकरा देत बाहेर येत होते. ते सर्व इनाम-दाराच्या नोकराने पाहिले. त्याने इनाम-दाराला जाऊन सर्व वर्णन करून सांगितले. म्हणाला—"मालक! आज फक्त संध्या-काळीच पन्नासावर लोक धर्मशाळेत जेवले."

आंता मात्र इनामदाराला फार राग आला. छोटू म्हणाला—"पहा तर तो किती लोकांचा हिशोब देतो तो? तो काय



म्हणतो ते ऐका व त्यानंतर काय करायचे ते करणे बरोबर होईल." इनामदार त्यावर काहीच बोलला नाही.

दुसऱ्या दिवशी सकाळी मेहुण्याने अदल्या दिवशीचा हिशोब दिला. त्याच्या म्हणण्या प्रमाणे फक्त बारा माणसे जेवली होती. इनामदाराने दरडावून विचारले–"गुलामा! तू किती दिवसापासून ही लबाडी चालविली आहेस?" असे म्हणत त्याने चाबूक घेऊन धर्मशाळेच्या व्यवस्थापकाला मारायला सुरवात केली.

मेहुण्याला अर्थच कळेना की एकाएकी असं झालं तरी काय? चाबकाचा मार असह्य झाल्याने तो तेथून पळून गेला.

[illegible]
धर्मशाळेत गेला व इनामदाराच्या मेहुण्याला सहानुभूती दाखवीत म्हणाला–"हा मात्र जुलूम झाला! हा माणूस नाही, अंगात राक्षस शिरला होता! पण मला आश्चर्य या गोष्टीचे वाटते की तुम्ही हे सर्व निमूट-पणे सहन करून स्वस्थ कसे बसला? दोघे बरोबरचे आहां, तरी म्हशीला मारतात तसं त्याने मारलं. आणि गंमत अशी की तुमच्या मदतीने ते मालक म्हणून मिरवीत आहेत! तुम्ही जर गप्प बसलात व त्याला धडा नाही दिलात तर चारचौघांत तोंड दाखवायला सुद्धा लाज वाटायची!" छोटूने कोलितच हाती दिले.

"परंतु त्याला धडा द्यायचा कसा?" मेहुण्याने छोटूचाच सल्ला विचारला.

"इनामदाराच्या बाजूने उभे रहायला दोघां बिलंदर नोकरांशिवाय या गावात आहे तरी कोण? तुम्ही सांगाल तर तुमच्या शब्दावर जीव द्यायला पंचवीस जणांना मी येथे आणून उभे करतो." छोटू म्हणाला. इनामदाराच्या मेहुण्याची हिंमत वाढली.

"बरोबर म्हणतो आहेस तू! या गावातले सर्व गावकरी त्याच्या विरुद्ध आहेत. तो मेला तर डोळ्याला एक थेंब पाणी देखील येणार नाही कोणाच्या. हा

[illegible] आहेत सर्व! मी आज त्याची पाठ दुरुस्त करतो." असे म्हणत इनामदाराच्या मेहुण्याने हातात चाबूक घेतला.

"पण इनामदारसाहेबांना इकडेच येऊ द्या. तेच जास्त बरं होईल. एक काम करा. धर्मशाळेवर इनामदार साहेबांचे नाव आहे, ते खोडून त्याच्या जागी आपले नाव लिहा. बाकी सर्व मी पाहतो." छोटूने आपली योजना सांगितली.

इनामदाराच्या मेहुण्याने छोटूने सांगि-तल्याप्रमाणे केले. आणि गावात 'हांहां' म्हणता ती बातमी पसरली. इनाम-दाराच्या कानावर पण गेली. तो चाबूक घेऊन पाय आपटीत धर्मशाळेकडे दोघां नोकरांना घेऊन आला.

इनामदाराने दांत ओठ चावून मेहुण्याला विचारले–"काय रे, तुझी ही हिंमत का? तू विश्वस्त म्हणून माझे नाव खोडून आपलं लिहितोस! तुला असे करायचा अधिकार कोणी दिला?"

"रेड्यासारखा रेकतो आहेस कशाला? ही धर्मशाळा तुझ्या बापाची आहे का? ही गांवकऱ्यांच्या पैशाने बांधली आहे. पैनपै त्यांची आहे. धर्मशाळा बांधून ती मी चालवितो आहे. मग तू कसा काय विश्वस्त



झालास रे?" इनामदाराच्या मेहुण्याने विचारले.

"मूर्खा! वटवट बंद कर! तू काय बोलतो आहेस, त्याचे भान आहे का तुला?" असे म्हणत इनामदार पुढे जाऊ लागला. त्याचा मेहुणा तयारच होता. त्याने इनामदाराच्या मुसकुटात एक भडका-वली. तेव्हा इनामदाराचे नोकर पुढे येऊ लागले.

तोपर्यंत गंमत पहायला म्हणून उभे राहिलेल्या छोटूच्या साथीदारांनी नोकरांना धरले आणि त्यांना खूप ठोकून काढले. इनामदाराने त्या गावकरी तरुणांकडे करड्या नजरेने एकदा पाहिले.

"तू कोणाला भीती दाखवितोस? तू आजपर्यंत धर्मशाळा आणि शिवालय यांच्या नावावर गरिबांवर जलूम केलास. परंतु हे गरीब आजपर्यंत स्वस्थपणे सर्व सहन करीत आले. यापुढे नाही हे लोक सहन करणार! लक्षात ठेव! तुला यावरून कळायला हवे!"

इनामदार चिडून म्हणाला—"कुत्र्या! तू काय कमी खाल्लंस या पैशात? धर्मशाळेत उतरणाऱ्या प्रवाश्यांना आणि व्यापाऱ्यांना स्वतः लुटून तू ही बातमी पसरविलीस की व्यापाऱ्यांना चोरांनी लुटले. जेथे धर्मशाळा बांधलेली आहे तेथल्या झोपडीवाल्यांना तेथून पळवून लावायला तू त्यांच्या झोपड्यांना आग नव्हती का लावलीस? आता तू मला लांब लांब गप्पा सांगतो आहेस?"

"दुष्टा! तूच तर ही कामे माझ्याकडून करविलीस! चालता हो माझ्या डोळ्यासमोरून." मेहुण्याने दरडावले.

अशातऱ्हेने दोघे परस्परांच्या जुलमाबद्दल परस्परांवर आरोप करीत होते ते सर्व ऐकून तेथे जमलेल्या नागरिकांच्या अंगा- [illegible] कावळ्याचे त्यांच्या मनात आले. त्यांना रोपवून छोटू इनामदारांना आणि त्यांच्या मेहुण्याला समजावून सांगत म्हणाला—"खरे पाहिले तर समाजकंटक तुम्ही दोघे आहांत. तुम्ही दोघांनी स्वतःच्या तोंडानेच आपापला अपराध मान्य केलात. म्हणून तुम्ही दोघे गावाबाहेर चालते व्हा. प्रजा जोपर्यंत भोळेपणाने सर्व सहन करते तोपर्यंत तुम्हांला लुटता येते. आतां प्रजेचे डोळे उघडले आहेत. म्हणून दोघे पुढे या गावात राहलात तर तुमच्या जिवावर बेतेल."

इनामदार व त्याचा मेहुणा दोघांनी छोटूकडे संशयी मुद्रेने पाहिले, म्हणजे तूच रचलेले हे सर्व नाटक आहे तर?

त्या गावातून ते दोघे निघून जाईपर्यंत छोटू त्या गावात राहिला. नंतर तो ते गाव सोडून पुढल्या मुक्कामाला गेला.





# मेजवान्यांपासून मुक्ती

नागनाथाचे नुकतंच लग्न झालं आणि त्याला चांगली नोकरीसुद्धा मिळाली. रघुनाथ नावाचा त्याचा एक मित्र होता. एकदां रघुनाथ जानकीला बरोबर घेऊन मित्राला भेटायला गेला. जानकीने नागनाथाची बायको पद्मावती हिला आपल्या घरी मुलाचा वाढदिवस म्हणून जेवायला आग्रह केला. वाढदिवसाला रिकाम्या हातांनी जाणे बरोबर नाही असा विचार करून नागनाथाने मुलासाठी व मुलाच्या आईसाठी रेशमी कापड बरोबर घ्यायला बायकोला सांगितले. दुसऱ्या दिवशी नागनाथ व पद्मावती रघुनाथाच्या घरी गेली.

पद्मावतीला वाढदिवस, त्यात मुलाचा वाढदिवस थोडा नवाच होता. रघुनाथाचे घर व घरातील भपका पाहून तिचे डोळे दिपून गेले. जानकी जरीकाठी लुगडे नेसून व मोत्याचे दागिने घालून मिरत होती. वाढदिवसाला म्हणून आलेल्या सर्वांनी मुलाला व मुलाच्या आईला द्यायला कापड चुपड खेळणे किंवा आणखी काही डोळ्यात भरणारी वस्तू आणली होती. आलेल्या अहेराचा ढीग लागला होता.

घरी गेल्यावर पद्मावती नवऱ्याला म्हणाली—"मुलाचा वाढदिवस जानकीने किती थाटाने साजरा केला नाही? आपण सुद्धा निमित्त काढून मेजवानी दिली पाहिजे."

नागनाथाला बायकोचे मन मोडणे अशक्य होते. एक आठवडा जेमतेम लोटला असेल पद्मावती जानकीच्या घरी गेली व लग्नाची वर्षगाठ म्हणून दुसऱ्या दिवशी तिला जोडप्याने जेवायला बोलावून आली. त्यानंतर जानकीला बरोबर घेऊन गावातल्या आणखी चारसहा जणांच्या घरी ओळख करून घेऊन त्यांना सुद्धा जोडप्याने जेवायला बोलावणे केले.

पद्मावतीने मेजवानीची तयारी फार जोराने केली होती. पंक्तीसाठी लोकांना बोलावणे केले होते आणि त्या सर्वांनी मेजवानीच्या तयारीची खूप प्रशंसा केली. त्या दिवसापासून जानकीला व पद्मावतीला मेजवानीची जेवणे देण्याचा जणुकाही चढा-ओढच लागली. कधी स्वतःच्या वाढदिवस, कधी मुलाच्या नाही तर कधी लग्नाच्या आणि कधी मुहूर्ताच्या.

या मेजवान्यांच्या सर्व निमित्तानिमित्ताने वामनाथ आणि रघुनाथ दोघांना जीव नकोसा वाटू लागला. एकदा दोघांची अचानक भेट झाली. तेव्हा दोघांनी आपापल्या बायकांच्या मेजवान्यांमुळे होत असलेल्या अनुसार खर्चाची गोष्ट सांगितली.

वामनाथ म्हणाला—"मित्रा! मला तर पळून जावेसे वाटू लागले आहे!"

रघुनाथ म्हणाला—"अरे बाबा! तुझ्या बायकोच्या नादी लागूनच माझ्या बायकोने हे मेजवान्यांचे खूळ सुरू केले!"

वामनाथ म्हणाला—"माझी बायको म्हणत होती, भेटी येतात म्हणून तुझ्या बायकोने या मेजवान्या सुरू केल्या."

"होय, होय! माझी बायको म्हणते की आपल्या दागिन्यांचा टेंभा मिरवायला तुझ्या बायकोने मेजवान्यांचा खेळ खंडोबा सुरू केला आहे." रघुनाथ म्हणाला.

"तुझ्या बायकोचा हा वेडेपणा दूर करायला एक युक्ती सांगतो!" वामनाथाने ती युक्ती सांगितली.

"तुझ्या बायकोचा वेडेपणा दूर करायला माझी युक्ती ऐक!" रघुनाथाने ती युक्ती सांगितली.

एके दिवशी पद्मावतीने मेजवानी दिली. मेजवानीला निघण्यापूर्वी जानकीने आपली दागिन्यांची पेटी उघडली आणि मोठ्याने किंचाळीच फोडली. कारण पेटीत एक देखील दागिना नव्हता. सगळेच्या सगळे नाहीसे झाले होते.

ती रडत ओरडत रिकामी पेटी घेऊन रघुनाथ ओटीवर बसला होता तिकडे गेली व रघुनाथाला रिकामी पेटी दाखवून म्हणाली—"पाहिलेत? कोठे गेले हो सर्व दागिने?"

"दागिने आता येतील कोठून? आज-पर्यंत राहिले नशीब समजा! तुला समजा-यला हवं! तू दर महिन्याला दोनदोन मेजवान्या देतेस आणि त्यांच्या नावाला बोलावतेस! कुणाकडे जेवायला जातेस तेव्हा भेटी घ्यायला जातेस! मग पैसे येणार कोठून? पैसे आडाला लागतात का? मी मालकाकडून दोन हजारांचं कर्ज काढलं होतं. त्यांनी कर्ज फेडायला सांगितलं. मी कोठून आणणार पैसे? तुझे दागिने गहाण टाकून कर्ज फेडलं. आपल्या ऐपतीपेक्षा जास्त खर्च केल्याचा असा परिणाम होतो. आजपासून काटकसर करून दोघेजण असे राहिलो तर फिटेल कर्ज व सर्व दागिने परत मिळतील." रघुनाथाने बायकोला समजावून सांगितले.





दागिने गेल्यामुळे जानकी संध्याकाळा-पर्यंत रडत राहली. तिने कानाला खडा लावला, चुकून सुद्धा मेजवानीची गोष्ट काढावयाची नाही.

त्या दिवशी नागनाथने आपल्या बायकोला सांगितल्याशिवाय नेहमी मेजवान्या उड-विणाऱ्यांच्या घरी जाऊन सांगितले की तुम्ही प्रत्येक मेजवानीच्या वेळी काहीतरी भेट घेऊन येता, हे आम्हांला नाही आवडत. काही भेट बीट आणायची असेल तर तुम्ही न आलेले बरं!" सर्वांना ह्यायसं वाटलं.

त्या दिवशी संध्याकाळी पाहुणे मंडळी रिकाम्या हातांनी आली. ते पाहून पद्मा-वतीचा उत्साह थंडावला. पाहुण्यांनी मेजवानीची व पक्वान्नांची खूप स्तुती केली. परंतु पद्मावती आतल्याआत खूप संतापली, फुकटाचे गिळायला आले आहेत सर्व! कशी तरी ती मेजवानी संपली.

सर्व निघून गेल्यावर पद्मावती नवऱ्याला म्हणाली–"पाहिलंत, एकाने तरी काही आणलं का? पुरवा झोडून ढेकरा काढीत सर्व निघून गेले! काही लाजलज्जा?"

"अग वेडे, आपण लोकांना जेवायला बोलावतो, ते त्यांनी भेटी आणाव्या म्हणून का? या मेजवान्यांकरितां जो खर्च होतो तेवढ्यावर तुला आपल्या मनासारख्या वस्तू विकत घेता नाही का येणार? दुष्काळाच्या दिवसात ही चैन आणि मेजवान्या हव्यात कशाला? आपण अशा मेजवान्या देत राहलो तर वर्षभरात दिवाळं निघेल." नागनाथाने गोड शब्दांत बायकोची खूप कानउघाडणी केली.

पद्मावतीला ती गोष्ट पटली. तिला मेजवान्यांचा तिटकारा आला.

तेव्हांपासून मेजवान्यांची ही चढाओढ कायमची थांबली.

आपापली युक्ती छान साधल्याबद्दल नागनाथ व रघुनाथ दोघांना आनंद झाला. त्या आनंदांत त्यांनी दोघांनी मिळून एकत्र एक जेवण केले आणि त्यानंतर मेजवान्या कायमच्या बंद झाल्या.



# जसा सासरा तशी सून

रामपूर नावाच्या गावी धनशेट नावाचा एक व्यापारी होता. पै पै जोडून तो लक्षाधीश झाला. त्याला एकुलता एक मुलगा होता. त्याचं लग्नाचं वय झालं तेव्हा, सुनबाईला आणायचा विचार म्हातारा करू लागला. परंतु सून खर्चिक स्वभावाची की काटकसरीने राहणारी कशी मिळते कोणास ठाऊक? याच विचारात तो व्यापारी त्याला हवी होती तशा सुनेच्या शोधार्थ मुलाला बरोबर घेऊन गावोगाव हिंडू लागला.

धनशेटाने अनेक स्थळे पाहिली, परंतु श्रीमंतांच्या मुलींचे नखरे व नट्टापट्टा पाहून त्याने श्रीमंताची मुलगी सून म्हणून आणायची नाही असे ठरविले. अशा मुली घरात आल्या तर घरातली लक्ष्मी वर्षभरात घराला 'राम राम' करून निघून जाईल. मनासारखे स्थळ मिळालं नाही तेव्हा ते आपल्या गावच्या वाटेवर तो आपल्या एका मित्राच्या घरी उतरले.

त्या मित्राला एक मुलगी होती. तिचे लग्नाचे वय होते. ती हुशार होती. ती धन-शेटाच्या मुलाबरोबर गप्पा गोष्टी करताना कसलंतरी टाचण करू लागली. ते लक्षात आल्यावर धनशेटाने तिला विचारले–"कसलं टाचण होत होतं ग मुली? की काही हिशोब चालला आहे?"

"तसं काही नाही, आपण मुलासाठी स्थळं पहात खूप हिंडलात म्हणे आणि खर्च पण खूप केलात! आतां तुम्ही आमच्या घरी आलां आहां, तेव्हा आम्हाला सुद्धा खर्च करावा लागणार. हा खर्च कसा भरून काढायचा ह्याचं टाचण आपल्या चिरंजीवांचा सल्ला घेऊन करते आहे." धनशेटने जास्त विचार न करतां तिलाच आपली सून करून घेतले.





# जावयाची जबाबदारी

रंगनाथरावांचे कुटुंब फार मोठे होते. त्यांना एकंदर दहा मुलं होती. त्यांतली पहिली सहा अपत्ये मुली. परंतु रंगनाथरावांकडे वडिलार्जित शंभर एकर जमीन होती. म्हणून काळजी नव्हती.

थोरल्या मुलीचे लग्न झाल्यावर रंगनाथरावांना एका आजाराने ग्रासले. म्हणून त्यांनी जावईबापूंना घरजावई करून त्यांच्या हातात सर्व किल्ल्या दिल्या. जावयाचे नाव होते गणपतराव. त्यांच्यावर एका मोठ्या कुटुंबाची जबाबदारी आली. त्यांना इतक्या मोठ्या इस्टेटीचा कारभार पाहायला अधिकार मिळाला. गणपतराव व्यवहारकुशल होते. सासऱ्याच्या इस्टेटीची व कुटुंबातील राहणीची ओळख व्हायला फारसा उशीर लागला नाही. रंगनाथरावांच्या शेताची व गुराढोरांची कामे करायला तीन गडी होते.

गणपतराव सासऱ्याच्या घरातल्या खर्चावर ते निगा ठेवू लागले. काटकसर करायला सर्वांना बजावू लागले. वर्षांतून फक्त एकदा नवे कपडे शिवायचे किंवा लुगडी वगैरे आणायची असा प्रघात पाडला आणि दरसणावारी पक्वान्ने करण्याची गरज नसल्याचे त्यांनी घरात सांगून ठेवले.

गणपतरावांनी आपल्या पाच मेहुण्यांची लग्ने अशा तरुणांना शोधून करून दिली की कोणी त्यांच्या कारभारात ढवळाढवळ करायला येऊ नये व आपल्या कह्यात रहावे. त्यांनीसुद्धा गणपतरावांच्या कामात ढवळाढवळ एकदाचासाठी करण्याचा विचार सोडला की थोरल्या साडूंच्या इच्छेप्रमाणे वागलं तर ते काही वावगे करणार नाहीत, करतील ते चांगलेच करतील.

परंतु रंगनाथरावांच्या सर्वांत धाकट्या मुलीने आपल्या पतीची निवड स्वतःच केली. त्यांचा तो प्रेमविवाह होता. तिच्या पतीचे नाव होते महादेवराव. लग्नाच्या बाबतीत तिने आपल्या थोरल्या मेहुण्याचा अधिकार जुमानला नाही. लग्न करणार तर महादेवरावांशीच असा तिने हट्ट धरला. तिचे लग्न झाले तेव्हापासून गणपतरावांचा 'निर्विघ्न" व्यवहार बंद पडला.

महादेवराव वयाने लहान होते, पण अकलेने मोठे होते. ते गणपतरावांच्या प्रत्येक कामावर निगा ठेवीत आणि त्यांना हिशोब विचारीत. त्यामुळे गणपतरावांच्या कामात पदोपदी विघ्ने येऊ लागली. ते सासऱ्याला भेटून धाकट्या साडूचे नाव घेतल्याशिवाय त्याच्या विरुद्ध तक्रार करीत म्हणाले—"आपल्या समोरच सर्व व्यवहार चालू आहे. इकडे काही दिवसापासून पैशाची चणचण भासू लागली आहे. त्याचे मुख्य कारण घरात व बाहेर माझ्या शब्दाप्रमाणे लोक वागायला तयार नाहीत."

तेव्हा रंगनाथरावांनी विचारले—"तर असं सांगा की मी काय करू?"

गणपतराव म्हणाले—"आपला माझ्यावर विश्वास असेल तर ज्येष्ठ चिरंजीव सर्व व्यवहार पाहू लागेपर्यंत सर्व इस्टेटीचा व्यवहार पाहण्याचा पूर्ण अधिकार मला द्यावा."

रंगनाथरावांनी घरातल्या सर्व लोकांना



सांगितले. म्हणाले—"आज पासून गणपतराव जे काही सांगतील ती माझी आज्ञा मानून सर्वांनी वागले पाहिजे. त्यांच्या आज्ञेबाहेर कोणी राहता कामा नये.

तेव्हापासून गणपतरावांना सारे रान मोकळे मिळाले. त्यांनी सासऱ्याच्या इस्टेटीतून त्यांना वाटेल ते आणि वाटेल तेवढे उचलायला सुरवात केली. परंतु त्यांच्या वाटेवरची सर्वांत मोठी धोंड होती ती महादेवरावाची. म्हणून त्यांच्यावर चोरीचा आळ आणून त्यांनी त्यांना तुरुंगात पाठविले व आपल्या वाटेवरचा काटा काढला. ती गोष्ट रंगनाथरावांना आवडली नाही. परंतु

असल्याचे सांगून त्यांना वेडयांच्या इस्पितळात पाठवायला मागे पुढे पाहिले नाही. त्यानंतर सासऱ्याच्या अलोट संपत्तीवर स्वत:चा अधिकार गाजवायलाच नव्हे तर ती गडप करायला सुरवात केली. एवढी की स्वत:च्या नावावर त्यांनी एक वाडा बांधून घेतला. परंतु महादेवरावांवरचा आरोप खोटा ठरला व ते सुटून आले. त्यांनी कोर्टात गणपतरावांच्या कारवायांविरुद्ध तक्रार केली. मुख्य आरोप सासऱ्याला वेडा म्हणून सांगून वेडयांच्या इस्पितळात टाकले हा होता. कोर्टाच्या आज्ञेने सासऱ्याची डॉक्टरी तपासणी होऊन ते वेडे नसल्याचे ठरले.

रंगनाथरावांनी सर्व प्रकार पाहिला व पुन्हां इस्टेटीवर आपला ताबा करून घेतला. त्यांनी थोरल्या जावयाचे सर्व अधिकार काढून घेऊन ते धाकटयाला दिले.

महादेवरावांनी व्यवहार पहायला सुरवात केली तेव्हापासून गणपतरावांच्या चुकाच काढल्या. कुटुंबाच्या उन्नतीसाठी स्वतंत्रपणे काहीच केले नाही.

गणपतरावांच्या कारकीर्दीत नोकरवर्गावर कडक नजर होती, पण पगार त्यांना खूप मिळे. ते कामे पण चोख करीत नव्या जावयाला त्यांच्याकडून कामे करवून घेता आली नाहीत. गुरांचे हाल होऊ लागले. महादेवरावांच्या कारकीर्दीत इस्टेटीचे व्यवहार ढासळतच गेले.

महादेवरावांनी त्यांच्याकडून ते काम होत नसल्याचे कबूल केले. रंगनाथराव म्हणाले–"गणपतरावांनी दुष्टपणा केला. पण कर्तबगार होते, परंतु स्वार्थ त्यांच्या आड आला. तुम्ही त्यांच्या चुका दाखविण्याचे सोडून इस्टेटीची कामे कशी उरकायची याचा विचार करा. तुम्ही नवे जावई आहां, सर्व जबाबदारी तुमच्यावरच!"

त्या दिवसापासून महादेवरावांनी गणपतरावांची गोष्ट कधी काढली नाही. स्वत:च्या हिमतीवर इस्टेटीचे व्यवहार पाहिले व ती वाढविली. दोन वर्षांत ढासळलेली इस्टेट सावरली.





# नकली नाणी

सोनशेट गावातला एक धनाढ्य व्यापारी होता. किराण्या मालापासून सोन्या-चांदीपर्यंत सर्व तऱ्हेचा व्यापार करून तो लक्षाधीश झाला. परंतु त्याला कोटयाधीश व्हायचे होते.

राज्यात जुगार, दारू आणि लबाडी यांवर सरकारचे नियंत्रण नव्हते, म्हणून फसवेगिरी राज्यभर चालू होती. गावात वदंता होती की खजिन्यातली खरी नाणी काढून नकली नाणी करण्याचा धंदा सुरू झाला आहे. सोनशेटला अर्थातच ती गोष्ट माहीत होती. खरी नाणी देऊन दुप्पट नाणी मिळतात हे त्याने ऐकले होते. म्हणून त्याने विचार केला आपण आपली खरी नाणी देऊन खोटी घेतली तर आपल्याला सहजी कोटयाधीश होता येईल.

एके दिवशी तो दुकानात निघाला तेव्हा दूर त्याला एक वृद्ध गृहस्थ एका भिकाऱ्याला मूठभर चांदीची नाणी काढून देत असलेले दिसले. सोनशेटच्या तोंडाला पाणी सुटले. भिकारी निघून गेल्यावर सोनशेटने आपले नाव सांगून त्याचे नाव वर्धमान असल्याचे विचारून घेतले.

सोनशेटने वर्धमानाला विचारले–"काय हो, तुम्ही भिकाऱ्यांना अशी मूठ भर भरून नाणी दान करता का?"

"अहो, त्याला काय? तुम्हांला सुद्धा, तुम्ही भीक मागितलीत तर तुमच्या नावारूपाला साजेल अशी टोपलीभर नाणी देईन." वर्धमान म्हणाला.

"इतकी नाणी कशी देता हो?" सोनशेटने चकित होऊन विचारले.

"अहो ती खरी नाणी वाटली का तुम्हांला? पितळ्या तांब्याच्या नाण्यावर चांदीचा मुलम्मा चढविलेला आहे! कोणी खरी नाणी आणून दिली तर चौपट नाणी



मी देईन. पाहिजे तर तुम्ही प्रयोग म्हणून पहा. मी तुमच्या बरोबर राहतो." असे सांगून वर्धमानाने एक मूठभर नाणी सोनशेटला दिली.

सोनशेटने भीतभीत ती नाणी घेतली आणि कापडाच्या एका दुकानात गेला. त्याने कापड विकत घेऊन ती नाणी दिली. दुकानदाराने कोणत्याही प्रकारे संशय न करतां ती नाणी ठेवून घेतली. सोनशेटला वाटले आतां आपल्या जवळची खरी नाणी देऊन नकली घ्यायला काहीच हरकत नाही.

कापडाच्या दुकानातून बाहेर आल्यावर सोनशेटला वर्धमान म्हणाला—"मला वाटतं, तुम्हांला या नाण्यांवर विश्वास बसला असावा. मी खऱ्या नाण्यांबद्दल तुम्हांला नकली नाणी पाहिजे तेवढी द्यायला तयार आहे. पाहिजेत का?"

सोनशेटने आनंदानेच होकार दिला. असं ठरलं की सोनशेट शंभर खरी नाणी देईल त्यांच्याबद्दल वर्धमानाने चारशे खोटी नाणी द्यायची.

सोनशेट शंभर खरी नाणी घेऊन वर्धमानाच्या घरी निघाला. वर्धमानाने सोनशेटकडची खरी नाणी घेऊन बेफिकीरपणे ती एका टोपलीत टाकली आणि खाटेखालून एक पेटी ओढून तिच्यातली नाणी ओंजळी भरभरून चारदा सोनशेटला देत म्हणाला मोजून घ्या चारशांच जास्तच असतील. सोनशेटने मोजली, सत्तावीस जास्त होती.

तो घरी गेला. दुकानात त्याने त्याच नाण्यांनी व्यापार केला. गिऱ्हाइकांनी किंवा साथीदार दुकानदारांनी त्या नाण्यांची देवघेव करते वेळी संशय केला नाही, त्या नकली नाण्यांचा उपयोग तो जास्त जास्त करू लागला. वर्धमानाला तो खरी नाणी देऊन खोटी घेत राहिला.

शेवटी एकदां गांवला निघाल्यावर आपल्या कडची दहा लाख खरी नाणी पोती भरभरून गाडीत टाकली व तो वर्धमानच्या घरी गेला.

वर्धमान म्हणाला—"मी एकदम इतकी नाणी कशी बदलून देणार हो? माझे गुरुवर्य एका गावी राहतात. पाहिजे तर चला. त्यांच्याकडे ते हेच काम करतात."

दोघे नाण्यांनी भरलेली गाडी घेऊन निघाले. दोन दिवसांनी ते त्या 'गुरु'च्या गावी येऊन पोचले. तेथे वर्धमानच्या शिफारशीने सोनशेटचे काम सहजी झाले.

सोनशेट चौपट नाणी दोन गाड्यांत घालून वर्धमानने बरोबर सोबतीला पाठविलेल्या चौघां जणांबरोबर आपल्या गावाला निघाला. वर्धमान आपल्या 'गुरु'-कडेच राहला.

पहिल्या दिवशी प्रवासात कोणतेही विघ्न आले नाही. दुसऱ्या दिवशी प्रवास करीत असतां दुरून राजाचे शिपाई येत असलेले दिसले. वर्धमानने पाठविलेले लोक सोनशेटला म्हणाले—"हे पहा शेटजी! राजाचे शिपाई येत आहेत. आपण गाड्या एका बाजूला उभ्या करून दुसऱ्या बाजूला बसून राहू या. शिपायांनी विचारलं की गाड्या कोणाच्या, तर आपल्या नसल्याचं सांगायचं; शिपाई निघून गेल्यावर आपण गाड्या घेऊन पुढे जाऊ."

सोनशेट घाबरलेलाच होता. वर्धमानच्या नोकरांनी सांगितले ते त्याला मान्य करावे लागले. शिपायांनी पोत्यांना हात लावून विचारले—"कोणाची नाणी ही?"

"आम्हांला नाही बुवा माहीत. आम्ही यांच्या शेतात काम करणारे मजूर आहो.





मी देईन. पाहिजे तर तुम्ही प्रयोग म्हणून पहा. मी तुमच्या बरोबर राहतो." असे सांगून वर्धमानाने एक मूठभर नाणी सोनशेटला दिली.

सोनशेटने भीतभीत ती नाणी घेतली आणि कापडाच्या एका दुकानात गेला. त्याने कापड विकत घेऊन ती नाणी दिली. दुकानदाराने कोणत्याही प्रकारे संशय न करतां ती नाणी ठेवून घेतली. सोनशेटला वाटले आतां आपल्या जवळची खरी नाणी देऊन नकली घ्यायला काहीच हरकत नाही.

कापडाच्या दुकानातून बाहेर आल्यावर सोनशेटला वर्धमान म्हणाला—"मला वाटतं, तुम्हांला या नाण्यांवर विश्वास बसला असावा. मी खऱ्या नाण्यांबद्दल तुम्हांला नकली नाणी पाहिजे तेवढी द्यायला तयार आहे. पाहिजेत का?"

सोनशेटने आनंदानेच होकार दिला. असं ठरलं की सोनशेट शंभर खरी नाणी देईल त्यांच्याबद्दल वर्धमानाने चारशे खोटी नाणी द्यायची.

सोनशेट शंभर खरी नाणी घेऊन वर्धमानाच्या घरी निघाला. वर्धमानाने सोनशेटकडची खरी नाणी घेऊन बेफिकीरपणे ती एका टोपलीत टाकली आणि खाटेखालून एक पेटी ओढून तिच्यातली नाणी ओंजळी भरभरून चारदा सोनशेटला देत म्हणाला मोजून घ्या चारशेच्या जास्तच असतील. सोनशेटने मोजली, सत्तावीस जास्त होती.

तो घरी गेला. दुकानात त्याने त्याच नाण्यांनी व्यापार केला. गिऱ्हाइकांनी किंवा भागीदार दुकानदारांनी त्या नाण्यांची देवघेव करते वेळी संशय केला नाही, त्या नकली नाण्यांचा उपयोग तो जास्त जास्त करू लागला. वर्धमानाला तो खरी नाणी देऊन खोटी घेत राहिला.

शेवटी एकदां चांगला निश्चय केल्यावर आपल्या कडची दहा लाख खरी नाणी पोती भरभरून गाडीत टाकली व तो वर्धमानच्या घरी गेला.



वर्धमान म्हणाला—"मी एकदम इतकी नाणी कशी बदलून देणार हो? माझे गुरुवर्य एका गावी राहतात. पाहिजे तर चला. त्यांच्याकडे ते हेच काम करतात."

दोघे नाण्यांनी भरलेली गाडी घेऊन निघाले. दोन दिवसांनी ते त्या 'गुरु'च्या गावी येऊन पोचले. तेथे वर्धमानच्या शिफारशीने सोनशेटचे काम सहजी झाले.

सोनशेट चौपट नाणी दोन गाड्यांत घालून वर्धमानने बरोबर सोबतीला पाठविलेल्या चौघां जणांबरोबर आपल्या गावाला निघाला. वर्धमान आपल्या 'गुरु'कडेच राहला.

पहिल्या दिवशी प्रवासात कोणतेही विघ्न आले नाही. दुसऱ्या दिवशी प्रवास करीत असतां दुरून राजाचे शिपाई येत असलेले दिसले. वर्धमानने पाठविलेले लोक सोनशेटला म्हणाले—"हे पहा शेटजी! राजाचे शिपाई येत आहेत. आपण गाड्या एका बाजूला उभ्या करून दुसऱ्या बाजूला बसून राहू या. शिपायांनी विचारलं की गाड्या कोणाच्या, तर आपल्या नसल्याचं सांगायचं; शिपाई निघून गेल्यावर आपण गाड्या घेऊन पुढे जाऊ."

सोनशेट घाबरलेलाच होता. वर्धमानच्या नोकरांनी सांगितले ते त्याला मान्य करावे लागले. शिपायांनी पोत्यांना हात लावून विचारले—"कोणाची नाणी ही?"

"आम्हांला नाही बुवा माहीत. आम्ही यांच्या शेतात काम करणारे मजूर आहो.



यांच्या बरोबर शेतावर कामाला आलो." वर्धमानाचा नोकरांनी उत्तर दिले. सोनशेटने होकारार्थी मान हलविली. शिपाई राजधानीकडे गाड्या हाकून घेऊन गेले.

ते पाहून सोनशेटचा जीव खालीवर होऊ लागला. हताश होऊन घरी गेला आणि खाटेवर अंग टाकले. त्याचं सर्वस्व गेले होते. एका महिन्याने कसाबसा बाजारात निघाला. दूर त्याला वर्धमान दिसला. आज सोनशेट भिकारीदास झाला होता. परंतु वर्धमान तसाच उदार श्रीमंतासारखा मुठी भरभरून भिकाऱ्यांना दान करीत होता. एका भिकाऱ्याला त्याने सोनशेट समोरच एक मूठभर नाणी काढून दिली.

सोनशेटने त्या भिकाऱ्याला ओळखले. तो वर्धमानाचाच नोकर होता. थोडक्यात सोनशेटला फसविण्यासाठी त्याने ते सोंग केले होते.

त्यानंतर वर्धमान भिकाऱ्याच्या पाठोपाठ निघून गेला. भिकाऱ्याच्या हातातून सर्व नाणी त्याने परत घेतली. वर्धमान निघून गेल्यावर सोनशेटने भिकाऱ्याला गाठले. तेव्हां त्याला कळले की वर्धमानच्या गुरूच्या गावाहून त्याच्या बरोबर आलेल्या चार नोकरांपैकीच तो एक होता. त्याच्याकडून त्याला कळले की शिपायांचं सोंग करून आलेले लोक वर्धमानचेच नोकर होते.

भिकारी सोनशेटला धमकावून म्हणाला–"हे गुपित कोणाला सांगितलंत तर विसरू नका, आमच्याशी गाठ आहे. आम्ही व आमचे साथीदार जन्मठेप भोगून आलेले आहो."

"माझे धन आणि माझे कुटुंब यांचे कसे व्हायचे?" सोनशेटने विचारले.

"मी तुम्हांला थोडी खरी नाणी देतो. व्यापार करा." भिकारी म्हणाला.

"पण तू देणार ती खरी नाणी की खोटी?" सोनशेटने विचारले.

तो भिकारी हसत म्हणाला–"आमच्या जवळ खऱ्याखोट्याचा प्रश्नच येत नाही. सर्व नाणी खरीच असतात!"



# धान्याची किंमत

एका गावी राजारामराव म्हणून एक जमिनदार रहात असत. त्यांनी आपल्या गावात एक सुंदर वाडा बांधला होता. तो वाडा इतका सुंदर होता की मोठमोठ्या शहरात सुद्धा इतका सुंदर वाडा चुकूनचा पहायला मिळणे शक्य होते. तो वाडा पहायला परगावचे लोक नित्य येत.

शेतात जे धान्य पिके जमिनदार स्वतः समोर उभा राहून कोठारात भरवून ठेवीत असे. नोकरांना व गरिबांना धान्य देते वेळी तो स्वतः मापून देत असे आणि कोठाराला कुलूप लावून ठेवी. एकदा शेजारच्या गावातले तिघेजण वाडा पहायला आले. त्या वेळी जमिनदार नोकरांना धान्य मापून देत होता. काही दाणे जमिनीवर पसरलेले होते ते काळजीपूर्वक वेचून त्याने ते कोठारातल्या धान्यात टाकले. ते पाहून त्या तिघांपैकी एकाने थट्टेत विचारले–"काय हो? तुम्ही धान्याचा एकेक दाणा सोन्याच्या मण्यासारखा वेचता आहां?"

जमिनदाराने त्या वेळी काहीच उत्तर दिले नाही. तिघांना आपल्या घरी जेवायला बोलाविले. त्याने निरनिराळी पक्वान्ने तयार करविली होती. सैपाक्याने पाने मांडून त्यांवर खाद्यपदार्थांऐवजी सोन्याचे मणी वाढले.

जमिनदार म्हणाला–"धान्याच्या दाण्यांपेक्षा किमती मी सोने वाढले आहे, तुम्हांला तुम्ही हवं तेवढं मापून घ्या, पोटभर जेवा!" तेव्हां आपली चूक त्यांच्या लक्षात आली. त्यांनी जमिनदाराची माफी मागितली. त्यानंतर त्यांना पंचपक्वान्नांचे जेवण वाढण्यात आले. अन्नाची किंमत ओळखून तिघे आपल्या गावी परतले.












# गुन्हेगाराला योग्य शिक्षा

काशी येथे कमलगुप्त नावाचा एक धनाढय व्यापारी रहात असे. त्याला पद्मिनी नावाची एक अत्यंत रूपवती मुलगी होती. ती सुशील मुलगी आहे असे सांगत. कमलगुप्तने तिच्यासाठी योग्य स्थळाचा शोध करून चंद्रगुप्त नावाच्या तरुणाची निवड केली व त्याला आपला घरजावई करून घेतले. हळूहळू त्याने आपला सर्व व्यापारधंदा जावयावर टाकला.

पद्मिनीचे चंद्रगुप्ताशी लग्न झाले होते. परंतु तिच्या मनात पतीविषयी तिलमात्र आदर किंवा प्रेम नव्हते. ती मनाला वाटेल तेथे नवऱ्याच्या दृष्टीआड हिंडे फिरे. पुढे तिला एक मुलगा झाला. परंतु तिने मुलाच्या अंगाला स्पर्शदेखील केला नाही. म्हणाली–"माझा मुलगा झाला म्हणून काय, तोसुद्धा परपुरुषच आहे. मी त्याच्या अंगाला स्पर्श कसा करायचा?"

लोकांना वाटले. खरी पतिव्रता आहे बाई!

एके दिवशी चंद्रगुप्त आपल्या दुकानात बसला असतां एक कर्मठ ब्राह्मण तरुण रस्त्यावर मंत्रवलेले पाणी शिंपडत चालत असलेला दिसला. तो दिसायला फार सुंदर होता आणि सदाचरणीसुद्धा वाटत होता.

त्यावेळी चंद्रगुप्त गहू मापून देत होता. वाऱ्याने गव्हातली गवताची काडी उडून ब्राह्मणाच्या शेंडीवर पडली. चंद्रगुप्त घाई-घाईने ती काढायला धावला.

परंतु त्या ब्राह्मण तरुणाने चंद्रगुप्ताला तसे करून देता अडविले व म्हणाला–"मी आतां आपले डोके झाटून टाकतो. मी आजपर्यंत कोणतेही पाप केले नाही. मग हा अपचार कसा काय घडला?"

चंद्रगुप्ताने ब्राह्मणाची क्षमा मागितली, त्या तरुणाने आपला विचार बदलला. म्हणून चंद्रगुप्ताच्या मनात त्या तरुण मुलाविषयी अत्यंत आदर उत्पन्न झाला. त्याने त्या तरुणाला विनंती केली की त्याने काहीं दिवस त्याचे आतिथ्य ग्रहण करून त्याला उपकृत करावे. ब्राह्मण तरुणाने त्या गोष्टीस मान्यता दिली.

काही दिवसांनी चंद्रगुप्ताच्या मनात एक विचार आला की ऐन तारुण्य आहे व तोपर्यंत काय ती मेहनत करून धन संपादन करावे. तो विचार मनात येताच त्याने सर्व कुटुंबाचा भार त्या तरुण ब्राह्मणावर टाकलाव तो स्वतः व्यापार करायला परगावी निघाला. पाटलीपुत्र येथे व्यापार करण्याचे त्याने ठरविले.

त्याने पाटलीपुत्र शहराच्या बाहेर रानात काहीवेळ विश्रांतीसाठी थांबण्याचे ठरविले. तेथे झाडावर एक कावळा एका फांदीवर निश्चेष्ट बसला होता. इतर पक्षी दाण्याच्या शोधार्थ निघाले. त्यांच्या घरट्यातली अंडी पाहून त्या कावळ्याने एकेक करून सर्व अंडी खाल्ली आणि पुन्हा पहिल्या सारखा निश्चेष्ट आपल्या जागेवर जाऊन बसला.

चंद्रगुप्तला वाटले, कसा दुष्ट पक्षी आहे! याच्या अपराधाबद्दल याला कोणी शिक्षा करणारा नाही का?

इतक्यात एक पारधी आला. झाडावर इतर पक्षी दिसले नाहीत. म्हणून चिडून जाऊन त्याने त्या कावळ्यालाच तीर मारला. कावळा तत्काळ मरून खाली



पडला. चंद्रगुप्तला वाटले की कावळयाला त्याच्या पापाबद्दल देवाने शिक्षा केली.

नंतर चंद्रगुप्त शेजारीच एक आश्रम दिसला त्यात गेला. एक मुनी ध्यानमग्न बसलेले दिसले. एक बाई त्या मुनींना पाहून त्यांना वाकून नमस्कार करू लागली. मुनीने चटदिशी एक खंजीर त्या बाईच्या पाठीत खुपसून तिला ठार केले आणि तिच्या अंगा-वरचे दागिने काढून घेऊन आश्रमात लपवून ठेवले. दुरून चंद्रगुप्त हे सर्व पहात होता. फारच वाईट वाटले. इतका पवित्र दिसणारा मुनी असले कुकर्म कसे काय करू शकला?

त्याच वेळी शिपायांनी येऊन ज्या बाईचा खून झाला होता तिच्या नातेवाइकांना तिचा देह सोपविला व त्या मुनीला कैद केले. तेव्हा चंद्रगुप्तला वाटले की जगातला न्याय आणि धर्म लुप्त झालेला नाही. त्याचे चित्त शांत झाले. आपली पतिव्रता बायको आणि कर्मठ ब्राह्मण तरुणासारखे लोक या कलियुगात आहेत म्हणूनच जगातला धर्म टिकला आहे.

नंतर थोड्याच दिवसात त्याने बरोबर आणलेला माल विकून घरी परतण्याचा विचार केला. त्याला नित्य घराची आठवण येई. म्हणून तो फार कोठे मुक्काम न करता सरळ आपल्या गावी आला. तो घरी पोचला तेव्हा मध्यरात्र उलटून गेली होती. बायकोला हाक मारायला म्हणून झोपायच्या खोलीच्या खिडकीजवळ तो गेला. परंतु त्याला जे दृश्य दिसले ते पाहून त्याचा जगावरचा विश्वासच उडाला. तो कर्मठ ब्राह्मण आणि त्याची 'पतिव्रता बायको' एकाच अंथरुणावर झोपलेली होती.

"हाय रे देवा! हा काय तुझा न्याय आणि धर्म!" असा तो मनातल्या मनात देवाला दूषण देऊ लागला. त्याच वेळी छपरातून एक नागसाप खाली पडला व तो दोघांना चावून निघून गेला. दोघं जागच्या जागी तडफडून मरण पावली.

चंद्रगुप्त मनाचे समाधान करू लागला— "कदाचित, देव प्रत्येकाला पापाचे फळ असेच चाखवितो."





# कृतज्ञता

एका गावी जयदेव नावाचा एक श्रीमंत माणूस रहात असे. त्याच्या बायकोचे नाव जयप्रदा होते. त्या जोडप्याला मूल-बाळ नव्हते. त्यांनी पुत्रप्राप्तीसाठी अनेक व्रते व अनुष्ठाने आणि नवस वगैरे केले. परंतु त्यांना मूल झाले नाही. म्हणून दोघे तीर्थयात्रेला निघाली. तीर्थयात्रा संपवून दोघे गावी परत येत असता त्यांना जंगलात वाटेत चोरांच्या टोळीने घेरले. जयदेवचे नोकर चोरांना पाहून भीतीने पळून गेले. चोरांनी जयदेव व जयप्रदाच्या अंगावर जे दागिने व पैसा अडका होता तो सर्व लुटला.

त्याच वेळी चोरांची दृष्टी जयप्रदाच्या रूपावर पडली. तिची अब्रू लुटायचा ते विचार करू लागले. परंतु चोरांच्या सरदाराने त्यांना दरडावले. म्हणाला— "मी तुम्हांला कितीदा सांगितले आहे की बायकांच्या अंगावर कोणी हात टाकला तर त्याचे हात कापून टाकीन. विसरलात का? आपल्याला पाहिजे सोने व पैसे. फक्त एवढ्याचसाठी आपण आपला जीव धोक्यात घालून या जंगलात आलो. आपण चोर असलो तरी प्रथम मनुष्य आहो! आपल्याला मिळाले तेवढे सोने पुरे आहे!"

अशातऱ्हेने जयप्रदाच्या अब्रूचे रक्षण झाले. ती चोरांच्या सरदाराला म्हणाली— "तुम्ही आमचे सर्व धन लुटले आहे. परंतु तुमची फार आभारी आहे. या ऋणाची फेड माझ्या हातून केव्हा होईल सांगता येत नाही."

त्यानंतर पुष्कळ कष्ट सहन करून जयदेव व जयप्रदा आपल्या गावी परत आले.

काही दिवसांनी चोरांचा सरदार त्यांच्या गावात कोणत्या तरी कामानिमित्त









आला. राजाचे शिपाई त्याच्या पाळतीवर होते. त्यांना कोठून तरी सुगावा लागला. राजाने त्या सरदाराला धरून देणाऱ्याला इनाम जाहीर केले होते. म्हणून चोर आयता हाती सापडणार या आनंदात शिपाई होते. शिपायांनी चोराला ओळखले आणि त्याचा पाठलाग करीत आले.

चोरांचा सरदार शिपायांच्या डोळ्यात धूळ फेकून एका मोठ्या वाड्यात शिरला. संयोगाने तो वाडा आणखी दुसऱ्या तिसऱ्याचा नसून जयदेव व जयप्रदा यांचाच होता. जयदेवने चोराला ओळखले. त्यानेच एकदां त्यांना जंगलात लुटले होते. त्याला गोड गोड बोलून जयदेव एका खोलीत घेऊन गेला आणि बाहेरून त्याने कडी लावून घेतली. नंतर तो राजाच्या शिपायांना चोराला धरले असल्याची बातमी द्यायला धावला. त्याला राजाकडून इनाम मिळण्याची आशा होती, त्याच बरोबर चोराला त्याच्या पापाची चांगली शिक्षा करण्याची पण त्याला इच्छा होती. जयप्रदानें सुद्धा चोराला ओळखले. परंतु तिने त्याला न ओळखल्याचे सोंग केले. जयदेव घरातून बाहेर निघून गेल्यावर तिने चोराला त्या खोलीतून सोडवून म्हटले—"बाबा रे! तू एकदां माझी अब्रू वांचविली होतीस. आज मी तुला वाचवून त्या उपकाराची फेड करते आहे. तू जा, मोकळा आहेस. परंतु यापुढे वाईट मार्गाने पैसे मिळविण्याचा विचार सोड."

चोराच्या डोळ्यांना कृतज्ञतेची टिपे आली. त्याने कृतज्ञतापूर्वक जयप्रदाला नमस्कार केला व तेथून निघून गेला. आयुष्यात पैशापेक्षा इमानदारी व कृतज्ञता याचे स्थान मोठे आहे, हे त्याला कळले. त्या दिवसापासून त्याने चोरीचा धंदा सोडला. आणि मेहनत मजुरी करून त्याने पुढील आयुष्य घालविले.






राजारामाची राजवट सुरू झाल्यावर उत्तर दिशेला गंधर्वांनी राज्यावर स्वाऱ्या करून प्रजेला सतावून सोडले. भरताने एका मोठ्या सैन्यानिशी जाऊन त्यांचे पारिपत्य केलें आणि त्यांचा पराभव केला. गंधर्वांच्या अत्याचारापासून प्रजा मुक्त झाली आणि सुखशांतीपूर्वक राहू लागली.

त्यानंतर थोड्याच दिवसांनी वायव्य दिशेला लवणासुर नामक राक्षसाने धुमाकूळ घातला असल्याचे कळले. म्हणून रामाने शत्रुघ्नाला एक दिव्य अस्त्र देऊन लवणासुराच्या समाचाराला पाठविले. राक्षसांनी माया केली तर कळावी यासाठी रामाने बिभीषणाला शत्रुघ्नाच्या मदतीसाठी बोलावण्याचे ठरवून हनुमानाला लंकेला पाठविले.

लंकेहून बिभीषण राक्षस वीरांना बरोबर घेऊन आला. नंतर शत्रुघ्न आपल्या सैन्याबरोबर राक्षस सैन्याला घेऊन बिभीषणासह लवणासुरावर चाल करण्यासाठी निघाला.

शत्रुघ्नाने सुदर्शनचक्राप्रमाणे पुढे जाऊन लवणासुराच्या सैन्याची धुळदाण उडवून दिली. त्या भयंकर युद्धाच्या वेळी बिभीषणाच्या राक्षस वीरांनी अपूर्व पराक्रम दाखविला. शत्रुघ्नाने लवणासुराबरोबर युद्ध करून त्याचा वध केला. विजय मिळवून शत्रुघ्न अयोध्येला परतला.

एके दिवशी राम सिहासनावर बसलेला होता. डाव्या बाजूला सीता बसलेली होती.



समोर हनुमान बसलेला होता. रामाच्या राज्यसभेत भरत, लक्ष्मण, शत्रुघ्न, सुग्रीव, अंगद, नल, नील, जांबुवान, बिभीषण, वसिष्ठ आदी प्रमुख आपापल्या स्थानी बसलेले होते.

त्या वेळी अगस्त्य मुनींचे सभेत पदार्पण झाले. रामाने सिंहासनावरून उठून त्यांना प्रणाम केला आणि सर्व प्रकारे अर्घ्यादींनी त्यांचा सत्कार करून त्यांच्या कुशलक्षेमाची चौकशी केली.

तेव्हा अगस्त्य मुनी म्हणाले–"दुष्टांना दंड आणि शिष्ट जनांचं रक्षण हे तुझे व्रत तू पालन करीत असतां आम्हांला कोणत्या गोष्टीची काळजी असणार, रामा? तू दशकंठ [illegible] कीर्ती संपादन केली आहेस. ही गोष्ट जगजाहीर आहे. परंतु तिकडे समुद्रापलीकडे मायानगर येथे आपली राजधानी स्थापन करून शतकंठ नामक राक्षस शासन करीत आहे. तो तुझा वध करण्याच्या विचारात आहे.

रामाने आश्चर्यचकित होऊन विचारले–"महामुनी, त्या राक्षसाविषयी थोडेसे विस्तारानं सांगण्याची कृपा करावी."

अगस्त्य सांगू लागले–"कश्यपाला वसू नावाची मुलगी होती. असुरसंध्यासमयी गरोदर झाल्याने तिच्या पोटी अत्यंत विकृत व भयंकर रूप असलेला शतकंठ जन्मला. त्यानं ब्रह्मदेवाची आराधना करून घोर तप केले. ब्रह्मदेवाने प्रसन्न होऊन शतकंठाला दर्शन दिले. इंद्रादी देवांनी असाध्य असे वर त्याला दिले आहेत. म्हणून त्या राक्षसाला गर्व चढला आहे आणि त्याने त्रिलोक जिंकण्याचा विचार सुरू केला आहे. म्हणून तू त्याचा वध करणे आवश्यक आहे."

रामचंद्राने थोडा वेळ विचार करून विचारले–"तो दिसायला कसा आहे?"

"तो दिसायला कसाही असू दे. तुझ्या बाणाला असाध्य असे काही नाही! रावणापासून दहापट पराक्रमी आणि भयंकर [illegible] त्याचा वध कसा करावयाचा हे तुला इतर कोणी सांगण्याची गरज आहे का?" अगस्त्यांनी विचारले.

अगस्त्य मुनी आशीर्वाद देऊन निघून गेल्यानंतर राम आपल्या बंधूंना म्हणाला–"युद्धांत रावण, कुंभकर्ण इत्यादिकांचा वध करून मी थकलो आहे. लक्ष्मणही थकलेला आहे. भरत गंधर्वांशी युद्ध करून आणि शत्रुघ्न लवणासुराशी युद्ध करून थकलेले आहेत. दूर कोठे समुद्रापलीकडे राजधानी स्थापन करून रहात असलेल्या या शतकंठाचा वध करण्याचे काम कोणाला सांगावे? शंभर योजनांचा समुद्र पार करून जाणेच कठीण!" राम असे म्हणून विचारात गढून गेला.

इतक्यात रामाची दृष्टी समोर हनुमान बसला होता त्याच्यावर पडली. राम तत्क्षण म्हणाला–"महाबली हनुमाना! तुलाच हे शक्य आहे! तू रुद्राचे सामर्थ्य असलेला एकपाद रुद्र आहेस, परंतु असा बसला आहेस की तुला काहीच माहीत नाही?"

हनुमान म्हणाला–"प्रभो! आपल्यासमोर त्या राक्षसाची काय बिशाद? आपण माझ्या खांद्यावर बसून त्या द्वीपावर चलावे आणि त्या राक्षसाचा वध करावा."

रामाने हनुमानाला अत्यंत प्रेमाने आलिंगन करून त्याची स्तुती केली व म्हणाला–



"तुझे शौर्य आणि पराक्रम इतर कोणाजवळ आहे रे?"

सीता इतका वेळ हे सर्व ऐकत स्वस्थ बसली होती. तिने रामाला विचारले–"आपण हनुमानाला एकपाद रुद्र म्हणालात. रुद्राला वानर रूप कां धारण करावे लागले?"

तेव्हा रामचंद्राने पूर्वकथा सांगितली ती अशी: ब्रह्मांडावर शासन करणाऱ्या एकपादरुद्राने, ज्याच्या सेवेला महारुद्र गण सतत हजर असतात, एकदा ध्यानमग्न असता महाविष्णूचे स्वरूप पाहिले. तो विचार करू लागला, हे रूप पूर्वी कधी दृष्टीस पडले नाही. हे रूप त्या परम
























शिवाचेच असले पाहिजे. म्हणून तो तत्क्षण तेथून निघाला. विश्वभ्रमण करून पृथ्वी लोकात आला आणि परमशिवात विलीन झाला. त्या शिवाचा अंशच हा हनुमान आहे.

त्यानंतर रामचंद्र शतकंठाचा वध करण्यासाठी सिद्ध झाला. सीतेने बरोबर येण्याची इच्छा दर्शविली. लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न, सुग्रीव, बिभीषण आणि रामाचे विशाल सैन्य युद्धाला निघाले. रामाने हनुमान कोठे आहे चौकशी केली. तेव्हा तो विश्वरूप धारण करून पृथ्वी, आकाश व सर्व दिशा व्याप्त करून उभा असलेला दिसला. त्याचे संपूर्ण रूप पाहणे कोणाला शक्यच [illegible] पाहू लागले.

त्यानंतर हनुमान पृथ्वीच्या बाजूने थोडा वाकला. त्याच्या खांद्यावर रामाने प्रथम सीतेला बसविले व नंतर स्वतः बसला. त्यानंतर हनुमानाने आपल्याबरोबर येणार असलेल्या वानर व राक्षस सैन्याला चढायला सांगितले. त्या सर्वांनी हनुमानाच्या पाठीवर बसून आकाशमार्गे यात्रा सुरू केली. आकाशात उडत असता हनुमान मेरुपर्वतसारखा भासला.

हनुमान चतुःसमुद्र पार करीत असता रामाने सीतेला प्रत्येक समुद्राचे वर्णन करून सांगितले. शेवटी शतकंठाची राजधानी मायानगरी दिसली. त्या शहराला चहूकडून सोन्याचा कोट होता. हनुमानाशिवाय इतर कोणाला समुद्र पार करून जाणे शक्यच नव्हते.

मायानगरीत नंदनवनाची बरोबरी करू शकणारे एक विस्तीर्ण उद्यान होते. रामचंद्राने हनुमानाला तिथे उतरवायला सांगितले. सैन्ये तेथेच उतरली. नंतर रामचंद्र सुग्रीव आदिकांना म्हणाला—"तुम्ही राक्षसाशी युद्धाला निघा."

लगेच सुग्रीव, अंगद, बिभीषण आदी शूर वीर योद्धे आपापली सैन्ये घेऊन शतकंठाच्या नगरीवर स्वारीला निघाले. वानर [illegible] नगरकोटाच्या चारही बाजूला जो खंदक होता तो भरला. त्यांनी किल्ल्याची भिंत आपल्या पराक्रमाने पाडली. बुरूज पाडले व द्वारांवर उभारलेले गोपूर पाडले. नगरकोटाच्या रक्षणार्थ कालकेय नामक राक्षस उभे होते. त्यांना वानरांनी आणि राक्षसांनी केलेली स्वारी पाहून आश्चर्य वाटले. त्यांनी सिंहनाद केला आणि मनात विचार करू लागले— "या नगरावर शतकंठाचे राज्य आहे, हे या लोकांना माहीत नाही काय? हे कसे वाचणार?"

त्यानंतर कालकेयांनी विविध शस्त्रास्त्रे धारण करून वानरांच्या व राक्षसांच्या सैन्यावर हल्ला केला. त्यांच्या समोर वानर सैन्याला पाय रोवून लढणे अशक्य झाले. सैन्याची पांगापांग झाली. बिभीषणाने वानर सैन्याला थांबवून राक्षस सैन्याला अघाडीवर नेले. सर्वांनी मिळून कालकेयांशी युद्ध आरंभिले. युद्ध भयंकर रूप धारण करू लागले.

त्या वेळी शतकंठ शंकराच्या पूजेत मग्न होता. युद्धाचा आरडा ओरडा ऐकून त्याने आपल्या द्वारपालकांना त्या संबंधी विचारले.

द्वारपालकांनी शतकंठाला प्रणाम केला व म्हणाले—"महाप्रभो! कोणी तरी राजा एका वानरावर बसून कोठून तरी वानरांचे व राक्षसांचे सैन्य घेऊन आला आहे. आपले नगरकोट रक्षक कालकेय त्यांच्याशी





युद्ध करीत आहेत. त्याचा कोलाहल ऐकू येत आहे."

"अरे, कोणी ऐकलं, की कोणी तरी राजा माकडाच्या पाठीवर बसून वानर सैन्य घेऊन माझ्या राजधानीवर चालून आला आहे, तर हसणार नाहीत का? देवांनी सुद्धा माझ्या समोर मस्तक बांकविलं आणि हा राजा येथवर वानर सैन्य घेऊन आलाच कसा?" असे सांगून शतकंठाने आपल्या मंत्र्यांना बोलावून लढाईला तयार व्हायला सांगितले. त्याने रणवाद्ये वाजवून लढाईचे शिंग फुंकले व युद्धाला तयार झाला.

शतकंठाला किरीट व आभूषणे घालून युद्धाला येत असलेला पाहून स्वत: रामचंद्र [illegible] पहात राहले.

ते पाहून हनुमानाने रामाला सावध केले व म्हणाला—"प्रभो! आपण त्या राक्षसाला पाहून चकित झाल्यासारखे दिसतां! आपल्या प्रतापासमोर त्याची गणनाच काय? आपण जास्त विचार न करता त्याचा लौकर वध करावा." असे म्हणत हनुमान स्वत: शतकंठाच्या समोर जाऊन उभा राहिला व त्याच्या छातीत मुष्टिप्रहार केला. तो मुष्टिप्रहार त्याला असह्य झाल्याने तो जमिनीवर आदळला. लगेच उभा राहून व समोर हनुमानाला पाहून तो म्हणाला—"काय रे माकडा! एवढी शक्ती आहे का तुझ्या अंगात! त्रिलोकाला भयकंपित करणाऱ्या मला एका मुष्टिप्रहाराने तू खाली पाडलंस? मी आजपर्यंत कित्येक देवांना जिकलं, परंतु एकानेही मला असे जमिनीवर पाडलं नाही. तुझा मुष्टिप्रहार मी पाहिला, आता हे शूल येत आहे. स्वत:चे रक्षण कर!" अशा वल्गना करीत त्याने आपले शूल हनुमानावर टाकले. परंतु हनुमानाने ते मध्येच धरुन तोडून टाकले.

"शाबास!" म्हणत शतकंठाने हनुमानावर क्रमाने मुसळ, परशू व तलवारीचा प्रयोग केला. हनुमानाने ती शस्त्रे तोडून टाकली. [illegible] पराक्रम पाहून रामाला आनंद झाला. नंतर त्याने स्वत: धनुष्यबाण घेऊन शतकंठाशी युद्ध सुरू केले. रामाबरोबर बिभीषणदेखील पुढे आला. शतकंठाने दोघांचे बाण मध्येच धरून तोडून टाकले आणि त्यांना लाथ मारून लंकेत नेऊन टाकले.

त्या वेळी हनुमानाने आपली शेपटी चतु:समुद्रावर पसरवून लंकेपर्यंत एक पूलच जणुकाही बांधला. त्यावर चढून राम व बिभीषण परतले. त्यांनी शतकंठाशी पुन्हा युद्धाला सुरवात केली तेव्हा वानरसैन्याने शतकंठाच्या अंगावर झाडे उपटून झाडांचा आणि दगडांचा वर्षाव सुरू केला. शतकंठ आपल्या अस्त्रांनी त्यांचा चक्काचूर उडवीत होता. त्याच्यासमोर अंगद, नल, नील, ऋक्षजसारख्या थोर वानरवीरांचा पाडाव लागेना. रामाचे तिघे भाऊदेखील शतकंठासमोर हारले.

त्या वेळी राम सीतेबरोबर हनुमानाच्या खांद्यावर बसून युद्धाला आला. शतकंठ म्हणाला—"हे मानवा! तू माझ्याशी युद्धाला आलास हे रावणाशी तुझे युद्ध झाले तसे आहे असे वाटले का तुला? तू या माकडावर बसून इतका दूर आलासच कशाला? आणि वर सीतेला बरोबर घेऊन आला आहेस!"



रामाने त्याच्याशी गप्पा गोष्टीत वेळ न दवडतां त्याच्यावर बाणवृष्टी सुरू केली. तेव्हा शतकंठाने काय माया केला सांगणे कठीण, रामचंद्राला त्याच्यासमोर शतकंठ एक नसून कोट्यावधी असल्याचा भास झाला. म्हणून रामाची सर्व मोठमोठी अस्त्रे व्यर्थ झाली.

ते पाहून हनुमानाला राग आला. त्याने आपल्या बाहुबलाने शतकंठाच्या राक्षससैन्याचा संहार सुरू केला. तोपर्यंत रामाने थोडा वेळ विश्रांती घेण्यासाठी आपले धनुष्य. आणि दोन भाते सीतेच्या हातात दिले. सीतेने त्या धनुष्यबाणांच्या सहाय्याने शतकंठावर बाण सोडायला सुरवात केली.

शतकंठ क्रुद्ध होऊन सीतेवर आपला सर्व पराक्रम दाखविण्यासाठी युद्ध करू लागला.

सीतेने मनातल्या मनात "मी जर पतिव्रता असेन आणि रामचंद्र खरे सत्यव्रती असतील तर या बाणाने या राक्षसाचा वध होईल." असे म्हणत एक बाण धनुष्यावर चढवून सोडला आणि आश्चर्य म्हणजे तो बाण लागून शतकंठ मरून जमिनीवर आदळला. सीतेने धनुष्य व बाण रामाच्या हातात देऊन रामाला नमस्कार केला.

रामाने प्रसन्न होऊन आपल्या गळ्यातला रत्नहार काढून सीतेला दिला. सीता म्हणाली–"आपल्या या सैन्याला आपल्या पाठीवर आणून, असंख्य राक्षसांचा वध करून शतकंठ रावणाचा वध व्हायला मूळ कारण जो हनुमान त्याला हा रत्नहार द्यावा." त्यानंतर रामाने तो हार हनुमानाच्या गळ्यात घातला. रामाच्या हाती तो रत्नहार आपल्या गळ्यात घालवून घेऊन हनुमान आनंदित झाला. तो म्हणाला–

"सीतारा[illegible] माझ्या वक्षस्थलावर ठेवून माझ्या हृदयात त्या दोघांचा सतत वास होत असल्याचा आनंद मला होईल."

युद्ध संपले व सर्व अयोध्येला परतले. बिभीषण रामाचा निरोप घेऊन ससैन्य लंकेला परतला. सुग्रीव वगैरे वानर किष्किंधेला परतले. परंतु हनुमान रामाकडेच राहिला.

शतकंठ रावणाचा वध झाल्यावर रामाने जी राजवट सुरू केली त्याला रामराज्य हे नाव प्राप्त झाले. या राज्यात शोक, क्रोध, वार्धक्य, वैर, लोभ, संताप यांना जागाच उरली नाही. प्रजेला त्यांची कल्पनाच उरली नाही.

रामाच्या सेवेला राहणाऱ्या हनुमानाच्या मनात एकदा त्याची माता अंजना हिच्या दर्शनाला जाण्याची इच्छा उत्पन्न झाली. तेव्हा हनुमान रामाची अनुज्ञा घेऊन गंधमादन पर्वतावरच्या अंजनादेवीच्या आश्रमाकडे निघाला.



# असीरगडाचे रक्षण



खानदेशातील असीरगडनावाचा किल्ला देशात अत्यंत बळकट म्हणून प्रसिद्ध होता. काही जणांच्या मते जगात इतका बळकट किल्ला दुसरा नाही. ९०० फूट उंचीच्या एका टेकडीवर बांधलेला हा किल्ला शत्रूला अभेद्य होता.

असं सांगतात की एकदा एक सैनिक त्या प्रदेशातून जात असता एक कुत्रा एका हरणाचा पाठलाग करीत जात होता. हरण उलट फिरले आणि त्याने कुत्र्याला आपल्या शिंगांनी मारून परतवले. सैनिकाने विचार केला, ही जागा साहसीवृत्तीस योग्य आहे. मी येथेच कायम राहणे बरे होईल.





त्या सैनिकाच्या नातवाने खानदेशाची स्थापना करण्यासाठी तेथल्या मोठमोठ्या जहागीरदार वतनदारांना जिंकून येथे असीरगडचा अभय किल्ला बांधला.



असीरगडाचे नाव ऐकून अकबर एका मोठ्या सैन्यानिशी तेथे आला. अकबराच्या सैनिकांनी किल्याला वेढा देऊन किल्याचा अधिपती बहाद्दुर शहा याला शरण मागायला संदेश पाठविला.

बहाद्दुरशहा स्वभावाने भित्रा होता. परंतु मलिक याकूब ह्या हबशी किल्लेदाराने आपल्या मालकाला सुचविले—"मालक! अकबर बादशाह येथे कायम बसून राहणे शक्य नाही. आपण युद्ध करून किल्याचे रक्षण करावे. वर्षभरात शत्रूला येथून जावेच लागेल!"





किल्यात एकूण पन्नास हजार लोक होते. त्यांनी तीन हजार तोफांचा मारा मोंगलांच्या सैन्यावर केला. याकूबने या युद्धात सेनापतित्व ग्रहण केले होते.

किल्यात कित्येक वर्षे पुरेल एवढी रसद होती. याकूबने बहाद्दुरशाहला शरण न जाण्याचा सल्ला दिला होता. परंतु बहाद्दुरशाहमध्ये तेवढे साहस नव्हते. एके दिवशी बहाद्दुरशाह याकूबचे मुलगे, मुकराब व बहाद्दुरखान यांना बरोबर घेऊन किल्याबाहेर डोंगर उतरून अकबराला शरण गेला.





अकबराने बहाद्दुरखानाला आपल्या अधीन ठेवून मुकराब द्वारा याकूबकडे निरोप पाठविला की याकूबखानाने किल्ला अकबराच्या स्वाधीन केला तर त्याला क्षमा केली जाईल. मुकराबने ती गोष्ट जाऊन सांगितली, तेव्हा याकूब म्हणाला—"तू भित्रा पळपुटा आहेस, मला तोंड दाखवू नकोस! चालता हो!"

म्हणून मुकराब अकबराकडे परत आला. अकबराला वाटत होते की मुकराब चांगली बातमी घेऊन आला असणार. परंतु त्याने एकाएकी काळजात कट्यार खुपसून स्वतःच्या आत्महत्या करून घेतली.







किल्यात बहाद्दुरशाहचे सात मुलगे होते. बहाद्दुरशाहने आत्म समर्पण केले होते. म्हणून याकूबने सातही जणांना विचारले–"तुमच्या पैकी जो लढाई चालू ठेवेल त्याला मान्यता देईल त्याला गादी मिळेल" परंतु एकाने देखील होकार दिला नाही.



हळूहळू असीरगडावरचे सरदार मोंगलांच्या बाजूला गेले. याकूबला हे माहीत होते की भित्र्यांच्या हातून किल्याचे रक्षण होणे शक्य नाही. त्याने एक खड्डा खणवून तयार करविला आणि आपल्या जवळच्या नातेवार आप्तबंधूंचा निरोप घेऊन विषपान करून प्राण त्याग केला.



किल्ला मोंगलांच्या हाती गेला तेव्हा याकूब त्यांच्या हाती लागला नाही. जिवात जीव असेपर्यंत किल्ला शत्रूच्या हाती न देण्याची प्रतिज्ञा त्याने केली होती. किल्लयाचे रक्षण करणे अशक्य असल्याचे कळल्यावर त्याने आत्महत्या करून घेतली. मोंगलांनी लांच देऊन त्याच्या अधिकारीवर्गास फोडले व किल्ला सर केला. त्या वेळी किल्यात

# गोष्ट मथळा चढाओढ

## या गोष्टीला उत्तम मथळा सुचवून रु. २५ मिळवा!

?

एका गरीब ब्राह्मणाने एकदा एका जमिनदाराकडे मदत मागितली. तो जमिनदार मोठा दानी होता. त्याने ब्राह्मणाला एक दुभती गाय दान केली. गाईला बांधायला गोठा नव्हता. जमिनदाराने गोठा बांधयला निराळे पैसे दिले. गाईला चारा दानापाणी द्यायला ब्राह्मणाकडे काही नव्हते. जमिनदाराने चारा व दाणा दिला.

गाय दूध देई ते शहरात नेऊन विकायला ब्राह्मणाला फार त्रास होई. म्हणून ते दूध विकत घेण्याचे जमिनदाराने कबूल केले.

ब्राह्मणासमोर आणखी एक प्रश्न उभा होता. त्याच्या बायकोला सैंपाक करता येत नव्हता. तोपर्यंत भिक्षेवर दोघांचे भागत असे; म्हणून तिला कधी चूल फुंकायचा प्रसंगच आला नाही. म्हणून जमिनदाराने ब्राह्मणाच्या घरी एका सैंपाकीण बाईला पाठविले. परंतु जेवायच्या वेळी चार जण अवचित घरी आले. ब्राह्मणाने त्यांना विचारले–"आपण कोण?" "कशासाठी आला आहां?"

"आपण फार आळशी आहां ना, म्हणून जेवण जेवायला जमिनदाराने या चौघा जणांना पाठविले आहे." सैंपाकीण बाई म्हणाली.

★ ★ ★

वरील गोष्टीला उपयुक्त होईल असा एक सुंदर मथळा विचार करून एका कार्डावर स्वतःच्या पत्त्यासह लिहून "गोष्ट मथळा चढाओढ", 'चांदोबा', चंदामामा प्रकाशन, २ व ३ अर्काट रोड, वडपळणी मद्रास ६०००२६ या पत्त्यावर पाठवा.

१० मार्च १९७८ च्या आत पोस्टकार्ड पोंचले पाहिजे. त्या कार्डावर 'फोटो चढाओढ परिचय' देता कामा नये.

चढाओढीचा निकाल मे १९७८ च्या चांदोबात जाहीर करण्यात येईल.

---

जानेवारी महिन्यातल्या चढाओढीचा निकाल (मथळा) "आसक्ती"

नांव: सौ. जयश्री चिंतामण बागुल, काम्प्लेस बिल्डींग नं ५ (अ) मुलुंड, मुंबई-८२

      





# अमरवाणी

न ह्यतो धर्मचरण
किंचि दस्ति महत्तरम्
यथा पितरि शुश्रूषा
तस्य वा वचन क्रिया ॥ १ ॥

[ वडिलांची (पित्याची) सेवा आणि त्यांच्या आज्ञेचे पालन ह्यांहून थोर धर्माचरण नाही. ]

अस्माकं च कुले पूर्वं
सगर स्वाज्ञया कितु:
खर्नभि स्सागरै र्भूमि
मवाप्त स्सुमहा न्वध: ॥ २ ॥

[ प्राचीन काळी "आमच्या" सूर्यवंशात सगराच्या आज्ञेप्रमाणे पृथ्वी खणून त्याची मुले मृत्युमुखी पडली. ]

जमदग्न्येन रामेण
रेणुका जननी स्वयं
कृत्ता परशु नारण्ये
पितुर्वचन कारिणा ॥ ३ ॥

[ जमदग्नीचा मुलगा परशुराम याने पित्याच्या आज्ञेने अरण्यात आपली आई रेणुका हिचा परशुने वध केला. ]



# कावळा आणि घुबड

[ ५६ ]

त्यानंतर अरिमर्दनाने प्राकारकर्ण याचे मत विचारले.

प्राकारकर्ण म्हणाला–"प्रभो, या कावळ्याचा वध करू नये. आपण याचे रक्षण केले तर हा आपला आप्त मित्र होऊन आपला एक उत्तम सल्लागार म्हणून काम करू शकेल. आपल्या मित्राकडे तो पुढे कधी आपला शत्रू होऊ शकेल या दृष्टीने पहावे, ही राजनीती आहे. 'राजकुमाराच्या पोटात साप' या कथेवरून हीच गोष्ट तर शिकायला मिळते!"

"कोणती गोष्ट ती?" असे अरिमर्दनाने विचारता प्राकारकर्ण सांगू लागला :

एकदा देवशक्ती नावाचा राजा एका देशावर राज्य करीत असे. त्याला एकच मुलगा होता. तो युवराज होता. त्याच्या पोटात एक साप शिरला असल्या कारणाने तो दररोज अशक्त होत गेला. देवशक्ती राजा त्यामुळे फार दु:खी होता. तो प्रत्येक देवळात जाऊन त्या देवासमोर मुलाच्या पोटातला साप काढून टाकण्यासाठी नवस करी. आपल्या मंत्र्यांच्या सल्ल्याप्रमाणे त्याने आपल्या मुलाचे शेजारच्या देशाच्या राजकन्येशी लग्नसुद्धा करून दिले.

ही राजकन्या फार हुशार होती. एके दिवशी ती बाहेर गेली. परत येत असता तिने पतीला सापाच्या बिळावर डोके ठेवून झोपला असल्याचे पाहिले. राजकुमाराच्या पोटातला साप राजकुमाराच्या तोंडा बाहेर तोंड काढून बाहेर पहात असलेला दिसला. त्याच वेळी बिळातल्या सापाने सुद्धा तोंड बाहेर काढून पाहिले.

बिळातला साप राजकुमाराच्या पोटातल्या सापाला म्हणाला–"मित्रा! त्या



सुंदर राजकुमाराच्या पोटात शिरलास का?" राजकुमाराच्या पोटातला साप म्हणाला–"होय रे मित्रा! तू आपल्या बिळात मोहरा भरलेले हंडे लपवून नाहीस का ठेवलेस?"

"मूर्खा! काळचा मोहोऱ्या, तांबडचा मिरच्या आणि ओव्याचा काढा करून प्याल्यावर तुझा कपाळमोक्ष होईल!" असे बिळातला साप म्हणाला.

"उकळते पाणी तुझ्या बिळात टाकले तर तुझा कपाळमोक्ष होणार नाही का रे, मूर्खराजा!" पोटातला साप म्हणाला.

राजकन्येने सापांचे हे संभाषण ऐकले आणि बिळातल्या सापाने सांगितल्याप्रमाणे काढा तयार करून पतीला प्यायला दिला. पोटातला साप मरून बाहेर येऊन पडला. त्यानंतर तिने बिळात उकळते पाणी ओतून त्या सापाला ठार केले आणि बिळातले हंडे काढविले.

अशातऱ्हेने अरिमर्दनाने आपल्या पांचही मंत्र्यांचे सल्ले ऐकले आणि बहुमताप्रमाणे वागायचे ठरविले. आपला सल्ला स्वीकार न केल्याचा राग आल्यामुळे रक्ताक्षी म्हणाला–"मित्र हो! तुम्ही जो सल्ला महाराजांना दिला आहे तो त्यांना मृत्यूदंडाहूनही क्रूर आहे. तुमच्यामुळे महाराज मागील एका गोष्टीतल्या सुतारासारखे फसले आहेत."

"कोणती ती कथा?" असे अरिमर्दनाने व त्याच्या मंत्र्यांनी विचारल्यावर रक्ताक्षीने गोष्ट सांगितली ती अशी :

एक सुतार होता. त्याची बायको वाईट चालीची बाई होती. ती गोष्ट सर्व गावाला माहीत होती. चार चौघांच्या तोंडी ते ऐकल्यावर सुताराला खात्री करून घ्यावेसे वाटले.

तो आपल्या बायकोला म्हणाला–"पहा ग! मी उद्या दूरच्या एका गावी निघतो आहे. मला परत यायला काही दिवस लागतील." ते ऐकून त्याच्या बायकोला फार आनंद झाला. तिने वाटेत फराळासाठी त्याला निरनिराळे खाद्यपदार्थ व मिष्टान्ने तयार केली.

दुसऱ्या दिवशी नवरा निघाल्याबरोबर त्याची बायको छान नटून तिचा देवदत्त नावाचा जो प्रियकर होता त्याच्या घरी जाऊन म्हणाली–"माझ्या पाठीशी लागलेलं भूत, माझा नवरा, परगावी गेला आहे. रात्री तू माझ्या घरी आलास तरी आपल्याला कोणतीच भीती किंवा काळजी करण्याचे कारण नाही."

सुतार दिवसभर गावाला लागून असलेल्या जंगलात फिरत राहिला आणि काळोख पडल्यावर मागच्या दाराने बायकोची नजर चुकवून घरात शिरला व पलंगाखाली लपून राहिला.

त्यानंतर काही वेळाने त्या पलंगावर घातलेल्या गादीवर देवदत्त येऊन बसला. मग सुताराची बायकोसुद्धा येऊन बसली. बसताच तिचा उजवा पाय पलंगाखाली लपलेल्या सुताराच्या अंगाला लागला. आपला नवरा आपली परीक्षा घेण्यासाठीच पलंगाखाली बसला असल्याचे ओळखून ती देवदत्ताला म्हणाली–"हे काय रे, मी पतिव्रता आहे, तुला माहीत नाही का?"

"तरमग तू मला कशासाठी बोलाविलंस?" देवदत्ताने तिला विचारलं.

"मी दररोज कालिका देवीची पूजा करते. आज देवी मला म्हणाली–'तुझा नवरा सहा महिने बाहेर जातो आहे तेव्हा पतीच्या जिवाला कोणत्याही प्रकारचा धोका होऊ नये व तुला वैधव्य येऊ नये असे वाटत असेल तर तुला स्वतःच्या पातिव्रत्याचा त्याग करावा लागेल' मला पातिव्रत्यापेक्षा पतीच मोठा वाटतो. म्हणून मी आपले अमूल्य असे जे पातिव्रत्य ते तुझ्या चरणी अर्पण करण्यासाठी तुला बोलाविले." असे ती कुलटा म्हणाली.

ते ऐकून बिचारा सुतार फसला. त्याला वाटू लागले 'लोकच मूर्ख! माझ्या बायकोसारख्या पतिव्रतेविरुद्ध त्यांनी केवढे मोठे कुभांड रचलं?' असा विचार करून त्याने उठून तिची क्षमा मागितली.












# १९४. असभ्य असूनही समर्थ !

पेरु या दक्षिण अमेरिकेतील कुज्कोक भागातील डोंगरात आश्चर्य चकित करून सोडणारा असा किल्ला बांधणारे आदिवासी आहेत. चित्रात दिसत असलेल्या कोटाचे दगड १५ ते २० फूट लांबीचे आहेत. दगडांच्या मध्ये कोणत्याही तऱ्हेचा गारावगैरे सुद्धा नाही. दोन दगडांच्या मध्ये चाकू किंवा 'ब्लेड' देखील शिरणे शक्य नाही. हा किल्ला बांधणाऱ्यांना लोखंडाचा शोध लागलेला नव्हता. दगडाचीच आयुधे आणि वेलांचे दोरखंड होते. अशी मागास उपकरणेच त्यांनी बापरली होती.





# माया सरोवर

[ २६ ]

[ नरभक्षक जातीच्या लोकांना मायासरोवरेश्वर सापडला. त्या वेळी त्या जागी सिद्धसाधक आला. आपल्या मालकाच्या रक्षणार्थ मकरकेतूने साधकाचा दास जलबुक राक्षसाला जखमी केले. नरभक्षक त्या सर्वांना धरून नेण्याच्या प्रयत्नात असता सर्वांनी एक जुटीने त्यांच्यावर उलट हल्ला केला. त्याच वेळी काही घोडेस्वार आले. पुढे–]

सिद्धसाधकाने आपले तीक्ष्ण शूल माया सरोवरेश्वराच्या छातीजवळ ठेवल्या-बरोबर माया सरोवरेश्वर भयभीत होऊन थरथर कापू लागला. म्हणाला–"हा मात्र अन्याय आहे, अधर्म आहे! कोणी शूर पराक्रमी कधी आपल्या शत्रूला तो संकटात असता असा वध करण्याचा प्रयत्न करील का?" ते ऐकताच साधकाने आपले शूल मागे घेऊन जमिनीवर टेकून उभे धरले व म्हणाला–"मी वीर पराक्रमी आहे. तर काढ तलवार पाहतो, मी तुझे शौर्य."

माया सरोवरेश्वर तलवार उपसायला निघाला, परंतु थांबून आपला अनुयायी मकरकेतू याच्याकडे त्याने सहेतुक पाहिले. तितक्यात घोडेस्वार तेथे आले. त्यांचा नायक घोड्यावरून खाली उतरला. सिद्धसाधक थोडासा रागानेच म्हणाला–










कोण रे तू? आमच्या भांडणात मध्ये बोलायला कशासाठी आला आहेस?"

घोडेस्वाराचा नायक त्या प्रश्नाकडे दुर्लक्ष केल्यासारखे दाखवून, पण त्याच बरोबर वनमाणसाला व जलग्रहाला पाहून थोडासा भ्याल्यासारखा होऊन म्हणाला— "मी कोण, कोणाच्या सांगण्यावरून आलो हे यापूर्वी तुम्हांला अडविताना उच्चारलेल्या माझ्या शब्दावरून तुम्हांला कळायला हवं होते!"

"तू काय म्हणून आम्हांला धमकी दिलीस, ते मी नाही ऐकलं. मी हा पाण्यातला पक्षी समोरून पळून जाऊ नये या प्रयत्नात होतो. म्हणून पुन्हा विचारतो

आहे, या घोड्यांवर की खेचरांवर बसून मध्ये बोलायला आलेला तू कोण?" सिद्धसाधक म्हणाला.

त्या प्रश्नाचे तावडतोब उत्तर न देता घोडेस्वारांचा नायक सिद्धसाधकाकडे जास्त खोल नजरेने पहात म्हणाला—"ओहो, तूच होय? तू सिद्धसाधकच नाही का? काही दिवसांपूर्वी हिरण्यपूरला जंगलाच्या पाहरेकऱ्याचे डोके उडविण्याच्या अपराधाखाली आणखी एका बरोबर तुला महाराजांसमोर आणून उभे केले होते, होय की नाही?"

"मी कोण हे तुला कळले व तू कोण हे काहीसे मला आठवले, पण तुझे नाव मात्र कळले नाही." साधक म्हणाला.

"माझे नाव वीरसेन. महाराजांच्या दोघां मुलांचे अपहरण झाल्यावर त्यांच्या शोधार्थ तू निघालास तेव्हा तुझ्याबरोबर निघालेला जयशील कोठे आहे?" वीरसेनाने विचारले.

"तो जयशील हंसांच्या रथात बसून आकाशात कोठेतरी उडत असेल. बरं तर तू जरा बाजूला हो. सुरासारख्या फुसारक्या मारणाऱ्या या भित्र्या पाण्यातल्या पक्ष्याला वाटेला लावतो आधी." असे म्हणत सिद्धसाधकाने आपले शूल सावरले.

"मी येथे रक्तपात होऊ देणार नाही!" असे म्हणत वीरसेनाने आपल्या घोडे-

त्यांना पुढे येऊन दोघांच्या मध्ये उभे रहायला सांगितले.

घोडेस्वार तलवारी उपसून आपल्या जवळ येऊन उभे राहलेले पाहून सिद्धसाधक त्यांच्या नायकाला म्हणाला—"आपल्या चारीबाजूला कित्येक दिवसांपासून खायला न मिळाल्यामुळे भुकेने कासावीस झालेले नरभक्षक जातीचे लोक आहेत. पाहिजे तर पापणी लवायच्या आत मी तुला आणि तुझ्याबरोबर आलेल्या घोडेस्वारांना ठार करून त्यांच्यासमोर टाकू शकेन. परंतु त्यामुळे नरभक्षकांचाच फायदा होईल, इतर कोणाचे ही हित होणार नाही."

"कोणाचे हित होईल की अहित याची मला गरज नाही. प्रथम तुम्ही सर्व जवळच कनकाक्ष महाराज स्वत: येऊन उतरले आहेत. तिकडे चला पाहू.." वीरसेन म्हणाला.

सिद्धसाधक ते ऐकून डोळे वटारून वीरसेनाकडे पहात म्हणाला—"हा हुकूम आहे की विनंती? मी या पृथ्वीवर एका महाकालाच्या हुकुमाशिवाय इतर कोणाचा हुकूम मानीत नाही."

आपला मालक नवीन आलेल्या माणसाशी रागाने बोलत आहे हे ओळखून जलवृक राक्षसाने दगडाची गदा खांद्यावर ठेवून आणि जोराने एकदा जमिनीवर पदाघात करून हुंकार केला. त्या पाठोपाठ



वनमाणूस त्याचा जणू प्रतिध्वनीच काढीत ओरडला. त्या भयंकर प्राण्यांना पाहून व त्याहून जास्त भयंकर त्यांचे ओरडणे ऐकून एका घोडेस्वाराचा घोडा बुजला आणि मागच्या पायांवर उभा राहिला आणि त्याच्या पाठीवरून घोडेस्वार खाली आदळल्यावर दूर पळून गेला.

हे सर्व पाहून वीरसेन स्वत: भयकंपित होऊन सिद्धसाधकाला म्हणाला—"अहो, तुम्ही सुद्धा माझ्यासारखेच हिरण्यपूरचे नागरिकच आहांत नाही का? तेव्हा तुम्ही महाराजांच्या दर्शनासाठी कां येऊ नये?" असे थोडे वाकून नमस्कार करीत वीरसेन साधकाला म्हणाला.



ते ऐकून साधक आनंदाने फुलून गेला व म्हणाला–"तसे म्हणतोस होय? ठीक आहे तर! मी महाराजांकडे येतो, चल तर! या सर्व नरभक्षकांना आणि सरोवरांतील या दोघां दुष्टांना सुद्धा त्यांच्याकडे घेऊन गेले पाहिजे." असे म्हणत त्याने चारीबाजूला पाहिले, परंतु माया सरोवरेश्वर किंवा मकरकेतू दोघांपैकी कोणीच दिसले नाहीत. तेव्हां आश्चर्यचकित होऊन म्हणाला–"कोठे गेले हे दोघे? एकदम अदृश्य कसे काय झाले?"

नंतर नरभक्षककडे वळून "ते पळून जात आहेत हे मला कां नाही सांगितलेत? ते जिवंत मिळेपर्यंत तुम्ही दोघे माझे कैदी." असे बिबळ…

…मांत्रिकाला सांगून सिद्धसाधक जलवृकाला म्हणाला–"जलवृका! त्यांना एका घोड्यावर घालून छांन बांधून आण."

जलवृक धावत गेला आणि म्हाताऱ्या मांत्रिकाला धरून, एक घोडेस्वार घोड्यावरून खाली उतरण्याच्या आधीच त्याला जोराने धक्का देऊन खाली ओढून घोड्याच्या पाठीवर त्या दोघांनाघट्ट आवळून बांधले.

ते काम संपल्यावर सिद्धसाधक वीरसेनाला म्हणाला–"आतां तू वाट दाखवायला पुढे चल. कनकाक्ष महाराजांच्या दर्शनाला जाऊ या." असे म्हणत त्याने आपले बाहून वनमाणसाला खुणावले. नरभक्षक पुढाऱ्यांना कैद केल होते म्हणून त्या जातीचे लोक पुढे काय करावे या विचारात असतां त्यांना साधक म्हणाला–"अरे माणसांना खाणाऱ्या क्रूर माणसांनो! तुमचे लोक त्या तलावातल्या पक्ष्याच्या आणि त्याचा चाकर मगरीचं तोंडवाल्याच्या शोधार्थ गेले आहेत. त्यांना आणल्यावर त्या दोघांच्या अंगाला थोडी जरी जखम लागली तर तुमच्या नायकाला व त्या मांत्रिकाला प्रथम मी आपल्या वनमाणसासमोर फराळ करायला टाकीन आणि नंतर तुमची सर्वांची रानटी श्वापदांसारखी शिकार करीन." असे

… आपटून सर्वांना दटावले.

नरभक्षकांनी आपले तोंडदेखील उघडलं नाही. दीन मुखाने ते आपल्या नायकाकडे आणि मांत्रिकाकडे पहात राहिले. ते दोघे घोड्याच्या पाठीवर तडफडत ओरडत होते. "हे देवा! तू या माणसांना आहार म्हणून पाठवून आमचेच प्राण जायची वेळ आली की रे! आमचं रक्षण कर!"

घोडेस्वारांचा नायक त्यांना तलवार दाखवून गप्प करीत आपल्या सर्व अनुयायांना बरोबर घेऊन कनकाक्ष महाराज उतरले होते त्या बाजूला निघाला. त्यांच्या पाठीमागून वनमाणसाच्या खांद्यावर बसून सिद्धसाधक निघाला.

त्याच वेळी जंगलातल्या आणखी एका भागात हंसरथात बसून जाणाऱ्या जयशीलला व त्याच्या बरोबरच्या इतरांना अकस्मात एका जागी वाघ पाठीस लागलेली एक स्त्री दिसली. ती स्वतःला वांचविण्यासाठी झुडपाच्या आड त्याच्या चारीबाजूला धावत पळत होती व मध्येच एखादी झाडाची फांदी आली तर ती धरून वर चढून स्वतःला वांचविता येते का पहात होती.

हंसरथात बसून खालच्या अरण्यात लक्षपूर्वक पहात असलेल्या वैद्यदेव नावाने



ओळखल्या जाणाऱ्या देवशर्माला सर्वात आधी ते दृश्य दिसले. क्षणभर ते दृश्य पाहून तो अवाकच झाला. भयकंपित होऊन त्याने शेजारीच बसलेल्या जयशीलला त्याचा खांदा हालवून ओढून म्हटले–"जयशीला! त्या मुलीला पाहिलंस का? तिच्या पाठीस वाघ लागला आहे! तीच कांचनमाला, माया सरोवरेश्वराच्या नोकरांनी अपहरण करून नेलेली कनकाक्ष महाराजांची राजकन्या! आतां काय करायचं रे?"

जयशीलने देवशर्माने दाखविलेल्या बाजूला पाहिले व लगेच उभा राहिला आणि रथ चालविणाऱ्याला म्हणाला–"अरे, लगेच रथ खाली उतरव!"



अंगरक्षकाने खाली वांकून पाहिले व तेथे उंच झाडांची गर्दी पाहून म्हणाला– "अहो! येथे खाली उतरविणे अशक्य आहे हो! आणखी थोडं पुढे जाऊन पाहू या, तिकडे झाडझुडुप नाही ना त्या उघड्या जागेवर उतरू या."

हे ऐकून जयशील संतापून म्हणाला– "अरे मूर्ख माणसा! तू तिकडे रथ उतरविशील त्याच्या आत राजकन्या वाघाच्या जबड्यात सापडणार नाही का? थोडा खालून उडू दे तुझा रथ. मी कोणत्यातरी झाडाच्या फांदीवर उडी टाकून मी तिला वांचविण्याचा प्रयत्न करतो."

अंगरक्षक [illegible] त्या दोऱ्या थोड्या खाली ओढल्या. हंस खालच्या बाजूने उडू लागले आणि झाडाच्या शेंड्या जवळून जाऊ लागले. जयशीलने चटदिशी उडी मारून दोन्ही हातांनी एक फांदी जवळ दिसली ती धरली. परंतु त्याचे वजन पेलणे त्या फांदीला शक्य नव्हते. म्हणून तुटली आणि जयशीलबरोबर चाळीस पन्नास फुट खाली जाऊन पडली. ती फांदी जमिनीवर आदळण्यापूर्वीच जयशील फांदी सोडून एक उडी मारून जमिनीवर हातापायला काही अपाय झाल्याशिवाय अलगद उतरला.

त्या फांदीच्या आदळण्याच्या आवाजाने कांचनमालाचा पाठलाग करीत असलेला वाघ थोडासा दचकला आणि त्याने मागे वळून पाहिले. ती संधी मिळताच कांचनमाला जवळच्या एका झाडाची फांदी हाताला आली ती धरून वर चढू लागली. परंतु वाघ तेवढ्यात सावध झाला व मोठ्याने एक डरकाळी फोडून तिच्याकडे धावला. तो तिचा पदर धरून ओढणार इतक्यात जयशील पाठीमागून धावला. परंतु तलवार उपसून वाघाला मारायला वेळ नाही हे ओळखून त्याने वाघाचे मागचे दोन्ही पाय धरून त्याला दूर फेकून दिले.

[illegible] ला न मिळाल्यामुळे वाऱ्याबरोबर हलणाऱ्या फांदीबरोबर मागेपुढे झोके घेतल्यासारखी हलत होती. ती आपली कृतज्ञता व्यक्त करीत म्हणाली–"तुम्ही कोण मला माहीत नाही, तुम्ही मला वाघाच्या जबड्यातून बाहेर काढलेत! तुमचे किती उपकार मानू?"

जयशील तिचे अपूर्व सौंदर्य पाहून आश्चर्य चकित झाला. "किती काळ लोटला आपण किती कष्ट सहन करून, जीव धोक्यात घालून येथवर आलो आणि कशा तऱ्हेने का होईना कनकाक्ष महाराजांच्या राजकन्येला वांचवू शकलो. तिचा भाऊ कांचनवर्मा कोठे आहे तर?" त्याच्या डोक्यात विचार चालू होते.

"तू कांचनमाला आहेस व या देशाच्या राजाची राजकन्या आहेस, हे मला चांगले माहीत आहे. तुझा भाऊ कांचनवर्मा कोठे आहे? हंसरथांतून खाली पडून तू स्वतःचा जीव कसा काय वाचवू शकलीस?" जयशीलने उत्सुकतेने तिला विचारले.

जयशील बोलत असतां कांचनमाला झाडाच्या फांदीवरून खाली उतरून आली आणि एका सुंदर तरण्या बांड शूर माणसाला आपलं नाव कसं काय माहीत झालं याबद्दल आश्चर्य करीत म्हणाली–"काय हो, मी हंस रथातून खाली पडले, परंतु



माझ्या सुदैवाने एका ओढ्याच्या पाण्यात पडले म्हणून वांचले. माझ्याबरोबर रथात मायासरोवरेश्वर व त्याचा सारथी याच अरण्यात कोठेतरी पडले असावेत व माझ्यासारखेच जिवंत असावेत. तुम्ही माझा भाऊ कांचनवर्मा याच्या विषयी विचारलंत, तो माया सरोवरातील महालातच आहे."

"मायासरोवरेश्वराविषयी मला थोडी माहिती आहे. त्याचे नोकर सर्पनख व सर्पस्वर आहेत. त्यांच्याशिवाय आणखी एका प्रमुख अनुयायाची मला चांगली माहिती आहे. मायासरोवरातून तुझ्या भावालासुद्धा सोडवून आणायचे आहे. तिकडे जायची वाट तुला नक्कीच माहीत

     

असणार. त्या आधी इकडेच जवळच माझा एक मित्र सिद्धसाधक आहे, त्याला भेटले पाहिजे.'' जयशील म्हणाला.

कांचनमाला त्याच्याबरोबर तेथून निघण्याच्या बेतात असतां, त्या वेळेपर्यंत जयशीलने उचलून दूर फेकून दिल्यामुळे कंबर मोडली असल्या कारणाने तो वाघ चटदिशी मान वर करून दात काढून एकदा गुरगुरला आणि त्यांच्यावर उडी मारण्याच्या हेतूने उठण्याचा प्रयत्न करू लागला. परंतु उभे राहता न आल्याने पुन्हा खाली पडला.

"किती क्रूर प्राणी असला तरी जखमी घायाळ स्थितीत त्याला वेदना सहन करीत सोडून देणे बरोबर नाही. त्याचे डोके उडवून या कष्टातून त्याला आतांच मुक्त करतो." असे म्हणत जयशील तलवार उपसून वाघ होता तिकडे निघाला.

"किती भयंकर वाघ आहे हो! तुम्हांला यायला एका क्षणभराचा उशीर झाला असता तर त्याने मला मारून टाकले असते.'' असे

शीलच्या बरोबर वाघ होता त्या बाजूला जाऊ लागली.

तोंपर्यंत जलप्रहावर बसून झाडी झुपडा-आडून मायासरोवरेश्वर ते सर्व दृश्य पहात व त्यांचे बोलणे ऐकत होता. शेजारी एका घोड्यावर बसून आलेल्या मकरकेतूकडे वळून म्हणाला–"या जयशीलला कैद करायला हीच उत्तम संधी आहे! कमळ नाळांच्या दोरीचा फास टाकून त्याला पकड."

"प्रभो! हा जयशील शूर व पराक्रमी आहे. त्याच्याशी वैर करणे आपल्या हिताचे नाही." असे रडक्या आवाजात मकरकेतू म्हणाला.

"मूर्ख, भितरा!" असे म्हणत माया-सरोवरेश्वराने स्वतः एक बळकट दोरखंड घेतला व जलप्रहावर थोडा पुढे जाऊन त्याचा फास दोन तीनदा आकाशात गरगर फिरवून जयशीलच्या गळपात फेकला.

(क्रमशः)





# भिकारी योगी

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला तेव्हा प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तू आपल्या प्रयत्नात अनेक वेळा अयशस्वी झाला आहेस. तरी तू अविश्रांत-पणे प्रयत्न चालू ठेवला आहेस याचे मला आश्चर्य वाटते. भाग्य उदयास आले असता त्याला पाठ दाखवून जंगलात भटकणाऱ्या व्यक्ती काही असतात. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला धनगुप्त याची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

धनगुप्त हा एका व्यापाऱ्याचा मुलगा होता. त्याला वडिलोपार्जित मोठी इस्टेट मिळाली." एवढी मोठी संपत्ती आणि तिचा उपभोग दोन्हींवर त्याच्या मनातली आसक्ती

## वेताळाच्या गोष्टी













समसमान होती. परंतु सुख उपभोगायला त्याला फुरसतच मिळत नसे. म्हणून त्याने विचार केला की जुगार खेळावा, म्हणजे धन मिळविता येईल आणि ते उपभोगायला सवड ही मिळेल. तो विचार मनात येताच त्याने जुगार खेळायला सुरवात केली. जुगारीत त्याला चांगली प्राप्ती होई. म्हणून मोठमोठ्या रकमा पणाला लावून तो खेळू लागला आणि एकदां एकाएकी सर्वस्व घालवून बसला आणि भिकारी झाला.

त्यानंतर त्याचे मन विरक्त झाले. त्याला या जगाचाच वीट आला. तो खोल जंगलात जाऊन राहू लागला. हिंस्र पशू त्या भागात रहात, परंतु त्याला त्या गोष्टीची वानवाच नव्हती. त्या [illegible] दाढी मिशा वाढल्या आणि तो एखाद्या वेड्यासारखा दिसू लागला.

धनगुप्त जंगलात रहात असे तेथून जवळच एक भिल्लांची वस्ती होती. त्या वर्षी पाऊस पडला नाही. म्हणून भिल्लांना आहाराच्या शोधार्थ दूरदूर भटकावे लागले. त्यावेळी त्यांना धनगुप्त दिसला. कोणतेही शस्त्र जवळ नसता हिंस्र पशूंच्या मध्ये निश्चिंतपणे त्याला रहात असलेला पाहून भिल्लांना वाटले की हा कोणी तरी थोर योगी असावा. कंदमुळे व फळे आणि मध त्याच्या पायांसमोर ठेवून त्याच्या पायांवर त्यांनी लोटांगण घातले.

ते पाहून धनगुप्तने त्यांना विचारले—"तुम्हांला काय हवे आहे?"

"आपण येऊन आमच्या वस्तीत राहण्याची मेहेरबानी करावी. आम्ही आपली सेवा करू, म्हणजे आमचे भाग्य उदयास येईल." भिल्ल म्हणाले.

धनगुप्त काही बोलल्याशिवाय त्यांच्या वस्तीत रहायला गेला. त्याने त्या वस्तीत पाऊल टाकले आणि मुसळधार पाऊस पडू लागला. म्हणून धनगुप्ताच्या महिमेवर भिल्लांचा विश्वास वाढला. त्या दिवसापासून भिल्लांच्या जीवनात मोठा बदल घडून आला. भिल्लांना धनगुप्ताच्या पायगुणाचा तो महिमा आहे असे वाटले. त्याच सुमारास त्या देशाच्या राजाच्या दूतांनी राजाला कळविले की भिल्लांचा दडखोरपणा वाढत असून त्यांच्या धाडी गांवावर येत आहेत. त्यांचे बंड दाबून टाकण्यासाठी राजाने आपले सैन्य पाठविले. परन्तु भिल्लांनी योग्याचा आशीर्वाद प्राप्त आहे, असे समजून जिवावर उदार होऊन युद्ध केले आणि यशस्वी झाले.

राजाला त्या गोष्टीचे आश्चर्य वाटले. भिल्लांच्यात इतकी शक्ती कोठून आली. या गोष्टीचा शोध लावण्यासाठी राजाचे हेर त्या प्रांतात गेले. हेरांनी धनगुप्ताच्या चारी बाजूला भिल्ल आनंदाने नाचत असल्याचे पाहिले.

हेरांकडून ती बातमी कळल्यावर राजाला सुद्धा धनगुप्तात काहीतरी महिमा असल्याची खात्री झाली. त्याने विचार केला अशा माणसाच्या हातून भिल्लांचे बरे व्हायच्या ऐवजी राज्याचे भले झाले तर जास्त चांगले आणि त्याने धनगुप्तकडे गुप्तपणे तसा निरोप पाठविला.

धनगुप्ताने विचार केला की भिल्लांच्या वस्तीत आपल्याला इतके सुख मिळत आहे तर राजदरबारात आपल्याला त्याहून जास्त सुख लाभेल. म्हणून भिल्लांना न कळविता तो एके दिवशी भिल्लांची वस्ती सोडून निघून गेला व राजाच्या महालात आला.

राजाने उत्साहाने धनगुप्ताचे स्वागत केले व त्याचा सर्व प्रकारे सत्कार केला.





धनगुप्ताने आपले नाव 'अनुभवानंद स्वामी' सांगितले.

योगायोग असा की. राजा कित्येक दिवसांपासून संधिवाताने आजारी होता, परंतु अनुभवानंद स्वामींनी राजवाड्यात पाऊल टाकल्या घटकेपासून राजाचा संधिवात कमी होऊ लागला आणि काही दिवसांनंतर पूर्ण बरा झाला. राजाने वैद्यांच्या औषधामुळेच त्याचा आजार बरा झाल्याचे सांगून सर्व वैद्यांची फार प्रशंसा केली; परंतु अनुभवानंद स्वामींच्या आगमनाचाच तो परिणाम असल्याचे त्याच्या मनाला वाटत होते.

राजाने स्वामींच्या राहण्यासाठी एक उत्तम आश्रम बांधला आणि त्यांच्या सर्व सुखसोयींची उत्तम व्यवस्था करून दिली. हळू हळू राजाच्या पाठोपाठ सर्व दरबारी स्वामीजींचे भक्त झाले. तसे स्वामीजी फार कमी बोलत, परंतु ते बोलत त्यातली प्रत्येक गोष्ट खरी ठरे. त्यामुळे स्वामीजींच्या वाणीवर सर्वांचा विश्वास वाढला.

एके दिवशी राजाने स्वामीजींजवळ जाऊन निवेदन केले की शेजारच्या राज्यावर तो स्वारीला निघणार आहे. त्या युद्धात विजयप्राप्ती होवो असा आशीर्वाद द्यावा. ते शेजारचे राज्य म्हणजे धनगुप्ताची जन्मभूमीच होती. परंतु नाइलाजाने स्वामीजींना "विजयोस्तु!" असा आशीर्वाद द्यावा लागला. तसे धनगुप्ताला चांगले माहीत होते की त्याने तसा आशीर्वाद दिला नसता तरी त्याच्या देशाच्या राजाला युद्धात जय मिळणे शक्य नाही.

धनगुप्ताच्या आशीर्वादाप्रमाणे त्याच्या शिष्य राजाला विजयश्री मिळाली. त्यासाठी मोठा आनंदोत्सव करून स्वामीजींचा मोठा सत्कार करण्याचे राजाने ठरविले. परंतु आश्रमात स्वामीजी नसल्याचे पाहून त्याला आश्चर्य वाटले व वाईटही वाटले. ते कोठे गेले असावेत याची कल्पना देखील कोणाला नव्हती.

[illegible] विचारले—"[illegible]नगुप्ताचे जीवित सुखाने चालू होते. त्याच्या मनात पुन्हा जगाचा मोह जागला. जी व्यक्ती आयुष्याच्या सर्वोच्च शिखरावर पोचण्याच्या बेतात आहे ती त्याला पाठ दाखवून पुन्हा सुखोपभोगाकडे वळली म्हणावयाची का? किंवा त्याच्या आशीर्वादाचा परिणाम त्याच्या मातृभूमीच्या विरुद्ध झाल्याचे पाहून त्याला दुःख झाले? की आपल्या मातृभूमीचा पराभव करणाऱ्याच्या हातून आपला सत्कार करून घेणे त्याला आवडले नाही म्हणून तो अदृश्य झाला? या सर्व शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला—"धनगुप्ताला हे चांगले माहीत होते की आपल्या मातृभूमीला त्या युद्धात जय मिळणे शक्य नाही. त्याला स्वतःच्या वाणीवर थोडा जरी विश्वास असता तरी तो राजाला विजयी होण्याचा आशीर्वाद न देता. त्याच्यात काही महिमा असता तर जुगारीत सर्व घालवून बसून भिकारी झाला नसता. तरी त्याला एका गोष्टीबद्दल वाईट वाटले असावे की आपल्या वाणीचा परिणाम म्हणूनच आपला देश त्याच्या शिष्य राजाचा स्वाधीन झाला आणि तसे त्या राजाला तरी वाटते आहे. ते श्रेय घ्यायला त्याचे मन तयार होत नसावे. शिवाय त्याला पुढे कधी त्याच्या वाणीत काहीच महिमा नाही हे प्रगट झाले तर त्याचा जीव धोक्यात येण्याची शक्यता आहे. नंतर स्वामी होऊन सत्कार करवून घेण्याचे ते जीवन त्याने स्वतः होऊन स्वीकारलेले नव्हते. या सर्व कारणांमुळे त्याने आपल्या त्या 'स्वामी' जीवनाला तिलांजली दिली."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ शवाबरोबर अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# चतुर व्यापारी

एका शहरातल्या व्यापाऱ्याच्या घरी वीस हजार रुपयांची चोरी झाली. तसा तो स्वभावाने लोभी व चिक्कूच होता आणि त्यात इतक्या मोठ्या रकमेची चोरी झाली. म्हणून त्याच्या मनाला धक्काच बसला. त्याने राजाकडे आपले गाऱ्हाणे नेले. परंतु कित्येक दिवस चोरांचा शोध लागला नाही. त्यामुळे तो व्यापारी मानसिक आजाराने आजारी पडला.

शेवटी त्याने देवाची करुणा भाकायला सुरवात केली. गावातल्या प्रत्येक देवळात जाऊन त्याने नवस करून देवाला विनवले की देवा, श्रावण महिन्याच्या पौर्णिमेपर्यंत मला चोरीचे पैसे परत मिळाले तर मी त्याच दिवशी तुझ्या चरणी दहा हजार रुपये अर्पण करीन.

दहा देवळात त्याने तोच नवस केला. म्हणून सर्व पुजाऱ्यांना वाटू लागले की त्याला वेड लागले असावे. कारण फक्त वीस हजार रुपयांचीच चोरी झाली होती.

मध्यंतरी शिपायांच्या हुशारीने म्हणा किंवा व्यापाऱ्याच्या नशिबाने म्हणा,—चोर सापडले आणि त्यांच्या हातात सर्व रुपये देखील सापडले.

श्रावण पौर्णिमा आली. परंतु व्यापाऱ्याने कोणत्याही देवाचा नवस फेडला नाही. पुजाऱ्यांनी त्याला त्याचे कारण विचारले.

तेव्हा व्यापारी म्हणाला—"मी आतांच्या आतां नवस फेडायला सिद्ध आहे. परंतु कोणत्या देवाच्या कृपेने मला माझे चोरी गेलेले पैसे परत मिळाले हे मला कळले नाही."





# बेणणीची मजुरी

सिरीपूर नावाच्या गावी धर्मू नावाचा एक शेतकरी रहात असे. तो आपली दोन एकर जमीन नांगरून त्यांत पीक काढी. ते त्याच्या कुटुंबाच्या उदरनिर्वाहापुरेसे होई. शिवाय तो इतरांना पडेल ते काम करून मदत करी. परंतु त्याने चुकूनसुद्धा कोणासमोर हात पसरला नाही.

धर्मूच्या शेजारी भद्रू नावाचा आणखी एक शेतकरी रहात असे. त्याच्या जवळ पन्नास एकर उत्तम सुपीक जमीन होती. परंतु पिकावर जी प्राप्ती होई तेवढ्यावर त्याचे समाधान होत नसे. म्हणून तो सावकारीचा धंदा सुद्धा करी. तो गरिबांकडून चक्रवाढ व्याजाने पैसे वसूल करून त्यांचे शोषणच करी. गरीब लोक जळू म्हणून पाठीमागून निंदा करीत.

गावाचा पाटील भद्रूचा मित्र होता. त्याच्या मदतीने भद्रू गरीबांवर जास्तच जुलूम करी. सिरीपूरचे गावकरी सर्वसामान्यपणे गरीबच होते. म्हणून जे जुलूम होत ते मुकाट्याने सहन करीत.

त्याच सुमारास भद्रूची गुरे धर्मूच्या शेतात शिरली व साऱ्या पिकाचा नास झाला. परंतु पाटलाकडे तक्रार करून फारसा फायदा होणार नाही असा विचार करून धर्मूने गप्प राहण्यात शाहाणपणा मानला.

परंतु भद्रूने मात्र 'चोराच्या उलट्या बोंबा', या न्यायाने पाटलाकडे तक्रार केली की धर्मूने त्याच्या गुरांना खूप बडवले व त्यांची हाडे बाहेर आली. पाटलाने भद्रूकडून लांच घेऊन धर्मूला चावडीवर बोलाविले. धर्मूला पाटलाने विचारले—"काय रे धर्मू! तू भद्रूच्या गुरांना खूप बडविलेस म्हणे? तुला त्याविषयी काय म्हणावयाचे आहे?"

श्री गुणाकर



पाटील म्हणाला ते ऐकून धर्मू चकितच झाला. तो विचार करू लागला, आपलं पीक नष्ट झालं त्याबद्दल आपण तक्रार करायला हवी होती. उलट आपल्यावरच आरोप लावून आपली हजेरी घेतली जाते आहे! हा काय न्याय झाला?

धर्मू म्हणाला–"खरं सांगू का, पाटील? भद्रूची गुरं माझ्या शेतात शिरली व साऱ्या पिकाचा नास केला. मी गुरांना आपल्या शेतातून बाहेर हाकलले हे खरं आहे, परंतु एकाही गुराच्या अंगाला हात लावला असेल तर शपथ. नुकसान माझं झालं, आणि माझ्यावरच आरोप, हा न्याय नव्हे!"

      

"ओ हो [illegible] निघालास की रे! सिरीपूर गावात तुला एक दिवस राहणं देखील अशक्य होईल! माझा निकाल ऐक. तू भद्रूच्या गुरांना मारलेस म्हणून नुकसानभरपाईखातर तू शंभर रुपये त्याला दे. शिवाय त्याच्या गुरांनी तुझ्या शेतात बेणणीचे काम केले आहे त्याची मजुरी म्हणून आणखी पन्नास रुपये दे. एकूण दीडशे रुपये दे!" पाटलाने निकाल सांगितला.

धर्मूला आपल्या कानावर विश्वास होईना. त्याने विचारले–"गुरांनी बेणणीची कामे कशी काय केली?"

"भद्रूची गुरं तुझ्या शेतातले फक्त गवत तेवढे चरली आहेत. म्हणून तुला बेणणी-साठी मजूर लावण्याची गरज उरली नाही! त्या कामासाठी तू मजुरांना जी मजुरी दिली असतीस ती भद्रूच्या गुरांना मिळाली पाहिजे." पाटील म्हणाला.

धर्मूने आश्चर्यचकित होऊन विचारले–"गुरांना कसं कळणार की गवत कोणतं आणि भात कोणतं? विचित्र न्यायच ऐकतो आहे!"

पाटील संतापून म्हणाला–"तू माझ्या निकालाची निंदा केली आहेस. त्या अप-राधाबद्दल उद्या संध्याकाळपर्यंत तू कचेरीत पन्नास रुपये जमा केले पाहिजेस. नाहीतर तुला तुरुंगाची शिक्षा करावी लागेल."

[illegible] नाही. तो बाहेर निघाला आणि सरळ रामदासाच्या घरी आला. त्याला त्याने घडलेली गोष्ट सांगितली.

रामदास धर्मूसारखाच सरळ व धर्मभीरु माणूस होता. दोघांत गाढ मैत्री होती. सर्व वृत्तांत ऐकून त्याला वाईट वाटले. तो म्हणाला–"तुझ्यावर हा जुलूमच आहे. मी या सर्वांना चांगला धडा शिकवितो. तू मी देतो ते दोनशे रुपये नेऊन त्या दोघांच्या तोंडावर फेकून ये. या लबाडांकडून दुप्पट पैसे कसे वसूल करायचे ते मी पाहून घेतो!" असे सांगून रामदासने धर्मूला दोनशे रुपये देऊन पाठवून दिले.

दुसऱ्या दिवशी रामदासने आपली गुरे पाटलाच्या शेतात नेऊन सोडली. पाट-लाच्या नोकरांनी ती बातमी पाटलाच्या कानावर घातली. पाटलाने येऊन पाहिलं, त्याचं सर्व शेत फस्त झाल्यावर रामदास आपल्या गुरांना पाणी पाजीत होता.

पाटलाने जाऊन रामदासला विचारले–"तू आपली गुरं माझ्या शेतात सोडली होतीस आणि गुरांना सर्व पिकाचा नास करून टाकला, असं मला कळलं आहे, खरं का हे?"

"मी आपली गुरं तुमच्या शेतात सोडली? कोणी सांगितलं तुम्हांला हे सर्व? खोटी गोष्ट आहे!" रामदास म्हणाला.



"माझ्या नोकरांनी पाहिलं, स्वतःच्या डोळ्यांनी! तू जे काम केलं आहेस त्याबद्दल नुकसानभरपाई द्यावी लागेल!" पाटलाने धमकावले.

"तुम्हांला काय वाटेल ते करा. मी एक कवडी सुद्धा नुकसानभरपाई देणार नाही." रामदासने तितक्याच करड्या स्वरात उत्तर दिलं.

"ठीक, या गोष्टीचा निकाल कोर्टात होईल." असे सांगून पाटील जिल्हा कचेरीत गेला आणि कोर्टात फिर्याद दाखल केली की रामदासने माझ्या शेतात गुरे सोडून दहा एकर जमिनीच्या पिकाचा नास केला आहे. त्याची नुकसानभरपाई कोर्टाने देववावी. रामदास-







वर समन्स जारी करण्यात आला. रामदास त्याची वाटच पहात होता. तो धर्मूलाबरोबर घेऊन ठरल्या वेळी कोर्टात हजर झाला.

न्यायाधिशाने रामदासाला विचारले– "तुझ्या विरुद्ध फिर्याद आहे की तू आपली गुरे गावच्या पाटलाच्या शेतात सोडून त्याचे सर्व पीक नष्ट करविलेस. तुला त्याविषयी काय म्हणावयाचे आहे?"

"आपण न्यायाधीश आहांत. मी खरं तेच सांगणार आहे. हे खरे आहे की मी आपली गुरे पाटलांच्या शेतात सोडली होती. परंतु माझ्या गुरांनी शेतातले फक्त गवत तेवढे चरले. बाकी पिकाला तोंड देखील लावलं नाही. म्हणून कृपा करून पाटलांकडून मला बेणणीची मजुरी देवविण्याची कृपा करावी." रामदास म्हणाला.

तेव्हा तेथे हजर असलेले सर्व लोक मोठ्याने हसू लागले. न्यायाधिशाला रामदासच्या जबानीत गूढार्थ असल्याचा संशय आला. त्याने विचारले–"रामदास! बेणणीची मजुरी ती कशी काय?"

"आपण [illegible] न्याय करावा. यापूर्वी पाटलांनी भद्रूच्या दोन एकर जमिनीची अशीच बेणणी केल्या बद्दल भद्रूला पन्नास रुपये देवविले आहेत. दोन एकरांना पन्नास रुपये बेणणीची मजुरी मिळू शकते तर दहा एकरांची अडीचशे रुपये मजुरी होते. तो विचार करूनच मी आपली गुरे पाटलांच्या शेतात सोडली होती, बेणणी करायला. म्हणून माझ्या गुरांना न्याययुक्त मजुरी मिळाली पाहिजे. मी त्या गुरांचा मालक आहे, ती रक्कम मला देवविण्याची मेहरबानी करावी." रामदासने हात जोडून विनंती केली.

न्यायाधिशाला खरी गोष्ट कळायला वेळ लागला नाही. धर्मूच्या तोंडी सर्व गोष्टी कळल्यावर धर्मूला भद्रूकडून दोनशे रुपयांवर दंड म्हणून जास्त रक्कम देवविण्यात आली. पाटलाला त्या पदावरून काढून टाकण्यात आले आणि रामदासला पाटील म्हणून नेमण्यात आले.



# लोभ

एका गावी रामशास्त्री नावाचे एक भटजी रहात असत. त्यांना भिक्षुकीच्या धंद्यात मिळकत बेताचीच होत होती. म्हणून रामशास्त्री विचार करू लागले की आपल्या विद्वत्तेच्या बळावर लक्षावधी रुपये मिळविणे शक्य आहे आणि आपली कीर्तीही वाढेल.

त्याच सुमारास त्या देशाच्या राजाने रुद्र यज्ञ करण्याचे ठरविले आणि देशातल्या सर्व दशग्रंथी ब्राह्मणांना निमंत्रणे पाठविली. निमंत्रण मिळतांच रामशास्त्री विचार करू लागले की आपले स्वप्न साकार होण्याची चिन्हे दिसू लागली आहेत. राजासमोर आपल्या पांडित्याचे प्रदर्शन करून दरबारी विद्वान म्हणून मानाची जागा पटकावणे शक्य आहे.

म्हणून रामशास्त्रींनी भिक्षुकी सोडली, घरदार विकले आणि रुद्रयज्ञ केव्हा सुरू होतो याची वाट पाहू लागले. गावातल्या लोकांनी दुसऱ्या एका भटाला बोलावून त्याच्या करवी आपली लहान मोठी धर्म कार्ये करवायला सुरवात केली.

त्याच सुमारास राजा एकाएकी आजारी पडला आणि रुद्रयज्ञ एक वर्षभर लांबणीवर पडला. परिणामी रामशास्त्री भिक्षुक राहिले नाहीत व दशग्रंथी म्हणून मिरवूही शकले नाहीत. शेवटी त्यांना दुसरे गांव शोधून भिक्षुकीचा धंदा पुन्हा सुरू करावा लागला.





# साधूची संगत

वल्लभ हा एक हुशार तरुण युवक होता. दुर्दैवाने त्याला आपला म्हणेल असा कोणी नव्हता. उदर निर्वाहाचे साधनही काही नव्हते. त्याला अनेक कष्ट सहन करावे लागले. शेवटी त्याने लबाडी लुच्चेगिरी करूनच आयुष्य घालवायचे ठरविले.

त्याच सुमारास दिव्यानंद नावाचे एक साधू त्या गावात आले. गावातील वृद्ध-मंडळींनी आणि श्रीमंतांनी साधूच्या उतरण्याची उत्तम व्यवस्था करून दिली. दर्शनाला येणाऱ्या सर्व गावकऱ्यांना साधू उपदेशामृत पाजून आशीर्वाद देत. गावकरी साधूला फळांपासून सोन्यापर्यंत वस्तू नेऊन साधूला भेट म्हणून देऊ लागले.

ते पाहून वल्लभने विचार केला, साधूने सर्वसंगपरित्याग केला असतां त्याला या सर्व वस्तूंची गरज काय? तेव्हा या वस्तू आपण पचवू शकलो तर काय हरकत आहे? तो विचार मनात आला त्याच दिवसापासून तो साधूच्या दर्शनाला जाऊ लागला. सर्व परिस्थिती स्वत: पाहून त्याने ओळखून घेतली. एके दिवशी साधूच्या आश्रमात शिरून साधूला मिळालेल्या सर्व वस्तू त्याने एका गाठोड्यात बांधून ठेवल्या. साधूची झोप मोडली. त्याने वल्लभला पाहिले. वल्लभने सुरा काढून साधूला धमकावले. परंतु दिव्यानंद हसत वल्लभला म्हणाले—"बेटा, या सर्व वस्तू घेऊन जाऊन तू काय करणार?"

वल्लभ क्षणभर किंकर्तव्यविमूढ स्थितीत थबकला, परंतु लगेच सावध होऊन म्हणाला—"या सर्व वस्तूंची आपल्या सारख्या साधूला गरजच काय? परंतु मला या मिळाल्या तर मी चैनीत राहू शकेन."

रहायला एवढेच पुरेल म्हणतोस? की आणखी काही लागेल?" साधूने विचारले.

वल्लभ चकित होऊन म्हणाला—"आणखी असेल तर तेही पाहिजे."

"तर मग तू काही दिवस माझ्याजवळच रहा. तुझ्या मताप्रमाणे तुला चैनीत व सुखात पुढील आयुष्य घालविण्या पुरेशी संपत्ती प्रजेकडून मला मिळेल ती सर्व घेऊन जाऊन सुखाने रहा." साधूने त्याला समजावून सांगितले.

वल्लभला ती गोष्ट पटली. त्या दिवसा-पासून वल्लभ साधूबरोबरच राहू लागला. साधू ज्या ज्या गावी जात त्या त्या गावी वल्लभही जाऊ लागला. साधूच्या उप-देशाने चित्त शांती मिळाल्यामुळे प्रजा साधूला अनेक वस्तू भेट म्हणून आणून देत. एके दिवशी साधू वल्लभला म्हणाले—"मी काही दिवस समाधिस्थ राहणार आहे. माझी समाधी संपेपर्यंत तूच माझ्या जागी प्रजेला उपदेश करण्याचे काम करीत रहा. मी उपदेश करीत आलो ते तू ऐकत आलाच आहेस! कोणी काही शंका विचारली तर तू आपल्या समजुतीप्रमाणे त्याचे उत्तर देत जा." असे सांगून साधू समाधिस्थ झाले.

वल्लभ साधूच्या जागी बसून उपदेश देऊ लागला. लोकांच्या शंकांचे निरसन करून त्यांच्या मनाचे समाधान करू लागला.

एक दिवशी एक अट्टल चोर वल्लभाच्या दर्शनाला आला आणि म्हणाला—"बुवा!










मी आयुष्यभर चोऱ्या केल्या, दरोडे घातले आणि कित्येक खून केले. माझ्या पापांचे फळ म्हणूनच की काय, माझी निरपराध मुले, बायको व नातेवाईक राजाच्या शिपायांच्या अत्याचारामुळे परलोकी गेले. या सर्वांचे मूळ कारण हे पापी धन आहे. आपण हे स्वीकार करून गोरगरिबांना वांटून टाकावे." असे म्हणत त्याने पुष्कळसे धन वल्लभसमोर ठेवले आणि निघून गेला.

काही दिवसांनी एक प्रसिद्ध व्यापारी वल्लभाकडे आला व म्हणाला–"बुवा! मी व्यापारात लबाडी करून पुष्कळ पैसे मिळविले, परंतु आयुष्यात मला सुख म्हणून मिळत नाही. माझी बायको व मुले विचित्र विचित्र आजाराने आजारी पडून मरण पावली, तेव्हा माझे हे सर्व धन निरुपयोगी ठरलं. पाप करून मिळविलेले हे धन गोर गरिबांना वांटून मला चित्तशांती लाभेल असे काहीतरी करा."

अशातऱ्हेने अनेक प्रकारचे लोक वल्लभकडे येत आणि आपल्या पापाबद्दल पश्चाताप करीत

तोंडून त्यांच्या दुःखकथा ऐकून वल्लभच्या मनात कालवा-कालव होऊ लागली. आपण चैनीत आयुष्य घालविण्याची स्वप्ने पहात होतो. परंतु त्याच्या मनात आतां त्या सर्व सुखाचा वीट आला.

त्या नंतर दिव्यानंद समाधी संपूर्ण झाल्यावर बाहेर आले. त्यांनी वल्लभाला विचारले–"बेटा! तुला सुखपूर्वक पुढील आयुष्य घालवायला पुरेसे धन लाभले का?"

ते ऐकून वल्लभ दिव्यानंदांच्या पायां पडून म्हणाला–"बुवा! मला या तुच्छ धनाची गरज नाही. या धनामुळे सुखप्राप्ती होणे शक्य नाही. कृपा करून माझ्यावर अनुग्रह करा व पुढील आयुष्य आपल्या संगतीत घालवायला संधी द्या."

त्यानंतर वल्लभ दिव्यानंदांबरोबरच राहूला. दिव्यानंदांनी गोलोकवास केल्यावर त्यांची गादी वल्लभाने चालू ठेवली. भक्ताकडून मिळणाऱ्या धनाचा उपयोग त्याने प्रजेचा हितासाठीच केला.



# लांच म्हणजे काय?

एका राजाच्या दरबारात जनार्दन नावाच्या तरुणाला नोकरी मिळाली. सरकार दरबारात नोकरी म्हणजे लक्ष्मीनेच दार उघडले असे एका श्रीमंत माणसाला वाटले. त्याने खूप हुंडा देऊन आपल्या मुलीचे लग्न त्या तरुणाशी करून दिले. कमला सासरी आली.

परंतु कमलाला सासरी आल्यावर कळलं की तिचा नवरा बोळयाने दूध पिणारा आहे. लांच बीच घेत नाही. तिने नवऱ्याला लांच घ्यायला सांगितले व खूप आग्रह केला. परंतु उपयोग झाला नाही, तेव्हा ती रुसून माहेरी जायला तयार झाली.

तेव्हा जनार्दनने बायकोला विचारले–"मी लांच घेऊ लागलो तर तू माझ्याबरोबर संसार करायला तयार आहेस का?" कमला म्हणाली–"आनंदाने करीन!"

तेव्हा जनार्दन म्हणाला–"तर मग असं कर की तू माहेरून परत येते वेळी बरोबर मला जेवायला सोन्याचे ताट घेऊन ये."

"कां? मी बरोबर एवढा हुंडा, डाग दागिने आणि संसाराची सर्व भांडी आणली, ती नाही पुरली का? आणखी सोन्याचं ताट कां आणू? नाही आणणार!" कमला म्हणाली.

"तर मग चोरून घेऊन ये." जनार्दन म्हणाला.

"मी बाबांच्या घरात चोरी करू म्हणता? तुम्हांला वेडबीड तर नाही ना लागले?" कमलाने विचारले.

"लांच घेणे माझ्या मते चोरीच करणे आहे. कारण राजा हा मला पित्यासारखा आहे. त्याच्याशी लबाडी करून लाच घेणे चोरी करण्यासारखेच आहे." जनार्दन म्हणाला.

कमला निरुत्तर झाली. माहेरी जायचा विचार तिने मनातून काढून टाकला.












# देवाचे धन

शिवराम शास्त्री एका गरीब ब्राह्मण कुटुंबात जन्माला आल्याने गावातल्या प्रमुख नागरिकांची मर्जी संभाळून एका डोंगरात बांधलेल्या देवळात पुजाऱ्याचे काम करीत. कित्येक पिढ्यांचे दारिद्र्य त्यांच्या वाट्याला आलेलें होते. देवदर्शनाला लोक येत ते देवासमोर चार पैसे ठेवीत ते पेटीतच टाकीत. पेटीचे बूड खोल भुयारात होते. शिवरामशास्त्रींना मासिक पगार मिळे तेवढाच.

शिवरामशास्त्रींना या गोष्टीचा राग येई की पेटीत दररोज इतके पैसे पडत आहेत आणि त्यांना मात्र पगारावर भागवावे लागत आहे. एके दिवशी शास्त्रीबुवा आवश्यक हतोडा वगैरे हत्यारं घेऊन टेकडी चढून गेले आणि त्यांनी फार हुशारीने भुयारात पेटीला लावलेले कुलूप उघडले. पेटीत सोन्याचे मणी, दागिने व नाणी पाहून शास्त्रीबुवांच्या तोंडाला पाणी सुटले. त्यांनी काही मोजके दागिने काढून घेतले आणि ते एका गोठाड्यात बांधून घेऊन पुन्हां कुलूप लावले. नंतर टेकडीवरून उतरून घरी आले. त्यांनी आपल्या घराच्या परसात ते दागिने एक खड्डा खणून पुरून ठेवले. त्यांचा स्वभाव विसराळू होता म्हणून त्यांनी ज्या जागी ते धन पुरून ठेवले होते त्याचे वर्णन एका कागदावर लिहून ती चिट्ठी देव्हाऱ्यात शंकराच्या पिंडी खाली घडी करून ठेवून दिली.

त्यानंतर दोन दिवस शास्त्रीबुवांना झोपच लागेना. दुसऱ्या दिवशी त्यांना परसात कोणी काहीतरी करीत असल्याचा भास झाला. त्यांनी उठून जाऊन पाहिले, परंतु तेथे कोणी नव्हते.

शास्त्रीबुवा चकित होऊन आकाशाकडे पहात होते त्याच वेळी कोणीतरी त्यांच्या पाठीमागून सरकन पळत गेला आणि भिंती वरून उडी मारून अदृश्य झाला.

शास्त्रीबुवांना शंका आली की त्यांनी पुरून ठेवलेल्या साठ्याची गोष्ट कोणाला कळली तर नाही? म्हणून त्यांनी दागिने पुरून ठेवले त्या बाजूला ते गेले. त्याच वेळी त्यांच्या चारी बाजूला शिपाई गराडा देऊन उभे राहले. शास्त्रीबुवांना वाटले की चोराचा पाठलाग करीत शिपाई आले असावे. म्हणून त्यांनी चोर पळून गेला ती वाट दाखविली.

परंतु शिपाई दरडावून म्हणाले–"तूच चोर आहेस! आणखी कोण असणार? आमच्या डोळ्यात धूळ फेकून तू येथे आलास. बोल चोरलेला माल कोठे ठेवला आहेस?"

त्यानंतर शिपायांनी परसातली सर्व जागा हुडकून पाहिली, त्यांना एका झुडपात चोरीचा माल सापडला. म्हणून शास्त्रीबुवांनाच चोर समजून शिपाई त्यांना पकडून घेऊन गेले. शास्त्रीबुवांनी जी चोरी केली नव्हती त्याबद्दल त्यांना शिक्षा झाली.

दुसऱ्या दिवशी पुन्हा तो चोर शास्त्रीबुवांच्या घरी आला. त्या चोराचे नाव शंभुदास होते. घरात कोणी नसणार हे त्याला माहीत होते. म्हणून तो मोठ्या आशेने घरात शिरला होता. परंतु घरात त्याला काही मिळाले नाही. मात्र देव्हाऱ्यात पिंडीची बैठक चांदीची होती. ती त्याने उचलली



     

तेव्हा त्याला एक चिट्ठी सापडली. त्यात दागिने लपवून ठेवले होते, त्या जागेचे वर्णन होते. आपण चोरलेला माल मिळाला नाही तर दुसराच एक ठेवा मिळाल्याचा आनंद शंभुदासला झाला. चिट्ठीतल्या वर्णनाप्रमाणे परसात जमीन खणल्यावर त्याला दागिन्यांचे गाठोडे सापडले. त्याने ते आपल्या उपरण्यात बांधून घेतले. वाटेत भाकऱ्या विकत घेतल्या आणि त्या उपरण्यात बांधून धर्मशाळेतल्या पडवीत खायला बसला. त्या पडवीत एक बैरागी बसलेला होता.

शंभुदासने काही भाकऱ्या खाल्ल्या आणि उरलेल्या तशाच उपरण्यात बांधून ते गाठोडे उशाजवळ घेऊन झोपला.

शंभुदासला झोप लागल्यावर बैराग्याने उरलेल्या भाकऱ्या उडवायच्या ठरविले. त्याने कसलं तरी औषध शंभुदासला हुंगवले आणि उशाजवळचे गाठोडे लांबविले. भाकऱ्यांबरोबर त्याला दागिन्यांचे गाठोडे-सुद्धा मिळाले.

तो बैं[illegible] एक चोर होता. त्याचे नाव लिंगप्पा होते. तो वेष पालटून निसटण्याच्या बेतात असता त्याला टेकडीवरचे देऊळ दिसले. तो त्या निर्जन देवळाकडे निघाला.

लिंगप्पा देवळात गेल्यावर पुन्हा वेष बदलू लागला. त्याच वेळी सवयीप्रमाणे पहाटे उठून देवळाच्या विश्वस्तमंडळाचा प्रमुख आपल्या नोकराबरोबर तेथे आला. दर महिन्यात तो त्याच दिवशी देवळात येऊन पेटी उघडून पेटीतले धन काढून हिशोब करीत असे. त्याने पेटीचे कुलूप काढून पाहिले तर त्याला काहीतरी ढवळाढवळ झाल्याचा संशय आला. संशयावरून त्याच्या नोकरांनी लिंगप्पाला धरले. त्याच्या जवळ देवाचे धन सापडले. नोकरांनी चोराला खूप बडविले आणि त्याला कोतवालाकडे पोचते केले.

देवाचे धन चोरल्याबद्दल दोघांना तुरुंग-वास भोगावा लागला आणि शेवटी देवाचे धन जसेच्या तसे देवाजवळ पोचते झाले.



# जिवंत बाहुली

एका गरीब माणसाने लहानपणीच मुलींची आई वारली, म्हणून मुलींना वाढविले. एकदा धाकट्या मुलीने कपड्यांची बाहुली केली व मोठ्या बहिणीला म्हणाली—"तू एक बाहुला कर की ग!" परंतु थोरलीला बाहुला करता आला नाही. तिने धाकटीची बाहुलीच बळकावली. धाकटी किती ओरडली, परंतु तिने ती परत दिली नाही. तेवढ्यात बाप येऊन म्हणाला—"तुझी ताई बाहुली करील ना, ती मी तुला देईन. मग झालं ना?"

त्यानंतर काही वर्षांनी मोठीचं लग्न झालं आणि वर्षभराने तिला एक मुलगी झाली. बाळंतपणातच थोरली आजारी पडली. ते कळल्यावर बाप धाकटीला घेऊन थोरलीला भेटायला आला. मोठ्या मुलीचा आजार वाढतच गेला आणि त्याच आजारात ती आपल्या तान्ह्या मुलीला सोडून परलोकी गेली. मरते वेळी ती आपल्या धाकट्या बहिणीला जवळ बोलावून म्हणाली—"तुला बाहुली हवी होती ना, ही घे माझी हसरी खेळकर बाहुली!"












# खरं ते!

रवींद्र नोकरीच्या शोधार्थ राजधानीच्या शहरी निघाला. गावात पोचेतो काळोख पडू लागला. समोर एका वृद्ध माणसाला पाहून रवींद्रने विचारले–"काय हो! ही रात्र काढायला कोठे जागा मिळू शकेल का?" त्या वृद्ध माणसाने रवींद्रजवळ त्याच्या घरासंबंधी व विद्याभ्याससंबंधी चवकशी केली व त्याला आपल्याच घरी बोलावून घेऊन गेला. स्नान झाल्यावर दोघे जेवायला बसले.

त्यांना एक तरुण स्त्रीने वाढले. जेवण झाल्यावर दोघे ओटीवर बोलत बसले. तेव्हा तो वृद्ध रवींद्रला म्हणाला–"आपल्याला ज्या मुलीने जेवायला वाढले ती माझी पुतणी, माझ्या धाकट्या भावाची मुलगी! तिचे नाव आहे रमा. माझा धाकटा भाऊ दरबारात मोठ्या हुद्द्यावर होता. एकदा दरबारात जात असता एका बैलाने त्याला शिंग मारले व तो तत्काळ मरण पावला. त्याला मुलगा नाहा. म्हणून महाराजांनी असे वचन दिलं आहे की माझ्या धाकट्या भावाच्या जावयाला दरबारात त्याच हुद्द्यावर नोकरी देण्यात येईल. तुला हरकत नसेल तर तू रमाशी लग्न करून घे आणि दरबारात नोकरी कर!"

रवींद्र विचार करू लागला, रमा दिसायला बरीच दिसते आहे. तिच्याशी लग्न करून घेतले तर सहजी मोठ्या हुद्द्यावर नोकरी मिळेल. उजाडल्यावर त्याने रमाच्या चुलत्याला आपली संमती कळविली. त्यानंतर मुहूर्त वगैरे पाहून रवींद्र व रमाचे यथावेळी लग्न झाले.

लग्न झाल्यानंतर थोड्याच दिवसांनी रवींद्रला रमाच्या स्वभावाची कल्पना आली. ती चढेल व घमेंडखोर होती. तिला वाटे की तिच्या मुळेच तिच्या नवऱ्याला मोठ्या हुद्द्यावरची नोकरी मिळाली आहे. ती शेजारपाजारच्या मैत्रिणींशी बोलतांना घमेंडीत म्हणे,–"ह्यांनी लग्न केलं नसतं तर ही नोकरी कधी मिळाली असती का?"

रवींद्रच्या कानावर त्या गोष्टी येत, व त्याला वाईट वाटे. परंतु तो एका शब्दानेही बायकोला काही बोलला नाही. त्यामुळे रमाचा तोरा वाढतच गेला.

रमाचे पुष्कळ नातेवाईक होते. ते काही तरी निमित्ताने राजधानीच्या गावी येत तेव्हा रमाकडेच उतरत. ते आणखी कोठे राहण्याचा विचार करीत तर रमा आग्रह करून त्यांना आपल्या घरीच रहायला सांगे. अंगाबाहेर खर्च होई, परंतु रवींद्र ते सर्व सहन करीत गेला.

एकदा रमाची आते आपल्या चार मुलांना घेऊन रमाच्या घरी आली. ती भेटायला म्हणून आली होती, परंतु तेथेच ठाण मांडून राहली. ती नवरा बायकोमध्ये कळीच्या नारदासारखी भांडण लावून गंमत पाही. एके दिवशी रवींद्रने रमाला विचारले–"काय ग, तुझ्या आत्याबाईंना स्वत:चं घरदार नाही वाटतं? किती दिवस झाले राणीसरकार येथेच ठाण मांडून बसल्या आहेत?"



रमा चिडून म्हणाली–"तुम्ही माझ्या आतेचा असा अपमान केलेला मला नाही खपणार! तुम्हांला आहे कोण पुसणारा? आहेत माझी चार नात्याची मंडळी. ती तुम्हांला एवढी जड वाटू लागली का? माझ्यामुळेच तर आपला संसार चालू आहे, हे विसरलात वाटतं?"

रवींद्रने तो अपमान गुपचूप सहन केला. त्यानंतर दोन दिवसांनी दरबारात जाण्याचे त्याने बंद केले. रमाने नवऱ्याला विचारले–"तुम्ही कामावर नाही जात?"

रवींद्र म्हणाला–"नोकरी असेल तर ना कामावर जायचे? पगाराचे पैसे आपल्या या घरातल्या अन्नसत्रात पुरत नाहीत, म्हणून वरची प्राप्ती म्हणून लांच घेऊ लागलो आणि शेवटी बिंग बाहेर पडले










आणि कामावरून कमी करण्यात आले आहे!"

रमा कपाळ आपटून नवऱ्याला काय वाटेल ते बोलली. चार पांच दिवसात तिच्या जवळ होते ते पैसे संपुष्टात आले. आत्याबाईकडे पुष्कळ पैसे होते, तिने उसने देता का, विचारले.

परंतु आत्याबाईंना भाचीच्या नवऱ्याची नोकरी गेल्याचे कळलं होतं. पैसे परत मिळणे शक्य नाही हे ओळखून त्या भाचीला म्हणाल्या—"बरं आहे की ग! ज्याला नोकरी किंवा इतर कामधंदा नाही त्याने कशाच्या बळावर उसने मागावे ग? कोणी शहाणा माणूस देईल तरी का त्याला उसने पैसे?" असे सांगून आत्याबाई मुलांना घेऊन निघून गेल्या.

आतां रमाला कळलं की नातेदारसुद्धा गूळ असेल तर मुंगळ्यांसारखे जमा होतात. त्या दुष्ट आतेमुळे ती आपल्या नवऱ्याला किती वाकडे बोलली होती? तिला गोड-धोड खायला घालण्यासाठीच लांच घेऊन नोकरी घ[illegible] होती नवऱ्याला. परंतु आम्हांला गरज पडली तेव्हां तीच आते निघून गेली. रमा कपाळ आपटून रडू लागली.

रवींद्र रमाचे सांत्वन करीत म्हणाला— "वेडे, तू रडणे बंद कर पाहू! माझी नोकरी गेलेली नाही. माणसाचा स्वभाव कळावा म्हणून मी सर्व नाटक रचलं होतं. नातेदार झाले तरी त्यात जिव्हाळ्याचे कोण हे ओळखले पाहिजे. नवरा बायकोने परस्पर प्रेमाने राहलं पाहिजे. यात कोणाचे उपकार कोणावर नसतात. मान व प्रेम एकत्र राहणेच शक्य नाही. तुझ्यामुळे मला नोकरी मिळाली हे खरे असले तरी, ती नोकरी करण्याची लायकी माझ्यात असली तरच ना ती टिकेल. ती लायकी माझ्यात असली पाहिजे. तुझ्या लायकीचा तेथे उपयोग नाही. 'खरं ते' मी सांगितले!"

त्यानंतर रमात पालट झाला व दोघांचा संसार सुखाचा झाला.



# परतणारे वर

दोघे भाऊ गावात उदरनिर्वाहाचा काही मार्ग निचत नाही हे पाहून द्रव्यार्जनासाठी देशाटनाला निघाले. वाटेत दुपारच्या खाण्याच्या वेळी त्यांनी बरोबर आणलेली पुरचुंडी उघडल्याबरोबर त्यांच्यासमोर एक योगी येऊन उभा राहिला व म्हणाला—"काय हो, मला सुद्धा भूक लागली आहे, खायला काही मिळेल का?"

दोघां भावांनी बरोबर आणलेल्या खाद्यपदार्थांचे दोन सारखेसारखे वाटे केले आणि एक वांटा त्या योग्याला दिला बाकी वाटा दोघांनी अर्धा अर्धा वांटून खाल्ला.

योग्याला फार आनंद झाला. निघताना म्हणाला—"माझ्या गुरुने मला दिलेले दोन वर माझ्या जवळ आहेत. ते परतणारे वर आहेत. मी ते तुम्हांला एकेक देतो. तुम्ही कोणाला ही काही मिळावं असं इच्छिलेत की ते तुम्हांला परत मिळते." असे सांगून तो योगी निघून गेला. हे वर काय आहेत बुवा, दोघांनाही कळेना.

त्यानंतर दोघे निरनिराळ्या दिशेने निघाले. मोठा भाऊ सज्जन होता. त्याला कोणी मदत केली नाही तर तो मनाला लावून घेत नसे. परंतु जे मदत करीत त्यांचे भलं व्हावं असेच त्याला वाटे. धाकटा भाऊ तापट होता. त्याला कोणी मदत केली नाही की तो त्यांना शिव्या देत म्हणे—"तुझं तोंड बंद होवो! तुझे पोट जळो!"

योग्याने म्हटल्याप्रमाणे ते वर खरे ठरले. थोरला श्रीमंत होत गेला आणि धाकटा निरनिराळ्या आजारांमुळे अंथरुणाला खिळला.













# नशिबाचा खेळ

प्राचीनकाळी कोशल देशावर राजा अनंगपाल याचे राज्य होते. एकदा त्याच्या सौवीर नावाच्या सेनापतीने बंड केले आणि राजाचा वध करून स्वत: सिंहासन हस्तगत केले. अनंगपाल राजाला तीन मुलगे होते. तिघे पळून गेले आणि काशीला एका ब्राह्मणाच्या घरात आश्रयाला राहले. त्या ब्राह्मणाने त्यांना सर्व विद्या शिकवून त्यांत पारंगत केले. ते वयात येईपर्यंत त्याच्याच घरात राहिले. एकदां त्या ब्राह्मणाने त्यांना जवळ बोलाविले व म्हणाला–"आतां तुम्हांला सर्व विद्या अवगत आहेत. तुम्ही स्वत: आयुष्याचे काय ते ध्येय ठरवून ते गाठण्याच्या प्रयत्नाला लागा."

युवराजाचे नाव होते आदित्य. त्याने विचार केला, सैन्य उभे करून त्याला उत्तम शिक्षण द्यावे. सैन्याच्या बळावरच तर सेनापती सिंहासन हस्तगत करू शकला. म्हणून सैन्य उभे करून सैन्याच्या बळा-वर आपले गेलेले राज्य परत मिळविले पाहिजे.

मधला राजकुमार विक्रम त्याने विचार केला, सर्व जगाच्या मुळाशी धन आहे. धन असेल तर सर्व होते. त्याच्या शिवाय सैन्य उभे करणे शक्य नाही.

सर्वात धाकटा उदयभानू. त्याने विचार केला, सैन्य किंवा पैसा दोन्ही निरुपयोगी आहेत. नशिबात असेल त्यावरच समाधान मानण्यात श्रेयस्कर आहे. सेनापती त्याच्या नशिबात होतं तेवढ्यावर मनाचे समाधान मानून स्वस्थ राहला असता तर त्यांच्या वडिलांचे राज्य गेले नसते.

शेवटी तिघे आपापल्या मनातील विचाराप्रमाणे कामाला लागून पाचवर्षा-नंतर त्याच जागी परस्परांना भेटण्याचे [illegible] किती सिद्धी मिळाली हे कळल्यावर पुढले पाऊल टाकायचे असे त्यांनी ठरविले.

त्यानंतर आदित्य कोशल राज्यातच जाऊन गुप्तपणे आपल्या कामाला लागला. त्याने, सेनापतीने, विश्वासघात करून स्वत:च्या मालकाचा कसा वध केला आणि सिंहासन बळकावले, हे सांगून प्रजेच्या मनात सेनापतीच्या विरुद्ध असंतोष पसर-विला. गादीचे खरे वारस जिवंत आहेत, त्यांनाच राज्य देवविले पाहिजे असे सांगून त्याने सैन्य उभे करायला सुरवात केली. दहा हजाराचे सैन्य उभे झाले. पांच वर्षांनी तो त्या ब्राह्मणाच्या घरी आपल्या दोघां भावांना भेटण्यासाठी आला.

मधला विक्रम शंभर दरोडेखोरांच्या नायक होऊन त्यांचा मदतीने अलोट धन जमवून पांच वर्षांनी आपल्या भावांना भेटायला आला.

उदयभानू एका गावातच पाच वर्षे राहाला. सुरवातीला त्याने मोलमजुरी केली. नंतर गावातली कामे, विहिरी, तलाव व कालवे काढायला त्याने पुढाकार घेतला. त्याला शेजारपाजारच्या गावात चांगली कीर्ती मिळाली. तो देखील पाच वर्षांनी दोघां थोरल्या भावांना भेटण्यासाठी आला.

तिघे आपापल्या विचाराप्रमाणे यशस्वी होऊन परतलेले पाहून गुरु म्हणाला– "आतां तुम्ही तिघं कोशल देशात परत जा आणि आपापल्या परीने प्रयत्न करून











पित्याचे राज्य मिळाल्यावर ते वाटून घ्या आणि सुखाने पुढील आयुष्य घालवा."

आदित्य व विक्रमला वाटलं की धाकटा उदयभानू मूर्खच निघाला. नशिबावर सर्व सोडून स्वस्थ बसला. याच्या हातून जगात काही मोठे कार्य होणेच शक्य नाही. म्हणून दोघे मोठे त्याच्याकडे दुर्लक्ष करून राज्य हस्तगत करून घेण्यासाठी सर्व तैयारीनिशी निघाले. आदित्याची नजर विक्रमच्या धनावर होती. सैन्य आपल्या राजाच्या खातर बंड करील, परंतु त्याला पोसायला धन आवश्यक आहे. असा विचार करून आदित्य विक्रमला म्हणाला–"तू आपल्या जवळचे धन सैन्याला लागणारा दारूगोळा, रसद वगैरेसाठी खर्च कर. राज्य मिळाल्यावर अर्धे अर्धे वाटून घेऊ."

सैन्य जमवायला आदित्याला जे कष्ट करावे लागले त्याच्याकडे दुर्लक्ष करून विक्रम म्हणाला–"माझ्या पैशाने पगार, दारू गोळा, रसद वगैरे पुरवून राज्य मिळाल्यावर ते सैन्य तुझे कसे होईल व राज्यात वा[illegible] ऐकून आदित्य संतापला. दोघांचे भांडण झाले आणि विक्रमने मोठ्या भावाचा वध करून सैन्यावर आपला अधिकार कायम केला. त्यानंतर त्या सैन्याच्या मदतीने त्याने सेनापतीच्या विरुद्ध युद्ध पुकारले व त्याला सिंहासनावरून काढून स्वतः राजा झाला.

परंतु सेनापती विरुद्ध बंड करणाऱ्या विक्रमला प्रमुख सरदारांनी आपला राजा मान्य केला नाही. त्यांनी त्यांचा खरा पुढारी आदित्यालाच मानले व त्याचा वध करणाऱ्या विक्रमच्या विरुद्ध बंडाचे निशाण उभे केले. त्या बंडात विक्रमचा वध झाला.

आतां सिंहासन कोणाला मिळणार हा प्रश्न उभा राहिला. प्रजेतील प्रमुख लोकांनी तिसऱ्या राजकुमाराचा शोध सुरू केला. उदयभानूला भेटून त्यांनी त्याला सिंहासनावर बसण्यास विनविले.

अशातऱ्हेने उदयभानूला सिंहासनप्राप्ती झाली.





# योग्य दंड

गंगाराम हा पहिल्यानंबरचा चिक्कू होता. इतका की पैसा खर्च होतो म्हणून त्याने आपल्या एकुलत्या एका मुलीचे लग्नसुद्धा केले नाही. गंगारामाच्या घराशेजारी रंगनाथ नावाचा एक तरुण युवक रहात असे. तो दुधाचे रतीब घरोघरी लावून त्यावरच आपला उदरनिर्वाह चालवीत असे. एकदा गंगारामला भेटून त्याने त्याच्या मुलीला मागणी घातली. फक्त तीन रुपये खर्चून दोन हार विकत आणून दिले तर पुरे. दोघे देवळात जाऊन देवाला साक्षी ठेवून परस्परांना हार घालून लग्न करून घेऊ, असे त्याने सांगितले. पण गंगाराम तीन रुपये स्वतःच्या हाताने खर्च करण्यास तयार नव्हता. म्हणून तो लग्नाचा विषय टाळीतच गेला.

एकाएकी एकदा गंगारामच्या मनात साखरभात खायची इच्छा उत्पन्न झाली. साखरभात करून खायचा म्हणजे खर्च होणार. दोन वेळ कांजी पिऊन व एक वेळ मूठभर तांदुळाचा भात खाऊन भागविणाऱ्या संसाराला एक वेळ साखरभात करून खायचा म्हणजे महिन्याभराचा खर्च करावा लागणार. म्हणून गंगारामाने मनातली इच्छा तशीच दाबून टाकली. परंतु ती किती दबणार? साखरभाताची सारखी आठवण होऊ लागली. घरात साखरभात करायचा म्हणजे बायको व मुलगीसुद्धा खाणार. म्हणून गंगारामाने साखरभाताला लागणारा सर्व सिधा एका टोपलीत लपवून ठेवला. त्यावर थोडे गवत झांकून ठेवले आणि उजाडताच उठून बायकोला म्हणाला–"पहा ग, मी एका जरूरी कामानें बाहेर जातो आहे, संध्याकाळपर्यंत परतणार नाही."

गंगारामच्या बायको एक दिवस का होईना, जिवाला मोकळपणा मिळणार असा








विचार करून खूष झाली. तिने रात्रीची उरलेली थोडी कांजी नवऱ्याला प्यायला दिली. गंगाराम ती पिऊन ते टोपले डोक्यावर घेऊन निघाला आणि जंगला गेला. अजून उजाडले नव्हते. लाकूडतोडे सुद्धा जेथे जाण्याचे धाडस करीत नाहीत अशा दाट झाडीच्या जागी गंगाराम गेला आणि तेथे त्याने चूल पेटविली. तूप साखर तांदूळ वगैरे काढून ठेवले. भात शिजवला आणि तूप व साखर घालून साखरभात तयार केला. थोडा थोडा खाऊन संध्याकाळपर्यंत संपवायचा असा त्याने विचार केला.

थोड्या वेळाने साखरभात चुलीवर असतांनाच तुपाचा वास जंगलात दरवळू लागला. साखरभात छान तयार झाला. चुलीवरून खाली उतरवून तो खाण्याच्या विचारात होता, इतक्यात पाठीमागून दोन बळकट हात आले व साखर भाताचे भांडे उचलू लागले. गंगारामने घाबरून मागे वळून पाहिले. त्याला यमदूतासारखे चार जण दिसले

पाहून गंगारामला कापरेच भरले व तोंडावाटे शब्दच उमटेना. तो घाबरून एकदम जमिनीवर कोसळला.

तिकडे दुर्लक्ष करून चोरांनी वडाची पाने आणून ती छान धुतली आणि त्यावर साखर भात वाढून घेऊन मिटक्या मारीत खाल्ला. मातीचे भांडं रिकामं झालं ते दूर फेकलं आणि निघून गेले.

गंगाराम अर्धमेल्या स्थितीत ऐन दुपारी घरी परतला. घराची दारे उघडी होती. घरात बायको किंवा मुलगी कोणी नव्हते. तिजोरी उघडी रिकामी पडलेली होती. त्याचे सर्व धन व बायकोचे दागिने वगैरे सर्व नाहीसे झाले होते.

छाती बडवीत गंगाराम घराबाहेर पडला. नंतर त्याला कळले की त्याच्या बायकोने मुलीचे लग्न रंगनाथाशी देवळात लावून दिले. सर्व जण दूर बायकोच्या माहेरी गेले आहेत. नाइलाजाने गंगारामला सुद्धा त्या गावची वाट धरावी लागली.





# ज्योतिष्याची भविष्यवाणी

संजय आपल्याबरोबर अर्जुनला गावाबाहेरच्या वडाच्या पाराजवळ बोलावून घेऊन जाताना म्हणाला—"तूसुद्धा आपलं भविष्य कां नाही विचारून घेत? दोन दिवसांपूर्वी एक नवा ज्योतिषी आला आहे. तो भूत, वर्तमान व भविष्य काळातल्या गोष्टी कशा अचूक सांगतो? प्रत्येक प्रश्नाचं उत्तर फक्त अर्ध्या रुपयाला मिळते!"

अर्जुन विचार करू लागला आपलं भविष्य विचारून घ्यायला नाही, तर त्या ज्योतिष्याचे भविष्य पहायला त्याच्याकडे अवश्य गेले पाहिजे. असल्या भोळेपणाची त्याला चीड होती. जादू नावाची थोडी हातचलाखी त्याला चांगली माहीत होती. असल्या लबाड लोकांवर त्याचा विश्वास मुळीच नव्हता. तो ज्योतिषी लबाड असेल तर त्याची लबाडी बाहेर काढून त्याच्या हातातून गावकऱ्यांना वांचविले पाहिजे, असे त्याने ठरविले.

तसा विचार करून तो आणखी काही गावकऱ्यांबरोबर वडाच्या झाडाजवळ गेला. झाडाखाली गंभीर मुद्रा करून बसलेल्या ज्योतिष्याला त्याने पाहिले. त्याचे लांब केस खांद्यावर लोंबत होते. तो तांबडे धोतर नेसून व तांबडा अंगरखा घालून बसला त्याच्या मागच्या बाजूला दाट झाडी होती. त्याच्या व झाडीच्या मध्ये स्थंडिल होते. त्याच्या मध्यभागी एक लोखंडी सळई उभी करून ठेवलेली होती. स्थंडिलावर फुलांच्या पाकळ्या विखुरलेल्या होत्या. स्थंडिलाच्या एका बाजूला लाल रंग लावलेली एक लहानशी कवची होती.

ज्योतिषी ध्यानमग्न दिसत होता. त्याच्या तिघां शिष्यांपैकी एक प्रश्न विचारायला येणाऱ्यांना थोड्या अंतरावर रांगेने उभा














करीत होता. दुपारच्या वेळी सुद्धा त्या झाडाखाली संध्याकाळच्या काळोखासारखी दाट सावली होती.

थोड्या वेळाने ज्योतिष्याने डोळे उघडून विचारले—"तुम्ही सर्व भविष्य विचारायला आलां आहां ना? मला ज्योतिष्य मुळीच माहीत नाही. ज्योतिष्य सांगते ती डोक्याची कवची. ही कवची मी या जगात आलो त्या पूर्वी मरण पावलेल्या इजिप्त देशातील एका मुलीची आहे. ही कवची सोन्याच्या पेटीत घालून भूमध्य सागरात बुडविली तरच त्या मुलीला स्वर्गप्राप्ती होईल. त्या साठी मी पैसे जमवीत आहे. म्हणून एका प्रश्नाचं उत्तर मिळवायला तुम्हांला अर्धा रुपया द्यावा लागत आहे, त्याचा रागलोभ मानू नका. एकेक जण पुढे या. असे सांगून ज्योतिष्याने आपल्या एका शिष्याला हाक मारली—"सत्यानंद ती कवची घेऊन ये."

सत्यानंदने ज्योतिष्याच्या हातात कवची आणून दिली. तिला खाली भोक होते. ते भोक सर्वांना दाखवून ज्योतिष्याने कवची पुन्हा सत्यानंदाच्या हातात दिली. सत्यानंदाने ती स्थंडिलामध्ये उभी करून ठेवलेल्या सळईत खाली उतरवून ठेवली. नंतर ज्योतिषी म्हणाला—"आता विचारा प्रश्न. कवची वर येऊन खाली पडली तर उत्तर 'होय' समजा व हलली नाही तर उत्तर 'नाही.' समजा."

सर्वात पुढल्या रांगेत उभा असलेल्या एका वयस्कर माणसाने ज्योतिष्यासमोरच्या थाळ्यात अर्धा रुपया टाकून विचारले—"मी आणखी किती दिवस जगणार?"

सर्वांनी चकित मुद्रेने कवची कडे पाहिले. कवची वर येऊन पुन्हा खाली झाली. त्याचा अर्थ प्रश्न करणारा काही दिवस जगणार. त्या माणसाने ज्योतिष्याला नमस्कार केला व तो बाजूला झाला. त्यानंतर एका आजारी माणसाने थाळ्यात अर्धा रुपया टाकून विचारले—"मला लौकर मरण येणार का?"

या खेपेस कवची जागची हललीच नाही.

[illegible] अनेक तऱ्हेचे प्रश्न विचारले. अर्जुन लक्षपूर्वक तो सर्व प्रयोग पहात होता. तो संध्याकाळी घरी परतला. रात्रभर तो विचार करीत होता व शेवटी काही तरी निश्चय त्याने केला. सकाळी तो ज्योतिष्याला जाऊन भेटला.

ज्योतिष्याने गोड शब्दात विचारले—"काय रे बुवा? तुला काय पाहिजे?"

"मी आपलं भविष्य विचारायला आलो आहे." अर्जुन म्हणाला.

"भविष्य विचारायची ही वेळ नाही. आतां कवची विश्रांती घेत आहे. तू सर्वांबरोबर तीन प्रहरी ये." ज्योतिषी म्हणाला.

अर्जुनने एकदा चौफेर नजर फिरवून पाहिली. त्याला स्थंडिलाशेजारी एक राहुटी दिसली. ज्योतिषी व त्याचे शिष्य त्याच राहुटीत रहात होते. त्या राहुटीची जागा बारकाईने पाहिल्यावर अर्जुनच्या मनातली शंका दुणावली.

अर्जुन घरी परतला आणि विचार करू लागला या ज्योतिष्याचे बिंग कसे बाहेर काढावयाचे? त्याचा मुलगा बाहेर अंगणात एक सायकलचे चाक काठीने ढकलीत चालवीत होता. ते पाहून त्याला एक युक्ती सुचली. त्याने आपल्या मुलाजवळून ते सायकलचे चाक मागून घेतले आणि दोन तीनदां चालवून पाहिले. नंतर त्याला



आपण आपल्या प्रयत्नात यशस्वी होणार, या गोष्टीची खात्री झाली.

त्या दिवशी तिसऱ्या प्रहरी अर्जुन आपल्या मुलाला बरोबर घेऊन त्या ज्योतिष्याकडे गेला. गावकरी जमले होते. प्रश्नोत्तरे सुरू झाली. त्याची पाळी आल्याबरोबर अर्जुन कागदावर लिहून ठेवलेले चार प्रश्न ज्योतिष्याला दाखवून व थाळ्यात दोन रुपये टाकून म्हणाला—"काय हो, माझ्या प्रश्नाची उत्तरे देण्यापूर्वी हे सायकलचे चाक पलीकडे मला ढकलू द्या." असे म्हणत त्याने ते जोराने राहुटी आणि स्थंडिलाच्या मधून झाडीच्या बाजूला ढकलले.







चाक राहुटी आणि स्थंडिल यांच्या मधून जात असता लोखंडी सळईतली कवची उडाली.

अर्जुनच्या तोंडावर स्मित झळकले. ज्योतिष्याचे तोंड पांढरे फट्ट पडले. त्याने अर्जुनकडे करड्या नजरेने पाहिले.

अर्जुनने हसत विचारले—"माझा पहिला प्रश्न आहे, सूर्य पूर्वेकडे उदय पावतो का? दुसरा प्रश्न आहे, लोखंडाहून कापूस हलका असतो का? तिसरा प्रश्न आहे, सोने पितळाहून जास्त किमतीचे असते का? आणि चवथा प्रश्न आहे, दंव हे विस्तवाहून थंड असते का? ज्योतिषी बुवा, मी थाळ्यात या चारही प्रश्नांची रक्कम टाकली आहे. तेव्हां माझ्या लहानशा सोप्या प्रश्नांची उत्तरे कवचीला विचारावी?"

परंतु कवची जागची हललीच नाही. ज्योतिषी व त्याचे शिष्य पळ काढण्याच्या विचारात होते. तेव्हा अर्जुनने आपल्या मित्रांना खुणावले. त्या सर्वांच्या चारी बाजूला वळे करून उभे राहिले.

नंतर [illegible] म्हणाला—"मित्र हो! आपल्या भोळेपणाच्या फायदा घेऊन हा ज्योतिषी लबाडी करीत होता. ही खरी कवची नाहीच. कागदाच्या लगद्याची बनवलेली आहे. एक काळा बळकट दोरा बांधून हा ती हलवीत होता. दोराचे एक टोक सळईच्या एका टोकाला बांधलेले आहे व दुसरे राहुटीत बसलेल्या एका माणसाच्या हातात आहे. लगद्याची ही कवची लोखंडाच्या सळईतून खाली उतरते तेव्हां तिला दोरा गुंडाळला जातो. राहुटीत बसलेला माणूस दोरा ओढतो तेव्हा कवचीवर येते व सैल सोडतो तेव्हा ती खाली जाते.

त्यानंतर स्थंडिल व राहुटी जाऊन पाहिल्यावर अर्जुन म्हणाला ते खरं असल्याची गोष्ट सिद्ध झाली. ज्योतिष्याने लबाडी करून जे पैसे मिळविले होते ते गावकऱ्यांना परत मिळाले आणि ज्योतिषी व त्याच्या साथीदारांना पोलीसांच्या हवाली करण्यात आले.





# महाबली हनुमान

अयोध्येला राम एके दिवशी आपल्या मंत्रिवर्गाशी व सामंतांशी राज्यकारभारासंबंध मंत्रणा करीत असता विश्वामित्र ऋषी रागारागाने पाय आपटीत तेथे आले व म्हणाले—"रामा, तुझा जय असो! काशीपुरीचा राजा ययाती याने गर्वांध होऊन माझा अपमान केला आहे. त्या अधम राजाचे तू ताबडतोब पारिपत्य कर. ही गुरूची आज्ञा आहे असे समज!" सांगून विश्वामित्र ऋषी जसे आले तसेच रागारागाने निघून गेले.

विश्वामित्र ऋषींची ती आज्ञा ऐकून राम धर्मसंकटात पडला. कारण ययाती राजा हा रामाचा एक सामंत राजा होता. काशी राज्याची व्यवस्था सुद्धा तो न्याय व नीतीनेच पहात असे. पूर्वी, विश्वामित्र ऋषींनी रामलक्ष्मणांना धनुर्विद्या शिकवून त्यात निष्णात केले होते. म्हणून रामलक्ष्मण त्यांना गुरु मानीत. तरी एका प्रजावत्सल, व नीतिधर्मपरायण राजाचा वध कसा काय करावयाचा आणि विश्वामित्रांच्या आज्ञेचा भंग तरी कसा करावयाचा, असा अवघड प्रश्न रामासमोर होता.

रामाने दरबार बरखास्त केला आणि एकांतात सुमंताला बोलावून घेऊन म्हणाला—"सुमंता! हा माझा व्यक्तिगत प्रश्न आहे. माझ्या हातून ययातीचा वध टळणे आता शक्य नाही. आम्ही दोघे द्वंद्वयुद्धच करणार त्यामुळे प्रजेची तशी जास्त हानी होणार नाही. राम तुझा वध करायला येत आहे.



अगदी असा निरोप ययातीकडे पाठव." रामाने स्थिरचित्ताने ही गोष्ट सुमंताला सांगितली.

घडलेली गोष्ट अशी होती : काशी राज्यातील प्रजेने राजाकडे आपले गाऱ्हाणे नेलं होतं की, जंगली हत्ती व इतर रानटी श्वापदे सरहद्दीवरच्या गावात शिरून प्रजेला फार त्रास देत आहेत. म्हणून त्या श्वापदांना ठार करण्यासाठी ययाती शिकारीला निघाला. त्याच वेळी विश्वामित्र ऋषी त्याच बाजूला येत होते. शिकार करायला निघालेल्या राजाचा रथ वेगाने जात होता. म्हणून विश्वामित्र ऋषी समोरून येत असलेले राजाच्या लक्षात आले नाही व तो रथातून उतरून विश्वामित्रांना नमस्कार वगैरे करू शकला नव्हता आणि शिकारीच्या नादात पुढे निघून गेला.

तो आपला फार मोठा अपमान आहे, असे विश्वामित्र मुनींना वाटले. "रथातून उतरून मला नमस्कार न करता तो गेला. आपला त्याने जाणून बुजून अपमान केला. तेव्हां या ययातीला त्याबद्दल चांगली शिक्षा देवविली नाही तर मी नावाचा विश्वामित्र नाही." अशी स्वतःशीच प्रतिज्ञा करून मुनी सरळ रामाकडे गेले.

हेरांकरवी ही बातमी ययातीला कळली केवढी मोठी चूक झाली, या बद्दल ययाती दुःखी मनाने पश्चात्ताप करू लागला. ययातीच्या बायकोचे नाव यशोधरा होते. त्या दंपतीला चंद्रांगद नावाचा एक मुलगा आणि चंद्रमुखी नावाची एक मुलगी होती. त्या कुटुंबाची रामावर फार भक्ती होती. नकळत घडलेल्या त्या चुकीबद्दल दुःख करीत सर्व बसले होते.

काही वेळाने ययाती एकदम उठून उभा राहिला व म्हणाला—"मी रामाच्या पायावर स्वतः जाऊन लोटांगण घालतो आणि निरपराध असल्याचे सांगून त्याच्याजवळ विनंती करतो की दयेची भीक घाल."

ययाती राजा सकुटुंब सपरिवार अयोध्येला निघण्याच्या तयारीत असतां नारद [illegible] उभा राहिला हसू लागला. म्हणाला—"भोळ्या राजा! एकाएकी कोसळलेल्या संकटामुळे तुझा विवेक नष्ट झाल्यासारखा दिसतो आहे. एकवचनी एकबाण असा राम आज तुझा वध करणार हे निश्चित समज! विचार करायला तुझ्याजवळ वेळच कोठे आहे? तू लगेच नीघ आणि अंजनादेवीच्या आश्रमात जाऊन तिच्याजवळ अभयदान माग. हनुमान तिचा मुलगा आहे, तो तेथेच आहे."

ययातीला नारदाने दिलेला सल्ला पटला. तो अंजनादेवीच्या आश्रमाकडे धावला. अंजनादेवी नुकतीच ध्यानावस्थेतून उठली होती. तिच्या कानावर आर्तनाद पडला—"अंजनीमाते! मी तुझ्या पायाजवळ शरण मागायला आलो आहे. माझं रक्षण कर. मला अभयदान दे!" आणि त्या पाठोपाठ समोर ययाती राजा दिसला. त्याचे सर्व अंग भीतीने थरथर कापत होते.

"बाबा रे! भीती कसली? मी तुला अभयदान देते. माझा मुलगा हनुमान आहे ना, त्याची शपथ घेऊन सांगते, तुझ्यावर कोणतेही संकट येणार नाही." या शब्दात अंजनेने ययातीला अभयदान दिले.

त्याच वेळी हनुमान गंधमादन पर्वतावरून परतला. ययातीने मायलेकांना साष्टांग नमस्कार केला आणि म्हणाला—



"माझं नाव ययाती, मी काशीराजा. रामावर माझी भक्ती आहे. माझं रक्षण तुमच्या शिवाय कोणी करू शकणार नाही." त्याने कापऱ्या आवाजात निवेदन केले.

हनुमानाने ययातीला दोन्ही हात धरून उभे केले व म्हणाला—"राजा! आतांच नाही का माझ्या आईने तुला अभयदान दिले! मग भ्यायचे कारणच काय? आईने दिलेल्या वचनाप्रमाणे मी देखील तुला वांचविण्याची प्रतिज्ञा करतो."

तेव्हा ययाती म्हणाला—"अरे हनुमंता! आतां मी काय सांगू? राम निष्कारण माझा वध करायला निघाला आहे रे!" असे सांगून ययातीने घडलेले वृत्त सांगितले.



हनुमंताने सर्व शांतपणे ऐकून घेतले. अंजनीमाता म्हणाली–"केवढी मोठी चूक झाली? मी माहीत नव्हते म्हणून अभय-दान दिले." ती विचारात पडली.

तेव्हा हनुमान मातेला म्हणाला–"आई! काळजीत पडण्यासारखे काहीच घडले नाही! आर्त लोकांना मदत करण्यापेक्षा श्रेष्ठ धर्म कोणताही नाही. या ययातीला मी जिवंत असेपर्यंत कोणत्याही प्रकारचा त्रास होणार नाही!" ययातीला हनुमंताने स्वमुखाने दिलेल्या वचनाची गोष्ट सर्वांस कळली. अयोध्येलासुद्धा ती बातमी पोचली. रामाने सुद्धा ती गोष्ट ऐकली. सीतेच्या काना-पर्यंतही ती बातमी पोचली.

अंत:पुरात बसून सीतेने यशोधरेला दोघां मुलांना घेऊन येताना पाहिले. यशोधरा केविलवाण्या स्वरात ओरडली–"माते जानकी! भिक्षा मागते आहे! पतीची भिक्षा घाल मला!"

"बाई! तुझा पती हनुमंताच्या आश्र-याला गेला आहे, व सर्व प्रकारे निर्भय स्थितीत खुशाल असल्याचे ऐकते. आतां त्याला कसलेही भय नाही, तू निश्चित रहा. तू मुलांना घेऊन येथेच माझ्याकडे रहा." असे सांगून सीतेने त्यांना अंत:पुरात आदरपूर्वक बोलावून त्यांच्या राहण्याची उत्तम सोय करून दिली. दोघां मुलां-बरोबर सीता गप्पागोष्टीत रंगून गेली. आपल्याला तशी गोड मुलं असली तर किती बरं होईल असं सीतेला वाटलं. त्या मुलांना पाहून अपत्य असावं असे सीतेला वाटलं.

राम धनुष्यबाण घेऊन ययातीचा वध करण्यासाठी पायीच निघाला. त्याच्या पाठोपाठ त्याचे तिघे भाऊ, मंत्री व इतर लोक निघाले. रामाच्या शिवाय आणखी कोणाच्याही हातात शस्त्र नव्हते.

रामाला येत असलेला पाहून त्याच्या स्वागतार्थ जे काही कर्तव्य होते ते सर्व हनुमानाने केले. त्याच्या वाटेवर फुले अंथरली.

[illegible] टेकून उभा राहिला व म्हणाला–"प्रभो! ययातीवर आपला अनुग्रह असू द्यावा! तो निरपराधी आहे. निर्बलाला शिक्षा करणे आपल्याला आवडत नाही. मी त्याच्या वतीने विनवणी करीत आहे. मला क्षमा करा!"

रामाला राग आला. म्हणाला–"मला उपदेश करण्यालायक तू शाहणा झालास नाही का?" असे म्हणत रामाने त्याला लाथ मारली. ती लाथ लागताच हनुमान आनंदित होऊन म्हणाला–"जे चरण लागल्यावर दगडातून शापमुक्त होऊन अहिल्या एक पतिव्रता स्त्री म्हणून प्रसिद्ध झाली, त्या पादस्पर्शाने माझा देह सर्वदा धन्य झाला. आतां माझ्या शरिरात अपूर्व शक्तीचा संचार झाला आहे."

आता मात्र राम फारच संतापला. म्हणाला–"कायरे माकडा! माझ्या खुशा-मदीच्या या सर्व गोष्टी सोड आणि ययातीला माझ्या समोर उभा कर. गुरूच्या आज्ञेचे मी पालन केले पाहिजे. मी त्यासाठी इकडे आलो आहे!"

"रामा! तुझ्या गुरूची आज्ञा किती अन्यायपूर्ण आहे, हे समजून घेण्यापूर्वीच तू एका भोळ्याभाबड्या भक्ताचा वध करायला आला आहेस. आईने दिलेल्या वचनाचे पालन व्हावे म्हणून मी ययातीच्या



रक्षणासाठी उभा आहे. तेव्हा प्रथम तू माझा वध कर आणि नंतर ययातीच्या समाचाराला जा." असे गंभीरपणे बोलून हनुमान उभा राहिला. त्या पाठोपाठ हनुमंताचा देह वाढू लागला आणि त्याच्या देहातून प्रकाशाची किरणे चारी दिशांना पसरू लागली.

ते पाहून राम म्हणाला–"तू इतका मोठा झाला आहेस का? तू काय एक वानरच तर आहेस असे मला वाटले होते. परंतु माझ्या समोर युद्धाला उभा राहण्या इतका शूर पराक्रमीसुद्धा तू असशील याची कल्पना मी केली नव्हती." राम हे शब्द हनुमानाची हेळना करीतच म्हणाला होता.



“रामा! तो सर्व तुझ्या चरणांचाच प्रताप आहे, असे मी आतांच नव्हते का म्हटले?” हनुमान म्हणाला.

रामाने धनुष्य धारण केले त्याच्यावर बाण चढविला. हनुमानाने आपली शेपटी लांब केली आणि ती आपल्या देहाच्या चारी बाजूला गरगर फिरवू लागला. रामाने सोडलेली सर्व अस्त्रे हनुमानाच्या शेपटीत अडकून दूर पडू लागली. त्या वेळी विश्वामित्र मुनी सुद्धा त्या जागी येऊन पोचले.

रामाच्या प्रत्येक अस्त्राबरोबर हनुमान आपला देह वाढवीत होता आणि त्याचा देह कल्पनातीत वाढतच गेला. रामाला









वर आ[illegible] हनुमानावर बाण सोडावा लागू लागला. तेव्हा हनुमान वीरासन घालून बसला व म्हणाला–“रामा! आता तुला बाण सोडणे थोडे फार सोपे जाईलसे वाटते!”

राम ते ऐकून अकस्मात् उग्र रूप धारण करून म्हणाला–“आतां हा मी शेवटचा बाण तुझ्या हृदयाचा नेम धरून सोडीत आहे. त्याबरोबर तुझे काम संपेल व माझे ही संपेल.” असे म्हणत रामाने एक अर्धचंद्राकृती बाण काढला.

तेव्हा विश्वामित्र धावत समोर येऊन रामाला म्हणाले–“रामा! आता तू युद्ध बंद कर आणि प्रसन्न चित्ताने तू हनुमानाला आशीर्वाद द्यावा अशी माझी इच्छा आहे. हे सर्व पाहिल्यावर माझा होता नव्हता तो सर्व अहंकार नष्ट झाला. शिवाय ययातीचा काही दोष नव्हता.”

राम मान खाली वांकवून म्हणाला–“नाही गुरुवर्य! अजून माझे अस्त्र उरलेलेच आहे. आपल्या आज्ञेचे पालन करतो. मला थांबवू नका!”

रामाने ते अस्त्र धनुष्यावर ठेवले आणि हनुमानाचा नेम धरून म्हणाला–“हनुमंता! या माझ्या रामबाणाचा नेम तुझ्या हृदयावर लावला आहे. अजूनही तू आपला अहंकार सोडून ययातीला

       

माझ्या समोर उभा कर आणि रामाचा दास म्हणवून घे!"

हनुमान म्हणाला–"मी तेव्हा होतो, एव्हा आहे आणि सर्वदाच रामाचा स्वामि-भक्त दास राहिलो आहे! एकाला शरण देऊन नंतर तुला सोडून दिल्याने क्षुद्र झालेला मी तुझा दास होण्यालायक राहिलो नाही. तुझाच थोरपणा कमी होत आहे. तू लवकर आपला रामबाण सोड, मी तुझ्या बाणाचे हृदयपूर्वक स्वागत करतो." असे म्हणत हनुमानाने दोन्ही हातांनी आपली छाती फाडून अस्त्र धरले.

रामाने बाण सोडला. तो बाण हनुमंताच्या हृदयाला लागला खरा परंतु त्यात अदृश्य झाला. तेव्हा हनुमंताची छाती दैदीप्यमान दिसू लागली व तिच्यात रामाचे रूप दर्शन झाले. सर्व ते दृश्य निश्चेष्टपणे पहात उभे राहिले.

रामाने धनुष्य खाली ठेवले व म्हणाला–"हनुमंता! तू अजेय आहेस! मीच हारलो!"

तेव्हा [illegible] छातीवर ठेवलेले हात काढून घेतले. त्या पाठोपाठ छाती पूर्वी होती तशी बंद झाली. हनुमान म्हणाला–"रामा! यात जय कोणाचा व पराभव कोणाचा? तुझे अस्त्र माझ्या हृदयात सर्वदा वास करणाऱ्या तुलाच मिळाले. तूच ग्रहण केलेस. ते तुझ्यातच लीन झाले. त्यात माझा असा काहीच पराक्रम किंवा प्रताप नव्हता." असे म्हणत हनुमानाने लवून नमस्कार केला.

विश्वामित्र मुनी पुढे आले व हनुमानाला जवळ ओढून त्याच्या पाठीवर शाबासकी देत म्हणाले–"हनुमंता? तू शरणागताचे रक्षण करण्यामध्ये रामासारखाच आहेस. त्याच बरोबर तू प्रतिज्ञेचे पालन करण्यात ही रामासारखाच आहेस. म्हणून तू वीर म्हणून सर्वदा ओळखला जाशील. महाबली हनुमान हे नाव सार्थक झाले."

नंतर रामाला, सीतेला वंदन करून व त्यांचा निरोप घेऊन हनुमान गंधमादन पर्वतावर गेला व तेथे तपश्चर्या करू लागला.





# उपकाराची फेड

मणूरचा युवराज यशोधर्म हा आपल्या मित्रमंडळीबरोबर एकदा शिकारीला जंगलात गेला.

युवराजाला एक सुंदर हरण दिसले. तो घोड्यावरून खाली उतरला आणि हरणाला मारायला त्याने धनुष्यावर बाण ठेवून नेम धरला. हरण विद्युत्-वेगाने धावले व निसटले. युवराज त्या हरणाचा पाठलाग करीत दूर गेला व आपल्या मित्रमंडळींच्या दृष्टीआड झाला.





तो दमला होता व त्याला तहान लागली होती. त्याला एक स्वच्छ ओढा वहात असलेला दिसला.



पोहायला म्हणून त्याने पाण्यात उडी टाकली. पण पाण्याची ओढ इतकी होती की तो स्वतःला सावरू शकला नाही. तो धबधब्यातून खाली खडका-वर कोसळणार इतक्यात एका तरुण मुलीने एक वेल टाकून त्याला वाचविले.



ती एका ब्राह्मणाची मुलगी होती. उपकाराची फेड म्हणून तो तिला अनेक वस्तू भेट म्हणून देऊ लागला. तिने त्या सर्व भेटींची गरज नसल्याचे सांगून तिला भेटीची गरज असेल तेव्हा कळवीन असे सांगितले.





कित्येक वर्षे लोटली. त्या ब्राह्मणाच्या मुलीचे मथुरेच्या एका पुजाऱ्याशी लग्न झाले.
यशोधर्म राजा झाला.



हूणांनी माळवा प्रदेश जिंकून तेथे ते ठाण मांडून बसले. त्यांचा सेनापती मिहिरगुल मधून मधून हल्ले करी व गावांना व नगरांना आगी लावी आणि प्रजेची कत्तल करी.



हूणांनी मथुरेतील एका देवालयाचा ध्वंस केला. त्या देवळाच्या पुजाऱ्याशी त्या ब्राह्मण कन्येचा विवाह झाला होता. पुजाऱ्याबरोबर त्याच्या बाय-कोला व मुलीला सुद्धा हूणांनी अटक केली.

पुजाऱ्याची मुलगी फार सुंदर होती. तिच्याशी लग्न करून दिल्यास तिच्या आईवडिलांना सुटका मिळेल असे हूणांचा सेनापती म्हणाला.













त्या गोष्टीस पुजाऱ्याने, त्याच्या बायकोने आणि त्यांच्या मुलीने नकार दिला. पुजाऱ्याच्या बायकोने एका माणसाकरवी यशोधर्माकडे निरोप पाठविला की वचन दिलेली भेट म्हणून हूणांशी युद्ध कर.



यशोधर्म लगेच ससैन्य आपल्या काही मित्रांसह हूणांचं पारिपत्य करण्यासाठी चालून आला. त्याने हूणांचा पूर्ण पराभव केला आणि अपूर्व विजय मिळविला.



आपला प्राण एकदा ज्या स्त्रीने वांचविला होता तिला अटकेतून सोडविण्यासाठी तो गेला असता ती मृतावस्थेत पडलेली होती. राजाला त्याचे फार दुःख झाले, परंतु तिच्या मृत्युसमयी का होईना, तिच्या ऋणाची फेड करू शकल्याबद्दल त्याच्या मनाचे समाधान झाले.

# गोष्ट मथळा चढाओढ

## या गोष्टीला सुंदर मथळा सुचवून रु. २५ मिळवा!

?

एक माणूस शर्ट शिवविण्याच्या विचाराने कापड विकत घेऊन शिप्याकडे गेला आणि शर्ट शिवून द्यायला सांगितले. शिप्याने कापड माप घेऊन पाहिले व म्हणाला–"साहेब, शर्टाला हे कापड नाही पुरणार."

तो माणूस दुसऱ्या शिप्याकडे गेला. तो शिंपी म्हणाला–"हे शर्टाला पुरेल, दोन दिवसांनी येऊन घेऊन जा.

दोन दिवसांनी तो माणूस शिप्याकडे शर्ट आणायला गेला. शिप्याचा मुलगा त्याच्यात कापडामागल्या कापडाचा शर्ट घालून खेळत होता. शिप्याकडून शर्ट घेऊन त्या माणसाने अंगात घालून पाहिला. शर्ट बरोबर होता.

त्यानंतर थोड्या दिवसांनी पहिला शिंपी त्याला दिसला तेव्हां त्या माणसाने त्या शिप्याला विचारले–"काय रे, तू तर कापड पुरणार नाही म्हणाला होतास? परंतु दुसऱ्या शिप्याला मी तेच कापड दिले आणि त्याने त्या कापडात माझा शर्ट शिवलाच आणि उरलेल्या कापडात आपल्या मुलाला सुद्धा एक शर्ट शिवून घेतला. तुला याविषयी काही म्हणावयाचे आहे का?"

"त्या मुलाचे वय काय होते?" पहिल्या शिप्याने विचारले.

"सहा वर्षे!" तो माणूस म्हणाला.

"मग बरोबर! माझ्या मुलाला बारावं वर्ष चालू आहे!" पहिला शिंपी उत्तर देऊन मोकळा झाला.

★ ★ ★

वरील गोष्टीला उपयुक्त होईल असा एक सुंदर मथळा विचार करून एका कार्डावर स्वतःच्या पत्त्यासह लिहून "गोष्ट मथळा चढाओढ", 'चांदोबा', चंदामामा प्रकाशन, २ व ३ अर्काट रोड, वडपळणी मद्रास ६०००२६ या पत्त्यावर पाठवा.

१० एप्रिल १९७८ च्या आत पोस्टकार्ड पोंचले पाहिजे. त्या कार्डावर 'फोटो चढाओढ परिचय' देता कामा नये.

चढाओढीचा निकाल मे १९७८ च्या चांदोबात जाहीर करण्यात येईल.

---

फेब्रुवारी महिन्यातल्या चढाओढीचा निकाल (मथळा) "खुळी भावना"

नांव: विजय रामदास घामणे, घ. न. ५२६, माळीगल्ली शिंदेवाडा, पिंपळगाव, नासीक



# अमरवाणी

संश्रुत्य च पितु र्वाक्यम्,
मातु र्वा, ब्राह्मणस्य वा
न कर्तव्यं वृथा (वीर),
धर्मं, माश्रित्य तिष्ठता ॥ १ ॥

[वडील, आई किंवा ब्राह्मण यांपैकी कोणाच्या ही आज्ञेचे पालन करण्याचा नियम पाळणाऱ्याने तो धर्म मोडू नये.]

गुरुश्च, राजा च, पिता च, वृद्धः
क्रोधा त्प्रहर्षा द्यदि वापि कामात्,
यद्व्यादिशेत्कार्य मपेक्ष्य धर्मम्
कस्तन्न कुर्या दनृशंस वृत्तिः ॥ २ ॥

[गुरु, राजा, पिता किंवा कोणी वृद्ध या पैकी कोणीही रागाच्या भरात, आनंदात किंवा कामासक्त होऊन केलेल्या आज्ञेचे पालन न करणारा कोण सज्जन असेल? ]

न सत्यं दानमाने वा,
न यज्ञा स्वाप्त दक्षिणाः,
तथा बलकरा (सीते)
यथा सेवा पितुर्हिता ॥ ३ ॥

[पित्याला इष्ट असलेली सेवा ही इतकी मोठी आहे की तिची बरोबरी दान, मान किंवा यज्ञात दिलेल्या दक्षिणेने होणार नाही. ]





# कावळा आणि घुबड

[ ५७ ]

रक्ताक्षी सुताराची गोष्ट सांगून म्हणाला–
"मित्र हो! या कावळ्याच्या म्हणण्यावर विश्वास करून फसू नका. हा कावळा आपला हाडवैरीच आहे, हे तुमच्यासारख्या बुद्धिमंतांना सहजी कळण्यासारखे आहे!"

परंतु त्याचा सल्ला कोणीही मानला नाही आणि स्थिरजीवीला एका डोलीत डोंगरी किल्ल्यात उचलून घेऊन गेली.

स्थिरजीवी राजाला म्हणाला–"हे राजा! आपण माझ्यावर इतकी दया कशासाठी दाखविलीत? मी आपला आजवर शत्रू म्हणून वागलो त्याबद्दल शरमेने माझी मान खाली होते आहे. तुम्ही माझ्यावर कृपा करून थोडा विस्तव आणविलात तर मी पापाचे प्राय:श्चित्त म्हणून त्यात प्रवेश करून पापमुक्त व्हावे म्हणतो!"

राजाला व त्याच्या चौघा मंत्र्यांना त्याचे कपटीपणाचे बोलणे ऐकून आनंद झाला. त्यांनी भोळेपणाने विचारले–"काय हो, आपण अग्नीत स्वत:ची आहुती देण्याचे कारण काय?"

"हे प्राय:श्चित्त केले तर मी घुबडाच्या कुळात जन्म घेऊन या जगात परतेन." स्थिरजीवी म्हणाला.

परंतु कावळा म्हणाला ते रक्ताक्षीला आवडले नाही. तो म्हणाला–"तू घुबड म्हणून जन्मलास तरी कावळ्यांच्या बाजूलाच राहशील, मागे उंदराची मुलगी जशी शेवटी उंदीरच झाली तसा!"

"ती कोणती गोष्ट?" असे स्थिरजीवीने विचारता रक्ताक्षी गोष्ट सांगू लागला:

हिमालय पर्वतातून निघून उड्या मारीत फेस काढीत गंगानदी जेथे वाहू लागते त्या



जागी एका आश्रमात अनेक ऋषी व मुनी तपश्चर्या करीत असत. याज्ञवल्क्य मुनी हे त्या आश्रमाचे प्रमुख होते. एके दिवशी ते नदीवर स्नान करून परत येत असता एका घारीने उंदराच्या मुलीला त्यांच्या अंगावर टाकले. दयाळू मुनिवर्यांना त्या तिची कीव आली. त्यांनी आपल्या तपोबलाने तिला माणसाच्या मुलीचे रूप दिले आणि तिला आश्रमात नेऊन बायकोला म्हणाले–"या मुलीला तू पोटच्या मुलीसारखेच वाढव."

तिने पतीच्या इच्छेप्रमाणे त्या मुलीला अत्यंत प्रेमाने व वात्सल्याने वाढविले.

त्या मुलीला बारावे वर्ष लागले. मुनि-पत्नी याज्ञवल्क्य ऋषींना म्हणाली–"मुलगी मोठी झाली आहे; योग्य वर पाहून तिचे लग्न करून द्यावे. त्यातच तिचे व सर्वांचे हित आहे. उशीर करू नये."

"होय, तू म्हणतेस ते खरे आहे! शास्त्रा-प्रमाणे तिचे वय लग्नाचे झाले आहे, खरे! तिने सर्व विद्या शिकून घेतल्या आहेत. उत्तम गाणे म्हणते, चांगला सैंपाक करते, तिच्यासाठी योग्य वर पाहिला पाहिजे. तू व तिने होकार दिला तर सूर्याचे आवाहन करून त्यालाच कन्यादान करतो."

"त्यात काय बिघडलं? तर तसंच करा." बायको म्हणाली.

मुनिवर्यांनी सूर्याकडे निरोप पाठविला. सूर्य येऊन म्हणाला–"महात्मन्! आपण कशासाठी बोलविलेत?"

मुनिवर्य सूर्याला म्हणाले–"ही माझी कन्या! तू तिच्याशी लग्न कर." असे म्हणत मुलीकडे वळून याज्ञवल्क्य म्हणाले–"मुली! त्रिलोकाला प्रकाश देणारा हा देवा तुला पसंत आहे का?"

"हा तर फार गरम दिसतो आहे. याहून मोठं स्थळ मिळालं तर पहा." मुलगी म्हणाली.

मुनिवर्यांनी सूर्याला विचारले–"तुझ्याहून मोठा कोण आहे रे बुवा?"

सूर्य म्हणाला–"माझ्याहून मोठं धुकं आहे. ते मला पूर्णपणे झांकून टाकते व मी आहे हे कळू न देण्या इतके बलिष्ठ आहे."

मुनीने धुक्याचे आवाहन केले व मुलीला विचारले–"मुली! या बलवानाशी तुझं लग्न करून द्यायचं का?"

"हा तर काळा आणि ओलसर दिसतो आहे. याच्याहून मोठा कोण हे यालाच विचारून त्याच्याशी माझे लग्न लावून द्या." मुलगी म्हणाली.

"तुझ्याहून कोणी मोठा आहे का?" मुनीने धुक्याला विचारले.

"वारा माझ्याहून मोठा आहे. मला हलवून दूर ढकलू शकतो." धुके म्हणाले.

नंतर मुनीने वाऱ्याला बोलावून घेऊन मुलीला विचारले–"मुली! तुझे याच्याशी लग्न लावून देऊ का?"

"बाबा! हा तर फार चंचल आहे, याच्यावर विसंबून राहता येणार नाही. याच्याहून शक्तिशाली कोणी असेल तर पहा." मुलगी म्हणाली.

"तुझ्याहून मोठा कोण आहे बुवा?" मुनीने वाऱ्याला विचारले.

"माझ्याहून मोठा पर्वत आहे. त्याला जागचे हलविणे मला शक्य नाही." वारा म्हणाला.

तेव्हा मुनीने पर्वताचे पाचारण केले आणि मुलीला विचारले–"मुली! याच्याशी तुझं लग्न लावून देऊ का?"

मुलगी म्हणाली–"बाबा! याचं काळीज दगडाचं आहे. माझं सौंदर्य पाहूनही हा माझ्यावर भाळणार नाही."

"तुझ्याहून मोठा कोण रे बाबा!" मुनीने पर्वताला विचारले.

"मला पोखरून काढणारा उंदीर माझ्या-हून मोठा आहे." पर्वत म्हणाला.

मुनीने उंदराला बोलावून मुलीला विचारले–"मुली! याच्याशी लग्न करणार का?"

तिच्या चेहऱ्यावर सजातीचा अभिमान झळकला. ती लाजत म्हणाली–"बाबा! मला उंदीर करून याच्याशी माझं लग्न लावून द्या!"

मुनीने तेच केले.



## १९५. पेठेच्या मध्यभागी 'लिफ्ट'!

या चित्रात मधोमध दिसत असलेले 'लिफ्ट' चढून जाणारे कोठे जातात? लिस्बन (पोर्तुगाल) येथील दुसऱ्या पेठेत जातात. लिस्बन नगरातले निरनिराळे भाग काही मजल्यांसारखे अंतर असलेले आहेत. पॅरीसच्या 'ऐफेल टावर' बांधणाऱ्यानेच हे 'लिफ्ट' बांधले.





# माया सरोवर

[ २७ ]

[ बिबळ्याला आणि मांत्रिकाला बंदी करून सिद्धसाधक कनकाक्ष महाराजांच्या दर्शनाला गेला. हंसरथातून जयशीलला, वाघ पाठीस लागलेल्या स्थितीत कांचनमाला दिसली त्याने तिचे रक्षण केले. त्याच वेळी झाडीच्या आडून मायासरोवरेश्वराने त्याच्या गळ्यात फास टाकला. पुढे– ]

जयशीलने त्याच्या गळ्यात फास पडताच लगेच चकित होऊन मागे वळून पाहिले. त्याला जलग्रहावर मायासरोवरेश्वर व त्याच्या बाजूला घोड्यावर मकरकेतू दिसले. त्याने चटदिशी तलवार उपसली व कमळनाळांचा दोर कापायला तयार दिसला. तरी थोडा वेळ थांबून त्याने सरोवरेश्वराकडे वळून एकदा पाहिले.

मायासरोवरेश्वर आपल्या हातातला फासाचा दोर थोडा ओढल्यासारखा करीत जयशीलला म्हणाला–"तूच ना तो महा पराक्रमी जयशील? काय रे! तू दोर तोडायला निघाला होतास, मग मध्येच कसा काय थांबलास?"

"ओ हो! आता लक्षात आले, तूच तर तो मायासरोवरेश्वर, नाही का? तू माझ्या गळ्यात दोराचा फास टाकलास





तो न आवळता, मला ठार करायचे सोडून असा थांबलास कां ते आधी सांग!" जयशील त्याला म्हणाला.

"हं! मी एका सरोवराचा राजा आहे. तू, किती मोठा पराक्रमी वीर असलास तरी एक सामान्य मानव आहेस! तुझ्या प्रश्नाचं उत्तर द्यायची मला गरज नाही." सरोवरेश्वराने थोडेसे तोऱ्यातच उत्तर दिले.

जयशील रागाने त्याचे काही उत्तर देत असल्यासारखा वाटला. परंतु इतका वेळ दोघांचं संभाषण ऐकत गप्प उभी असलेली कांचनमाला मायासरोवरेश्वराकडे वळून म्हणाली—"अरे मामा, तू हंसरथातून खाली पडलास व तुला काही लागलं बिगलं नाही आणि जिवंत आहेस, हे पाहून मला किती बरं वाटलं! परंतु तू या जयशील नावाच्या मानवाच्या जिवावर काही बेतेल असे करू नकोस. यानेच मला वाघाच्या जबड्यातून वाचविले."

"अग मुली! ते सर्व मी स्वतःच्या डोळ्यांनी पाहिलं ग! ह्याला ठार करण्याचा विचार माझ्या मनात नाही, याला जिवंतच मायासरोवराकडे नेण्याचा विचार आहे." मायासरोवरेश्वर म्हणाला.

कांचनमाला जयशीलकडे वळून त्याला म्हणाली—"माझा मामा तुझ्या जिवाला कोणत्याही प्रकारे धोका होईल असे करणार नाही, तू स्वतः होऊन स्वेच्छेने माया-सरोवराकडे यायला हरकत काय?"

"अग कांचना! यात माझ्या इच्छे अनिच्छेचा प्रश्नच कोठे आहे? हा सरो-वरेश्वर मला बंदी करून घेऊन जाण्याच्या विचारात आहे. मला वाटलं तर मी एका क्षणात माझ्या गळ्यात पडलेल्या फासाचा दोर तोडून मोकळा होईन." जयशील म्हणाला.

जयशील म्हणाला ते ऐकून माया-सरोवरेश्वर त्याच्या शेजारी असलेल्या मकरकेतूला म्हणाला—"केतु! हा जयशील कोठे पळून जाऊ नये यासाठी याची वाट अडवून उभा रहा. मी फास थोडा आवळून त्याला पळून जाण्याचा प्रयत्न केल्यास त्याचा परिणाम कसा होऊ शकतो याची जरा चुणूक दाखवितो."

मकरकेतूने त्याला ते न आवडल्यासारखे तोंड करून, राजाज्ञेचे पालन करणे आवश्यक होते या साठी, घोड्याला जयशील होता त्या बाजूला चलायला वळविले. इतक्यात कांचनमालेने भयकंपित झाल्यासारख्या स्वरात ओरडून जयशीलच्या गळ्यात पडलेल्या फासाचा दोर दोन्ही हातांनी घट्ट धरला व म्हणाली—"मामा! तू हा दोर थोडा जरी ओढलास तर ते मला मुळीच खपणार नाही. मी याच्या बरोबर याच दोराचा फास गळ्याला लावून घेईन."

"आश्चर्यच आहे, इतक्या थोड्यावेळात येथवर मजल येऊन ठेपली आहे तर!" असे म्हणत सरोवरेश्वर चकित झाल्या-सारखा मान खाली वाकवून थोडा विचार करीत, आणि प्रयत्न करून पाहण्यात हरकत काय असे ठरविल्यासारखा म्हणाला—"जयशीला! तू म्हणालास तसा तुझ्या गळ्याला पडलेला फास कापून टाकशील की नाही, कोणाला ठाऊक, पण या जल-ग्रहाच्या हातातून निसटून जाणे तुला शक्य नाही. तो तुला पायाखाली तुडवून दात भोसकून यमलोकी पाठवील."



"तुला काय वाटेल तो प्रयत्न करून पहा!" असे म्हणत जयशील तलवारीने दोर कापायला निघाला. परंतु तेव-ढ्यात मकरकेतू हळूच त्याला म्हणाला—"जयशीला! अशी घाई करू नकोस! सरोवरेश्वर तुला मायासरोवराकडे घेऊन जात आहे त्यामुळे तुला हवं आहे तेच होत आहे. त्या सरोवरापर्यंत जाण्याची इच्छा तुझ्याही मनात आहेच, नाही का?"

मकरकेतू म्हणाला ते आपल्या भल्या-साठीच म्हणाला असे जयशीलला वाटले. कनकाक्ष महाराजांच्या दोघां मुलांपैकी एकटी कांचनमालाच आतापर्यंत भेटली, परंतु कांचनवर्मा अजून त्या सरोवरात एक



बंदी म्हणूनच राहतो आहे. परंतु एका गोष्टीचे मात्र त्याला आश्चर्य वाटले. ती गोष्ट म्हणजे तिला व तिच्या भावाला अपहरण करून घेऊन जाणाऱ्या सरोवरेश्वराला कांचनमाला "मामा" म्हणून हाक मारते आहे, हे कसे काय? त्याच्या मनात ती शंकासुद्धा डोकावू लागली...

"बरं तर मायासरोवरेश्वरा! तू माझ्याहून जास्त हुशार व बलवान आहेस, हे मान्य! आतां तू माझ्या बाबतीत काय करण्याच्या विचारात आहेस?" जयशीलने विचारले.

"तू मला शरण आल्यासारखा बोलतो आहेस, त्यात लबाडी तर नाही ना?" म्हणत मायासरोवरेश्वराने जयशीलकडे खोल दृष्टीने एकदा पाहिले.

"स्वतःचा पराक्रम काही नसेल तर लबाडी करून किती काळ जमेल? मी कसा आहे, या मकरकेतूला थोडे का होईना, माहीत झालं असलं पाहिजे. काय मकरकेतू, मी म्हणतो ते खरं आहेना?" जयशील म्हणाला.

"तुझे शौर्य व पराक्रम काय ते माया-सरोवरात पोचल्यावर कळेलच." असे जयशीलला म्हणून मायासरोवरेश्वर केतूला म्हणाला–"आपण या पूर्वी एका जलवृकाला पाहिलेच आहे, काय केतू? इतर बदमाश तेथे काय काय कृत्ये करीत आहेत न कळे!" असे म्हणत मायासरोवरेश्वराने काळजी वाटत असल्यासारखा दीर्घश्वास सोडला.

"तरमग माझ्या गळ्याला पडलेल्या गळफासाचं काय?" जयशीलने विचारले.

मायासरोवरेश्वराच्या तोंडून काही उत्तर येण्यापूर्वीच कांचनमाला जयशीलच्या गळ्यातला फास काढून हसत म्हणाली– "हा गळफास नसून मामाने तुझ्या गळ्यात घातलेला हा कमळांचा हार आहे!"

"एकूण कथा विद्युत्वेगाने विकास पावत असल्यासारखी दिसते आहे! ही पद्ममुखी सर्वप्रकारे दुर्दैवीच दिसते आहे! हा जयशील निदान त्या जलवृकराजाचा वध करण्याच्या कामी मदत करू शकला तर माझं केवढं मोठं कल्याण होईल!" मायासरोवरेश्वराच्या मनात हेच विचार चालू होते.

"महाराज, पुढे काय करावे अशी आज्ञा आहे?" मकरकेतूने विचारलं.

"आपण सर्व जण सरोवराकडे जायचे आहे, तू पुढे वाट काढीत चल." माया-सरोवरेश्वर म्हणाला.

"जयशील आपल्या बरोबर पायी कसा चालणार?" असे म्हणत मकरकेतूने जय-शीलकडे पाहिले.



"कांचना माझ्याबरोबर जलग्रहावर येईल. तू जयशीलला घोड्यावर बसवून घे!" मायासरोवरेश्वर म्हणाला.

कांचनमाला पुन्हा मायासरोवरात जाणार हे ऐकून चकित होऊन जयशील मकरकेतूला म्हणाला–"केतू! कांचन-मालेला परत मायासरोवराकडे नेणे मला पसंत नाही. मी कनकाक्ष महाराजांना वचन देऊन आलो आहे, दोघां मुलांना परत घेऊन येतो म्हणून! ही मुक्त स्थितीत सापडली आहे, हिला पुन्हा त्या कैदेत नेऊन टाकणे मला मान्य नाही!"

मायासरोवरेश्वराने संतापून जयशीलकडे पाहिले. त्याच वेळी कांचनमालेनेसुद्धा रागाने त्याच्याकडे पाहिले व म्हणाली–"मी व माझा मोठा भाऊ दोघांना जंगलातून पळवून आणले ही गोष्ट खरी असली तरी आम्ही कोणाच्या कैदेत मात्र नाही. माझा मोठा भाऊ बरोबर नसेल तर मी एकटी ती कधी काय आईवडिलांकडे येणार? तुला शक्य असेल, तर तू म्हणतो आहेस तसे आम्ही दोघं कैदेत असलो तर, आम्हां दोघांना प्रथम तू सोडविले पाहिजेस." असे म्हणत ती जलग्रहाकडे घाईघाईने गेली आणि मायासरोवरेश्वराने हात पुढे केल्यावर तो धरून ती जलग्रहावर चढली.

"केतू, हे सर्व मला विचित्रच दिसतं



सरोवर, हे सर्व खोटे तर नाही ना?" जयशील चकित होऊन मकरकेतूला म्हणाला.

"पहिल्याने तू घोड्यावर तर येऊन बस. सरोवरात पोचल्यावर तुला सर्व गोष्टींचा खुलासा होईल." मकरकेतू म्हणाला.

जयशील पुढे काही न बोलता मकरकेतूच्या मागे घोड्यावर बसला. मायासरोवरेश्वराने जलग्रहाला चलायला खुणावले. तो चालू लागला. त्याच्या पाठोपाठ मकरकेतूने घोड्याला जोराने पळविले. त्यावेळी जयशीलला सिद्धसाधकाची फार आठवण झाली. किती दिवस झाले तो आपल्यावर जंगलांत भटकत जीव धोक्यात घालून आपल्या बरोबर आला. आपण त्याला कोठे दिसलो नाही तर त्या बिचाऱ्याला काय वाटेल, कोण जाणे? मी मृत्युमुखी पडलो, असं तर नाही वाटणार त्याला? हंसरथात आपल्या बरोबर आपला बालमित्र देवशर्मा होता. त्याने आपल्याला रथातून खाली उडी टाकतांना पाहिले होते. कांचनमालेला वाचवायच्या प्रयत्नात आपण वाघाच्या तोंडी मेलो की काय असे तर त्याला वाटणार नाही?

जयशील या विचारात इकडे मग्न असता तिकडे घोडेस्वारांचा नायक वीरसेन सिद्धसाधकाला कनकाक्ष महाराज जंगलात उतरले होते तेथे घेऊन गेला. कनकाक्ष महाराजांनी साधकाला ओळखून अत्यंत प्रेमाने विचारले–"काय रे बाबा! तुझ्या बरोबर माझ्या मुलांच्या शोधार्थ जयशील गेला होता तो कोठे आहे? मी कित्येक दिवस तुमची वाट पाहिली व शेवटी निराश होऊन सर्व राज्य कारभार मंत्र्यांवर टाकून स्वतःच आपल्या मुलांच्या शोधार्थ निघालो आहे."

"महाराज! युवराजांना आणि राजकन्येला अपहरण करून घेऊन जाणारी अद्भुत रूप असलेली शक्तिशाली माणसे आहेत. ती मायासरोवर नावाच्या एका सरोवरात राहतात. त्यांना पाण्यात किंवा पाण्याबाहेर संचार करता येतो व राहता येते. त्यांच्या पैकी काही जणांना आम्ही पकडले आहे. त्यांचा राजा मायासरोवरेश्वर याला नरभक्षक जातीच्या लोकांनी पकडले होते. त्यानंतर तो आमच्या हातात सापडला होता, परंतु निसटून पळून गेला. त्यामुळे तसे जास्त नुकसान झाल्यासारखे काहीच नाही. त्या मायासरोवरातच आणखी एका जागी राहणारा जलवृक राक्षसांचा नायक माझा दास आहे. त्याच्या मदतीने तो मायासरोवर कोठे आहे, आपल्याला कळेल."

"अस्सं!" असे म्हणत कनकाक्ष महाराजांनी साधकाच्या पाठीमागे दगडी गदा खांद्यावर घेऊन उभा असलेल्या जलवृकाकडे पाहिले व म्हणाले–"तर मग जयशील कोठे आहे?"

"तो मायासरोवरेश्वराच्या दोघां नोकरांबरोबर त्या मायासरोवरेश्वराचा शोध काढीत हंसांच्या रथात बसून आकाशात हिंडतो आहे. तो सरोवरेश्वर जंगलात माझ्या दृष्टीस पडला होता, ही गोष्ट मात्र जयशीलला माहीत नाही." सिद्धसाधक म्हणाला.

"हंसांच्या रथात?" असे म्हणत राजा व त्याच्या बरोबरचे इतर लोक चकित होऊन साधकाकडे पाहू लागले.



"हंसांचा एक रथच काय, विचारतां महाराज? हा जलवृकराक्षस काय आणि हा वनमाणूस काय–आणखी तीन फूट उंचीची माणसं आणि प्राणिभक्षक वृक्ष काय–आपण शहराबाहेर एकदां जंगलात पाऊल टाकले की एकेक डोळ्यांवर व कानांवर विश्वास होणार नाही असे प्राणी आणि वस्तू आम्हांला पहायला मिळाले. सिद्धसाधक म्हणाला.

इतक्यात काही अंतरावरच्या झाडाखाली कसला तरी आवाज झाला. तेथे राजाच्या शिपायांबरोबर दोघे नरभक्षक मोठमोठ्याने बोलत काही तरी सांगत होते. त्यांना

आणि त्यांना जर वनमाणसावर बसून जंगलात फिरणाऱ्या भूताळरायाकडे, म्हणजे सिद्धसाधकाकडे नेले तर कळेल असं सांगत होते.

शिपाई त्यांना "तुम्ही कोण, कोठून आलात?" वगैरे नेहमीचे प्रश्न विचारीत होते.

साधकाने एका सैनिकाला तिकडे पाठवून त्या दोघांना बोलावून आणायला सांगितले. दोघां नरभक्षकांनी आल्यावर साधकाला नमस्कार केला व म्हणाले–"मालक! आमच्या नायकाला व मांत्रिकाला सोडलं तर आम्ही एक महत्वाचे गुपित सांगू!"

साधकाला वाटलं की ते दोघे कोणती तरी महत्वाची बातमी घेऊन आले असावेत त्याने जलवृक राक्षसाला, त्या दोघांना सोडून घेऊन यायला सांगितले. त्याने बिबळयाला व म्हाताऱ्या मांत्रिकाला घट्ट आवळून बांधलेल्या दोऱ्या सोडून त्यांना एकेका हाताने धरून आणून साधकासमोर उभे केले.

"सांगा, तुम्हांला कोणते गुपित माहीत आहे ते?" सिद्धसाधकाने त्या दोघां नरभक्षकांना विचारले.

"भूताल प्रभू! तुमच्या हातांतून निसटून पळून गेलेल्या मगरतोंड्याला आणि त्या विलक्षण हत्तीवर बसून येणाऱ्याला धरून आणण्यासाठी त्यांच्या शोधार्थ हिंडत असता त्यांना तुमच्यासारखाच एक जण दिसला. त्याच्याबरोबर एक मुलगीसुद्धा दिसली. आम्ही त्या सर्वांना पकडण्यासाठी त्यांच्यावर हल्ला करण्याचा विचार केला. परंतु त्यांत आमचीच चूक होईल की काय असे वाटून आम्ही झाडाआड लपून बसलो. तेव्हा तो विलक्षण हत्तीवर बसलेला आणि तो मगरतोंड्या त्या दोघांना हत्तीवर आणि घोड्यावर बसवून डोंगराच्या बाजूने पळाले. आणखी एक सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे हंसरथातून उतरलेले काही जण पूर्वेच्या बाजूला सुमारे चार कोस दूर, कोणाकरितां माहीत नाही, झाडी झुडपे शोधीत आहेत." (क्रमशः)





# नास्तिकाची श्रद्धाभक्ती

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हा प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! एखादी व्यक्ती नास्तिक-तरी असू शकते किंवा आस्तिक तरी असू शकते. परंतु नास्तिक असून श्रद्धाभक्ती असणाऱ्या एका व्यक्तीची गोष्ट मी तुला सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

एका गावी रामराव नावाचे एक सुखवस्तू गृहस्थ रहात होते. ते दुःखी कष्टी गोरगरिबांना मदत करीत व त्यामुळे गरिबांचा कैवारी म्हणून त्यांचा नावलौकिक त्या गावात झाला. परंतु गंमत अशी की त्यांचा देवावर मुळीच विश्वास नव्हता. ते नास्तिकच होते. देवळात जाऊन देवाची



पूजा वगैरे गोष्टींवर त्यांचा विश्वास नव्हता. आपल्याला शक्य होईल तेवढी लोकसेवा करीत राहण्यातच जन्म सार्थक होतो, असे ते म्हणत.

एकदा रामरावांचा दुसरा मुलगा कोणत्या तरी विचित्र रोगाने फार आजारी पडला. त्या गावातल्या एकादेखील वैद्याला किंवा डॉक्टराला रोगाचे निदान झाले नाही. रामरावांचे नातेवाईक व मित्रमंडळी येऊन म्हणू लागली—"तू आहेस नास्तिक! म्हणून देव तुझी परीक्षाच पाहतो आहे. देवासमोर उभा राहून थोबाडीत मारून घे आणि चूक कबूल कर. तुझा मुलगा बरा होईल."

मी नास्तिक असलो तरी मी देवाचा कधी अपमान केला नाही. कोणी विश्वास करीत नाही, म्हणून त्या अपराधाबद्दल पीडा-देणारा तो देव कसला? मी कोणत्याही देवासमोर काही मागणे मागायला जाणार नाही." रामरावांनी सर्वांना स्पष्ट शब्दात सांगून टाकले.

रामरावांच्या बायकोला पतीचा हा हट्टीपणा आवडला नाही. तिने नवऱ्याला सांगितल्याशिवाय देवळात जाऊन मुलाला बरं केल्यास एक हजार रुपये हुंडीत टाकीन असा नवस केला. परंतु त्याचा काही एक फायदा झाला नाही. देवावरचा तिचा विश्वास सुद्धा उडाला. मध्यंतरी त्या गावात एक अधिकारी पुरुष आले असून आंधळ्यांना दृष्टी देतात अशी किंवदंती गावात पसरली. रामरावांच्या बायकोला वाटलं की विचारून पहावं त्यांना आणि पतीला म्हणाली—"आपण छोटूला घेऊन जाऊन स्वामीजींना दाखवावं म्हणते!"

"संन्यासी आजार बरे करू लागले तर वैद्य हवेत कशाला? ही सर्व लबाडी आहे!" रामराव म्हणाले.

आपल्या विश्वासाप्रमाणे रामराव मुलाला घेऊन कोणी वैद्य त्याला बरा करतो का पहात गावोगाव खूप हिंडले. परंतु तो प्रयत्नही फुकट गेला.

अशा परिस्थितीत महाभीषक नावाचे एक वैद्य देशाटन करीत रामराव होते त्या गावी आले. ते त्या गावात फक्त दहा दिवसच राहणार व त्यांनी औषध दिल्यावर रोग बरा झाला नाही असे एकही उदाहरण नाही हे ऐकून गावातले लोक महाभीषकाच्या दर्शनाला जाऊ लागले. रामरावसुद्धा त्या महाभीषकाला दाखवायला मुलाला घेऊन गेले. त्याने मुलाची नाडी परीक्षा करून तीन गोळ्या दिल्या व दररोज एक गोळी खायला सांगितले.

पहिली गोळी घेतल्यावर मुलाने तोंड उघडले व बोलण्याचा प्रयत्न करू लागला. दुसरी गोळी घेतल्यावर तो चांगला बोलू लागला. रामरावांनी मुलाला तिसरी गोळी दिली आणि महाभीषकाच्या दर्शनाला जाऊन म्हणाले—"वैद्यबुवा! आपण सामान्य माणूस नसून फार थोर देवपुरुष आहात!"

महाभीषक स्मित करून म्हणाले—"अहो! माझ्याजवळ अमोघ औषधी द्रव्ये आहेत. त्यांचाच हा सर्व महिमा आहे. माझं थोरपण असे त्यात काही नाही. सामान्य आजार इतर कोणीही बरा करतो. माझ्याकडे फक्त असाध्य रोगांसाठीच औषधे आहेत. म्हणून मी एका जागी रहात नाही व देशसंचार करीत असतो आणि जेथे जुनाट असाध्य रोग आढळतात तेथे जाऊन औषध देऊन ते बरे करतो."



रामरावांनी त्यांना एक हजार रुपये देऊन त्यांचे पाय धरले व म्हणाले—"आज पर्यंत मी देव नाही, असे मानत आलो. आपणच माझे देव!"

महाभीषकाने रामरावांना हात धरून उठविले व म्हणाले—"तुमचा देवावर विश्वास नाही का? तर तुम्ही देवाचे प्रत्यक्ष अवतार अशा स्वामीजींचे दर्शन केलेले नाही से दिसते. देवाचे प्रत्यक्ष दर्शन हवे असेल तर त्यांचे दर्शन घ्यावे. मी त्यांचा भक्त आहे. त्यांच्या आज्ञेप्रमाणेच मी देशोदेशी हिंडून ही सेवा करीत आहे."

महाभीषकाने सांगितले म्हणून रामराव स्वामीजींच्या दर्शनाला गेले. परत आल्यावर








बायकोने स्वामीजींच्या विषयी चवकशी केली. "ते आहेत तुझ्या माझ्यासारखेच. परंतु त्यांना लोक देव कां मानतात हे मला नाही कळलं. देवपुरुष म्हणावे तर त्या महाभीषकांनाच म्हणता येईल!" रामराव म्हणाले.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला– "राजा! रामरावांना आस्तिक म्हणावे की नास्तिक? कधी देवळात पाऊल न टाकणारा माणूस महाभीषकात देव कसा पाहू शकला? महाभीषकाने–'माझ्यात देव नाही, त्याचे दर्शन स्वामीजींतच घडेल' इतक्या स्पष्ट शब्दात सांगितले असून त्या स्वामीजीत रामरावांना देव कां दिसू नये? या प्रश्नाची समाधानकारक उत्तरे माहीत असूनही दिली नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य उत्तरादाखल म्हणाला– "देव कसा असतो याला काही प्रमाण नाही. निरनिराळ्या मताच्या संस्थापकांनी देवाचे रूप निरनिराळे सांगून इतरांनी वर्णिलेल्या रूपाला मानलं नाही, एवढेच नव्हे तर इतर मतानुयायांना 'नास्तिक' म्हणायलासुद्धा मागेपुढे पाहिले नाही. परोपकार हा रामरावांत थोर गुण होता. देवावर ज्यांचा पूर्ण विश्वास असतो ते आपल्या सर्व बऱ्या वाईट कर्माचा भार देवावरच टाकतात. रामरावांना ते मान्य नव्हते, म्हणून ते नास्तिक ठरले. नवस करूनही जो रोग देवाच्या हातून बरा झाला नाही तो महाभीषकाने करून दाखविला. म्हणून त्याच्यात त्यांना देवाचे दर्शन घडले. लोक ज्या स्वामीजींच्या दर्शनासाठी त्यांच्या शोधार्थ धावत, त्यांच्यात रामरावांना एक सामान्य माणूसच दिसला. त्यात वावगे काहीच नाही."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# जीव घेणारी विद्या

एका गावात विठू नावाचा एक गवळी रहात असे त्याच्या चार गाई एवढेच काय ते त्याचं सर्वस्व होते. तो दररोज त्यांना चरायला घेऊन जाई. झाडावर नाहीतर उंचवट्यावर बसून तो पावा वाजवीत स्वतःची करमणूक करी. गाईंचे दूध विकून स्वतःचा उदर निर्वाह करी.

एके दिवशी तो एका झाडावर बसून पावा वाजविण्यात निमग्न झाला असता त्याला थोड्या अंतरावरून वाघाची डरकाळी ऐकू आली. तो दचकला व त्याने गाई चरत होत्या त्या बाजूला वळून पाहिले, त्याला एक अपूर्व दृश्य दिसले ते पाहून तो थक्कच झाला. त्याच्या चारी गाई एका वाघाच्या चारीबाजूला उभ्या राहून त्याला शिंगांनी भोसकत होत्या आणि वाघ स्वतःचे रक्षण करून तेथून निसटून जाण्याच्या प्रयत्नात होता. परंतु गाई त्याला अडवून उभ्या होत्या, पळून जायला वाटच देत नव्हत्या. शेवटी त्यांनी त्या वाघाला ठार केले.

विठूला आपल्या गाईंचा पराक्रम पाहून आनंद झाला. तो गाईंचे कौतुक करीत असता गाई जसे काहीच घडले नाही अशातऱ्हेने पुन्हा शांतपणे चरू लागल्या.

त्यानंतर काही दिवसांनी विठू राही त्या प्रदेशात पाऊस पडलाच नाही आणि कुरणे वाळून गेली. त्यामुळे गाईंना गवत मिळेनासे झाले. त्यामुळे गाई वाळू लागल्या. गवताअभावी गाई वाळत चाललेल्या न पाहवल्यामुळे विठू त्यांना हाकीत दूरच्या डोंगराळ प्रदेशात घेऊन गेला. त्या भागात गवत खूप वाढलेले होते. परंतु ते चरायला त्या प्रांतात गाईच नाहीत हे पाहून त्याला आश्चर्य वाटले. तेथून अर्ध्या मैलावर एक गाव होते तेथे तो गेला आणि त्याने



तेथेच राहण्याचे ठरवून आवश्यक ती व्यवस्था केली.

त्या गावात गाई होत्या, परंतु त्यांना पौष्टिक चारा आणि गवत न मिळाल्याने त्या वाळलेल्या होत्या.

"डोंगराच्या पायथ्याशी एवढे गवत असता गाई वर्षानुवर्षे खायला प्यायला न मिळाल्यासारख्या कां? नदीत नावेत बसून प्रवास करीत असता तहानेने जीव कासावीस करून घेतल्यासारखेच हे झाले!" विठूने गावकऱ्यांना विचारले.

"बाबा रे, आता आम्ही काय सांगू? डोंगराच्या चारी बाजूला जी कुरणे आहेत त्यात वाघ वगैरे जंगली जनावरे येऊन

गुरं पुन्हा परत येत नाहीत! म्हणून आम्ही आपल्या गाईगुरांना त्या बाजूला जाऊ देत नाही. तुसुद्धा जवळपास गवत मिळेल तेवढ्यावरच भागव, तुला सावध करून ठेवावे, म्हणून सांगतो." गावकरी म्हणाले.

"माझ्या गाईंच्या वाटेला वाघ असो की सिंह, कोणी जाणेच शक्य नाही. त्यांना स्वत:चे रक्षण करता येते. या गाई सामान्य गाई नाहीत! त्या सर्व मिळून एक जुटीने आपले रक्षण करतात." विठू म्हणाला.

गावकरी विचार करू लागले, काय गप्पा मारतो आहे? याला इकडची परिस्थिती माहीत नसावीसे दिसते. मूर्खासारखा गाईंना त्या कुरणात सोडील आणि कायमचा गाईंना मुकेल.

वास्तविक गोष्ट निराळीच होती. त्या डोंगरापलीकडच्या झाडीत झिंगू बेरड नावाचा गुरे चोरणारा एक अट्टल चोर रहात असे. वाघा-सिंहासारखे त्याला ओरडता येत असे. तो गवतात लपून राहून वाघासारखा डरकाळ्या फोडून गावकऱ्यांना पळवून लावी व मग त्यांच्या गाई डोंगरापलीकडे पळवून नेऊन गुरांच्या बाजारात विकून टाकी. अशा तऱ्हेने त्याने पुष्कळ पैसे जमविले होते.

एवढेच माहीत होते की त्याच्या गाई वाघा-सिंहाला भीत नाहीत.

झिंग्या बेरडाला कित्येक दिवसांपासून गाईगुरे पळवून न्यायला मिळाली नव्हती. म्हणून तो काय करावे या विचारात पडला होता आणि अशा परिस्थितीत त्याला त्याला कमालीचा आनंद झाला. विठूच्या गाई कुरणात शिरलेल्या दिसल्या. गाई खाऊनपिऊन पुष्ट झालेल्या होत्या. त्यांचा मालक विठू एका झाडावर निश्चिंतपणे बांसरी वाजवीत बसला होता.

झिंग्या बेरडाने त्या गाई पळवून न्यायचे ठरविले. त्याने खूप विचार करून कोणत्या झाडीत लपून राहल्याने आपण यशस्वी होऊ हे ठरविले आणि दुसऱ्या दिवशी त्या जागी गाई चरायला येण्यापूर्वीच तो लपून बसला.

विठूच्या गाई त्याच बाजूला जाऊन चरू लागल्या. विठू झाडावर बसून पावा वाजवू लागला. थोड्या वेळाने त्याला वाघाची डरकाळी ऐकू आली. परंतु तो घाबरला नाही. त्याची नजर गाईंवर होती. गाई त्याच्या कल्पनेप्रमाणे डरकाळी ऐकू आली त्या दिशेला वळून वाघाला तोंड द्यायच्या जणूकाही पवित्र्यात उभ्या राहिल्या. विठूने पावा वाजवायचा बंद केला आणि काय होते ते दृश्य पाहण्यासाठी तयार होऊन बसला.



मध्यंतरी झिंग्या बेरडाला हे पाहून आश्चर्य वाटले की गाई डरकाळी ऐकून पळत नसून तो लपला होता त्या बाजूलाच पुढे येत आहेत. गाई वाघाची डरकाळी ऐकून भीत नाहीत हे पाहून त्याने सिंहासारखे गर्जून पाहिले.

परंतु सिंह गर्जना ऐकून सुद्धा गाई मागे फिरत नव्हत्या, उलट खुरांनी जमीन उकरू लागलेल्या त्याला दिसल्या, जणूकाही सिंहाला आव्हान करीत म्हणत होत्या, असेल धाडस तर ये पुढे! आज तुझी शेखी जिरवितो चांगली!

झिंग्याला हे कळायला आता वेळ लागला नाही की गाई पळून जायच्या तर दूरच,

त्या आपल्यावर तुटून पडणार व आपलाच कपाळमोक्ष होणार. तो इतका भ्याला की त्याच्या सर्वांगाला घाम सुटला. त्यानंतर तो आवाज बदलून एकदा वाघासारखा तर एकदा सिंहासारखा ओरडू लागला. त्याने निरनिराळ्या रानटी जनावरांचे आवाज काढून ओरडून पाहिले. तरी काही फायदा झाला नाही.

परंतु त्या डरकाळ्या ऐकून गावाच्या जवळपास असलेली जनावरे सैरावैरा पळू लागली आणि जी गुरे गोठ्यात बांधलेली होती ती दावी तोडून पळू लागली.

गावकरी आपल्या गुरांना आवरायला धावले. तेवढ्यात विठू गावात धावत आला आणि त्याने घडलेली खरी स्थिती गावकऱ्यांना समजावून सांगितली. म्हणाला— "माझ्या गाईंनी त्या वाघासिंहांना धरले आहे, तुम्ही स्वतः येऊन पहा!" काही लोक धाडस करून ते पहायला गेले. विठू त्यांना घेऊन झिग्याला गाईंनी जेथे कोंडीत अडविले होते तेथे जाऊन थांबला.

[illegible] विचारले—
"कोठे आहे रे वाघ विठू?"

"तो इतक्या सहजी बाहेर येईल का? कारण बाहेर आला तर त्याच्या चिंधड्या माझ्या गाई उडविणार नाहीत का? तुम्ही त्या झाडीत दगड फेका वाघासिंहासारखे ओरडणारे श्वापद बाहेर येईल!" विठूने त्यांना सांगितले. त्याप्रमाणे गावकऱ्यांनी झाडीत दगड फेकायला सुरवात केली. तेव्हा ओरडत झाडीबाहेर रक्तबंबाळ झालेला झिग्या आला आणि गाई त्याला वाट द्यायला जणू बाजूला सरकल्या. झिग्या गांवकऱ्यांचे पाय धरून त्यांची माफी मागू लागला.

गावकऱ्यांना तेव्हा कळले की त्यांच्या गाईंना वाघासिंहांनी खाल्लेले नसून झिग्याने त्यांना पळवून नेले होते. त्यांनी संतापून झिग्याला खूप बडवून काढला. त्या दिवसापासून विठू त्या गावचा प्रमुख झाला. त्यानंतर गावातल्या गुरांना चरायला कुरणे खुली झाली.



# उपदेश

जयराम गावातल्या श्रीमंतांपैकी एक प्रमुख होता. एकदा त्याच्याकडे एक भिक्षुक आला. त्याला पाहून जयराम म्हणाला—"या या! आपलीच वाट पहातो आहे!" भिक्षुकाला वाटले की मोठी दक्षिणा मिळणार आहे. जयराम मोठ्या उत्साहाने सांगू लागला—"अहो, हा वाडा बांधायला दोन लाख खर्च करावे लागले मला!"

"तरीच पहा, कसा सुंदर व बळकट वाडा झाडा झाला आहे!" भिक्षुक म्हणाला. त्यानंतर जयरामाने आपला सर्व वाडा त्या भिक्षुकाला स्वतः दाखविला. शेवटी तो तिजोरीच्या खोलीत गेला आणि तिजोरी उघडून तिच्यातील त्याचे वैभव त्याने दाखविले. शेजारच्या खोलीत नेऊन चांदीची भांडी आणि कोठरात नेऊन सांठविलेले धान्य दाखविले.

"आपल्या मस्तकावर लक्ष्मीचा व अन्नपूर्णेचा वरदहस्त आहे!" भिक्षुक म्हणाला.

त्यानंतर जयराम भिक्षुकाला परसात घेऊन गेला आणि म्हणाला—"हे सर्व वैभव मी स्वतःच्या मेहनतीने, घाम गाळून मिळविले आहे. भीक मागून कोणासमोर हात पसरून नाही, काय कळले?" नंतर मागचं दार उघडून म्हणाला—"या वाटेने तुम्हांला जायला हरकत नाही." भिक्षुक तोंडावाटे एक शब्दही न उच्चारता निघून गेला.





# देवळासाठी चंदा

रामपूरचा जमिनदार पहिल्यानंबरचा चिक्कू होता. तो लोकात मिळून मिसळूनही रहात नसे. त्याची बायको अगदी निराळी होती. ती देवभक्तही होती.

एकदा त्या गावच्या रामाच्या देवळाचा जीर्णोद्धार करण्याचे देवळाच्या विश्वस्तांनी ठरवून रामनवमीच्या उत्सवात या शुभ-कार्याचा आरंभ करण्याचेही ठरविले. त्यांनी या कामासाठी चंदा वसूल करण्याची योजना आंखली. विश्वस्त मंडळी सर्वात आधी जमिनदाराच्या घरी आली. जमिन-दारसाहेब चंदा देतीलच या गोष्टीची खात्री नव्हती.

विश्वस्तांनी चंदा मागितला तेव्हा जमिनदाराने नकार दिला नाही, गोड शब्दात म्हणाला–"चंदाच ना? केव्हाही येऊन घेऊन जा. सगळ्यांच्या कडून मागून झाल्यावर माझ्याकडे या."

विश्वस्त म्हणाले–"हे पहा, तुम्ही पहिल्याने चंदा दिलात तर तुमचा आकडा पाहून इतर देणार. नाही तर पायरीच चढू द्यायचे नाहीत."

जमिनदार थोडावेळ विचारात पडला. नंतर म्हणाला–"बरं तर माझ्या नावावर लिहा एक हजार रुपये. परंतु ही रक्कम मी आतांच नाही देणार."

"धन्यवाद! आपण शब्द दिलात की पुरे. परंतु एक विनंती आहे. आपण मेहर-बानी करून गावातल्या बैठकीच्या जागी अवश्य यावे. तेथे सर्व लोक जमणार आहेत याच कामासाठी. चंदा कसा वसूल करायचा, कोणाकडून किती मागायचे, हे ठरणार आहे. सर्वांसमक्ष आपण देऊ केलेली रक्कम आम्ही जाहीर करू. त्यानंतर कोणाला टाळाटाळ करायला सवड मिळणार नाही." प्रमुख विश्वस्त म्हणाले.

जमिनदार त्या गोष्टीस कबूल झाला. जमिनदाराला वाटले त्यांना लगेच रक्कम काढून देण्याची गरज नाही.

त्यानंतर विश्वस्तांनी जमिनदाराच्या पत्नीला भेटून जमिनदारांनी दिलेल्या वचनाची गोष्ट सांगून त्यांनी ते वचन लवकरात लवकर पुरे होईल असे काही करता आलं तर करण्यास विनंती केली. तिला जमिनदाराच्या स्वभावाची चांगली ओळख होती. दिलेले वचन जमिनदार क्वचितच पाळीत असे. म्हणून ती विश्व-स्तांना म्हणाली–"तुम्ही काळजी करण्याचे कारण नाही, वचन पुरे करविण्याची जबाब-दारी माझ्यावर टाका. कसे ते मी पाहीन. पुन्हा विचारण्याची घाई मात्र करू नका."

"वहिनी! आम्ही तुमच्या आज्ञेबाहेर का आहो? अहो, जमिनदारसाहेबांनी सर्वांसमक्ष रक्कम दिली तर इतर लोकां-कडून वसूल करणे सोपे जाईल, एवढेच! नाही तर चंदा वसूल करणे किती कठीण आहे, हे तुम्हांला सांगायला हवं का?" विश्वस्त म्हणाले.

तिने काय करायचं ठरविलं आहे, ते सांगून म्हणाली–"तुम्हांला बैठकीच्या जागीच पुरी रक्कम मिळेल अशी मी युक्ती करते! म्हणजे झालं ना?"

त्या दिवशी संध्याकाळी ठरल्याप्रमाणे चौकातल्या ओटयावर जमिनदाराच्या अध्यक्षतेखाली गावकऱ्यांची सभा झाली. विश्वस्तांच्या प्रमुखाने सभेत जमिनदार-



साहेबांनी देऊ केलेली एक हजार रुपयांची रक्कम जाहीर करून त्यांचे आभार मानले व सर्वत्रांना सढळ हाताने चंदा देण्यास विनंती केली. नंतर जमिनदाराकडे वळून म्हणाला–"आपण सर्वांसमक्ष शुभारंभ करण्याची कृपा करावी!"

जमिनदाराला चुकूनसुद्धा वाटले नाही की सर्वांसमक्ष त्याला रक्कम देण्यास सांगण्यात येईल. तो थोडा चपापला. तरी स्वतःला सावरून म्हणाला–"ठीक आहे, घरी येऊन घेऊन जा!"

जमिनदाराला ठाऊक होते की घरून निघतांना तो नेहमी दहाची नोट खिशात ठेवीत असे ती पुढे करून बाकी रक्कम घरी घेऊन जायला सांगता येईल. म्हणून त्याने खिशात हात घालून खिशातले कागद बाहेर काढले. कागदांबरोबर नोटांचे एक पुडके होते. सर्व शंभराच्या नोटाच होत्या. मोजून पहिल्या त्या बरोबर दहाच निघाल्या.

"वाः वा! जमिनदारसाहेब पुरी रक्कम घेऊन आले आहेत. आपल्या गावातले [illegible] आहेत जमिनदार साहेब." असे म्हणत विश्वस्त प्रमुखाने टाळ्या वाजवून आपला आनंद व्यक्त केला. त्याच्या पाठोपाठ सर्व लोकांनी टाळ्या वाजवून जमिनदारसाहेबांचे अभिनंदन केले.

जमिनदार असा काही कोंडीत सापडला की त्याला हजार रुपये देण्याव्यतिरिक्त काही मार्गच उरला नाही. त्याने ती रक्कम दिली. त्यानंतर चंद्याच्या रकमा भराभर वसूल झाल्या.

जमिनदाराने घरी गेल्यावर बायकोला विचारले–"काय ग, माझ्या खिशात एक हजार रुपये कोठून आले? तू ठेवले होतेस का?"

"होय तर! मी तुम्हांला सांगायला विसरले. तुम्ही निघण्यापूर्वीच एका कुळाने येऊन एक हजार रुपये आणून दिले. ते मी तुमच्या खिशात ठेवले होते. परंतु कामाच्या गर्दीत मी सांगायला विसरले. बरोबर होते ना सर्व एक हजार?" जमिनदाराच्या बायकोने विचारले.



# शेरास सव्वा शेर

एका श्रीमंत माणसाने दागिने करण्यासाठी एका सराफाला काही रुपये दिले. दागिने तयार झाले. सराफाला त्या श्रीमंताकडून आणखी आठशे रुपये मिळावयाचे होते. तो श्रीमंत माणूस सराफाला म्हणाला–"मी आठशे रुपये माझ्या धाकट्या भावाच्या हाती पाठवून देतो. तुम्ही त्याच्या हाती दागिने पाठवून द्या." सराफ म्हणाला–"मी तुमच्या भावाला ओळखत नाही." श्रीमंत म्हणाला–"अहो, जो आठशे रुपये आणून देईल तोच माझा भाऊ!"

हे संभाषण एका लबाडाने ऐकले होते. त्याने दुसऱ्या दिवशी आठशे रुपये सराफाला आणून दिले आणि दागिने मागितले. परंतु त्या श्रीमंताचा भाऊ आदल्या दिवशी संध्याकाळीच आठशे रुपये देऊन दागिने घेऊन गेला होता. सराफाने त्या लबाड माणसाकडून आठशे रुपये घेतले आणि घरात जाऊन सोन्याचा मुलम्मा केलेले काही नकली दागिने आणून त्या लबाड माणसाला दिले.





# आगीची भीती

रूपराम नावाचा राजा एक योग्य प्रजावत्सल राजा होता, परंतु काही गोष्टींवर त्यांचा अंधविश्वास होता. त्याच्या या अंधविश्वासामुळे त्याला स्वतःला व इतरांना फार त्रास होई.

एकदां रूपरामला पहाटे एक स्वप्न पडले. स्वप्नात अग्निनारायणाने दर्शन देऊन राजवाड्याकडे तीक्ष्ण दृष्टीने पाहिले. त्या पाठोपाठ राजवाड्याला आग लागली आणि मोठमोठ्या ज्वाळा येऊ लागल्या.

रूपराम मोठ्याने ओरडला–"आग, आग! वांचवा!" त्याचं ओरडणं ऐकून लोक धावले. राजाची झोप मोडली होती आणि सर्व लोक गर्दी करून जमा झालेले पाहून राजाला कळेना की लोक कशासाठी जमले आहेत. लोकांनी तो ओरडला असल्याचे सांगून "तुम्हांला स्वप्न बिप्न पडलं होतं का?" विचारलं. तेव्हा राजाला स्वप्नातली गोष्ट आठवली. त्याने आपल्या मंत्र्यांना बोलावून त्याला पडलेल्या स्वप्नाची गोष्ट घाबऱ्याघाबऱ्या सांगितली. प्रधान म्हणाले–"महाराज! यात विशेष घाबरण्यासारखं काहीच नाही!"

राजा म्हणाला–"प्रधान, पहाटे पडलेले स्वप्न कधी खोटं होत नाही!" असे सांगून त्याने आज्ञा केली की कोठेही विस्तव पेटविता कामा नये व एकदेखील दिवा लावता कामा नये.

राजपरिवारातल्या सर्वांसाठी बाहेरून सैपाक करवून मागविण्यात आला. म्हणून राजाला व राणीला थंडगार झालेले पदार्थच खाणे भाग झाले. रात्री राजवाड्यात सर्वत्र काळोख. म्हणून वाड्यात हिंडणे फिरणेदेखील अशक्य झाले. भितीशी, दाराशी किंवा परस्परांशी टक्कर होऊन पडले देखील.

मंत्र्यांसमोर मोठा प्रश्नच उभा राहिला की या परिस्थितीतून बाहेर निघायला मार्ग काय? दरबारी जादुगार सोमनाथने दरबारी पुजाऱ्याला भेटून आपली युक्ती सांगितली. म्हणाला–"दादा! परेश नावाचे माझे काका दुसऱ्या राज्यात राहतात. ते माझ्यासारखेच जादुगार आहेत. मी त्यांना बोलावून आणून महाराजांची व त्यांची भेट घालून देतो. त्यांनी अग्निनारायणाला वश केले आहे असे आपण महाराजांना सांगू या. जादू करून ते सिद्ध करून दाखवितील. म्हणजे महाराजांचा विश्वास बसेल. नंतर राजवाड्यात उभा राहिलेला प्रसंग सोडवायला मार्ग काढता येईल."

सोमनाथने सुचविल्याप्रमाणे परेशला दरबारात आणण्यात आले. त्यापूर्वी पुजाऱ्याने महाराजांना भेटून परेशने अग्नीला वश करून घेतल्याचे सांगितले होते. परेशने आपल्या मंत्रशक्तीचा प्रयोग करून दाखविण्याची सर्व तयारी केली. त्याने आपल्या पिशवीतून एक काचेची चिमणी काढली. तिचे वरचे तोंड दोन इंच व्यासाचे होते. टेबलावर एक मेणबत्ती पेटवून तिच्यावर ती चिमणी ठेवण्यात आली. मेणबत्ती थोडा वेळ जळून विझली. तेव्हा चिमणी काढून मेणबत्ती पुन्हा पेटविण्यात आली. पुन्हा तिच्यावर चिमणी ठेवल्यावर मेणबत्ती विझली. हा प्रयोग करून परेश सर्वांना म्हणाला–"जो माणूस चिमणी असेपर्यंत



मेणबत्ती जळत ठेवील त्याला मी शंभर सुवर्णमुद्रा द्यायला तयार आहे!"

परंतु कोणीच पुढे आला नाही.

राजाने आपल्या दरबारी जादुगाराला विचारले–"सोमनाथ, पाहतोस काय? प्रयत्न करून पहा!"

"महाराज! ही जादू नाही. ईश्वराच्या अनुग्रहाशिवाय अग्निनारायणाला वश करून घेणे शक्य होणार नाही. कदाचित् हे कोणी तरी योगी पुरुष असावेत!" सोमनाथ म्हणाला.

"होय महाराज! मी योगसाधना करून ईश्वराला प्रसन्न करून घेतले आहे. ही सिद्धी त्याच्याकडूनच प्राप्त झाली आहे. हा पहा पत्रा. यावर तो मंत्र लिहून ठेवलेला आहे!" असे म्हणत परेशने आपल्या पिशवीतून लोखंडी पत्रा काढून दाखविला. त्यावर कोणत्यातरी विचित्र लिपीत काहीतरी लिहिलेले होते. तो पत्रा झेंड्याच्या आकृतीचा होता. तो चिमणी-वरच्या बाजूला ठेवून चिमणीच्या आतल्या [illegible] पेटविली. या खेपेसे मेणबत्ती जळत राहिली. परंतु पत्रा काढून घेतांच ती विझली.

तेव्हां पत्र्याचा महिमा लक्षात आला. राजा व दरबारी सर्वांनी मान डोलवून तो मान्य केला. परेशने तसे अनेक पत्रे पिशवीतून काढले. ते राजाच्या हातात देऊन म्हणाला–"जेथे आग लागण्याची भीती असेल तेथे हा पत्रा लावून ठेवला तर आग लागण्याचं भय रहात नाही.

त्यानंतर राजवाड्यात पुन्हा स्वैपाक होऊ लागला व दिवे लागले. हा जादूचा प्रयोग सोमनाथने स्वतः केला होता. चिमणीच्या आत मेणबत्ती पेटविल्यावर ती आतला प्राणवायु असेपर्यंत जळते व तो संपताच विझते हा एक नैसर्गिक नियम आहे. परंतु परेशने चिमणीचा वरचा भाग पत्रा लोंबत ठेवून विभागला तेव्हा एका भागातून प्राणवायू नसलेली हवा निघून जाई आणि दुसऱ्या भागातून ताजी हवा आत जाई आणि मेणबत्ती न विझता जळत राही.





# श्रमाचे फळ

चीन देशात होएँगो नदीच्या बाजूला एक दगडीकोळशाची खाण होती. त्या खाणीतून पिंग व चिन या नावाचे दोघे मजूर कोळसा खणून आणीत आणि तो विकून आपला उदरनिर्वाह चालवीत.

एके दिवशी ते दोघे खाणीच्या दोन्ही बाजूला काम करीत असता कोळशाचा एक मोठा तुकडा तुटून पिंगच्या पायावर पडला व त्या खाली पिंगचे पाय चिरडले गेले.

चिन लगेच पिंगला खांद्यावर उचलून घेऊन गेला पिंगचे दोन्ही पाय गेले. आता त्याला स्वतःचे पोट भरणे कठीण जाऊ लागले.

एके दिवशी पिंग आपला मित्र चिन याला म्हणाला–"मित्रा! मला खाणीच्या जवळ घेऊन जा. मी खाणीच्या देवीला, तिने मला असा लंगडा करून कां ठेवलं, विचारीन!"

चिनने पिंगला खाणीजवळ पोचविले. पिंग जोराने ओरडून म्हणाला–"हे खाणी-तल्या देवी! आता तूच सांग, माझं पोट कसं भरायचं?" खाणीतून उत्तर आलं नाही. परंतु अकस्मात एक गाठोडे पिंग समोर येऊन पडले. पिंगने सोडून पाहिले त्यात सोन्याच्या गिनी होत्या.

तोपर्यंत चिन पिंगविषयी सहानुभूती दाखवी. परंतु तेव्हापासून त्याला पिंगचा हेवा वाटू लागला. त्याचे पाय तुटले तर काय झाले? त्याला मेहनती शिवाय उदरनिर्वाहाचं साधन मिळालं. हेवा वाटण्याचं कारण तेच होतं. दुसऱ्या दिवशी खाणीत गेल्यावर चिनने पहार कुदळ दूर फेकली आणि मोठ्याने ओरडू लागला–"देवी! मलादेखील चैनीत व सुखाने आयुष्य घालविण्याचा काही मार्ग सांग."

खाणीची देवी चिनला दर्शन देऊन म्हणाली–"बाबा रे! तुला कोणती उणीव आहे? तुला मेहनत करून पोटापुरते मिळते आहे ना?"

"माते! मी अशी मेहनत किती दिवस करू शकेन ग? मला सुद्धा धनाचा साठा दे, मी तुझे उपकार कधी विसरणार नाही." चिन म्हणाला.

"तू पिंगसारखं स्वतःचं काही घालवून बसायला तयार आहेस का?" देवीने विचारलं.

चिनने होकार दिला. तेव्हा देवी म्हणाली–"तू घरी जा आणि आपल्या मुलाच्या डोळ्यात डोळे घालून पाहू लाग. त्याला नऊ वेळा उचक्या आल्यावर तो मरेल. तू त्याला आणूनमला दे."

चिनने विचार केला, मुलं आपल्या पोटी जलमतील, परंतु पोटाचा असा सोपा मार्ग काही निघणार नाही. असा विचार करून तो घरी गेला. त्याचा चार वर्षांचा मुलगा खेळत होता. चिनने त्याला जवळ [illegible] घालून त्याच्याकडे पाहू लागला. त्याला उचक्या सुरू झाल्या. पांच वेळा त्याला उचकी लागल्या नंतर मुलाच्या तोंडावर पिवळी झळक दिसू लागली. चिनला वाटलं की त्याचा मुलगाच सोन्याचा खजिना होणार आहे. चिनने त्याच्याकडे पाहण्याचे बंद करून खाणीकडे धावला. चिनच्या मुलाला उचक्या यायच्या बंद झाल्या व तो पहिल्यासारखा खेळू लागला.

चिनला पाहून खाणीतली देवी हसू लागली. म्हणाली–"तुला धन देण्याची शक्ती माझ्यात असती तर मी पिंगचा पाय तुटू दिला असता? कोणी तरी ही खाण सरकारकडून कंत्राटावर घेतली आहे. त्याने मला भेट म्हणून ते गाठोडे टाकलं होतं. पिंगचे भाग्य चांगलं होतं म्हणून त्याला ते मिळालं. चिन, एक गोष्ट लक्षात ठेव, तुझ्या डोळ्यातच खजिना भरला आहे. सोन्या-सारखा तुझा मुलगा म्हातारपणी तुला मदत करील." असे सांगून देवी अदृश्य झाली.



# न्हल्यावर दहल्या!

बंडू एका गल्लीतून जात होता. त्याला कोकिळेची 'कूक' 'कूक' ओरडणे ऐकू आले. त्याला वाटलं की पलीकडच्या गल्लीतल्या वडावरच्या झाडावरून कोकिळेचा आवाज येत असावा.

कोकिळेला चिडवावे असे लगेच त्याच्या मनात आलं. तसाच आवाज काढून तो 'कूक' 'कूक' करून तो ओरडू लागला. बंडूने तिच्याशी चढाओढच लावण्याचे ठरविले आणि ओरडू लागला. शेवटी दमून ओरडणे बंद करून पुढे निघून गेला.

गल्लीच्या टोकाला त्याचा मित्र खंडूलाला भेटला. बंडू त्याला म्हणाला–"मी आता गल्लीतून येत असता एका कोकिळेला खूप खिजविलं."

ते ऐकून खंडू म्हणाला–"म्हणजे! अरे मीच तो कोकिळेचाच आवाज समजून त्या झाडाजवळ उभा राहून 'कूक' 'कूक' करीत होतो.





# बिचारा मौलवी

हारून अल रशीद जेव्हा बगदाद येथे खलीफा होते त्यावेळी त्यांच्या राज्यात एक मौलवीसाहेब होते. त्यांच्याजवळ चोवीस विद्यार्थी शिकत असत मौलवीसाहेब फार निष्ठुरपणे मुलांना सूर्यास्त झाल्या-वरही कधी कधी एकेक तास बसवून शिकवीत. त्यांचा हा निष्ठुरपणाच शेवटी त्यांच्या वाइटाला कारण झाला.

एके दिवशी मौलवीसाहेब शिकवायला सुरू करणार, तितक्यात चोवीसचे चोवीस विद्यार्थी उठून उभे राहिले आणि म्हणाले–"मौलवीसाहेब! आज आपला चेहरा पिवळा कां हो दिसतो आहे?"

मौलवीसाहेबांनी त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले. कारण त्यांची तब्येत बिघडली नव्हती, छान होती. म्हणून ते मुलांना दरडावून म्हणाले–"मूर्खांनो! तुम्ही आपा-पली पुस्तके उघडून वाचू लागा!"

परंतु विद्यार्थ्यांचा नायक मौलवीसाहे-बांच्या अगदी जवळ जाऊन घाबऱ्या आवा-जात म्हणाला–"मौलवीसाहेब! खुदा की कसम, आपला चेहरा हळदीसारखा पिवळा झाला आहे. आपली तब्येत बरी नसेल तर आज मी शिकवितो."

इतर विद्यार्थ्यांनी आपल्या रडक्या चेहऱ्याने मौलवीसाहेबांना दर्शविले की त्यांनी विश्रांती घेतली नाही तर घेरी येऊन पडतील की काय?

तेव्हा मौलवीसाहेबांना वाटले, कदाचित खरोखरच आपली तब्येत बरी नसेल. तरी त्यांना आजारी असल्यासारखं मुळीच वाटत नव्हते. परंतु तो आजार बाहेर दिसत नसला तरी काय कोणास ठाऊक एकाएकी दुखणे कसे उलटेल हे सांगवत नाही. म्हणून त्यांनी शिकविण्याची जबाबदारी विद्यार्थ्यांच्या प्रमुखावर टाकली आणि घरी निघाले. घरी जाऊन ते अंथरुणावर पडले आणि बायकोला म्हणाले–"मला कावीळ झाल्यासारखं दिसतं आहे. मला काढाबिढा करून दे!"

थोड्या वेळाने विद्यार्थ्यांचा प्रमुख मौलवीसाहेबांच्या घरी येऊन मौलवी-साहेबांच्या हातात चोवीस दीनार देत म्हणाला–"मौलवीसाहेब आपल्या शागि-र्दांनी आपल्या औषधपाण्यासाठी चंदा वसूल करून माझ्या हाती ही रक्कम पाठविली आहे; ही आपण स्वीकारावी."

ते ऐकून विद्यार्थ्यांविषयी मौलवीसाहे-बांच्या मनात अपार वात्सल्याची भावना उत्पन्न झाली. मौलवीसाहेबांनी त्या दिवशी शाळेला सुट्टी दिली. परंतु त्यांना विद्या-र्थ्यांनी ती रक्कम सुट्टीसाठी चंदा म्हणून वसूल केली असल्याचे माहीत नव्हते.

ते पैसे पाहून मौलवीसाहेबांना आनंद झाला हे खरे असले तरी त्यांना आपण आजारी पडलोच का, याबद्दल स्वतःवर राग आला. परंतु गंमत अशी विद्यार्थ्यांचा प्रमुख मौलवीसाहेबांच्या घरी जाऊन म्हणाला–"मौलवीसाहेब! खुदाची मेहर-बानी आपल्यावर असू द्या. परंतु आज आपला चेहरा कालच्याहून जास्त पिवळा दिसतो आहे!"

मौलवीसाहेब घाबरले आणि विचार करू लागले, काहीतरी चांगला इलाज केला पाहिजे. म्हणून मुलाकडून मिळालेली रक्कम त्यांनी औषध पाण्यासाठी खर्च कर-



ण्याचे ठरविले. ते विद्यार्थ्यांच्या प्रमुखाला म्हणाले–"हे पहा बेटा, शाळेची जबाबदारी आता तुलाच संभाळावी लागेल!"

एक आठवडा गेला. विद्यार्थ्यांचा प्रमुख आणखी चोवीस दीनार वसूल करून घेऊन आला आणि मौलवीसाहेबांच्या हातात देत म्हणाला–"आपल्या औषध पाण्यासाठी सर्व मुलांनी ही रक्कम वसूल करून दिली आहे. आपण मेहरबानी करून ही घ्यावी."

मौलवीसाहेबांना परमानंद झाला. तोपर्यंत त्यांना कोणताही आजार नसल्याचं चांगलं माहीत झालं होतं. तरी त्यांनी विचार केला कंठशोष करून शिकवीत बसण्यापेक्षा घरबसल्या मुलांनी चंदा वसूल करून औषधपाण्यासाठी देलेली रक्कमच जास्त फायद्याची आहे.

विद्यार्थ्यांचा नायक जेव्हांजेव्हां येई मौलवीसाहेब त्याला म्हणत–"बेटा, मला कोणतेच औषध लागू पडत नाही, आणि जिभेला चव अशी उरलीच नाही! अंगात थोडीसुद्धा शक्ती उरली नाही."

एक दिवशी मौलवीसाहेब अंडे उकळून ते फोडून खाण्याच्या तयारीत असता विद्यार्थ्यांचा नायक आला. त्याला पाहून मौलवीसाहेबांनी घाईघाईत ते अंडे खूप कढत होते तरी तोंडात टाकले. त्यांचे तोंड भाजले व तोंडाला फोड आले.

त्यावेळी विद्यार्थ्यांचा नायक पळून जाण्याऐवजी खोडसाळपणाने म्हणाला–"मौलवीसाहेब! आपले गाल सुजले आहेत हो! फोड किंवा गळू झालं आहे, वाटतं?"

मौलवीसाहेब तोंड भाजल्यामुळे घाबरलेले होते. त्यांच्या तोंडून शब्दच उमटत नव्हता. त्याच वेळी तो विद्यार्थी म्हणाला–"मौलवीसाहेब हा फोड फोडतो मी!" असे म्हणत तो सुई घेऊन मौलवीसाहेबांजवळ गेला.

मौलवीसाहेब चटकिशी उभे राहले आणि घरात पळून जाऊन परसात त्यांनी तोंडातले अंडे थुकून टाकले. परंतु तोपर्यंत तोंड आंतून छान पोळून निघाले होते. त्यानंतर त्यांनी न्हाव्याला बोलावून इलाज केला.





# चोर जाळ्यात अडकला

गढवालचे राज्य वैभवशाली व सुखी होते.

परंतु एकदा त्या राज्यात एक अट्टल चोर शिरला व त्याने राज्यभर दरोडे घालून धुमाकूळ माजविला. त्याला धरण्यासाठी राजाने अनेक प्रयत्न केले, परंतु यश मिळाले नाही.

त्या दरोडेखोराचे नाव जग्गू होते. राजाने जग्गू दरोडेखोराला पकडून देणाराला मोठे इनाम दिले जाईल अशी दवंडी पिटवून जाहीर केले. परंतु त्या चोराचा पत्ता कोणालाच लागला नाही. अशा परिस्थितीत प्रधान रामवर्मा याने दोन दिवसात चोराला धरून हजर करण्याचे वचन दिले. राजाला ते ऐकून आश्चर्य वाटले. इतके शिपाई आणि राज्यातली सर्व प्रजा यांनी जेथे हात टेकले तेथे एकटे प्रधान दोन दिवसात चोराला धरून देण्याची प्रतिज्ञा करीत आहेत, हे काय?

दोन दिवस संपत आले. दुसऱ्या दिवशी रात्री प्रधान आणि आणखी चार जण एक हृष्टपुष्ट बलदंड तरुणाला अटक करून घेऊन आले. त्याला त्यांनी राजासमोर उभे केले.

राजाने प्रधानाला विचारले–"प्रधान हा कोण हो?"

"महाराज, हाच जग्गू दरोडेखोर आहे. याचे साहस आणि घमेंड पाहून आश्चर्य होते. हा माझ्या घरी चोरी करायला आला आणि पकडला गेला. याला सकाळपर्यंत राजवाड्यातच कैद करून ठेवावे. उद्या याची जाहीर चवकशी करावी आणि काय ती शिक्षा याला द्यावी." प्रधानाने सुचविले.

दुसऱ्या दिवशी सकाळी जग्गू दरोडेखोर कैद झाल्याची गोष्ट वणव्यासारखी राजधानीभर पसरली. त्याची जाहीर चवकशी

पाहण्यासाठी लोकांचे थवेच्या थवे राजवाड्याकडे लोटले.

चवकशी फार वेळ चालली नाही. राजाने विचारतांच आपले नाव जग्गू असल्याचे मान्य केले आणि राज्यात अनेक ठिकाणी दरोडे घातल्याचे ही मान्य केले.

तेव्हा काहींनी त्याचे डोके छाटून टाकावे असे सांगितले. काही जणांनी त्याला फांसावर लटकवावे, अशी सूचना केली.

शेवटी प्रधान रामवर्माने सूचना केली–"महाराज! या चोराच्या मुळे आपले फार नुकसान झाले आहे. याला फाशीची शिक्षा देऊन किंवा याचा शिरच्छेद करून आपल्याला विशेष लाभ होणार नाही. याच्याकडून आपल्याला काही फायदाच करून घ्यायचा असेल तर सर्वांत उत्तम उपाय म्हणजे याला हद्दपारीची शिक्षा द्यावी, म्हणजे तो शेजारच्या राज्यात जाऊन तेथे लूटमार करून धुमाकूळ माजवील. त्या पासून शेजारच्या राजाला [illegible] आहे." हा मंत्र्याचा सल्ला राजकीय दृष्टीने राजाला फार आवडला.

राजाने त्याप्रमाणे चोराला हद्दपारीची शिक्षा सांगून सरहद्दी बाहेर निघून जायला सांगून सोडून दिले.

जग्गू दरोडेखोर तेथून निघाला. तो राज्याच्या सरहद्दीजवळ पोचला असेल, त्या निर्जनस्थानी त्याला एक तरुण भेटला. त्याने जग्गूला विचारले–"कोण रे तू?"

"मी जग्गू आहे!" जग्गू म्हणाला.

"तू खोटे बोलतो आहेस! खरा जग्गू चोर तर मी आहे. तू आपलं नाव बदलून विनाकारण या संकटात सापडला आहेस!" तो तरुण म्हणाला.

लगेच जग्गूचे सोंग करणाऱ्या प्रधानाच्या मुलाने खऱ्या जग्गूला धरले. त्याच्या पाठीमागून वेष पालटून येणाऱ्या राजाच्या शिपायांनी खऱ्या दरोडेखोर जग्गूच्या मुसक्या बांधल्या.

प्रधानाची युक्ती फळास आली.





# बोलके मौन

एका गावी रघू नावाचा शेतकरी रहात असे. त्याची फार मोठी शेतीभाती होती, गोठ्यात बैलाच्या चार जोड्या होत्या आणि गायवासरे ही होती. परंतु तो काटकसरीने राही. मुलगे वयात आल्यावर त्याने त्यांची लग्ने करून दिली आणि शेताची सर्व कामे त्यांच्यावर टाकली.

थोड्या दिवसांनी सुनांनी घराची सर्व जबाबदारी आपल्यावर घेतली. त्यांचे सासऱ्याशी पटत नसे. कारण तो पैपैचा हिशोब विचारी. व्यर्थ खर्च केलेला त्याला आवडत नसे. मुलं शेतावर जे उत्पन्न होई बापासमोर कोठारात आणून ठेवीत.

एकदा रघू आजारी पडला. मुलांनी वैद्याला बोलावून औषधपाणी करण्याचा विचार केला. परंतु म्हातारा कबूल होईना. तो म्हणाला–"मुलांनो! अरे हा आजार आपोआप बरा होईल. उगाच खर्च कशाला करता?" परंतु दिवसे दिवस आजार वाढतच गेला आणि शेवटी वाचाच गेली. त्या स्थितीत मुलांनी वैद्याला बोलावून औषधपाणी करण्याचे ठरविले. परंतु बापाने हाताने खूण करून नकार दिला.

आता रघूच्या सुनांना फावले. त्यांनी आपापल्या नवऱ्याला सांगून बापाच्या इस्टेटीचे वांटे करून घेतले.

एके दिवशी मोठ्या मुलाने रघूच्या खोलीत जाऊन म्हटले–"बाबा! ही खोली माझ्या वाट्यात आली आहे. याची दुरुस्ती करावयाची आहे. तेव्हां तुम्ही गोठ्यात पडून राहिलात तर?" त्याने बापाला गोठ्यात खाट टाकून तेथे पोचते केले.

तेव्हापासून रघूचे जिणे फार कष्टाचे झाले. वेळेवर खाणेपिणे मिळत नसे व औषध पाण्याची हयगय होऊ लागली. म्हणून रघू अगदीच अशक्त झाला.

एके दिवशी मोठा मुलगा गोठ्यात गेला होता, त्याला बापाची स्थिती फार नाजुक असल्याचे स्पष्ट दिसले. बाप काही सांगू लागला. त्याच्या डोळ्यातून कसली तरी इच्छा झळकत होती.

मोठ्या मुलाने धाकट्या भावाला बोलावून घेतले. त्यानंतर दोघी सुनासुद्धा तेथे आल्या. गावकरी रघूला भेटायला जमले. कोणाला तो काय म्हणतो आहे, कळेना.

शेवटी बराच वेळ विचार केल्यावर सर्वांना वाटले की रघूने बरेचसे धन कोठे तरी ठेवून दिले असावे आणि मुलांना ते वेळीच सांगून टाकण्याची इच्छा त्याच्या मनात असावी. परंतु चांगलं औषध पाणी झाल्याशिवाय त्याला बोलतां येणार नाही.

म्हणून दोघे मुलगे बापाला शहरातल्या मोठ्या इस्पितळात घेऊन गेले. तेथल्या तज्ञ वैद्यांनी उत्तम औषधे देऊन रघूचा आजार बरा केला. बराच खर्च होत असलेला रघूला पाहवत नव्हता. तरी [illegible] आणविला. रघू चांगला बोलू लागला.

घरी परतल्यावर मुलांनी व सुनांनी रघूच्या खाटेभोवती जमा होऊन विचारले– "बाबा! तुम्ही कोठे धनाचा सांठा ठेवला आहे का?"

रघू आश्चर्यचकित होऊन विचारले– "मी? नाही बुवा!"

"त्या दिवशी तुम्ही खुणावून सांगण्यासाठी धडपडत होता?" मुलांनी विचारले.

रघूने थोडे आठवल्यासारखे करून म्हणाला–"अरे हो, आठवले! गाईचें वासरू केरसुणी खात होतं. केरसुणी फुकट जाईल व वासराला काही होईल, म्हणून मी खुणावलं होतं. थोरला तेथे आला, त्याला मी सांगत होतो. कोणालाच ते कळलं नव्हते तर!" म्हणत म्हाताऱ्याने सुस्कारा सोडला.

रघू म्हणाला ते ऐकून मुलं व सुना वाचा बंद झाल्यासारखी परस्परांकडे पाहू लागली.





# योग्य स्थळ

फार पूर्वी काशी येथे विश्वनाथ नावाचा एक गरीब ब्राह्मण रहात असे. तो भिक्षुकी करून किंवा वेळ पडल्यास चौपद्री हाती घेऊन आपला उदरनिर्वाह चालवी. त्याला लावण्यवती नावाची एक सुंदर मुलगी होती. तिला त्याने लाडात वाढविले.

लावण्यवती वयात आल्यावर तिच्या लग्नाचा प्रश्न उभा राहिला. गरीब दरिद्र ब्राह्मणाच्या मुलीचे लग्न म्हणजे सामान्य गोष्ट नव्हती. शिवाय वाटेल त्याला मुलगी देण्याची इच्छापण विश्वनाथच्या मनात नव्हती.

त्याच सुमारास काशी नगरीत दवंडी पिटविली गेली–"एका राजाच्या मुलाकरिता वधू पाहिजे. सुंदर व सुशील मुलींच्या आईवडिलांनी सरकारी धर्मशाळेत राजनाथला भेटावे. वर आधाराशिवाय उभा राहू शकत नाही. तो नेहमी विचारात गढलेला असतो. चार चौघांचा सल्ला घेऊनच तो कोणतेही काम करतो. मान वांकेल एवढे वैभवाचे ओझे वहात असतो. काळ्या ढगासारखा गुणी आहे."

ती दवंडी ऐकून विश्वनाथ हसू लागला. म्हणजे वर लंगडा आहे, भ्रमिष्ट आहे, डोक्यावर टोपली वाहतो आहे. ढगासारखे बदलत राहून शेवटी पाण्यासारखे विरघळून जाणारा असणार. अशा अयोग्य मुलाला मुलगी देणारा कोण मूर्ख असेल?

ती दवंडी लावण्यवतीनेसुद्धा ऐकली होती. ती आपल्या वडिलांना म्हणाली– "बाबा! आपण धर्मशाळेत जाऊन चवकशी करू या की?"

"अग पोरी! तू अशा मुलाशी लग्न करणार?" बापाने विचारले.

परंतु लावण्यवतीने धर्मशाळेत जाण्याचा हट्ट धरला. तिच्या हुशारीची विश्वनाथला

खातरी होती. दोघे धर्मशाळेत गेले. लावण्यवती राजनाथला नमस्कार करून म्हणाली– "आपणच ना राजनाथ? आपल्या मुलाशी लग्न करायला मी तयार आहे!"

"मुली! तू मुलातले सर्व गुणदोष ऐकलेस ना? मुलावरच्या प्रेमामुळेच मी त्याच्या लग्नाचा विचार केला. म्हणून तू विचार करूनच काय ते ठरव!" राजनाथने तिला समजावून सांगितले.

लावण्यवती स्मित करून म्हणाली– "यात विचार करण्यासारखं काय आहे? आपल्या मुलाशी यापूर्वीच एकीचं लग्न झालं आहे. तेव्हा मला हरकत असण्याचं कारणच काय?" ते ऐकून राजनाथच्या तोंडावर स्मित झळकले. तो म्हणाला– "बरं तर मुली! मी तुला आपली सून करून घ्यायला तयार आहे!"

त्यानंतर राजनाथने विश्वनाथाच्या घराचा पत्ता व इतर गोष्टी विचारून टिपून घेऊन दोघांना निरोप दिला. घरी परत येत असतां विश्वनाथने मुलीला [illegible] आहे की ग?"

मुलगी म्हणाली– "बाबा! तो नवरदेव कोण आहे, असे वाटलं तुम्हांला? ते काशीचे युवराज आहेत. राजा धर्माचा अवलंब घेऊनच राज्य करू शकतो. त्याला सर्वदा प्रजेची काळजी वहावी लागते. मंत्र्यांचा सल्ला घेतल्याशिवाय तो कोणतेही काम करीत नाही. राजमुकुटाचे ओझे वहात असल्यामुळे त्याला खूप धनप्राप्ती होते आणि तो मेघासारखा वाफरूपी कर वसूल करून पावसासारखा प्रजेच्या सुखासाठी तो खर्च करतो." लावण्यवती म्हणाली.

"पण त्याची पहिली बायको म्हणजे कोण?" विश्वनाथने विचारले.

"आणखी कोण? भूमि!" लावण्यवती म्हणाली. ती म्हणाली ते खरे निघाले.

लावण्यवतीला घेऊन जाण्यासाठी सोन्याची पालखी आली. थोड्या दिवसांनी काशीच्या युवराजाशी लावण्यवतीचे थाटा-माटाने लग्न झाले.





# कर्तव्य पालन

रामशास्त्री हे आपल्या गावातले प्रसिद्ध वैद्य होते. ते गाव एका नदीच्या काठी वसलेले होते. दर बारा वर्षांनी त्या नदीच्या काठी एक जत्रा भरत असे. त्या वर्षी एके दिवशी संध्याकाळी रामशास्त्र्यांचे बालमित्र श्रीहरी व विठ्ठलराव रामशास्त्र्यांकडे आले. श्रीहरी एका शाळेत शिक्षकाचे काम करीत. विठ्ठलराव एका गावात न्यायाधीश होते.

रामशास्त्र्यांनी आपल्या मित्रांना सर्व देवळे दाखविली आणि सर्व संध्याकाळी घरी परतले. त्यांनी बायकोला तासाभराने सर्वांची पाने वाढण्याची तयारी ठेवायला सांगितले. नंतर तिघे मित्र आंगणात गप्पा मारीत बसले. रामशास्त्री गप्पांच्या संदर्भात म्हणाले– "मी आयुष्यभरात फक्त एकदा आपल्या कर्तव्यपालनात चूक केली, अन्यायच केला."

"एका गावातला एक श्रीमंत माणूस दर महिन्यात एकदा सर्व मित्रांना मेजवानी देत असे. त्यांनी अर्थातच मला देखील जेवायला बोलाविले होते. ते बोलावणे आलेले मला पाहून फार आनंद झाला. कारण गावातल्या प्रतिष्ठित लोकांत आपली गणना झाली. शिवाय जेवतांना चार श्रीमंत लोकांशी ओळख होईल व धंद्याच्या दृष्टीने पुढे सोयीचे होईल. म्हणून उत्तम वस्त्रे परिधान करून मी जेवायला निघणार, इतक्यात एक गरीब बाई रडत रडत आली आणि माझे पाय धरून तिचा नवरा फार आजारी असल्याचे सांगून म्हणाली– "वैद्यबुवा! मी दहा मुलांची आई आहे. माझे यजमान गेले तर आमचे हाल कुत्रासुद्धा खाणार नाही. ते बेशुद्ध होऊन पडले आहेत. त्यांना काय वाटेल ते करून वांचवा!"

  



"परंतु माझे लक्ष त्या दिवसाच्या मेजवानीवर होतं. शिवाय त्या गरीब बाईच्या नवऱ्याला वाचविल्याने मला विशेष प्राप्ती होणार नव्हती. म्हणून मी "मला एका अत्यंत जरूरीच्या कामाने बाहेर जावे लागत आहे, मला यावेळी फुरसत नाही," असे सांगून तेथून निघून गेलो.

"परंतु काही कारणाने त्या दिवशीची मेजवानी झालीच नाही. मी घरी परतलो आणि त्या गरीब बाईचा शोध काढीत तिच्या घरी गेलो. परंतु वेळेवर इलाज न झाल्यामुळे त्या बाईच्या नवऱ्याचे प्राणोत्क्रमण झाले होते."

"ही एक गोष्ट सोडून मी आपल्या कर्तव्यपालनात कधी चूक केली नाही."

[illegible] म्हणाले- तुमच्यासारखा मी सुद्धा एकदां आपले कर्त्तव्य बजावले नाही. मी एका जमिनदाराच्या शाळेत शिक्षकाचे काम करीत होतो. त्या शाळेत गावातल्या शेतकऱ्यांच्या मुलांबरोबर जमिनदारसाहेबांचा मुलगा देखील शिकत होता. परंतु बापाने स्थापन केलेली शाळा म्हणून मुलगा बेफिकीर वृत्तीने राही. कधी अभ्यास करीत नसे एक शेतकऱ्याचा मुलगा फार हुशार होता. तो प्रत्येक विषयात जमिनदाराच्या मुलापेक्षा जास्तगुण मिळवी.

"म्हणून जमिनदाराच्या मुलाने त्या शेतकऱ्याच्या मुलाला शाळेतून काढून टाकायला सांगितले. त्याच्या इच्छेविरुद्ध केल्यास त्याच्या बापाचा आपल्यावर क्रोध होईल असा विचार करून मी त्या शेतकऱ्याच्या मुलाला कधी न शिकविलेल्या विषयातून प्रश्न विचारले. तो मुलगा उत्तरे देऊ शकला नाही हे कारण सांगून मी शाळेतून त्याचे नाव काढून टाकले.

"शेतकऱ्याला माहीत होते की त्याच्या मुलावर अन्याय होतो आहे. परंतु जमिनदार साहेबांच्या भीतीने त्याला गप्प रहावे लागले. अशातऱ्हेने शिकून नाव काढू शकणारा मुलगा शेवटी बापाबरोबर शेतात काम करू लागला."

"माझ्या हातून सुद्धा एकदा अशीच चूक घडली होती." असे म्हणत विठ्ठलरावांनी घडलेली गोष्ट या शब्दात सांगितली. "एकदा माझ्या कोर्टात एकजण फिर्याद घेऊन आला. एका व्यापाऱ्याने एक मोठा वाडा आपल्या जमिनीत बांधताना त्याच्या जमिनीला लागून एका शेतकऱ्याची जमीन होती. त्या जमिनीवर त्या शेतकऱ्याचे झोपडे होते. व्यापाऱ्याने ती जमीन त्या शेतकऱ्याकडे विकत घेण्याची इच्छा दर्शविली. परंतु शेतकरी तरी विकायला तयार नव्हता. व्यापाऱ्याने आपल्या नोकरांकरवी झोपडे पाडवून जमीन बळकाविली.

"मला ती गोष्ट माहीत होती. परंतु त्या व्यापाऱ्याशी माझ्या बहिणीच्या लग्नाच्या गोष्टी चालू होत्या. तो व्यापारी वजनदार होता, म्हणून मी त्याच्या बाजूने निकाल दिला. हा एकच अन्याय माझ्या हातून घडला."









त्यानंतर रामशास्त्री म्हणाले–"याचा अर्थ थोडक्यात हा की एक चूक झाली खरी, त्यानंतर आपण सर्व आपापले कर्त्तव्यपालन बरोबर करीत आलो आहो."

असे सांगून रामशास्त्री घरात गेले आणि माजघरात जाऊन पाहतात तर जेवणाची तयारी नव्हती. घरी पाहुणेमंडळी आली आहेत ही गोष्ट जणुकाही बायकोच्या गावीच नव्हती. शांतपणे दाराआड बसून मित्रांचं चाललेले बोलणं ऐकत होती.

रामशास्त्र्यांनी दरडावून विचारले– "म्हणजे अजून सैंपाक वगैरे काही झालाच नाही तर?"

"नाही, आज मला बरं नाही. सर्व अंग मोडून आल्यासारखं झालं आहे." बायको म्हणाली.

रामशास्त्र्यांचा पारा चढला. कित्येक वर्षांनी बालमित्र आले आणि त्यांना आपल्या घरी उपास घडणार या विचाराने रामशास्त्री संतापून बायकोला मारायला गेले.

तेव्हा बायको म्हणाली–"थांबा तरी! मी फक्त एकदांच ना आपल्या कर्त्तव्यपालनात चूक केली. एवढ्यासाठी तुम्ही माझ्या अंगावर हात टाकायला निघालात? एक वेळ जेवायला नाही मिळालं तर जग नाही उलटत. कोणी मरत नाही? परंतु वैद्याने कर्त्तव्यपालन केले नाही तर एका माणसाचा जीव जातो. शिक्षक आपल्या एका विद्यार्थ्यावर अन्याय करतो आणि त्या मुलाचे जीवित नष्ट होते. न्यायाधीश चूक करतो त्याचे 'फळ निष्कारण भोगावे लागते एका गरीब शेतकऱ्याला. ही कामे-करणारे कर्त्तव्यपालनात एकदा जरी चूक करतील तर त्यांना क्षमा करता कामा नये. तुम्ही तिघांनी ही खूणगाठ प्रथम कडोसरीला बांधून ठेवली पाहिजे.

"तुम्ही देवळे पहायला गेला होता, तेव्हांच मी सैंपाक उरकला. उठा पाय धुवून या. वाढते जेवायला." रामशास्त्र्यांच्या पत्नीने नवऱ्याची कानउघाडणी केली.






अंजनेने केलेल्या अतिथिसत्काराची वाखाणणी करीत तिचा निरोप घेऊन रामचंद्र व त्याच्याबरोबर आलेले सर्व लोक अयोध्येला परतले.

वाटेत सीता यशोधरेला म्हणाली– "पाहिलंस, मी तुला सांगितलं होतं की नाही, तुझ्या पतीच्या जिवाला कोणत्याही प्रकारे धोका राहणार नाही! हनुमंताला शरण गेल्यामुळे ययातीचे रक्षण झाले."

यशोधरा त्याबद्दल सीतेचे आभार मानून म्हणाली–"हा सर्व सीतारामांचा अनुग्रह नाही का! हनुमंताच्या हृदयात श्रीरामचंद्राबरोबर तूसुद्धा होतीसच की! आम्हां सर्वांना दिसलीस! आमच्या डोळ्यांचं पारणं फिटलं!"

"होय ग सीते! आम्हीसुद्धा पाहिलं! किती अद्‌भुत दर्शन होते ते!" म्हणत अत्यंत आनंदोत्साहाने चंद्रांगद व चंद्रमुखीने टाळ्या वाजविल्या. यशोधरेने त्यांना 'हुःश' म्हणून गप्प केले आणि आपल्या मुलांकडे प्रेमवात्सल्याने पहात असलेल्या सीतेकडे वळून म्हणाली–"माते! तू लौकरच पुत्रवती माता होशील! तुझ्या तोंडावर दिव्य मातृकळा स्पष्टच दिसते आहे!"

सीता थोडी लाजल्यासारखी स्मित करून यशोधरेला म्हणाली–"वयाने तू माझ्याहून लहानच दिसते आहेस, परंतु इतक्या गोड मुलांची आई झाल्यामुळे तू माझ्याहून मोठीच आहेस; भाग्यशाली आहेस! तू म्हणालीस ते मी आशीर्वादच मानते."



अशा तऱ्हेने सीता त्यांच्याबरोबर गप्पा गोष्टीत रमून गेली आणि पालखीत बसून अयोध्येला आली. ययाती सकुटुंब रामाचा अतिथी म्हणून काही दिवस राहला. सीतेने तशी इच्छा दर्शविली होती. जितके दिवस यशोधरा व ययाती आपल्या मुलांबरोबर रामाकडे राहली सर्वकाळ सीता त्यांच्या बरोबरच बोलण्यात आनंदाने राही. मुलांना घरात व अंगणात खेळत असताना तन्मय होऊन सीता पाहात राही.

काही दिवसांनी ययाती व यशोधरा सीतारामांच्या निरोप घेऊन आपल्या राजधानीला निघून गेली.

एकदा पौर्णिमेला संध्याकाळी रामसीते-बरोबर अंत:पुरातील उद्यानात फिरत होता. त्याच वेळी चंद्राचा उदय झाला. राम सीतेला पूर्वदिशेकडे बोट दाखवीत म्हणाला–"जानकी! तिकडे पहा!"

सीता म्हणाली–"पूर्व दिशेच्या रूपे कौसल्येच्या पोटी रामचंद्राचा उदय होतो आहे!"

राम म्हणाला–"नाही! सीतादेवीच्या पोटी तसा चंद्रोदय होणार आहे, असे पूर्वदिशा भविष्य सांगत आहे!"

"तो चंद्र रामचंद्रासारखाच आहे, असे-देखील ती म्हणते आहे, नाही का?" सीता म्हणाली.

"छे:! ती म्हणते आहे, तो चंद्र जानकी-देवीसारखा आहे!" राम म्हणाला.

दोघं परस्परांवर अशा कोट्या करीत आनंदाने चांदण्यात विहार करीत होती. दोघांनी एका चंद्रशिलेवर बसून सरोवराकडे पाहिले. त्यांना सरोवरात दोन कमळे जुळ्या मुलांसारखी उमलेली दिसली. सीतेची नजर त्या कमळांवरच खिळलेली होती. त्याच मन:स्थितीत ती रामाबरोबर अंत:पुरात गेली.

थोडी रात्र उलटल्यावर सीता एकाएकी उठून राजवाड्यातून उद्यानाकडे पाहू लागली. दुधासारखं शुभ्र चांदणं पडलं होतं. सरोवर त्या प्रकाशात चकाकत होतं. ती दोन कमळे आकाशात चकाकणाऱ्या दोन नक्षत्रांसारखी चकाकत असल्यासारखी सीतेला भासली.

तिकडे गंधमादन पर्वतावर हनुमान रामनामाचा जप करीत होता. किती काळ लोटला हे कळलेच नाही. कित्येक वर्षे लोटली. एके दिवशी अयोध्येहून रामाच्या अत्यंत विश्वासातला भद्र नावाचा सेवक हनुमंताकडे येऊन म्हणाला–"तुला रामाने बोलाविले आहे!"

भद्रकडे पाहिल्यावर तो फार चिंतेत असल्यासारखा हनुमानाला वाटला: हनुमानाने त्याला विचारले–"असं झालं तरी काय अयोध्येला?"

भद्र सुस्कारा सोडीत म्हणाला–"व्हायचं काय राहिलं आहे......!"

"तू काय म्हणतो आहेस, ते जरा नीट-नीट सांग!" हनुमान म्हणाला.

"थोडक्यांत सांगतो!" असे सांगून भद्रने जे घडले ते या शब्दात सांगितले:

"एके दिवशी ऋषींना बरोबर घेऊन काही ब्राह्मण रामाकडे आले. म्हणाले–'शंबूक नावाचा एक शूद्र तपश्चर्या करीत आहे. त्यामुळे धर्माचा अध:पात झाला आणि एका ब्राह्मणाच्या मुलाला अकाली मरण आले. तेव्हां शंबूकाचा लौकर वध करावा अशी आमची आज्ञा आहे!'"



"सर्व वर्गातील प्रजेला सुखी करण्याचे व्रत घेऊन राज्य करण्याचे रामाने ठरविले असल्यामुळे, त्याने साधूसारखे जीवित घालवीत असलेला शंबूक खाली मान घालून तपश्चर्या करीत होता त्या जागी जाऊन त्याचा व । केला. तेव्हा शंबुकाची बायको कपिला रामाला म्हणाली–'राजा! तुझ्यावर काही तरी मोठा अनर्थ ओढवणार आहे! त्याची पूर्वसूचना म्हणूनच तू हे भयंकर कृत्य केले आहेस!' असे सांगून तिने प्राण सोडला.

"ही घटना घडली त्यानंतर काही दिवसांनी, राम एके दिवशी रात्री वेष पालटून भद्राच्याबरोबर अयोध्येत फिरत



असता एका धोबी घाटावर पोचला. तेथे एका धोबी जोडप्याचे भांडण चालले होते. धोब्याने मारल्यामुळे धोबिणीची पाठ रक्तबंबाळ झाली होती. ती ओक्सा-बोक्शी रडत म्हणाली–'त्या सीतेला रामासारखा महाराजसुद्धा घरी घेऊन आला. मात्र तूच एकटा महापुरुष म्हणून मिरवितो आहेस!' खूप पिऊन झिंगलेला धोबी चिडला आणि बायकोच्या झिंज्या धरून म्हणाला–'राजाला कोण विचारील ग? इतके दिवस परपुरुषा-कडे राहिलेल्या बायकोला घरी घेऊन येणारा मी खुळा राम आहे, असे वाटलं होय तुला?'

घरी परत आल्यावर रामाने सीतेला वनवासात सोडून यायला लक्ष्मणाला आज्ञा केली. त्यावेळी सीतेला डोहाळे लागले होते. अदल्या दिवशीच ती रामाला म्हणाली होती की मला मुनींचा आश्रमात मुनिपत्नींच्या सान्निध्यात रहावेसे वाटते आहे. ते निमीत्त सांगून लक्ष्मण सीतेला रथात बसवून अरण्यात सोडून आला.

"सीतेचा त्याग केल्याने रामाला भूक तहान लागेना व झोप येईना. भद्रला हे सर्व पाहवले नाही. भद्रने रामाला लहानपणी अंगाखांद्यावर वाढविले होते. तान्ह्या रामाने चांदोबा हवा म्हणून सर्व राजवाडा डोक्यावर घेतला तेव्हा भद्रने त्याला आरशात चंद्र दाखविला. त्यावेळी आपले तोंड व चंद्रबिंब आरशात पाहून राम म्हणाला होता–'राम...चंद्र!' लगेच भद्रने प्रेमाने रामाच्या गालाला आपला गाल लावून विचारले–'आणि आता?' तेव्हा राम लगेच लडिवाळपणे म्हणाला–'आता 'रामभद्र'! तेव्हापासून रामाला 'रामचंद्र' व 'रामभद्र' ही नावे मिळाली. अशा रामभद्राला त्या परि-टाच्या तोंडचे ते शब्द इतके झोंबले की त्याचा शिरच्छेद करावा असे त्याला साहजिकच वाटले. तो धोबी जातीच्या वस्तीत गेला.

"इतक्या उद्धटपणाने बोलणाऱ्याला खूप बडवून काढण्यासाठी आम्ही गेलो तर तो पळून गेला होता. त्याची बायकोसुद्धा कोठे दिसली नाही!" असे त्या वस्तीतल्या लोकांनी भद्रला सांगितले. ती दोघं जिथे मिळतील तिथून त्यांना धरून घेऊन या, अशी आज्ञा करून काही जणांना पाठविले. परंतु ते कोठेच सापडले नाहीत.

लक्ष्मण सोडून गेल्यावर सीता नदीकाठी गेली व एका खडकावर उभी राहून नदीत जीव द्यायला तयार असतां वाल्मीकी ऋषी आले व त्यांनी तिला समजावून सांगून आपल्या आश्रमात नेले. सीतेला दोन जुळी मुले झाली. त्यांची नावे कुश व लव वाल्मीकी ऋषींनीच त्यांना सर्व विद्या शिकवून पारंगत केले. त्यांनी स्वत: रचलेले रामायण त्या दोघांना गायला शिकविले. सीतेने धनुर्विद्या शिकविली.

"एके दिवशी कुशलव रामायणातला राम कसा आहे, त्यांच्या आईचे नाव असलेली सीता कशी आहे हे पाहून येण्यासाठी राम-कथेचे गायन करीत अयोध्येला गेले.

"मध्यंतरी वसिष्ठ मुनींनी विचार केला की रामाला सीतेच्या विरहाचा जो ताप होत आहे तो थोडा कमी करता आला तर पहावा, यासाठी रघुवंशाच्या रीतीला अनुसरून अश्वमेध यज्ञ करायला सांगावे.



त्यांनी सूचना केली. सीतेची सोन्याची मूर्त शेजारी ठेवून रामाने अश्वमेध यज्ञ केला. त्याच दिवशी लवकुश मुनिबालक म्हणून रामायण गान करीत अयोध्या नगरीच्या राजपथावर हिंडत असलेले आढळले. लक्ष्मणाने त्यांना पाहिले त्यांना घेऊन राजवाड्यात आला.

"राजवाड्यात त्या दोघां बालकांनी सीतेच्या अग्निप्रवेशाची कथा डोळ्यासमोर चित्र उभे केल्यासारखी गाऊन म्हणून दाखविली. तेथे अंत:पुरातील कौसल्यादी सर्व स्त्रिया हजर होत्या. यज्ञकार्यात मग्न असलेली वडीलधारी पुरुषमंडळीसुद्धा हजर होती. प्रमुख नागरिकही हजर होते.



सर्वांच्या डोळ्यातून घळघळा अश्रुधारा वहात होत्या. सीतेचे नाव घेताच तिचे रूप प्रत्यक्ष डोळ्यासमोर उभे राही. सर्व हात जोडून तिला नमस्कार करीत. रामाने त्यांना मुनिबालकच समजून अत्यंत आनंदाने पोटाशी धरून निरोप देतांना अनेक भेटीच्या वस्तू दिल्या.

"यज्ञाच्या सर्व प्रारंभिक क्रिया संपल्यावर रघुवंशाची सूर्यचिह्न असलेली पताका बांधून यज्ञाचा घोडा सजवून तयार झाला व त्याला स्वेच्छापूर्वक जिकडे जावयाचे असेल तिकडे जावयास मोकळीक करून सोडण्यात आले. तो घोडा पळत सरळ वाल्मीकि ऋषींच्या आश्रमा शेजारी गेला. घो [illegible] होता. त्यावर लिहिलेले वाचून तो रामाच्या अश्वमेध यज्ञाचा घोडा असल्याचे कळल्यावर लवकुशांनी त्याला धरून आश्रमात आणून बांधून ठेवले.

"घोड्याला सोडविण्यासाठी शत्रुघ्न, भरत व लक्ष्मण एकामागून एक युद्ध करीत असता बेशुद्ध होऊन पडले. रामाने स्वतः जाऊन युद्ध केले. लवकुशांनी आपल्या पतिव्रता मातेचे स्मरण करून बाण सोडले. ते लागून रामसुद्धा बेशुद्ध होऊन पडला. सीतेने पुढे जाऊन रामाचा पदस्पर्श करताच रामाला शुद्ध आली.

'सीता साध्वी पतिव्रता आहे, तिला अयोध्येला घेऊन जा' असे वाल्मीकी ऋषींनी रामाला सांगितले. तेव्हा राम म्हणाला—"सीतेने तशी प्रतिज्ञा करून अयोध्येच्या नागरिकांची खात्री करून दिली तर बरे होईल."

"त्याप्रमाणे सीता अयोध्येला गेली व आपल्या दोघां मुलांना रामाच्या हाती देऊन म्हणाली—'माझ्या पातिव्रत्याचं प्रमाण म्हणून भूदेवी मला आपल्या पोटात ग्रहण करो!' सीतेच्या तोंडून ते वाक्य बाहेर पडताच भूकंप झाला. सर्वत्र अंधःकार पसरला. विजा चमकू लागल्या. जमीन हादरू लागली. सर्व अयोध्यावासी घाबरून
















आपापल्या घराबाहेर आले आणि सीता उभी होती तेथे जमा झाले. सीता उभी होती तेथे भूमी दुभंगली आणि आंतून हिऱ्या माणिक्यांनी मढलेल्या सिंहासनावर बसून भूदेवी बाहेर आली. ते सिंहासन नागस्त्रियां खांद्यावर घेऊन आल्या होत्या. भूदेवी सिंहासनावरून उतरली आणि आई मुलीला उचलून घेते तशी सीतेला दोन्ही हातांनी उचलून घेऊन सिंहासनावर आपल्या मांडीवर घेऊन बसली. पुन्हा एकदा भूकंप झाला. अयोध्या नगरी डोलू लागली. परंतु आश्चर्य म्हणजे एकाही घराचे कौलदेखील खाली गळून पडले नाही. सीतेबरोबर भूदेवी भूगर्भात निघून गेली आणि भूमी दुभंगली होती या गोष्टीचे चिह्नदेखील दिसले नाही. सर्व थक्क होऊन पहात असतां पापणी लवायच्या आत हे सर्व घडले.

"रामाला राग आला. 'भूमीला भग्न करतो' असे म्हणत त्याने धनुष्यावर बाण चढविला. तेव्हा आकाशवाणी झाली– "रामा! सर्व रघुवंशियांनी पृथ्वीचे अत्यंत प्रेमाने रक्षण व पालन केले आहे. तू तिला भग्न करणार? स्वतः प्रतिज्ञा करवून तू तीला माहेरी पाठविलेस आणि आतां राग कोणावर कशाला काढतोस!" राम मान खाली करून गप्प बसला.

"रामाने लवकुशांचा राज्याभिषेक केला आणि स्वतः एक खिन्न करुणमूर्ती म्हणून राहू लागला आहे.

"अश्वमेध यज्ञ चालून होता. यज्ञाचा घोडा उत्तरेकडून पूर्वेकडे निघाला. लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न त्याच्या पाठोपाठ सैन्य घेऊन जात होते." असे सांगून भद्र गप्प झाला.

हनुमंत दगडाच्या मूर्तीसारखा काही बोलल्याशिवाय मौनपणे सर्व ऐकत होता. परंतु त्याच्या डोळ्यातून अश्रूधारा सतत वहात होत्या. तो एकदम उभा राहिला व म्हणाला–"बरं तर मी रामाकडे जातो, तू पाठीमागून ये!" असे भद्रला सांगून हनुमानाने गदा खांद्यावर घेऊन आकाशात उड्डाण केले आणि अयोध्येला गेला.





# रुरू व प्रमद्वरा

हजारो वर्षांपूर्वी सिंधु व सरस्वती नद्यांच्या किनाऱ्यांवर एक थोर सभ्यता उदयास आली. त्या काळची प्रजा निसर्ग आणि देव यांच्या अगदी जवळपास असे.



त्यांच्यात वेदकर्ते ऋषी होते. ते सर्वदा सुखी जीवन आणि दीर्घ आयुरा-रोग्याच्या अपेक्षेने जन्म व मरण यांचे गूढ उकलण्यातच जीवित घालवीत. रुरू या तरुणाची कथा तेव्हांची आहे.



रुरू हा एक ऋषीकुमार होता. प्रमद्वरा या गंधर्वकन्येला ऋषीने वाढविले. दोघं अरण्यात व नदी-काठावर स्वेच्छापूर्वक आनंदाने हिंडत व खेळत.



दोघांची वये लग्नायोग्य झाल्यावर दोघांचे लग्न ठरले. लग्नाच्या एक दिवस आधी रुरुने जंगलात जाऊन प्रमद्वरासाठी फुले आणली. त्याला परत येत असता प्रमद्वराने पाहिले.

इतक्यात एक साप प्रमद्वराला चावून पळून गेला. रुरुने तिला विवर्ण झालेल्या मुखाने ती पडत असतां चटदिशी धरले.





प्रमद्वरा तेव्हा मेली नव्हती. त्याची हाक ऐकून तिने डोळे उघडले. परंतु तोंडातून शब्द' उमटेना. तिने डोळे मिटले.

आश्रमातील मुनिपत्नींनी येऊन प्रमद्वरेचा मृतदेह उचलून नेला. रुरु बराच वेळ स्तब्ध एकटा बसून होता. प्रमद्वरेला त्याच्यापासून दूर ओढून नेणारा मृत्यू कोण व कसा आहे ?





रुरु आपल्या नशिबाला दोष देत अनेक दिवस रानावनात हिंडत राहिला. त्याच्या मनाचं सांत्वन करण्याचं साहस कोणालाही झालं नाही. तो शाप देईल या भीतीने सर्व बोलायला सुद्धा धजले नाहीत.

शेवटी कामाने त्याच्यासमोर प्रत्यक्ष दर्शन देऊन त्याला यमलोकाला जाण्याचा मार्ग सांगितला.





रुरू यमलोकीं गेला. तेथील भयंकर रूपधारी यमदूतांकडे दुर्लक्ष करून तो सरळ यमाजवळ गेला.



परंतु यम त्याच्या विनवण्यांसमोर अगर प्रलोभनांसमोर नमला नाही. रुरू अर्धे आयुष्य द्यायला तयार झाल्याशिवाय प्रमद्वरा पुनर्जीवित होत नाही हे कळले. रुरूने निःसंकोच पणे आपले अर्धे आयुष्य दिले.



दुसऱ्या क्षणाला रुरू व प्रमद्वरा भूलोकी आले. दोघं झोपेतून जागे झाल्यासारखी उठली. त्यांच्या लग्नाला अनेक ऋषींनी उपस्थित राहून त्यांना आशीर्वाद दिला.

# गोष्ट मथळा चढाओढ

## या गोष्टीला सुंदर मथळा सुचवून रु. २५ मिळवा!

?

एके दिवशी एक राजा एका संन्याश्याच्या भेटीला येऊन म्हणाला—"महात्मन्! ईश्वर प्राप्तीसाठी आपल्यासारखे थोर पुरुष या जगातल्या सर्वस्वाचा त्याग करतात. ते आमच्या सारख्या सामान्यांना साध्य नाही. मी इहलोकाच्या बंधनांतून मुक्ती न मिळाल्यामुळे किती पापे करतो आहे, हे माझे मलाच कळत नाही."

राजा म्हणाला ते ऐकून संन्यासी चिडल्यासारखा होऊन म्हणाला—"असं कां म्हणतोस रे, राजा? तू माझ्याहून थोर त्यागी पुरुष आहेस! तुझे चरणामृत मी तीर्थ म्हणून डोक्यावर शिंपडले पाहिजे!" राजाला संन्यासी थट्टा करीत आहेत असं वाटलं. त्याने विचारलं— "स्वामी! असं कां म्हणता?

"मी खरंच म्हटलं, बाबा! हा लोक मोठा की देव मोठा, सांग पाहू!" संन्याश्याने विचारले.

"देव मोठा!" राजा म्हणाला.

"मी इहलोकाचा त्याग केला तर तू अनन्यभावे देवाचा त्याग केलास, होय की नाही? तुझा त्याग केवढा मोठा आहे!" संन्यासी म्हणाला.

★ ★ ★

वरील गोष्टीला उपयुक्त होईल असा एक सुंदर मथळा विचार करून एका कार्डावर स्वतःच्या पत्त्यासह लिहून "गोष्ट मथळा चढाओढ", 'चांदोबा', चंदामामा प्रकाशन, २ व ३ अर्काट रोड, वडपळणी मद्रास ६०० ०२६ या पत्त्यावर पाठवा.

१० मे १९७८ च्या आत पोस्टकार्ड पोंचले पाहिजे. त्या कार्डावर 'फोटो चढाओढ परिचय' देता कामा नये.

चढाओढीचा निकाल जुलै १९७८ च्या चांदोबात जाहीर करण्यात येईल.

---

मार्च महिन्यातल्या चढाओढीचा निकाल (मथळा) "धुर्तता"



# अमरवाणी

सुखदु:खे भयक्रोधौ,
लाभालाभौ, भवाभवौ,
यच्च किंचित् तथा भूतम्
ननु दैवस्य कर्मतत् ॥ १ ॥

[कारण न दिसता घडून आलेले सुखदु:ख, भय व क्रोध, लाभ व हानी आणि जन्म व मरण ही सर्व दैववशात घडलेली असतात.]

ऋषयो प्युग्रतपसो
दैवे नाभिप्रपीडिता:
उत्सृज्य नियमां स्तीव्रान्
भ्रश्यन्ते काम मुन्युभि: ॥ २ ॥

[अत्यंत उग्र तपश्चर्या करणारे ऋषी मुनीसुद्धा दैववशात तपश्चर्येचे सर्व यमनियम भंग केल्यामुळे कामवश होऊन भ्रष्ट होतात.]

असंकल्पित मे वेह
य दशस्मात् प्रवर्तते
निवर्त्यारंभ मारब्धं
ननु दैवस्य कर्मतत् ॥ ३ ॥

[प्रयत्नपूर्वक सुरु केलेले काम थांबवून, अकस्मात, कधीही कल्पनेत न आलेले काम सुरु करणे हे दैवच म्हटले पाहिजे.]



# कावळा आणि घुबड

[ ५८ ]

राजा व त्याचे चारही मंत्री यांचा स्थिरजीवीच्या बोलण्यावर विश्वास बसला. म्हणून रक्ताक्षीने स्थिरजीवीवर विश्वास करणे धोक्याचे आहे, असे सांगितले असूनही दुर्लक्ष करून ते स्थिरजीवीला आपल्या गुप्त निवासस्थानी घेऊन गेले.

वाटेत स्थिरजीवी मनात म्हणाला–"एकटया रक्ताक्षीने माझ्या मनातला हेतू ओळखला. इतरांनी भाग्य फुटके म्हणून त्याच्या सल्लयाची पर्वा केली नाही."

सर्व डोंगरातल्या गुहेत पोचल्यावर अरिमर्दन म्हणाला–"स्थिरजीवी आपला हितैषी आहे. त्याला रहायला आपल्या किल्लयात त्याला आवडेल ती जागा द्या."

ते ऐकून स्थिरजीवी मनातल्या मनात म्हणाला–"आपण आलो आहो, या सर्वांचा सर्वनाश करण्याकरिता. किल्लयात राहालो तर यांना सर्व कळेल. मुख्य करून रक्ताक्षी व त्याचे अनुयायी हजार डोळयांनी आपल्यावर नजर ठेवतील. त्यापेक्षा किल्लयाच्या दाराजवळच राहलो, तर किल्लयात घाईच्या कामाने येजा चालली असतां आपल्याकडे कोणाचं लक्षही जाणार नाही. आपले कारस्थान यशस्वी होईल."

असा विचार करून तो अरिमर्दनला म्हणाला–"महाराज! आपण किती उदार विचाराचे आहां! मला किल्लयाच्या फाटकाजवळ थोडीशी जागा दिलीत तरी पुरे."

अरिमर्दनाने स्थिरजीवीची नम्रता पाहून खुषीने, त्याने इच्छिल्याप्रमाणे व्यवस्था करून दिली. त्याची प्रकृती लौकर सुधारावी यासाठी पौष्टिक आहाराची व्यवस्था करून देण्यात आली. थोडयाच दिवसात स्थिरजीवीची प्रकृती छान सुधारली.

आपल्या सल्ल्याविरुद्ध स्थिरजीवीची व्यवस्था केलेली पाहून रक्ताक्षी राजाला म्हणाला–"सोन्याची शीट घालणाऱ्या पक्ष्याला सोडणारा राजा आणि मंत्र्यासारखे आपण अविवेकाने वागत आहां."

"काय ती गोष्ट, ऐकू दे तरी?" राजाने व मंत्र्याने विचारल्यावर त्यांना रक्ताक्षीने सांगितली ती गोष्ट अशी :

एकदा एका डोंगराच्या दरीत एक पक्षी रहात असे. तो सोन्याची शीट टाकी. एक शिकारी ती विचित्र गोष्ट पाहून फार चकित झाला. आपण जाळे टाकून त्याला पकडून आपल्याजवळ ठेवले आणि ते कळले तर राजा आपल्याला शिक्षा करील या भीतीने शिकारी त्याला धरून राजाकडे गेला व म्हणाला–"महाराज! या पक्ष्याची शीट म्हणजे शंभर नंबरी सोने आहे. मी आपल्याला एक भेट म्हणून देण्यासाठी या पक्ष्याला घेऊन आलो आहे."

राजा मंत्र्यांना म्हणाला–"आश्चर्यंच आहे! हे काय आहे, पाहू या का?"

"महाराज, पक्षी आणि तो सोन्याची शीट टाकतो, कोणी कधी ऐकलं आहे का? आपला या मूर्ख माणसाच्या बोलण्यावर विश्वास कसा काय बसला?" मंत्री म्हणाले.

म्हणून राजाने त्या पक्ष्याला सोडून दिले.

अरिमर्दन आणि त्याचे मंत्री ती गोष्ट ऐकूनही आपला विचार न बदलतां स्थिर-जीवीचा जास्तच आदर करीत राहिले.



तेव्हा रक्ताक्षी आपल्या अनुयायांना गुप्तपणे म्हणाला–"हे राज्य नष्ट होणार आहे. याचा शेवट जवळ येऊन ठेवला आहे. राजाचे व मंत्र्याचे रक्षण करणे अशक्य आहे. त्यांच्या हिताचं सांगावे ते त्यांना पटत नाही. थोडा वेळ मध्यंतरी मिळतो आहे, किल्ला सोडून निघून जाऊ या. शत्रू कधी खरा मित्र असू शकतो का? मागे एक गुहा बोलत असे म्हणे."

"गुहा बोलत असे?" अनुयायांनी विचारतां रक्ताक्षी गोष्ट सांगू लागला :

एका दाट अरण्यात खरनख नावाचा एक सिंह रहात असे. एकदा तो अरण्यभर सबंध दिवस फिरला तरी त्याला खायला शिकार मिळाली नाही. उपासामुळे त्याचा जीव कासावीस होत होता. सूर्यास्ताची वेळ होती. त्याला एक मोठी गुहा दिसली.

रात्री या गुहेत नक्कीच कोणी तरी प्राणी येऊन राहील. तेव्हा त्याला धरून त्याची शिकार करतां येईल, असा विचार करून तो सिंह त्या गुहेत शिरून पडून राहिला.

त्या गुहेत एक कोल्हा रहात असे. काही वेळाने कोल्हा आला आणि हाक मारू लागला–"ए गुहे! अग ए गुहे!"

काही वेळ थांबून कोल्ह्याने पुन्हा हाक मारली. परंतु उत्तर आले नाही.

कोल्हा गुहेला तिसऱ्यांदा हाक मारून म्हणाला–"मी रात्री येईन तेव्हा माझी हाक ऐकून तू 'ओ' देशील असं आपलं ठरलं होतं, विसरलीस का? तू आपलं वचन पाळलं नाहीस तर मी त्याच अटीवर दुसऱ्या गुहेत जाऊन राहू लागेन."

ते ऐकून सिंह विचार करू लागला, ही गुहा हाक मारली की उत्तर देत असावीशी दिसते. मी बोललो नाही तर कोल्हा निघून जाईल आणि मला उपाशी मरावे लागेल. असा विचार करून सिंह म्हणाला–"ओ!" त्याने "ओ" म्हटल्याबरोबर गुहा दुमदुमली.

कोल्हा हसून म्हणाला–"अस्सं होय! गुहा बोलते हे कधी कोणी ऐकलं आहे का?" असे म्हणत तो पळून गेला.



# १९६. यिन राजाची समाधी

चीन देशातील होनान प्रांतात अन्यांगजवळ ई. स. पू. १२व्या शतकाचा प्रारंभ झाला त्यावेळच्या यिन राजाच्या समाधीचा शोध लागला आहे. तिला टाकीने साफ केलेले नाही. समाधीच्या आत कांस्याच्या सापडलेल्या वस्तूवर कोरलेली नावे पाहिल्यावर ती यिन वंशातील वुटिंग याच्या राणीची असावी, असे दिसते. (यिन राजवंशाचा काळ ई. स. पू. १६ ते ११ शतकांच्या दरम्यान मानतात.)

या समाधीत सुमारे २०० कांस्याची भांडी सापडली आहेत. त्यापैकी ७० टक्के पेयपात्रे आहेत. ह्यांच्यातली मोठी जोडया जोडयांनी आहेत. त्यांच्यावर प्राण्यांची डोकी रेखाटलेली आहेत.

समाधीत ४०० जेडच्या आणि दगडी वस्तू आहेत. त्यांच्यात दहा माणसांच्या मूर्ती आहेत. त्यांच्यावरून त्या काळातील पोशाख आणि वस्त्र धारण करण्याची पद्धत कळते. विचित्र म्हणजे त्यांच्यात एक अर्धनारीश्वर मूर्तीसुद्धा आहे. इतर कला शिल्प म्हणजे वाघ, अस्वले, हत्ती, बैल, मेंढरे, घोडे, माकडे, पोपट, घारी वगैरे प्राण्यांची चित्रे आहेत.





# माया सरोवर

[ २८ ]

[ मायासरोवरेश्वराने चोरासारखे झाडाआड लपून जयशीलच्या गळ्यात फास टाकला. तो तोडून टाकण्याच्या बेतात जयशील असता मायासरोवरेश्वर थोडा नीट बोलला. नंतर तो, कांचनमाला, जयशील व केतू मायासरोवराकडे निघाले. ती बातमी सिद्धसाधकाला नरभक्षक जातीच्या लोकांकडून कळली. पुढे– ]

नरभक्षकांनी सर्व सांगून विचित्र हत्तीवर बसून जाणाऱ्या व्यक्तीविषयी आणि बरोबर धरून घेऊन जात असलेल्या माणसाविषयी वर्णन केल्यावर सिद्ध-साधकाला आपला मित्र जयशील संकटात सापडला असल्याचे सहजी कळले. परंतु त्याच्या बरोबर असलेली ती तरुण स्त्री कोण असावी, हे त्याच्या लक्षात आले नाही.

नरभक्षकांनी सांगितलेले वृत्त ऐकून कनकाक्ष महाराज चकित झाले. त्यांना सिद्धसाधक म्हणाला–"महाराज, आतां मला निरोप द्या. माझा मित्र जयशील याला धरून घेऊन ते दुष्ट मायासरोवरा-कडे चालले आहेत. इतका शूर व पराक्रमी माणूस त्यांच्या हातात कसा सापडला हे मला कळत नाही. त्याला सोडविण्यासाठी मी धावलेच पाहिजे."



असे म्हणत तो वनमाणसाच्या खांद्यावर चढून बसला.

कनकाक्ष महाराज त्याला म्हणाले–"साधका, त्याच्या रक्षणाची जबाबदारी माझ्यावर सुद्धा आहेच! मी सुद्धा येतो. आपण जास्त वेळ न घालविता, ते मायासरोवर कोठे आहे, शोधून काढले पाहिजे. तू या जलवृकाला त्याची वाट विचारून का घेत नाहीस?"

सिद्धसाधकाने जलवृकाकडे वळून त्याच्या छातीवर आपले शूल ठेवीत त्याला विचारले–"कायरे जलवृका? तू माझा विश्वासपात्र नोकरच आहेस ना की

काढून घेण्यासाठी हेर म्हणून आला आहेस?"

तो प्रश्न ऐकून जलवृक थोडादेखील भ्याला नाही. त्याने आपली दगडी गदा सिद्धसाधकाच्या पायाजवळ ठेवली व म्हणाला–"मालक, खरा जलवृक दिलेले वचन कधी भंग करीत नाही, तसे वचन भंग करणाऱ्याची आम्ही पाण्यातला कोल्हा म्हणून शिकार करतो. मी आपला सेवक व दास आहे!"

"तर मग सांग, मायासरोवर कोठे आहे?" सिद्धसाधकाने त्याला विचारले.

"मालक! मी याविषयी पूर्वीच सांगितले होते, ते सरोवर कोठे आहे, हे मी सांगितले तर माझे डोके फुटून जाईल. सरोवराच्या राजाने व आमच्या राजाने मिळून आमच्या जातीच्या सर्वांना दिलेला तो एक शाप आहे." दीनमुद्रेने जलवृक म्हणाला.

ते ऐकून साधक मोठ्याने हसून म्हणाला–"त्या मूर्ख पाणपक्ष्याला शाप देण्याची शक्ती असती तर तो हंसांच्या रथातून खाली घसरून पडला असता का? आणि नरभक्षकांच्या रांजणातल्या उकळत्या पाण्यात पडला असता का? तेव्हा हे कारण माझ्या जवळ सांगू नकोस."

जलवृक आपादमस्तक थरथर कापत होता तरी धीर करून म्हणाला–"मालक! आपल्याला माझ्या बोलण्यावर विश्वास होत नाही, तेव्हा मला मरण टळणे शक्य नाही. तेव्हा मी तोंडाने न सांगता नकाशा काढून सुचविले तर कदाचित मी वाचेन, असे वाटते. म्हणून प्रयत्न करून पाहातो." असे सांगून तो झाडाची एक वाळकी काडी घेऊन आला.

"अरे लांडग्या शिपाया! तुझ्यावर तसे मोठे प्राणसंकट म्हणशील तर एकही नाही. मी महाकालाचा भक्त आहे. यदाकदाचित् तू म्हणतो आहेस तसे तुला मरण आलेच तर तुला मी क्षणार्धात कैलासलोकी पाठवून तेथे तुला सुखी करण्याची व्यवस्था करीन." आपले शूल उचलून आकाशाकडे नाटचपूर्ण दृष्टीने पहात साधक म्हणाला.

जलवृक, काही उत्तर न देता काडीने जमिनीवर रेघोट्या काढू लागला. आणि मधूनमधून ओरडू ही लागला–"बापरे, डोके फुटू लागलेसे वाटते आहे, काळीज तुकडेतुकडे होणारसे दिसते आहे!"

कनकाक्ष महाराज जलवृकाच्या नजीक जाऊन साधकाला म्हणाले–"साधका! मी आपल्या मुलांना संरक्षणासाठी बरोबर पाठवायला हवे होते तेवढे अंगरक्षक पाठविले नाहीत आणि त्यांना जंगलात जाऊ दिले. त्यामुळे एकामागून एक किती अनपेक्षित गोष्टी घडत आहेत! बिचारा



हा पाणलांडगा खरोखरच डोके फुटून मरणारसे दिसते आहे!"

"महाराज, हा आहे मूर्ख! महाकालाचे दर्शन होऊन त्याची कृपा झाल्याशिवाय कोणत्या मानवाला अशी शक्ती प्राप्त होईल? शक्यच नाही!" असे सांगून जमिनीवर काढलेल्या रेघोट्यांकडे लक्षपूर्वक पहात साधकाने जलवृकाला विचारले–"काय रे, बहाद्दरा! या उभ्या रेघा काय आणि वाकड्या तिकड्या रेघा काय?"

जलवृक राक्षस मान वर न उचलता थरथर कापत म्हणाला–"मालक, या रेघा दोन्ही बाजूंच्या टेकड्या. या रेघा म्हणजे जंगलातली झाडे. त्यांच्या मधोमध हे झाड



एका टेकाडावर आहे. त्या झाडावर चढून टोकाच्या फांदीवर जाऊन एकदा पूर्वेकडे आणि नंतर पश्चिमेकडे पाहिल्यावर उत्तरेकडे पाहिले तर मायासरोवर दिसेल!" असे म्हणत तो दोन्ही हातांनी डोके घट्ट धरून मोठ्याने ओरडला–"गुपित सांगितले, मालक! डोके फुटू लागले आहे, मेलो...!" आणि जमिनीवर बेशुद्ध होऊन पडला.

सिद्धसाधकाने लगेच खाली वाकून जलवृकाच्या नाकातोंडाजवळ हात नेऊन श्वासोच्छ्वास चालू आहे की नाही, पाहिले व म्हणाला–"महाराज! अंधविश्वास डोक्यावर चढल्याचा जो परिणाम होतो त्याचं प्रत्यक्ष प्रमाण म्हणून हा जलवृक समोर आहे! शापाच्या भीतीने हा फक्त बेशुद्ध होऊन पडला आहे." असे सांगून बाजूला गंमत पहात उभे असलेल्या नरभक्षकांना म्हणाला–"अरे, पळा आणि पांचसहा मडकी भरून पाणी घेऊन या!" परंतु नरभक्षक त्या जलवृकाकडे आशाळभुतासारखे पाहात राहिले. त्यांच्या मनातला हेतु ओळखून आपले शूल वर उचलून सिद्धसाधक दरडावून म्हणाला–"मूर्खांनो! माझी आज्ञा ऐकलीत की नाही? मग जागचे हलत कां नाही?"

नरभक्षकांच्या नायकाने खूण करताच त्यांचा ज्योतिषी पुढे येऊन कनकाक्ष महाराजांना साष्टांग नमस्कार करीत म्हणाला–"आम्ही खोल जंगलात राहणारी आपली प्रजा आहो! आम्हांला कोणाशी कसं बोलायचं कळत नाही. आपण महाराज आहां आणि आपली आज्ञा सर्वांनी मान्य केली पाहिजे. या भुतांच्या नायकाला आपण बाजूला सारावे आणि या जलराक्षसाला आमच्या हातात द्यावे; आपलं नावं काढून आम्ही याला खाऊं."

म्हाताऱ्या ज्योतिष्याचं बोलणं संपण्यापूर्वीच साधकाने त्याची शेंडी पकडली व शूल त्याच्यावर रोखून म्हणाला–"कायरे, नरभक्षक क्रूर जंगली जनावरा! मी तुला माझ्या महाकालासमोर आतां बळी देऊन तुझ्या नरभक्षकांसमोर तुला खायला फेंकतो!"



सिद्धसाधक असे म्हणत शूल ज्योतिष्याच्या छातीत भोसकणार इतक्यात दुरून जलाश्वावर बसून भरधाव येत असलेला सर्पनख ओरडला–"सिद्धसाधका, घाई करू नकोस! आपणाला मायासरोवरातील जलवृकराक्षसांशी युद्ध करावे लागणार आहे." नंतर जवळ येऊन म्हणाला–"हे नरभक्षक आपल्या मदतीला आले तर प्रयत्न करून पाहिले पाहिजे!"

सर्पनखाचा आवाज ऐकल्याबरोबर साधकाने मान वळवून त्या बाजूला पाहिले. त्याने शूल खाली ठेवले. त्याचा हात थोडा सैल झालेला पाहून नरभक्षकांचा तो ज्योतिषी चटदिशी बाजूला सरकला आणि आपल्या लोकांच्या घोळक्यात मिसळला.

सर्पनख जवळ आला आणि घोड्यावरून उतरून जमिनीवर मेल्यासारखा पडलेल्या जलवृकाकडे पाहून म्हणाला–"साधका, याला परलोकी पाठविलेस का? अरे, हा तुझा स्वामिभक्त गुलाम नाही का?"

"होय, विश्वासपात्र नोकरच आहे! परंतु याचा तुमच्या राजावरच नव्हे तर सरोवरेश्वराच्या मंत्रशक्तीवरही विश्वास आहे. कोणता तरी शाप आहे म्हणे. सरोवराकडे जाण्याची वाट दाखविण्यासाठी जमिनीवर रेषा काढल्यावर जमिनीवर आदळला." सिद्धसाधक म्हणाला.

मध्यंतरी कनकाक्ष महाराजांचे सैनिक मोठमोठी भांडी भरून पाणी घेऊन आले व त्यांनी जलवृकराक्षसाच्या अंगावर ते ओतले. थंडगार पाणी अंगावर पडतांच त्याची हालचाल सुरू झाली व डोळे उघडून पाहिल्याशिवायच तो ओरडू लागला–"मी कोठे आहे? नरकात की सरोवरात?"

सिद्धसाधकाने त्याच्या पाठीवर एकदां जोराने लाथ मारली व म्हणाला–"जलवृक बहाद्दरा! तुला शापमुक्ती मिळाली. तुला मी जिवंत केले, ऊठ!" ते ऐकताच जलवृक उठून बसला. सर्पनख मनाचे समाधान झाल्यासारखा मान हलवून, राजाच्या शिपायांकडे व कनकाक्ष महाराजांकडे पाहून



म्हणाला–“वैद्यदेव हंसरथातून उडत जात असता त्यांनी सांगितल्यावरून कळलं. हेच, नाही का ते हिरण्यपूरचे कनकाक्ष महाराज?”

महाराज इतका वेळ सर्पनखाचा तो विचित्र वेष आणि तो ज्या घोड्यावर चढून आला होता तो जलाश्व दोघांकडे आश्चर्य करीत पहात होते. आतापर्यंत ते गप्प होते, परंतु सर्पनख म्हणाला ते ऐकून त्यांनी विचारले–“कोण वैद्यदेव? माझ्या राज्यातले नागरिकच ना?”

“महाराज, मला ते सर्व माहीत नाही. परंतु ते माझ्याबरोबरच निघाले आणि पाठोपाठ येतच आहेत, या बाजूला.” सर्पनख म्हणाला.

“साधका, तुला माहीत आहे का रे हा वैद्यदेव कोण हे?” कनकाक्ष महाराजांनी विचारता सिद्धसाधक काही वेळ विचारात पडला. शेवटी म्हणाला–“महाराज, त्या वैद्यदेवाविषयी मायासरोवरात आमचे परम शत्रू जलवृक राक्षसांना अगर मायासरोवरेश्वराच्या अनुयायांना माहीत नाही असे ते एक गुपित आहे. तो जयशीलासारखाच अमरावतीचा राहणारा आहे.”

“अमरावतीचा राहणारा आहे का जयशील? त्या देशाचा राजा रुद्रसेन हा माझा शत्रू आहे. मी संकटात आहे, हे कळताच तो स्वारी करण्याच्या तयारीत असल्याचे मला हेरांकरवी कळले आहे.” कनकाक्ष महाराज म्हणाले.

“महाराज, जयशीलच्या इमानावर संशय करण्याचे कारण नाही. तो कोणत्याही देशाचा नागरिक असो, त्याने वचन दिले आहे आणि ते तो भंग करणार नाही. युवराज व राजकन्या यांच्या शोधार्थ तो आपल्याला मदतच करील. मी आपल्या देशाचा एक नागरिक या नात्याने हमी देत आहे!” सिद्धसाधक म्हणाला.

साधक बोलत असता तिकडे नरभक्षकांच्या घोळक्यात काहीतरी गडबड झाल्यासारखा संशय आल्यावरून साधकाने तिकडे वळून पाहिले. तेव्हा त्यांना

विबळ्या आणि त्यांचा मांत्रिक त्याच्या जवळ धावत येऊन म्हणाले–“आपल्यासारखे चार जण दहाबारा जलवृक राक्षसांबरोबर युद्ध करीत आहेत. आम्ही त्यांच्या मदतीला जाऊ म्हणता का? थोडा आहार आम्हांला मिळेल?”

ते ऐकताच सर्पनख आपल्या घोड्यावर चढला व म्हणाला–“साधका, ते म्हणजे वैद्यदेव, माझा धाकटा भाऊ सर्पस्वर आणि हंसरथ चालविणारा सरोवरेश्वराचा अंगरक्षक!” असे म्हणत त्या दिशेने त्याने आपला घोडा सोडला.

“जय महाकाल!” असा जयघोष करून साधक आपल्या वनमाणसाच्या खांद्यावर बसला व कनकाक्ष महाराजांना म्हणाला–“महाराज, प्रथम त्या जलवृक राक्षसांच्या हातून आपल्या लोकांना वाचविले पाहिजे.” असे म्हणत सर्पनखापाठोपाठ तोही निघाला.

“अरण्यरक्षक देवा! आतां तूच आमची भूक भागवायला मार्ग दाखव!” असे म्हणत नरभक्षकांचा घोळका त्या दोघांच्या पाठोपाठ धावला.

सर्पनख व सिद्धसाधक येऊन पोचले त्यावेळी घोड्यावर बसून सर्पस्वर आपल्या तलवारीने जलवृक राक्षसांना भोसकायला प्रयत्न करीत होता. परंतु जलवृक निसटून



स्वतःचा बचाव करीत वैद्यदेव म्हणून ओळखला जाणाऱ्या देवशर्माला आणि हंसरथ हाकणाऱ्याला आणि लंगड्या मंगलवर्माला जिवंत धरण्याचा प्रयत्न करीत होते. परंतु देवशर्मा त्यांना आपल्या हातातल्या वज्रमूठ असलेल्या दंडाने अडवीत दरडावून सांगत होता–“अरे मूर्खांनो! संभाळा, हा दंड म्हणजे नुसती काठी नसून याच्या टोकाला जी अणी बसविलेली आहे ती विषाची आहे.”

तेवढ्यात तेथे सिद्धसाधक व सर्पनख येऊन पोचले. दुरून नरभक्षक व राजाचे सैनिक आरोळ्या देत त्याच बाजूला येत होते. त्यांना पाहून मागे पळून जाण्याच्या विचारात असलेल्या जलवृक राक्षसांचा










नायक त्यांना म्हणाला–" थांबा! आपल्या महाराजांची आज्ञा आहे की, यांना जिवंत धरून आणता आले नाही तर ठार करा!" असे म्हणत तो आपली दगडी गदा फिरवीत देवशर्माच्या डोक्यात मारायला धावला.

देवशर्मा एकच पाऊल मागे जाऊन म्हणाला–"तुझं मरण तुझ्या कपाळी लिहिलं आहे, त्याला आता मी काय करणार?" आणि त्याने आपल्या हातातल्या वज्रदंडाची अणी त्या जलवृक नायकाच्या अंगाला लावली मात्र तो एक किंकाळी फोडून तत्क्षण जमिनीवर लोळू लागला.

नंतर देवशर्मा आपला वज्रदंड वर उचलून सर्व जलवृकांना उद्देशून म्हणाला– "अरे, पाण्यातल्या लांडग्यानो, प्रत्यक्ष पाहिलात, मी सावध केलं असून फिकीर न केल्याचा परिणाम! सरोवरातल्या माया-सरोवरेश्वराची मुलगी पद्ममुखी हिला किंवा कांचनमालेला थोडा जरी अपाय झाला तर तुमच्या राजासकट तुम्हांला सर्वांना यमलोकी जावे लागेल. खबरदार!"

जलवृकराक्षस ते ऐकून इतके भ्याले की जंगलाच्या वाटेने पळाले आणि मागे वळूनही पाहिले नाही. सर्पनख घोड्या-वरून उतरून देवशर्माच्या जवळ जाऊन म्हणाला–" वैद्यदेव! मायासरोवरेश्वर, कांचनमाला आणि जयशील हे जलवृक-राक्षसांकडून त्यांच्यावर येणाऱ्या संकटाची कल्पना नसल्यामुळे सरोवराच्या दिशेने चालले आहेत. त्यांना सावध रहायला सांगितले पाहिजे ना?"

"ते काम तुम्ही दोघां भावंडांनी आणि हंसरथ चालविणाऱ्या सरोवरेश्वराच्या अंग-रक्षकाने केले पाहिजे!" देवशर्मा म्हणाला.

सर्पनख आणि सर्पस्वर दोघांनी आपा-पल्या घोड्यांना टाचा मारल्या आणि भरधाव घोडे सोडले. अंगरक्षकाने झाडा-पलीकडे ठेवलेल्या हंसरथात चढून तो क्षणार्धात आकाशात वेगाने सोडला. नर-भक्षक उत्साहाने आरोळ्या मारीत पळ-णाऱ्या जलवृक राक्षसांचा पाठलाग करू लागले. (क्रमशः)



# चतुर ज्योतिषी

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हा प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–" राजा, तुझा माणसाच्या प्रयत्ना-वर फार विश्वास दिसतो. परंतु देवाचा निर्णयच अचूक असतो. कसा, ते सिद्ध-करण्यासाठी मी तुला एका ज्योतिष्याची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

वसंत देशाचा राजा शूर पराक्रमी होता. गादीवर बसताच त्याला शेजारच्या हेमंत राज्याशी युद्ध करावे लागले. त्या युद्धात त्याला विजयश्री लाभली. थोडक्यात सांगा-वयाचे म्हणजे गादीवर येताच वसंत देशाचा राजा दोन राज्यांचा अधिपती झाला.

वसंत देशाच्या राजाला विजय मिळाला खरा, परंतु दोन्ही देशांच्या प्रजेचे अपार नुकसान झाले. राजा तर थोर पराक्रमी वीर आणि त्याला युद्धात विजयप्राप्ती झालेली. म्हणून त्याच्या मनात इतर देश जिंकायची महात्वाकांक्षा उत्पन्न होणे साहजिक होते. ती कल्पना करूनच मंत्री घाबरला. त्याने दरबारी ज्योतिष्याला बोलावून राजाची जन्मपत्रिका पाहून भविष्य सांगायला सांगितले.

ज्योतिषी पत्रिका पाहून म्हणाला– "प्रधान! आपला राजा दोनच राज्यांवर राज्य करणार असा योग स्पष्ट आहे. त्याला पुन्हा युद्ध करावे लागले तर त्यात त्याचा पराभव तर होईलच, शिवाय तो दोन्ही राज्ये गमावून बसेल." हे सर्व राजाला ऐकू जाईल इतक्या मोठ्याने ज्योतिष्याने प्रधानाला सांगितले.

तेव्हा राजा म्हणाला–"म्हणजे माझा सर्व पराक्रम फुकट जाईल, म्हणता?"

"महाराज! युद्धात विजयश्री मिळते ती फक्त राजाच्या पराक्रमामुळेच मिळते का? सैन्य संचालन उत्तम प्रकारे व्हावं लागतं. कधीकधी चुकीच्या जागी स्वारी केली तर विजयश्री हातची जाते. या सर्वांहून महत्वाची गोष्ट म्हणजे देवाचा अनुग्रहसुद्धा असावा लागतो. तोच आपल्या पत्रिकेत नाही असे स्पष्टपणे दिसते आहे." ज्योतिषी म्हणाला.

प्रधान म्हणाला–"महाराज! आपला पराक्रम तरी व्यर्थ कां जावा? आपण दरवर्षी द्वंद्वयुद्धाचे व इतर युद्धकलेचे सामने ठेवावे. इतर देशांच्या शूर योद्ध्यांना त्या स्पर्धेत भाग घ्यायला परवानगी द्यावी. जास्त काय, त्यांना निमंत्रणे पाठवून बोलवावे. अशा तऱ्हेने शूर पराक्रमी योद्ध्यांचा पराभव करून आपल्या शौर्याचे प्रदर्शन करावे." प्रधानाने सूचना केली.

राजाला तो सल्ला पसंत पडला. राजाने तसे करण्याचे ठरविले. सुरवातीला इतर देशाचे राजे व राजकुमार वसंत राजाशी द्वंद्वयुद्धात हारत. त्यांना त्या गोष्टीबद्दल अपमान भासू नये यासाठी वसंत देशाचा राजा त्यांचा सत्कार करून त्यांना निरोप देई. अशा पराक्रमी वीराशी मैत्री असल्याचा त्यांनाही अभिमानच वाटे. म्हणून वसंत देशाचा राजा युद्धाला चालून आला तर त्याचे त्यांना आनंदच वाटे.

अशी अनेक वर्षे लोटली. मध्यंतरी वसंत राजाच्या दरबारी ज्योतिष्याचा धाकटा भाऊ शमंतराजाच्या दरबारात दरबारी ज्योतिष्याच्या पदावर नेमला गेला

वसंत राजाला मूळबाळ नव्हते. शेवटी शेवटी त्याला एक मुलगी झाली. तिचे लग्नाचे वय झाले तेव्हा अनेक राजकुमार तिच्याशी लग्न करण्यास उत्सुक दिसले. कारण, एक तर ती सुंदर होती. दुसरं असं की दोन राज्यांना वारस तीच होती.

शमंत राजा तरुण होता. वसंत देशाच्या राजकन्येशी विवाह करण्याची इच्छा त्याच्या मनात होती. परंतु तो पराक्रमी नव्हता व





त्याचे राज्यदेखील लहानच होते. म्हणून इच्छा पुरी होण्याबद्दल त्याला विश्वासच होत नव्हता. परंतु निराश न होता त्याने आपल्या ज्योतिष्याला भविष्य विचारले.

ज्योतिष्याने शमंत राजाची जन्मपत्रिका पाहून त्याला तीन राज्यांचा अधिपती होण्याचा योग असल्याचे सांगितले व त्यासाठी त्याने वसंत देशाच्या राज-कन्येला मागणी घालण्यासाठी दूत पाठ-वायला सुचविले आणि ते मान्य नसल्यास युद्धाला तयार रहायला बजावून सांगायला सांगितले.

शमंत राजाने त्याप्रमाणे सांगून वसंत राजाकडे दूत पाठविला आणि गंमत अशी की वसंत राजाने काही न बोलता आपल्या मुलीचे लग्न शमंत राजाशी करून दिले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा, वसंत राजासारख्या प्रतापी राजाने त्याच्याहून दुर्बळ राजाला भिऊन त्याच्याशी आपल्या मुलीचे लग्न करून दिले, हा ईश्वरी संकेत म्हणता येईल का? की म्हातारपणामुळे युद्धात जय मिळेल की नाही या गोष्टीची त्याच्या मनात शंका होती? या प्रश्नांची समाधानकारक उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला—"वसंत राजाचा ज्योतिष्शास्त्रावर फार विश्वास होता. म्हणून तो शमंत देशाच्या राजाशी युद्धाला तयार नव्हता. त्याला आपल्या जन्मपत्रिके-वर अपरंपार विश्वास होता. म्हणून त्याने तेव्हा तिसरे राज्य जिंकण्याच्या भानगडीत पडण्याचा विचार सोडला होता. शमंत राजाच्या दरबारी ज्योतिष्याला हे गुपित माहीत होते. म्हणूनच तर त्याने तसा सल्ला आपल्या राजाला दिला होता. ईश्वरी संकेताची गोष्टच नव्हती."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# भ्रातृ प्रेम

एका राजाकडे काही गुलाम काम करीत असत. एकदा खजिना भरून निघावा, यासाठी राजा आपल्या गुलामांना बोलावून म्हणाला—"जो कोणी मेहनत व मोलमजुरी करून पैसे मिळवून हजार रुपये आणून खजिन्यात भरील त्याला मुक्त करीन."

गुलामांमध्ये दोघे भाऊ होते. त्यांच्यापैकी एक जण अशक्त होता. मोठ्या भावाने मोलमजुरी करून एक हजार रुपये मिळवून खजिन्यात भरले. नंतर राजाकडे जाऊन विनंती केली—"महाराज, मी जमा केलेल्या रकमेबद्दल माझ्या धाकट्या भावाला सोडावे."

राजाने चकित होऊन विचारले—"तू एवढी मेहनत करून एक हजार रुपये मिळवून आणलेस, आणि ही सर्व रक्कम आपल्या भावाला सोडविण्यासाठी कां खर्च करतो आहेस?"

मोठा भाऊ म्हणाला—"महाराज, माझा धाकटा भाऊ अशक्त आहे. मी जास्त मेहनत करून स्वतःला सोडवू शकेन. परंतु मी स्वतःची सुटका करून आधी मोकळा झालो तर माझ्या धाकट्या भावाला कोण मदत करील?"

राजाने त्याचे भ्रातृप्रेम पाहून एक हजार रुपये परत केले आणि दोघांनाही मुक्त केले.





# देवी बोलली तेव्हा

श्रीपुर हे एक श्रीमंत व संपन्न असे गांव होते. प्रत्येक घरात कोठारे धान्याने भरलेली असत. गावाचा प्रमुख मोठा जमिनदार होता. त्याला रावबहादुर हा खिताब मिळाला होता. गावात त्याच्या शब्दाला फार मान होता. कोणाच्या घरी काही प्रश्न उभा राहिला की तो जमिनदाराकडे धाव घेई. गावकरी अशिक्षित होते.

गावाचे वैभव वाढले त्यात एक देवीचे देऊळ होते. ते देऊळ बांधले गेले त्यात प्रत्येक गावकऱ्याने थोडाफार हातभार लावला होता. गावकरी चंदा देत त्या रकमेवर सुमारे एक लाख रुपयाचे दागिने देवीला करण्यात आले होतें. देवीचा पूर्ण शृंगार होई तेंव्हा देवीला ते सर्व दागिने घालून सजविण्यात येई. पंचक्रोशीतले सर्व गावकरी देवीच्या दर्शनाला आनंदाने येत. देवीचे दागिने एका खोलीत तिजोरीत ठेवीत असत. तिजोरीला व खोलीला निरनिराळी कुलपे असत. देवळाच्या किल्ल्या देऊळ उघडते वेळी पुजाऱ्याकडे असत व इतर वेळी जमिनदाराकडे.

एके दिवशी रात्री अचानकपणे देवीचे सर्व दागिने चोरीला गेले. सकाळीं देऊळ उघडताच पुजाऱ्याच्या ते लक्षात आले आणि त्याने जमिनदाराला कळविले. जमिनदार घाबऱ्याघाबऱ्या खांद्यावर उपरणे टाकल्याशिवायच देवळाकडे धावला.

थोड्याच वेळात ती बातमी गावभर पसरली. सर्व गावकरी देवळाबाहेर जमा झाले. सर्वांच्या तोंडावर काळजी व आश्चर्य झळकत होते. कारण सर्वांनी देवीच्या दागिन्यांसाठी स्वत:च्या मेहनतीने मिळविलेले पैसे चंदा म्हणून दिले होते. एक लाख रुपयांचे दागिने चोरीला जाणे म्हणजे सामान्य गोष्ट नव्हती. पुजारी व [illegible] त्यांना कधी हात लावणेच शक्य नव्हते. त्यांच्या पैकी कोणी एकाने चोरी केली असे कोणी म्हटले असते तर गावकऱ्यापैकी कोणी विश्वास केला नसता.

जमिनदार लोकांच्या गर्दीतून वाट काढीत सरळ देवीच्या गर्भागारात जाऊन देवीसमोर हात जोडून उभा राहिला व म्हणाला–"माते! आमच्या हातून असे कोणते पाप घडलं होतं की हा अनर्थ ओढवला? तूच सांग चोरी कोणी केली? मी तुझ्या समोर त्याला उभा चिरून त्याला बळी म्हणून तुझ्या चरणी वाहीन."

देवी बोलली–"भक्ता! माझे दागिने चोरणारा तुमच्याच पैकी एक जण आहे. तो आहे लखू धोबी. परंतु त्याचं काही बरं वाईट करू नकोस. तो भोळाभाबडा आहे!"

लखू धोब्याचं नाव ऐकताच सर्वांचे डोळे त्याच्यावर खिळले. तसा तो एक भुरटा चोर म्हणून गावकऱ्यांना माहीत होता. त्याने त्याबद्दल गांवकऱ्यांकडून पुष्कळ मार खाल्ला होता. परंतु तो देवीचे दागिने चोरण्याचे धाडस कसा करील?

तरी सर्व लोक लखू धोब्याला धरून फरफटत ओढून घेऊन आले. तो गयावया करून म्हणाला–"मालक, या चोरीविषयी मला काही माहीत नाही."



जमिनदाराने त्याची मानगुटी धरून विचारले–"कायरे, देवी मुकी आहे वाटलं तुला? अशा दयाळू मातेचे दागिने चोरतांना तुझे हात गळून कसे पडले नाहीत? बोल, कोठे ठेवले आहेस दागिने?"

अनेकांनी अनेक प्रकारे लखूला विचारले, परंतु त्याने चोरीचा अपराध मान्य केला नाही. शेवटी जमिनदाराने त्याला देवळात ढकलले आणि म्हणाला–"तू विचार करून काय ते उत्तर दे. मातेला क्रोध आला तर तू रक्त ओकून जागच्या जागी मरशील." असे बजावून सांगून जमिनदाराने देवळाचे दार बंद करून कुलूप लावले.



दुसऱ्या दिवशी जमिनदाराने दार उघडले तेव्हा लखू धोबी रक्ताच्या थारोळ्यात पडलेला होता. आता तरी तो आपली चूक कबूल करील असे सर्वांना वाटले होते. परंतु सर्वांना निराश व्हावे लागले.

त्यानंतर त्याचा देह देवळाबाहेर आणण्यात आला आणि देऊळ धुऊन मंत्रवलेल्या पाण्याने शुद्ध करण्यात आले.

आणखी काही दिवसांनी जमिनदार गावकऱ्यांना एकत्र बोलवून त्यांना म्हणाला–"हे पहा, मित्र हो! चोरी गेलेला माल परत मिळण्याची शक्यता आता उरली नाही. लखू धोबी जिवंत परत येणे शक्य नाही. रात्री मला देवीचा दृष्टांत झाला. ... रूप पाहून माझ्या मनाला धक्काच बसला. देवीने मला विचारले–'बेटा! तुम्ही सर्वांनी मला असेच ठेवायचे ठरविले आहे का? प्रत्येकाने एकेक दगड टाकला तरी एक टेकडी उभी राहील.'"

देवीची आज्ञा समजून गावकऱ्यांनी पुन्हा चंदा देऊन देवीकरितां दागिने करण्याचे ठरविले. दागिने लौकर तयार ही झाले. पुन्हा देवळाचे वैभव वाढले.

परंतु एक वर्ष लोटण्याच्या आत पुन्हा चोरी झाली. गावात ओरडा झाला. आता गावावर ईश्वरी कोप होणार असे प्रत्येकाला वाटू लागले. या खेपेस देवीचा कोप कोणावर होणार, याचा विचार करूनच सर्वांचे रक्त गोठले.

जमिनदार देवीसमोर उभा राहून हात जोडून म्हणाला–"माते! आम्ही या खेपेस-ही तुझ्या दागिन्यांचे रक्षण करण्यात अयशस्वी ठरलो. तू अशी आमची सत्व-परीक्षा कां घेते आहेस? या खेपेस हे धाडस कोणी केले, कृपा करून सांग तरी?"

या खेपेस देवी बोलली नाही, मौन राहिली. तेव्हा जमिनदाराने कंबरेला खोचून ठेवलेली कटयार काढली व ती छातीत भोसकून घेण्याच्या तयारीत असतां सर्व हाःहाःकार करू लागले. तेव्हा देवीच्या हृदयाला पाझर फुटला व ती म्हणाली–"तू आत्महत्या कशाला करून घेतोस? मी स्वतःच हे गाव सोडून जावे, म्हणते. तुमच्या पैकीच एकाने चोरी केली आहे. दगडू धोब्याने या खेपेस हे काम केले आहे."

दगडू धोब्याचे नाव ऐकताच काही लोक त्याला धरून आणायला धावले.

जमिनदार म्हणाला–"तुम्ही कोणी त्याच्या वाटेला जाण्याची गरज नाही. या खेपेस दागिन्याचा शोध लागल्याशिवाय तो मरणार नाही. पुन्हा एक लाख रुपये एकत्र करून देणे आपल्याला शक्य आहे का?"

परंतु जमिनदाराला वाटलं होतं तसं घडलं नाही. दगडू धोब्याला घेऊन यायला गेलेल्या लोकांनी परत येऊन त्या रात्रीच त्याचा खून झाल्याचे वर्तमान सांगितले.

ते कळल्यावर जमिनदाराने हातच टेकले. बेशुद्ध होऊन पडला. औषधोपचार झाले, तरी शुद्धीवर आला नाही. शेवटी गावकऱ्यांनी देवळात देवीसमोर जाऊन पुन्हा सर्व दागिने करून देण्याची प्रतिज्ञा केली तेव्हा जमिनदार शुद्धीवर आला.

लोकांनी देवीसमोर प्रतिज्ञा केल्याचे जमिनदाराला शुद्धीवर आल्यावर कळले. तेव्हा तो गावकऱ्यांवर कावून म्हणाला–



एकट्याला वांचविण्यासाठी तुम्ही एवढे ओझे स्वतःवर घेता आहां?"

गांवकरी म्हणाले–"जमिनदार साहेब! असं काय बोलता? तुमच्यावर आम्ही आमचा जीव ओवाळून टाकू! तुम्ही खुशाल असलात तर सारे गाव खुशाल राहील!"

देवी करितां तिसऱ्यांदा दागिने तयार झाले. परंतु या खेपेस चोरी होणार नाही, असे मात्र कोणाला वाटले नाही.

पुजाऱ्याची मुलगी वाणी फार हुशार होती. देवी कशी बोलेल? तिचा त्या गोष्टीवर विश्वासच बसत नव्हता. ही चोरी करणारा खरा चोर बस्ताद असला



करणारा म्हणून संशयित आरोपी जिवंत राहिलाच नाही. देवीच्या आड बसून कोणी तरी देवीसारखे बोलण्याचे सोंग करीत असला पाहिजे. मुलीने वडिलांना ती गोष्ट सांगितली तेव्हा त्यांना ते खरे वाटेना. कारण देवीवर त्यांची फार श्रद्धा होती.

त्याच सुमारास छोटू आपला कुत्रा घेऊन त्या गावात आला. गांवकऱ्यांच्या कानावर त्या पूर्वीच छोटूची कीर्ती पोचली होती. म्हणून छोटू आला तेव्हा गावात त्याचे स्वागत झाले.

छोटू देवळातच ठाण मांडून बसला.

म्हणून तिने छोटूला भेटून घडलेली गोष्ट सांगितली. दोन्ही वेळी घडलेल्या चोरी विषयी व संशयित व्यक्तीच्या खूनाच्या गुपिताविषयी तिच्या मनात जी शंका होती ती सांगून ती म्हणाली–"दादा! तू या खेपेस चोरी होणार नाही, याची काळजी घे. त्याच बरोबर खऱ्या चोराला पकडता आलं तर पहा. कारण गरीब निरपराध दोघांचे खून झालेले आहेत."

छोटूने थोडावेळ विचार करून विचारले–"देवळाच्या किल्लचा कोणाजवळ असतात?"

"दिवसभर माझ्या बाबांकडे असतात व संध्याकाळची आरती झाल्यावर ते किल्लचा जमिनदाराकडे पोचत्या करतात." वाणी म्हणाली.

"तर मग असं कर. आज रात्रीची आरती तू कर. सर्व दागिने काढून कोठे तरी लपवून ठेव. परंतु ही गोष्ट तुझ्या बाबांना सुद्धा कळता कामा नये. पुढे काय करायचं ते मी पाहून घेईन." छोटू म्हणाला.

त्या दिवशी वाणी रात्रीची आरती करून येते, असे वडिलांना सांगून किल्लचा घेऊन देवळात गेली आणि धावऱ्या धावऱ्या परत येऊन वडिलांना म्हणाली–"बाबा!

पुजारी धावऱ्या धावऱ्या देवळात गेला. देवीच्या अंगावर दागिने नसलेले पाहून जमिनदाराकडे धावला. जमिनदाराच्या तळपायाची आग मस्तकाला गेली. त्याने स्वत: देवळात जाऊन पाहिले. एक दागिना देखील देवीच्या अंगावर नव्हता.

त्याने करड्या नजरेने पुजाऱ्याकडे पाहिले व म्हणाला–"दिवसा ढवळ्या ही चोरी झाली आणि तुम्हांला ही गोष्ट कशी काय कळली नाही हो?" पुजारी उत्तर काय देणार?

गावभर ती बातमी वणव्यासारखी पसरली. या खेपेस कोणाच्या जिवावर बेतणार? प्रत्येकाच्या चेहऱ्यावर हाच प्रश्न जणुकाही लिहिलेला होता. चोरी करणारा मरत आला आहे तरी चोरी चालू आहे. हा धाडशीपणा कोणाचा असेल बुवा! देवीशी असा खेळ?

दुसऱ्या दिवशी सकाळी सर्व गावकरी देवीच्या देवळासमोर जमले. जमिनदाराने नेहमी प्रमाणे देवीला विनंती केली की चोराचं नाव तिने सांगावे. देवी बोलू लागली–

"या पुढे मी काहीच उत्तर देणार नाही. तुमच्यात अट्टल चोर आहेत. तुम्ही मला या खेपेस असे वचन द्या की तुम्ही



पडणार नाही. तरच मी चोराचे नाव सांगेन."

सर्वांनी होकार दिला. तेव्हा देवी बोलली–"या खेपेस दिवसा ढवळ्या चोरी करणारा चोर खंडू कुंभार आहे!"

लगेच लोक धावले व खंडू कुंभाराला धरून घेऊन आले. गर्दीत छोटू उभा होता. ओरडून म्हणाला–"तुम्ही सर्व थांबा! या खेपेस देवी, का कोणास ठाऊक, सपशेल खोटे बोलली आहे. मी खरी गोष्ट काय याचा शोध काढतो." असे सांगून तो देवीच्या मूर्तीकडे पाहून म्हणाला–"माते! जरा सावधपणे विचार करून उत्तर दे. खरोखरच

मूर्तीतून संतापाने म्हटल्यासारखा आवाज आला–"कोण आहे तो उर्मटपणाने मला विचारणारा? पहिल्याने त्यालाच याबद्दल दंड करा."

दुसऱ्या क्षणाला लोक छोटूला मारायला धावले. परंतु तेवढ्यात वाणी पुढे येऊन म्हणाली–"देवी खोटे बोलली आहे. सर्व दागिने मी काढून ठेवले आहेत." असे म्हणत तिने दागिन्याचे गाठोडे सोडून सर्वांना दाखविले.

सर्व चकित होऊन परस्परांकडे पाहू लागले. प्रत्येक स्वत:च्या मनात एकच प्रश्न विचारीत होता–"देवी असं खोटं कां बोलली?"

छोटू म्हणाला–"अशा खोटं बोलणाऱ्या देव्या मी कित्येक पाहिल्या आहेत! खोटं बोलणाऱ्या या देवीचे मी तुम्हांला प्रत्यक्ष दर्शन घडवितो." असे सांगून छोटूने आपल्या कुत्र्याला खूण केली. कुत्रा देवीच्या पाठीमागे गेला आणि तेथे लपलेल्या व्यक्तीला धरून ओढून बाहेर घेऊन आला. ती जमिनदाराच्या नोकराची बायको होती.

सर्व गांवकरी तिला दरडावून म्हणाले–"खरं काय ते बोल, नाहीतर देवीसमोर तुला बळी दिल्याशिवाय राहणार नाही!" तेव्हा तिने खरेखरे सांगून टाकले. प्रत्येक वेळी जमिनदार स्वत: दागिने चोरून नेत असे आणि तिला देवीच्या पाठीमागे उभी करून बोलायला सांगे. तिने न ऐकल्यास तिचा गळा कापून टाकण्याची धमकी देई.

मध्यंतरी जमिनदाराने तेथून पाय काढला. परंतु छोटूची नजर त्याच्यावर होती. तो गर्दीतून वाट काढीत जमिनदाराच्या घरी गेला. तो पर्यंत तो सर्व दागिने एका गाठोड्यात बांधून घेऊन पळून जाण्याच्या तयारीत होता.

परंतु छोटूने कुत्र्याच्या मदतीने जमिनदाराच्या हातातून सर्व दागिने काढून घेतले व त्याची अब्रू चवाठ्यावर टांगली.

गावकऱ्यांनी छोटूचे आभार मानले. छोटू आपल्या कुत्र्याला घेऊन पुढल्या मुक्कामाला गेला.



# पैज

एका राजाला नेहमी पैज लावायची सवय होती. दररोज दरबारात येताच तो म्हणे, "आज माझ्याबरोबर पैज लावायला कोणी तयार असेल तर त्याने उभे रहावे."

एके दिवशी राजा दरबारात आल्याबरोबर तेच म्हणाला. तेव्हा एक तरुण माणूस उठून म्हणाला–"महाराज, मी पैज लावायला तयार आहे. मी हारलो तर शंभर स्वर्णमुद्रा देईन, आपण हारलांत तर आपण द्याव्यात."

राजाने ते कबूल केले.

तरुण युवक म्हणाला–"महाराज, आपल्या उजव्या हाताच्या करंगळीच्या अंगठीखाली करंगळीवर एक तीळ आहे. आपण पाहिजे तर अंगठी काढून पहावे."

राजाने अंगठी काढून पाहिले, तीळ नव्हता. तरुण युवक हारला. तो शंभर स्वर्णमुद्रा काढून राजाला देऊन परतला. तेवढ्यात दरबारी मंडळीत खळबळ उडाल्या-सारखी दिसली. राजाने चौकशी करता कळले की त्या तरुणाने अनेक दरबारी मंडळींशी पैज लावली होती की राजाला उजव्या हाताच्या करंगळी अंगठी काढून दाखवायला लावतो. जो हारेल त्याने दहा हजार स्वर्णमुद्रा द्याव्यात, तो तरुण युवक ती पैज जिंकला होता.





# पापी धन

रामूला त्याची सर्व मिळकत कुटुंबाच्या उदरनिर्वाहास जेमतेम पुरेशी होई. परंतु त्याचा मित्र लखू व्यापार करी त्यात त्याला खूप फायदा होई. त्याने स्वतःला राहण्यासाठी चांगलं मोठं घर बांधलं होतं. रामू मधून मधून लखूच्या घरी गप्पा मारायला जाई.

एकदा रामू लखूच्या घरी गेला तेव्हा लखूने त्याला एक बातमी सांगितली. त्यांचा दोघांचा एक मित्र होता, गणू. त्याच्या घराला व दुकानाला एकाएकी आग लागली आणि त्याचे सर्वस्व नष्ट झाल्यामुळे त्याला भीक मागण्या शिवाय दुसरा मार्ग उरला नव्हता.

ते ऐकून रामूला फार वाईट वाटले. गणू व्यापार करायला म्हणून शहरात जाऊन राहिला होता. म्हणून मित्रांच्या भेटीगाठी कित्येक वर्षे झाल्या नव्हत्या. परंतु मित्रता कशी जाणार? म्हणून रामू म्हणाला–"आपण जाऊन त्याला भेटू या."

लखू हसून म्हणाला–"तू तरी अगदीच भोळासांब आहेस रे! अरे वेड्या, आपण या वेळी त्याला भेटायला गेलो तर तो आपल्याकडे पैसे नाही का मागणार?"

रामू ते ऐकून चकितच झाला. तो थोडासा रागावून म्हणाला–"पैसे म्हणजे पापाची कमाई आहे. मित्रता पवित्र असते. दोन्हींची बरोबरी कशी काय होणार?"

"तुझ्या जवळ एक दिडकी नाही द्यायला. तू पाहिजे तितका उपदेश करीत बसायला मोकळा आहेस." लखू म्हणाला.

तोपर्यंत काळोख पडू लागला होता. तरी रामूला राहवले नाही. तो लगेच निघाला. रात्रभर चालत राहल्यावर उजाडण्याच्या सुमारास त्याला गणू राही त्या शहरात पोचणे शक्य होते.

परंतु मध्यरात्रीच्या सुमारास सोसाट्याचा वारा सुटला आणि पाऊस पडू लागला. नशिबाने तोपर्यंत तो एका खेडेगावात पोचला होता. सर्व कपडे ओले चिंब झाले होते. तो एका घरासमोर गेला आणि त्याने दाराची कडी वाजविली.

एका म्हातारीने खिडकीतून डोकावून पहात विचारले–"कोण आहे?"

रामू म्हणाला–"आजी, मी शहराला जायला म्हणून निघालो होतो. पाऊस पडू लागला, म्हणून थांबावे लागलं. सकाळी उठून जाईन. दार उघडता का?"

"माझा मुलगा व सून परगावी गेले आहेत. मी घरात एकटी आहे. ते सांगून गेले आहेत, कोणी आलं तरी दार उघडू नका. परंतु तू ओला चिंब उभा आहेस, म्हणून दार उघडते." म्हातारी म्हणाली.

परंतु म्हातारीने दार उघडले नाही. परत निघून गेली. रामू मागच्या बाजूला जाऊन म्हातारी काय करते खिडकीतून पाहू लागला. म्हातारीने पेटीतून पैसे काढून एका पिशवीत ठेवले आणि वर चिंच घालून ठेवली. पिशवी खुंटीला टांगून ठेवली व पेटी बंद करून नंतर म्हातारीने दार उघडले. तोपर्यंत रामू पुढल्या दारासमोर येऊन उभा राहिला होता. म्हाता-



पुढल्या खोलीत रामूला झोपायला खाट आणून ठेवली. रामू खाटेवर पडला, परंतु त्याला झोप येईना. तो विचार करू लागला–"म्हातारीचे हे पैसे गणूला पुन्हा व्यापार सुरू करायला उपयोगी होतील. म्हातारीला ते पैसे गणू व्याजासकट मागाहून परत करू शकेल."

तोपर्यंत म्हातारी घोरू लागली होती. पाऊस थांबला होता. रामू उठला. पिशवी उचलली आणि शहराच्या वाटेने निघाला.

उजाडेपर्यंत तो गणूच्या घरी पोचला. त्याचे घर जळून गेले होते. रामू गणूचे सांत्वन करू लागला. परंतु गणूचे मन

रामूने पिशवीतले पैसे काढून गणूसमोर ओतले आणि म्हणाला–"मी देतो आहे, हे पैसे घे आणि पुन्हा व्यापार सूरू कर."

"रामू, हे पैसे तुझे नाहीत, हे मला माहीत आहे. लखू चौकशी करायला सुद्धा आला नाही, तेव्हा त्याने तुझ्या हाती हे पैसे पाठविले असतील असे मला वाटत नाही. खरं सांग, कोठून आणलेस एवढे पैसे?" गणून विचारले.

रामू म्हणाला–"मित्रा! एवढे आढेवेढे घेण्याचे कारणच काय? चार सहा महिन्यांनी म्हातारीचे पैसे व्याजासकट परत करता येतील!"

गणू म्हणाला–"रामू! माझ्याविषयी तू एवढी आपुलकी दाखविलीस त्याबद्दल मी तुझा फार ऋणी आहे. परंतु मला हे पैसे नकोत. मी केलेला सर्व व्यापार लबाडीचा होता. म्हणून लबाडीची कमाई सर्व नष्ट झाली. आता मी एका दुसऱ्या व्यापाऱ्याकडे नोकरी करतो आहे. मला जो पगार मिळतो तेव्हढयावर माझे भागते आहे.

सज्जनाला चोरी करण्याची बुद्धी कोठून झाली असती? तू हे पैसे परत नेऊन म्हातारीचे म्हातारीला दे."

मित्राची स्थिती तितकी वाईट नसल्याचे पाहल्यावर रामूच्या मनाचे समाधान झाले. तो आपल्या गावी निघाला. वाटेत म्हातारीच्या घराजवळ आला, तेव्हा घरासमोर गर्दी जमलेली दिसली. म्हातारी बाहेर ओटयावर बसून रडत होती.

म्हातारीची सून म्हणत होती–"तुम्ही खोटे बोलता आहां. चोराला कसं हो कळणार की चिचेच्या पिशवीत पैसे ठेवले आहेत? आता या म्हातारीला एक क्षणभर देखील मी घरात राहू देणार नाही!"

ते ऐकून रामूला फार वाईट वाटले. त्याने पिशवी म्हातारीच्या सुनेसमोर ठेवली व घडलेली गोष्ट सांगितली. तेव्हा सुनेने म्हातारीला घरात येऊ दिले.

रामू घरी परत जात असता विचार करीत होता–"धनच पाप करविते!"



# ईर्ष्या

कृष्णपूर नावाच्या गावी दोन पंडित निरनिराळे गुरुकुल चालवीत असत. त्यांपैकी प्रवर नावाचा पंडित मन लावून प्रेमाने आपल्या शिष्यांना शिकवी आणि मुलांचा विद्याभ्यास लौकर संपवून मुलांना त्यांच्या त्यांच्या घरी पाठवी.

विदुर नामक दुसरा पंडित आपल्या शिष्यांकडून खूप कसून काम करवून घेई आणि काही शिकवीत नसे. त्याच्या विद्यार्थ्यांचे शिक्षण दीर्घकाळपर्यंत पुरे होत नसे. म्हणून त्याच्याकडे विद्यार्थी शिकायला फारसे येत नसत.

त्यामुळे विदुरच्या मनात प्रवरविरुद्ध ईर्ष्याग्नी भडकला. त्याने राजाकडे गाऱ्हाणे नेले की प्रवर आपल्या शिष्यांकडून खूप पैसे वसूल करतो आणि त्यांचे शिक्षण पुरे होण्यापूर्वीच त्यांना प्रमाणपत्रे देऊन घरी पाठवून देतो. तेव्हा राजाने दोघांना हजर व्हायला निरोप पाठविला.

प्रवरने आरोपपत्र वाचले आणि लगेच घोडयाच्या गाडीत बसून राजाच्या दर्शनासाठी हजर झाला. विदुर उत्साहाने बैलगाडीत बसून निघाला.

फिर्यादीच्या आधी अपराधी आलेला पाहून राजाने चौकशी काही काळ पुढे ढकलण्याचा विचार केला. तेव्हा प्रवर म्हणाला–"महाराज! पंडित विदुर आणि मी दोघे एकाच वेळी निघालो. परंतु ते बैलगाडीतून येत आहेत व मी घोडयाच्या गाडीतून आलो. विद्यार्थ्यांची गोष्ट तशीच आहे. हुशार व तेजस्वी विद्यार्थी लौकर शिक्षण पुरे करून प्रमाणपत्र मिळवितात."

राजाने खोल विचार करून खऱ्या गोष्टीचा अंदाज लावला. त्याने प्रवरला राजगुरू म्हणून नेमले आणि विदुरला मिळत असलेली सरकारी मदत बंद केली.





# दोन यमगंड

गोपालपूर नामक गावी सखाराम नावाचा एक तरुण शेतकरी रहात असे. त्याचे वडील तो लहान असतांनाच वारले. त्याची आई लक्ष्मी. तिनेच त्याला वाढविले आणि तो वयात आल्यावर रुक्मिणी नावाच्या मुलीशी त्याचे लग्न करून दिले.

रुक्मिणी सासरी आली त्या दिवसापासून लक्ष्मी लहानसहान चुका काढून तिला तोंडाला येई ते बोले. सखाराम आईला फार भीत असे. त्याने आईच्या मागेसुद्धा बायकोच्या मनाचे सांत्वन करण्याचा प्रयत्न केला नाही. सर्व पाहूनही तो गप्प राही. त्यामुळे रुक्मिणीला देवाशिवाय दुसरा वालीच राहिला नाही.

अशा परिस्थितीत सखारामाची बहीण बाळंतपणासाठी माहेरी आली. तीसुद्धा भावजयीला त्रास देऊ लागली. तो छळ रुक्मिणीला असह्य होऊ लागला.

त्याच सुमारास रुक्मिणीचा भाऊ बहिणीला भेटायला म्हणून आला. रुक्मिणीच्या तोंडी तिचा चाललेला छळ ऐकून त्याला फार वाईट वाटले. त्याने विचार केला की बहिणीचा संसार सुखाचा व्हावा, यासाठी काहीतरी उपाय केला पाहिजे. बहिणीला काय करायचे ते सर्व सांगून तो आपल्या गावी निघून गेला.

त्यानंतर दोनच दिवसांनी सखाराम राही त्या गावी एक ज्योतिषी आला आणि फिरत फिरत सखारामाच्या घरी आला. लक्ष्मीचा ज्योतिषशास्त्रावर फार विश्वास होता. तिने ज्योतिष्याला हात दाखवून भविष्य सांगायला विनंती केली.

ज्योतिष्याने बराच वेळ लक्ष्मीचा हात पाहिला व काही बोलल्याशिवाय व भविष्य सांगितल्याशिवाय निघाला.

लक्ष्मीने आश्चर्याने विचारले—"काय हो, काही सांगितल्याशिवाय निघालात? मी फुकटात सांगायला सांगत नाही."

"आई, माफ करा. खरं सांगून तुमच्या मनाला दुखविण्याची इच्छा माझ्या मनात नाही." ज्योतिषी म्हणाला.

"काही हरकत नाही, सांगा! खरी गोष्ट सांगण्यात चुक कसली आणि संकोच कसला?" लक्ष्मी म्हणाली.

"आई! रागावू नका, तुमच्या हस्तरेषेवरून दोन यमगंड स्पष्ट दिसत आहेत. पहिल्या यमगंडातून तुम्ही वाचालही, परंतु दुसरा यमगंड धोक्याचा आहे. टळणे शक्य नाही." असे सांगून ज्योतिषी गप्प झाला.

यमगंडाची गोष्ट ऐकून लक्ष्मीच्या हृदयाचा थरकाप उडाला. तरी धीर करून तिने यमगंड सांगायला आग्रह केला.

"तुमच्या मुलीच्या पोटी जन्मलेला मुलगा तुमच्या मुळावर आहे. त्याला दहावे वर्ष लागेपर्यंत त्याचे तोंड पाहतां कामा नये. परंतु एका महिन्याच्या आत सर्पगंड आहे, तो मात्र टळणे शक्य नाही. नागवशीकरण मंत्र माहीत असणाऱ्या व्यक्तीने एक महिनाभर तुमच्यासाठी त्या मंत्राचा नियमित जप केला तर हा गंडही टळेल. पुढल्या महिन्यात आजच्या तिथीला सर्पदंश होण्याची भीती आहे." असे सांगून ज्योतिषी निघून गेला.

सर्पगंडाचे नाव ऐकूनच लक्ष्मी घाबरून गेली. ते पाहून रुक्मिणीला दया आली.













ती म्हणाली–"आई! आपण दोघी नशीबी आहोत. मला नागवशीकरण मंत्र माहीत आहे. मी नियमितपणे त्या मंत्राचा जप महिनाभर करते. तुमच्यावर नागराजाची वक्रदृष्टी पडणंच शक्य नाही."

मग काय पाहिजे. नावडती सून तत्क्षण आवडती झाली.

"मुली! तुला मंत्र माहीत आहे, हे नव्हतं मला माहीत. तू महिनाभर त्या मंत्राचा जप कर. आज तुझ्या तोंडून तुला नागवशीकरण मंत्र माहीत असल्याचे ऐकून मला पुनर्जन्म मिळाल्यासारखं झालं!" असं सांगून लक्ष्मीने प्रेमाने सुनेच्या पाठीवर हात फिरविला.

आता लक्ष्मीसमोर पहिल्या यमगंडाचा प्रश्न उभा राहिला. कारण तिच्या मुलीचं बाळंतपण एक दोन दिवसांवर आलं होतं. तरी लक्ष्मीने जास्त विचार न करतां मुलीला तिच्या सासरी पाठवून दिले. स्वतःचा जीव धोक्यात असल्यावर माकड खोल पाण्यात आपल्या पिलाला टाकून त्यावर नाही का उभं रहात?

रुक्मिणीने महिनाभर मंत्राचा जप केला. त्याच बरोबर घरातली सर्व कामे पण आनंदाने करीत राहिली. लक्ष्मीला कोणतेही काम करावे लागत नसे. तिला आपली सून गुणी असल्याचे कळू लागले. आजपर्यंत तिला आपण उगीच नावे ठेवली, असेही तिला वाटू लागले.

ज्योतिष्याने एका महिन्याची मुदत सांगितली होती. ती संपली. शेवटच्या दिवशी लक्ष्मीने खाटेवरून खाली पाय ठेवलाच नाही. सुनेने किती समजावून सांगितले की जिवाला आतां धोका नाही, परंतु दिवसभर ती भीत राहिली.

त्या दिवसापासून लक्ष्मीला रुक्मिणी मुलीपेक्षा जास्त जवळची वाटू लागली.

भावाने पाठविलेल्या ज्योतिष्याच्या कृपेने रुक्मिणीचा संसार सुखाचा झाला. दोन यमगंडांचे नाटक खेळण्यात तिच्या भावाने जी भूमिका निभावली होती, त्या गोष्टीचा उल्लेख रुक्मिणीने कोणासमोरही, नवऱ्यासमोरही चुकूनसुद्धा केला नाही.



# अर्धा वांटा

एक प्रवासी प्रवास करीत एकादशीच्या दिवशी एका गावी आला. त्या गावाच्या जमिनदाराची मोठी आमराई होती. आंबे काढायला तयार झाले होते. काही पिकले ही होते. प्रवासी एकादशीला फक्त फळे खात असे. म्हणून त्याने जमिनदाराला पिकलेले आंबे द्यायला विनंती केली.

जमिनदाराने एक चिट्ठी लिहून दिली व पाहिजे तितकी फळे तोडून घ्यायला सांगितली. चिट्ठी वाचून पाहरेकरी म्हणाला–"तुम्ही जेवढी फळे तोडाल त्यातली अर्धी मला दिली पाहिजेत."

प्रवासी म्हणाला–"कबूल! परंतु मी तुला फळे देईन त्यातले एक फळ मला परत दिले पाहिजे."

पाहरेकऱ्याने ते मान्य केले. प्रवाशाने बागवानाशीही तसाच करार केला. नंतर त्याने फक्त दोनच आंबे तोडले. म्हणून पाहरेकऱ्याला किंवा बागवानाला काहीच मिळालं नाही. कारण त्याने प्रत्येकाला एकेक आंबा दिला आणि ठरल्याप्रमाणे दोघांना एकेक फळ परत द्यावे लागले. प्रवाशाला दोन्ही आंबे खायला मिळाले.





# अतिथि सत्कार

कृष्णकांतला एकदा शेजारच्या गावी जावे लागले. त्यावेळी त्याचे वडील त्याला म्हणाले–"बाळा, त्या गावात आपले एक नातेवाईक रहात आहेत. परंतु त्यांच्या घरी गेलं की अतिथिसत्कार फारे होतो. म्हणून मला वाटतं की तू धर्मशाळेत उतरणं बरं!" तरी कृष्णकांत नातवाइकांकडून अतिथि-सत्कार करून घेण्यात चूक काय, असा विचार करून आपल्या नातेवाइकाच्या घरीच गेला.

हिंवाळ्याचे दिवस होते. पायी चालत गेल्याने कृष्णकांतचे तळपाय फुटले होते. तो आपल्या नातेवाइकाच्या घरी गेला व त्याने दाराची कडी वाजवली. नातेवाइकाने येऊन दार उघडले व कृष्णकांतला कुशल प्रश्न विचारून बायकोला कृष्णकांत आल्याचे जाऊन सांगितले.

नातेवाईक बाहेर आल्यानंतर कृष्णकांत घरात जाऊ लागला. परंतु त्याला थांबायला सांगून नातेवाईक बायकोला म्हणाला– "ऐकलंस का, पोऱ्याला बोलव की!"

कृष्णकांतला बाहेर तिष्ठत उभे राहणे आवडले नाही. त्याचे पाय दुखत होते. त्याला आत जाऊन बसावंसं वाटत होतं. परंतु त्याचा नातेवाईक आडवा उभा होता आणि इतर गोष्टी बोलत होता. आता कृष्ण-कांतला वाटू लागलं की आपल्याला लौकर घरात जाणे शक्य नाही. म्हणून तो बाहेर ओटयावर बसू लागला. परंतु तो नातेवाईक त्याला म्हणाला–"बाळा, जरा थांब की! पोरगा येतो आहे, तोपर्यंत बसू नकोस!"

गडयाला यायला उशीर झाला. तो बरोबर तपेलीभरून पाणी घेऊन आला होता. नातेवाईक सांगू लागला–"बेटा, 'अतिथि देवो भव!' असं थोरामोठयांचं म्हणणं आहे. म्हणून आमच्या घरात आलेल्या पाहुण्याला देवाला देतात तसा आदर [illegible]णी पाहुण्याच्या पायावर पाणी घालायचं असते. परंतु तू वयाने माझ्याहून लहान आहेस. कन्यादानाच्या वेळीच फक्त वडील माणसांनी लहानांचे पाय धुवायचे असतात. इतर वेळी तसे केल्यास वडीलधाऱ्या मंडळींचे आयुष्य क्षीण होते. तरुण मुलींनी परक्या पुरुषाचे पाय धोता कामा नयेत, असाही प्रघात आहे म्हणून मला पोऱ्याची वाट पहात थांबावं लागले. त्याला शोधायला वेळ लागला. पाय धुतल्या शिवाय पाहुण्याला बसविणे बरोबर नाही. म्हणून रागावू नकोस!"

"नव्हे हो, माझे पाय फुटले आहेत टाचेला चिरा पडल्या आहेत. गार पाणी घातलं तर झोंबेल." कृष्णकांत म्हणाला.

"तसं नव्हे बाबा! तू दुरून आला आहेस, म्हणून गार पाण्याने पाय धुण्याचीच रीत आहे." नातेवाईक म्हणाला.

त्यानंतर गडयाने कृष्णकांतचे पाय धुतले आणि मग तो घरात जाऊन बसला. नातेवाइकाने न्हाव्याला बोलावून कृष्ण-कांतचे पाय तेल लावून चोळविले. तेव्हा कोठे कृष्णकांतला थोडे बरे वाटले.

रात्री जेवण झाल्यावर पुराणप्रवचन करणाऱ्या पुराणिकाला बोलाविण्यात आले. त्यांचे प्रवचन मध्यरात्र उलटेपर्यंत होत राहिले.

नातेवाईक म्हणाला–"असं सांगतात की पाहुण्याच्या बरोबर बसून पुराणप्रवचन ऐकल्याचे पुण्य फार मोठे असते म्हणे!





अशाच प्रसंगी तुला काय किंवा मला काय, पुराण श्रवण करण्याचा योग जुळून येतो आणि पुण्यलाभ होतो.

कृष्णकांतला दररोज लौकर झोपायची संवय होती. त्यात त्या दिवशी तो खूप दमला सुद्धा होता. परंतु प्रवचन होत होते म्हणून त्याला जागावे लागले. झोपायला उशीर झाल्याने त्याला झोप येईना.

कृष्णकांतला झोपण्यासाठी अंगणात खाटेवर अंथरूण घालण्यात आले. तो खाटेवर आडवा झाला असेल नसेल तितक्यांत गडयाने परसात बांधून ठेवलेल्या वाघ्या कुत्र्याला आणून खाटेच्या एका

कृष्णकांतने चकित होऊन विचारले– "हे काय? माझ्या खाटेला कुत्रा बांधून ठेवता आहां?"

नातेवाईक समजावून सांगू लागला– "मुला! या गावात चोरांची फार भीती आहे. चोरांचे टोळकेच येते. कधी कधी माणसाचा खून सुद्धा करतात. म्हणून आम्ही कुत्रा पाळला आहे. गेले काही दिवस म्हणूनच चोरांचा सुळसुळाट थोडा कमी झाला आहे. पाहुण्याचे रक्षण करणे आमचे प्रथम कर्त्तव्य आहे."

कृष्णकांतला कुत्र्याची फार भीती वाटे. तो परदेशी जातीचा कुत्रा होता, वाघा-सारखा होता. कृष्णकांत त्या घरी नवा आला होता. म्हणून कुत्रा त्याला हुंगू लागला. म्हणून कृष्णकांतची झोप पार उडाली.

पहाटे त्याचा डोळा थोडा लागला. तेव्हा त्याच्या नातेवाइकाने त्याला हाक मारली. म्हणाला–"पाहुण्याने उठल्यानंतरच इतर कामे करायची असतात."

रात्रभर झोप नाही, प्रवासाचा शीण, हवापाण्यात झालेला बदल, या सर्वांमुळे कृष्ण-कांतला सर्दी झाली व तो शिंकू लागला.

नातेवाइकाची आई सत्तर वर्षांची म्हातारी होती. ती कृष्णकांतजवळ आली. कृष्णकांत शिंकताच ती ऊन पाण्यात बोटे

[illegible] ने त्याचे डोके ओले चिंब झाले.

कृष्णकांतच्या शिंका बंद झाल्यावर म्हातारीने विचारले–"बाळा! कसं वाटतं आता?"

"आजी! डोकं पुसायला पंचा, टॉवेल काही देता का?" कृष्णकांत म्हणाला.

"असे नको म्हणूस, बेटा! डोकं पुसायचं नसते. ते आपोआप वाळलं पाहिजे. घरा-तल्या माणसांची अशी सेवा करता येत नाही. परंतु तू आहेस पाहुणा, तुझी काळजी वाहलीच पाहिजे!" म्हातारी त्याची सम-जूत घालू लागली.

कृष्णकांतने त्या अतिथिसत्काराचा लाभ अशातऱ्हेने चार दिवस घेतला. पुराण श्रवण व कुत्र्याच्या भीतीने त्याला चार दिवस झोप मिळाली नाही.

ज्या दिवशी तो परत घरी जायला निघाला, त्या दिवशी त्याच्यासाठी कोणते-तरी विशिष्ट प्रकारचे सरबत तयार करण्यात आले. त्याचा नातेवाईक ग्लास कृष्णकांतच्या हातात देत म्हणाला–"बाळा! अमृतासारखं हे पेय फक्त पाहुण्यासाठीच तयार करतात. हे सात पेले असतं आणि सर्व पाहुण्याने एकटयाने प्यायचं असतं. ही रीत आहे."

कृष्णकांत चकित होऊन म्हणाला– "पाहुण्यांची इतकी काळजी वाहणारे लोक आता उरले आहेत कोठे? माझ्यासाठी आपल्याला फार कष्ट सहन करावे लागले. आणि खर्चही खूप करावा लागला."



"अरे, त्यात काय मोठं सं? परंतु मला एका गोष्टीचं मात्र फार आश्चर्य होते की आमच्याकडे कोणी पाहुणा म्हणून आला की तो पुन्हां दुसऱ्यां वेळी येत नाही." नातेवाईक म्हणाला. ते ऐकून कृष्णकांतला आश्चर्य वाटले. हे लोक अतिथिसत्कार इतका करतात व कोणत्याही गोष्टीची कमतरता ठेवीत नाहीत, तरी लोक पुन्हा कां येत नाहीत? असा विचार करीत त्याने सरबताचा ग्लास तोंडाला लावला.

त्यानंतर तो म्हणाला–"आतां मला कळलं की तुमच्याकडे येऊन गेलेला पाहुणा पुन्हा कधी कां येत नाही. तुमच्या घरी पाहुण्याचा सत्कार देवासारखा होतो. देव दगडाचा असतो. म्हणून तो सर्व सहन करतो. परंतु माणसाला ते शक्य नसते. मला इतके सरवत एकट्याने प्यायला देणे, ही न्यायाची गोष्ट नाही. घरातल्या सर्वांनी ते माझ्याबरोबर प्याले पाहिजे."

घरातली मंडळी त्याला तयार झाली नाहीत. तेव्हा कृष्णकांत म्हणाला–"पाहुण्याची शेवटची इच्छा पुरी करण्याचे कर्तव्य घरधन्याचं असतं की नाही?" तेव्हा सर्व मंडळी सरबत प्याली.

घरधनी सरबताचा एकच घोट घेऊन रागाने म्हणाला–"सर्वजण फेकून द्या ते सरबत. नका पिऊ!" कारण सरबत चवदार तर नव्हतेच त्याला कसला तरी वास येत होता.

तेव्हा कृष्णकांत म्हणाला–"आतां तुम्हीच सांगा सात पेले पिणारा पाहुणा पुन्हा तुमच्या घरीं पाऊल कशाला टाकील?"

घरधनी लाजेने मान खाली करून बसून राहिला. तेव्हा त्याला संशय आला की पाहुण्याने पुन्हा येऊ नये म्हणून बायको मुद्दाम तसे सरबत तयार करीत असावी.

कृष्णकांत म्हणाला–"पाहुण्याला आपत्यातलाच एक माणूस समजून त्याच्याशी वागलं तर त्याला पुन्हा यावंसे वाटेल. मी तुमच्या आतिथ्याबद्दल फार आभारी आहे." असे सांगून त्याने निरोप घेतला.



# चोरीची वृत्ती

रंगनाथ नामक एका व्यक्तीने विश्वनाथ नामक एका वाण्याकडे काम विचारले.

विश्वनाथ म्हणाला–"मी तुला आपल्या दुकानातच नोकरी देतो, परंतु एका अटीवर, मी जे काम सांगेन ते तू केले पाहिजेस." रंगनाथाने ते मान्य केले.

"तरमग ऐक. माझे शेजारी दुकानदार मधूनमधून आपल्या गावी जातात. तेव्हा तुला त्यांच्या दुकानातर काम करावे लागेल. परंतु जी विक्री होईल त्यातला थोडा वांटा मला आणून दिला पाहिजेस; शिवाय तू त्यातला वांटा काढतो आहेस ह्या गोष्टीचा त्या दुकानदाराला संशय येता कामा नये. समज तू कैद झालास तर तुला स्वतःचा अपराध मान्य करावा लागेल; समजले?" विश्वनाथने विचारले.

रंगनाथाने ती अटसुद्धा मान्य केली. तेव्हा विश्वनाथ म्हणाला–"तरमग तू निघून जा"

"कां बरे?" रंगनाथाने चकित होऊन विचारले.

"कारण तुझी वृत्तीच चोरी करण्याची आहे. माझ्या गैरहजेरीत तू विश्वासपूर्वक काम करशील याची खात्रीच काय?" विश्वनाथाने विचारले.





# भूत बंगला

राघवराव नावाच्या जमिनदाराची गावाच्या वेशीवर एक रिकामी जमीन होती. ती जमीन रामू नावाच्या एका वयस्कर माणसाने भाड्याने घेतली आणि भाडेचिट्ठीत भाड्याची रक्कम लिहून दर महिन्याच्या पहिल्या आठवड्यात देण्याचे कबूल केले; त्याने असेही लिहून दिले की जर त्याने एक वर्षभर भाडे दिले नाही तर जमीन मालकाला परत मिळेल. जमिनी-वरचा हक्क आपोआप नाहीसा होईल.

रामू एकटाच होता. तो कोणाला भेटत नसे की कोणाशी बोलत नसे. त्याने त्या रिकाम्या जमिनीत एक सुंदर बंगला बांधला. ती एक मोठीशी पर्णकुटीच होती. बांबूच्या भिंती होत्या व छप्पर कवलारू होते. तो एकटाच त्यात राही. त्याने त्या बंगल्याच्या चारी बाजूला सुंदर बागबगिचा लावला. फुलझाडे व फळझाडे वाढल्यावर बंगला सुंदर दिसे. परंतु तो बंगला आत जाऊन कधी कोणी पाहिला नव्हता; पाहण्याचे भाग्य कोणालाही लाभले नव्हते, तेवढे साहस सुद्धा नव्हते.

रामू स्वतःच सैंपाक करी, महिना संपायच्या आतच जमिनदाराला भाडे नेऊन देई. तो रहायला लागून दोन वर्षे झाली असतील. लोकांना रामूच्या एकलकोंडे-पणाविषयी कौतुक वाटे. बंगला आतून कसा आहे, रामू एकटा का राहतो, बंगल्यात काय होतं वगैरे गोष्टी विषयी कुतूहलही गावकऱ्यांच्या मनात होते. लोकांचा असा समज होऊ लागला होता की रामू एकटा रहात नसून त्याच्याबरोबर भुते राहतात. म्हणून कोणी एकटा दुकटा बंगल्याच्या जवळपास जायला धजत नसे.

एकदा सबंध महिना लोटला तरी रामू संवयीप्रमाणे भाडे द्यायला आला नाही. आठवडा गेला, महिना गेला तरी रामू फिरकला नाही. तेव्हा जमिनदाराने चौक-शीला नोकरांना पाठविले. नोकरांनी बंगल्याबाहेरून हाका मारल्या. परंतु उत्तर आले नाही. दाराला कुलूपसुद्धा नव्हते. म्हणून नोकर धीर करून आत गेले. घरातले सामान जागच्या जागी ठेवलेले होते. परंतु आत कोणी माणूस दिसेना. दिवसभर नोकर वाट पहात बंगल्याबाहेर बसून राहिले. संध्याकाळपर्यंत रामू फिर-कला नाही तेव्हा घराला कुलूप लावून नोकरांनी सर्व हकीगत मालकाला सांगितली.

एक वर्ष लोटले, रामूचा पत्ताच नाही. जमिनदाराने विचार केला की बंगला ताब्यात घेऊन युवासमाजाच्या कार्यालया-साठी द्यावा. परंतु लोकांना त्या बंगल्यात पाऊल टाकायला भीती वाटे. त्यांना वाटे की तो बंगला म्हणजे भुतांचा अड्डा आहे. त्यांनीच रामूला नाहीसे केले असावे. रात्री भुते जमतात व बंगल्यात धुमाकूळ घालतात असे सर्वांना वाटे. परंतु वास्तविक गोष्ट अशी होती :–

रामूचे खरे नाव कालीपद होते. त्याची दुसऱ्या एका जिल्ह्यातल्या चोरांशी मैत्री होती. त्या चोरांच्या टोळीने एकदा एका जमिनदाराच्या घरात दरोडा घातला आणि चोरीचा माल रामूच्या घरी आणून तो



सुरक्षितपणे ठेवायला रामूला सांगितले. रामू त्यातले सर्व पैसे व दागदागिने उचलून पळून गेला आणि दूर जमिनदाराच्या या गावी जाऊन राहू लागला. त्याने आपले नाव बदलून जमिनदाराची रिकामी जागा भाड्याने घेतली व तेथे बंगला बांधून राहू लागला. तो सर्व पैसे व दागिने नेहमी एका पेटीत घालून पेटी उशाशी ठेवून झोपत असे. खूप सावधगिरीने तो त्या पेटीचे रक्षण करीत असे.

परंतु चोर स्वस्थ कसे बसणार? चोरांनी खूप शोध केला आणि शेवटी रामू रहात असे ती जागा त्यांना सापडली. त्यांनी रामूला, म्हणजे कालीपदला धरून नेले.



त्यांची राहण्याची एक गुप्त जागा होती. तेथे ते कालीपदला, त्याने दिलेल्या धोक्याबद्दल कालीच्या पायासमोर बळी द्यायच्या तयारीत असता पोलीसांना गुप्त जागेचा पत्ता लागला. त्यांनी सर्व चोरांना कैद केले. अशातऱ्हेने रामूचा जीव वाचला.

तिकडे जमिनदाराच्या गावी मानस नावाचा एक कालेजात शिकणारा विद्यार्थी होता. तो उन्हाळ्याच्या सुट्टीत घरी आला तेव्हां जमिनदाराने भूतबंगला युवासमाजाच्या कार्यालयासाठी देऊ केला असल्याचे त्याला कळले. परंतु भुतांच्या भीतीने तो तसाच रिकामा पडून होता. विज्ञानशास्त्राची माहिती असणाऱ्या कोणाही व्यक्तीचा भुतांखेतांवर विश्वास बसणे शक्यच नाही. म्हणून मानस तो बंगला कसा मिळवावा याचा विचार करू लागला. खेडेगावातली तरुण मंडळी अंधविश्वासामुळे त्याचे म्हणणे कबूल करणार नाहीत, हे त्याला माहीत होते. म्हणून काहीतरी उपाय करून तो अंधविश्वास काढून टाकला पाहिजे.

असा विचार करून मानसने युवा समाजाचा पुढारी सुरजित याला सर्व काही सांगून जमिनदाराने देऊ केलेला बंगला युवासमाजाला मिळवून देण्याची खटपट करण्याचे ठरविले. "परंतु त्या आधी त्या बंगल्यातून भुतांना पळविले पाहिजे!" मानस म्हणाला.

भुतांना पळविता आले तर आपल्याला मजेत त्या बंगल्याचा उपयोग करता येईल." सुरजित म्हणाला.

"तरमग भुतांना पळवून लावणारा कोणी मांत्रिक नाही का रे आपल्या गावात?" मानसने विचारले.

"आहेत म्हणे, ती सर्व निरुपयोगी माणसं आहेत?" सुरजित म्हणाला.

"मला माहीत आहे एक माणूस. त्याच्या मदतीने हे काम फत्ते होईल." मानस म्हणाला.

युवासमाजाने ते मान्य केले.

दोन दिवसांनी मानस शहरातून सत्यानंद नावाच्या एका भूत वैद्याला बोलावून घेऊन आला. त्या भूत वैद्याचे केस पिंजारलेले होते. त्याच्या अंगावरचे सर्व कपडे लाल भडक होते. मानस आपल्या मित्रांना त्याची ओळख करून देत म्हणाला–"हे एक प्रख्यात भूतवैद्य आहेत. यांनी आतापर्यंत अनेक भुते उतरविली आहेत."

दुसऱ्या दिवशी शनिवार होता. त्याच दिवशी भूतबंगल्यातील भुतांना पळविण्याचे ठरले. बंगल्यात व बाहेर फुलांचा सडा घालण्यात आला. नंतर भूतवैद्य गावकऱ्यांना म्हणाला–"मित्र हो! या घरातले भूत जातीने ब्राह्मण आहे. मी त्याला संतुष्ट करून त्याने हा बंगला सोडून निघून जावे असे सांगण्याचे ठरविले आहे. त्याला मी या बाटलीत भरून, बाटली पाण्यात फेकून देणार आहे, म्हणजे त्याच्या आत्म्याला शांतिलाभ होईल. तुमची सर्वांची परवानगी असेल तर ते मी करणार आहे. तरमग बोला, तुमची परवानगी आहे का?"

सर्वजण म्हणाले–"कबूल, तसंच करा. आम्हांला हरकत नाही, उलट आनंदच होईल." सत्यानंदचा पोशाख आणि बोलण्याची रीत यांचा सर्वांच्या मनावर चांगलाच परिणाम झाला होता.

सत्यानंदसमोर एक रुंद तोंडाची बाटली ठेवण्यात आली. त्याच्या जवळ एक केळे होते. बाटलीची रुंदी तिच्या तोंडापेक्षा थोडी जास्त होती. काही तरी गुप्तलिपीत



लिहिलेला एक मोठा कागद सत्यानंदने घेतला. त्यावर लिहिलेला मंत्र वाचला आणि तो कागद बाटलीत घातला. त्यावर थोडेसे तेल टाकले आणि तो कागद पेटल्यावर एक केळे घेऊन वरच्या बाजूने केळे थोडे सोलले आणि सोलला गेलेला भाग बाटलीत घातला. केळे तोंडावर उभे राहिले. परंतु सत्यानंद मंत्र म्हणू लागल्या-बरोबर केळे बाटलीत सरकू लागलेले पाहून सर्व लोक चकित झाले त्यांना वाटले की बाटलीतले भूत केळे आत ओढून घेत आहे. लौकरच सर्व केळे बाटलीत गेले आणि साल बाहेर पडली.

त्यानंतर सत्यानंदने बाटलीचे बूच लावले व म्हणाला—"आतां भूत माझ्या हातात आहे. बंगल्याचा ताबा त्याने सोडला आहे. आता वाटेल त्याने बेफिकीर होऊन बंगल्यात रहायला हरकत नाही." असे सांगून तो स्वतः उभा राहिला व बंगल्यात गेला. तेव्हा सर्वांची भूत बाटलीत बंद झाल्याची खात्री पटली.

त्याच दिवशी संध्याकाळी त्या बंगल्यात युवासमाजाचे कार्यालय उघडले. उद्घाटन समारंभाचे अध्यक्ष स्थान स्वतः जमिनदार साहेबांनी भूषविले होते.

घरी परतल्यावर मानसने सत्यानंदला विचारले—"काय हो! भुताला कैद कर-ण्याचा हा प्रयोग म्हणजे काय? केळे बाटलीत जाऊ लागलं ते पाहून इतरांबरोबर मीसुद्धा चकित झालो. बाटलीत जी उष्णता उत्पन्न झाली तीमुळे बाहेरच्या हवेचा दाब वाढून केळे आत गेलं का?"

सत्यानंद वास्तविक मानसाच्या एका सहपाठी मित्राचा चुलता होता. त्याचे ते केस आणि लाल कपडे भाड्याने आणलेले होते.

मानसने विचारलेला प्रश्न ऐकून सत्यानंद हसत म्हणाला—"होय मानस! बाटलीत कागद पेटल्यावर आतली हवा तापून विरळ होते. तोंडावर केळे ठेवल्यावर आतली हवा गार होते व आकुंचित होते. तेव्हा बाहेरच्या हवेचा दाब पडल्याने केळे आत ओढले जाते.






हनुमान अयोध्येच्या वाटेवर वाल्मीकि-आश्रमात उतरला आणि मुनीश्वरांना नमस्कार करून त्याने विचारले—"महात्मन्! असं कसं काय घडलं हो हे सर्व?"

वाल्मीकि स्मित करून म्हणाले—"हनु-मंता! अरे हे मी तुला सांगायला हवं का, तुला सर्व कळलं आहे! शंबुकासारख्या निरपराध्यांचे अधिकाऱ्यांच्या अत्याचारा-मुळे कसे बळी पडतात? राज्याची सूत्रे हलविणाऱ्या बिचाऱ्या राजाला आपल्या माथी अनेक पापे कशी बांधून घ्यावी लागतात? पापी व विष ओकणाऱ्या सामान्य प्रजेच्यासाठी त्याला कसा कसा त्याग करावा लागतो, याचे प्रत्यक्ष प्रमाण म्हणून हे सर्व घडलं! मी आणखी काय सांगू?"

हनुमानाने वाल्मीकिआश्रमात सीता रहात असे ते कुटीर आणि लवकुश धनुर्विद्या शिकत असतां त्यांनी सोडलेल्या बाणांमुळे विद्ध झालेले वृक्ष फार कौतुकाने पाहिले. सीता हिंडेफिरे त्या जमिनीवरची धूळ आपल्या माथी लावून हनुमानाने अयोध्येच्या दिशेने उड्डाण केले.

हनुमान आकाशमार्गे उडत अयोध्येला आला आणि राजभवनासमोरच्या उद्यानात उतरला.

तेथे लवकुश धनुर्विद्येचा खेळ खेळत होते. त्या दोघांच्या मधोमध बाणांचा एक स्तंभ राजभवनाएवढा उंच उभा झाला होता. लवकुशांनी हनुमानाला पाहिले व डोळ्यांच्या खुणा करून काय करायचे ते



ठरविले आणि हनुमंताच्या चारीबाजूला बाणांचं एक कुंपण उभे केले.

लवने दरडावून हनुमंताला विचारले—"कोण रे तू?"

लवकुशांच्या चेहऱ्याकडे हनुमान कौतुकाने पाहात राहिला. लवाचा चेहरा सीतेसारखा तर कुशाचा अगदी रामासारखा होता. हनुमान स्मित करून म्हणाला—"मी हनुमान! रामाच्या दर्शनाला आलो आहे!"

"तू हनुमंताचे रूप धारण करून आलेला मायावी राक्षस कशावरून नसशील? मारीचचे तुझ्याशी काही नाते आहे का?" असे म्हणत लवाने धनुष्यावर बाण चढवून नेम धरला.

लवाला थोडा शांत रहायला सांगून कुशने रामासारख्या गोड शब्दात विचारले—"तू हनुमान आहेस हे आम्हांला कसे कळायचे? ते सिद्ध करीपर्यंत आम्ही तुला जागचे हलू देणार नाही."

"तुझा प्रताप ऐकला आहे, तो प्रत्यक्ष दाखव. प्रथम तुझं विराट रूप पहायचं आहे!" लव म्हणाला.

हनुमानाने आपला देह वाढविला व दोघांना प्रेमाने उचलून पोटाशी धरले. नंतर त्यांना आपल्या पाठीवर बसवून आकाशात उड्डाण केले आणि सरयू नदी आणि अयोध्येचे दृश्य आकाशातून दाखविले. नंतर त्याने त्यांना जमिनीवर ठेवून सीतेला दाखविले होते तसे आकाशाएवढे आपले विश्वरूप दाखवून शेपटी वाढवून चारीबाजूला भित उभी केली. नंतर लवकुशांना खांद्यावर बसवून म्हणाला—"मैरावणाचा संहार केला तेव्हा रामालक्ष्मणांना असेच खांद्यावरून घेऊन आलो होतो." असे सांगून दोघां मुलांना चारीबाजूला फिरवून भित दाखविली.

लवकुशांनी हनुमंताला नमस्कार केला व स्मित करून म्हणाले—"हनुमंता, तुझा प्रताप स्वतःच्या डोळ्यांनी पहायला मिळावा म्हणून तुला आम्ही अडविले. आम्हांला क्षमा कर."

"तुमची इच्छा पुरी व्हावी म्हणून तर मी तुम्हांला खेळविले!" हनुमान म्हणाला. नंतर दोघांनी हनुमंताचा एकेक हात धरला व त्याला रामाकडे घेऊन गेले.

हनुमंताला पाहतांच रामाच्या तोंडातून दुःखावेगाने शब्दच उमटेना. डोळ्यातून घळघळा अश्रुधारा सुरू झाल्या. हनुमान रामाला गुडघे टेकून नमस्कार करीत म्हणाला—"रामा! तू सामान्य माणसासारखा दुःखामुळे स्वतःला आवरू शकला नाहीस तर कसे? प्रजेचे पालन करणे म्हणजे सुखोपभोग आणि पुष्पशय्येवर लोळणे नाही, पडेल ते लहान थोर, बरे वाईट काम करावे लागते आणि त्याग करावा लागतो ही गोष्ट पुढील काळात जगाला कळावी, यासाठी रामराज्याचे उदाहरण तू घालून द्यावेस म्हणूनच नाही का हे सर्व घडले?" असे सांगून हनुमान गप्प झाला.

"तेव्हा राम म्हणाला—"हनुमंता! तुला भेटून आणि तुझ्या तोंडचे गोड शब्द ऐकून माझं मन हलकं झालं! सीतेच्या अभावी जे दुःख होत आहे त्याच बरोबर हा अश्वमेध यज्ञ अपुरा राहतो की काय अशी भीती वाटत आहे. यज्ञाचा घोडा यावेळी मणिपुरात पोचल्याचे कळते. त्या अश्वाचे रक्षण करण्याचा भार मी तुझ्या खांद्यावर टाकीत



आहे. म्हणूनच मी तुला बोलाविले. घोड्याबरोबर माझी तिघी धाकटी भावंडे गेली आहेत. तू त्यांच्या मदतीला जा."

रामाची आज्ञा शिरोधार्य करून हनुमानाने गदा खांद्यावर ठेवली व उड्डाण केले.

हनुमान आकाशमार्गे जात असतां एका दाट अरण्यात एक राक्षस व एक राक्षसीण खूप पिऊन नृत्य करीत असलेले दिसले. हनुमान सूक्ष्म रूप घेऊन त्यांच्या जवळच्या एका झाडावर उतरला आणि गंमत पाहू लागला. राक्षस व राक्षसीण त्या झाडाखाली बसून बोलू लागले:

"शत्रूचा अवशेषही राहू नये असे म्हणतात ते उगीच का? शत्रूचे उरलेले



अंश आपण आहो व शत्रूचे ऋण आपण आज फेडले. होय की नाही कराळकंठा! त्या दिवशी रात्री तू धोबी होऊन तू किती बोललास? मर्मावर आघात केलास." छान राक्षसीण म्हणाली.

"शूर्पणखे! तू छान सूड उगविलास! काय पण छान धोबिणीचे काम बजाविलेस?" राक्षसाने या शब्दात तिला शाबासकी दिली.

कराळकंठ हा शतकंठ रावणाचा धाकटा भाऊ होता. युद्धात स्वत:चा जीव वाचवून तो थोरला भाऊ शतकंठ याचा वध करणाऱ्या सीतेवर व रामावर सूड उगविण्यासाठी धोब्याचं रूप घेऊन अयोध्येला येऊन राहू लागला होता. रावणाची धाकटी बहीण शूर्पणखा अजून जिवंतच होती. काकतालीय न्यायाने तीसुद्धा सूड उगविण्याच्या विचाराने धोबिणीचे रूप घेऊन अयोध्येला येऊन राहू लागली होती. त्यांची परस्परांची गमतीशीर गाठ पडली.

दोघं भूक भागविण्यासाठी अयोध्येच्या वेशीवर कोणी माणूस एकटादुकटा सापडला तर त्याला ठार करून खाण्याच्या हेतूने फिरत असतांना धोबी धोबिणीच्या रूपात परस्परांना भेटली. शूर्पणखेने कराळकंठाला पाहून त्याचा हात धरून ओढून नेले खायला म्हणून. कराळकंठाने विचार केला स्त्रीचे मांस कधी भक्षण करायला पूर्वी मिळाले नव्हते. ते कसे असते हे पहायला मिळेल व भूक भागविता येईल म्हणून तो तिच्याबरोबर गेला तो एक माणूस आहे असे मानून त्याला ठार करून खाण्यासाठी शूर्पणखेने राक्षस रूप धारण केले. "अरे, मी फसलो की! तू राक्षसीणच का?" कराळकंठाने स्वत:ची ओळख सांगितली व दोघांनी धोब्याचं जोडपं म्हणून अयोध्येला राहण्याचं ठरविलं. सर्व कपटनाटक पुरे झाल्यावर विजयोत्सवाने ती दोघं या अरण्यात रहात होती.

हनुमान झाडावरून त्यांचं बोलणं ऐकत होता.

कराळकंठ म्हणाला—"त्या वेळी तेथे हनुमान नव्हता म्हणून बरं झालं. नाही तर आपणा दोघांची वळकटी करून आपणा दोघांना आपल्या थोरल्या भावांकडे त्याने पाठवून दिले असते. आपलं नशीब बलवत्तर म्हणून कोणत्या तरी डोंगरावर जाऊन राहिला होता तो वानर!"

"त्या हनुमंताचे नाव काढू नकोस. त्याचं नाव ऐकलं की मला राग येतो." शूर्पणखा म्हणाली.

"राग नाही, धडकी भरते म्हण की!" दात काढून कराळ म्हणाला.

"माझ्या भावाने माझ्यासाठी सोन्याचा राजवाडा बांधून दिला होता. त्याला आग लावली की त्या शेपुटवाल्याने! त्याच्यामुळे मला तशी भयभीती नाही म्हणा, सबंध अंगाची लाहीलाही होते!" शूर्पणखा स्वत:च्या अंगावर हात फिरवीत म्हणाली. लंकादहन झाले त्या वेळी तिच्या अंगावर एक जळती तुळई पडली तेव्हां तिची पाठ भाजून निघाली होती. कराळकंठ तो व्रण पाहून थट्टेत म्हणाला—"म्हणून तू अंगाची लाहीलाही होते म्हणालीस होय? अजून चुरचुर होत असेल नाही तुझी पाठ? तुझा वाडा जळून गेल्याची ती खूण आहे, समज!" त्याने उडविलेल्या थट्टेमुळे



"पुरे झालं, फार शहाणा आहेस बडबड करायला!"

"तसं नव्हे ग, शूर्पणी! त्याचं नाव घेतलं की माझ्या अंगाचा सुद्धा जळफळाट होतो. आमचा सर्वनाश त्यानेच केला!" तो म्हणाला.

"असं बोल! नाही तर तूच मोठा बहाद्दर म्हणून मोठमोठ्या गप्पा मारू नकोस! त्याची नजर चुकवून तू पळून गेलास, पळपुटा कुठला. शूरासारखं युद्ध करून मरायला काय हरकत होती रे?" शूर्पणखा म्हणाली.

"पळून आलो म्हणून तर सूड उगविणे आपल्याला शक्य झालं; तुझ्यासारखी सुंदर



"चल आतां दूर कोठे तरी जाऊन उरलेले आयुष्य सुखाने घालवू!" ती म्हणाली.

"आणखी एक काम उरलं आहे. रामाच्या अश्वमेध यज्ञाचा घोडा आहे, तो धरला पाहिजे!" तो म्हणाला.

"छान, मग त्याच्यावर बसूनच जाऊ या." ती म्हणाली.

"तो स्वारी करायचा घोडा नाही वेडे!" तो म्हणाला.

"काय म्हणालास? पुन्हा बोल तर तसे, खबरदार! माझ्या नखांचा पराक्रम काय तो दाखवीन. नाक कान थोडे लहान झाले असले तरी माझ्या रूपात काही कमतरता आली नाही. उलट त्यांचे सौंदर्य वाढले आहे. लक्ष्मणाने नाक कान कापले नसते तर कान लांब आणि नाक मोठे राहिलं असतं आतांच माझं रूप चांगलं झालं आहे. परंतु काय रे इच्छित रूप धारण करून इच्छिलेल्या जागी जाण्याची शक्ती आपल्याला असतांना घोड्याची काय गरज आपल्याला?" तिने विचारलं.

"त्या घोड्याला ठार करायचं!" कराळ म्हणाला.

"घोड्याने काय रे आपलं वाकडे केले?" तिने चकित होऊन विचारलं.

"शूर्पणखे! रामावर सूड उगवायचा! घोडा दिसला नाही तर रामाचा यज्ञभंग होईल. सीता नाही म्हणून त्याचा अर्धा जीव गेला आणि आतां घोडा गेला की उरलेला प्राण जाईल." कराळ म्हणाला.

"तरमग चल, लौकर त्याला ठार करू या. घोड्याच्या डोक्यातलं मांस फार रुचकर असत बरं का!" शूर्पणखा म्हणाली.

"अग खादाड पोरी! तुला खाण्या-शिवाय दुसरं काही सुचतच नाही!" म्हणत कराळ उठून उभा राहिला.

हनुमानाने एक फांदी मोडून त्यांच्या अंगावर टाकली.

"आपल्यावर पुष्पवृष्टी होते आहे की!" शूर्पणखा म्हणाली.

"अग कामरूपिणी! ती पुष्पवृष्टी नाही. झाडांची पानं आहेत." कराळ म्हणाला.

"ते काही असो. तू चल तर लौकर, त्या घोड्याचा समाचार घेऊ या!" असे म्हणत शूर्पणखेने कराळचे दोन्ही हात धरले आणि ती दोघं निघणार इतक्यात हनुमानाने आपली शेपटी वाढवून त्यांच्या वाटेवर आडवी धरली.

"साप, नागसर्प!" कराळ ओरडला.

शूर्पणखा लक्षपूर्वक पाहून ओरडली– "साप नाही, यमाने टाकलेला पाश आहे! हनुमंताची शेपटी आहे!"

"तू तरी काय बोलते आहेस? इकडे हनुमान कोठून येणार? काही पाहिलं की तुला हनुमान दिसतो!" कराळ म्हणाला.

"मला चांगली ओळख आहे, त्या शेपटीची. लंकेला आग लावणारी ही शेपटी आहे." थरथर कापत शूर्पणखा म्हणाली. शूर्पणखा म्हणाली ते ऐकून कराळ पळून जाण्याच्या खटपटीत असता शूर्पणखा म्हणाली– "मला एकटीला सोडून पळून जाणार का रे तू?"

तितक्यात भयंकर रूप धारण करून हनुमान समोर उभा राहिला. त्यांना पाहून ते राक्षस जोडपे पळू लागले तेव्हां हनुमंताने एक मोठा खडक उचलून त्यांच्या अंगावर फेकला. त्याच्या खाली चेंगरून ते जोडपे ठार झालं. अशातऱ्हेने शत्रूच्या अवशेष नष्ट झाल्याबद्दल हनुमंताला अपार आनंद झाला. त्याने सिंहनाद करून पुन्हा उड्डाण केले आणि मणिपुरच्या दिशेने निघाला.

हनुमान आकाशमार्गे जात असता अनेक धारा होऊन वहात सुंदरबनातून वाहणारी गंगानदी त्याने पार केली आणि मणिपुराच्या परिसरातल्या भागात तो आला. दूर ब्रह्मपुत्रा नदी चांदी वितळून वहावी तशी चकाकत वहात असलेली दिसली.

इतक्यात मणिपुर राजधानीच्या वेशीवर एक वीज चमकली आणि कडाडून खाली पडल्यासारखी भासली. हनुमान विद्युत्‌वेगाने त्या बाजूला गेला.





# गंगावतरण

एके काळी अयोध्येचा राजा सगर याला केशिनी आणि सुमती नावाच्या दोन बायका होत्या. पुत्रप्राप्तीसाठी सगराने हिमालय पर्वतात जाऊन तपश्चर्या केली.



त्याचे फळ म्हणून केशिनीला असमंज नावाचा मुलगा झाला. सुमतीच्या पोटी एक पिंडच जन्मला. तो फुटल्यावर त्याचे एक हजार मुलगे झाले.



सगराने अश्वमेध यज्ञ करण्याचे ठरवून घोडा सोडला. सगराचा वाढता प्रताप न पाहवल्यामुळे इंद्राने यज्ञाचा घोडा पळवून तो पाताळ लोकात कपिल मुनींच्या आश्रमात लपवून ठेवला.



आपला घोडा अदृश्य झाल्याचे कळल्यावर सगराने त्याला शोधून आणायला आपल्या हजार मुलांना पाठविले. त्यांनी दश दिशांना जाऊन शोध काढला. परंतु घोड्याचा पत्ता लागेना.

शेवटी त्यांनी पृथ्वी खणली आणि पाताळ लोकात गेले. तेथे त्यांना घोडा दिसला. ते घोड्याला धरायला जात असता कपिल मुनींनी रागाने त्यांच्याकडे पाहिले व त्यांना भस्म केले.





बराच काळ लोटला तरी मुलं परतली नाहीत. तेव्हा सगराने असमंज याच्या अंशुमंत नावाच्या मुलाला त्यांच्या शोधार्थ पाठविले. अंशुमंत पाताळ लोकी गेला. त्याने कपिल मुनींची क्षमा मागून घोड्याला परत आणले. परंतु भस्मीभूत झालेल्या सगरपुत्रांना जिवंत करून घेऊन येणे त्याला साध्य झाले नाही. त्यासाठी देवलोकातून

ते काम करण्याचा यत्न अंशुमंताचा मुलगा दिलीप याने केला. परंतु त्याला ते शक्य झाले नाही. त्याचा मुलगा भगीरथ याने दीर्घकाल तपश्चर्या करून गंगेला पृथ्वीवर आणण्यासाठी ब्रह्मदेवाकडून वर प्राप्त केला.





परंतु गंगेचा प्रवाह इतका जोराचा होता की तो धारण करणे पृथ्वीला शक्य नव्हते. तो धारण करण्याची शक्ती एकट्या शंकराला होती. भगीरथाने शंकराची आराधना करून त्याचा सहकार संपादन केला.

हिमालय पर्वतात गंगेचा प्रवाह धारण करायला शंकर उभा राहिला. गंगा त्याच्या जटांत पडली आणि तिचा जोर कमी झाल्यावर पृथ्वीवर उतरली.





पृथ्वीवर उतरल्यावर गंगा उत्साहाने पर्वतावरुन वेगाने उतरत धावत जह्नु ऋषींच्या आश्रमात शिरली आणि तिने त्यांचे अग्निहोत्र विझविले.



जह्नु ऋषींना तिचा राग आला व त्यांनी तिचे सर्व पाणी पिऊन टाकले. भगिरथाने फार विनंती केल्यावर त्यांनी तिला आपल्या कानातून जायला वाट दिली. अशा तऱ्हेने गंगेला जाह्नवी नाव प्राप्त झाले.



शेवटी गंगा भगीरथाबरोबर समुद्रात पोचून पाताळ लोकात गेली आणि दीर्घकालापासून भस्मीभूत झालेल्या सगरपुत्रांवरुन वाहू लागली व त्यांचा उद्धार केला. भगीरथाचा प्रयत्न यशस्वी झाला.

# गोष्ट मथळा चढाओढ

## या गोष्टीला सुंदर मथळा सुचवून रु. २५ मिळवा!

?

उजाडण्याची वेळ होती. अद्याप लोकांची येजा सुरु झाली नव्हती. एक अवधूत समाधिस्थ स्थितीत वाटेत आडवा बसलेला होता.

त्याच वेळी एक चोर त्या बाजूला आला. अवधूताला पाहून व त्याला चोर समजून तो चोर म्हणाला–"काय रे, मूर्खा! उजाडल्यावर चोरी करुन असा देहभान विसरुन बसल्या बसल्या झोपला आहेस का? कोणी तुला पाहील त्या आधी घरी निघून जा!" असे सांगून त्याला जागा करुन चोर निघून गेला.

त्यानंतर एक दारुड्या त्या बाजूला आला. तो अवधूताला म्हणाला–"प्यालास तर प्यालास, परंतु घरी जायची शुद्ध राहू नये आणि रस्त्यात पडून राहण्याइतकी पितात का रे?" असा रागावून दारुड्या निघून गेला.

त्यानंतर आणखी एक अवधूत त्या बाजूला आला. समाधिस्थ व्यक्ती आणखी कोणी अवधूतच आहे, हे ओळखून त्याच्या कानात प्रणव मंत्र म्हणून त्याचे पाय धरु लागला.

★ ★ ★

वरील गोष्टीला उपयुक्त होईल असा एक सुंदर मथळा विचार करुन एका कार्डावर स्वत:च्या पत्त्यासह लिहून "गोष्ट मथळा चढाओढ", 'चांदोबा', चंदामामा प्रकाशन, २ व ३ अर्काट रोड, वडपळणी मद्रास ६०००२६ या पत्त्यावर पाठवा.

१० जून १९७८ च्या आत पोस्टकार्ड पोंचले पाहिजे. त्या कार्डावर 'फोटो चढाओढ परिचय' देता कामा नये.

चढाओढीचा निकाल ऑगस्ट १९७८ च्या चांदोबात जाहीर करण्यात येईल.

---

एप्रिल महिन्यातल्या चढाओढीचा निकाल (मथळा) "धंद्यातील कसब"



# अमरवाणी

यद्यपि प्रतिपत्ति स्ते
दैवी चापि तयो र्मतं
तथा व्युपेक्षणीयं ते
न मेतदपि रोचते ॥ १ ॥

[ जे घडले ते सर्व दैविक असं तुला वाटते आहे. पण ते दुर्लक्ष करण्यासारखे नाही. ते मला बरोबर वाटत नाही.

विक्लवो, वीर्यहीनो यः
न दैव मनुवर्तते,
वीरा स्संभावितात्मानो
न दैवं पर्युपासते ॥ २ ॥

[(अंगात) पराक्रम नाही, शौर्य नाही, अशी व्यक्तीच दैवावर सर्व सोडते. शूर आणि बुद्धिमान (स्वतःच्या) पराक्रमाने कार्यसिद्धी करून घेतो, दैवावर सोडीत नाही.]

दैवं पुरुषकारेण
य स्समर्थः प्रबाधितुम्,
न दैवेन विपन्नार्थः
पुरुष स्सो वसीदति ॥ ३ ॥

[आपल्या पुरुषार्थाने दैवाला तोंड देणारी व्यक्ती दैवाला दोष देऊन दुःख करीत बसत नाही.]



# कावळा आणि घुबड

[ ५९ ]

बोलणाऱ्या गुहेची गोष्ट सांगून रक्ताक्षी आपल्या अनुयायांसह आणखी एका डोंगरात जाऊन राहू लागला. स्वसंरक्षणासाठी त्याने सर्व खबरदारी घेतली.

रक्ताक्षी निघून गेल्याचे कळल्यावर स्थिरजीवीला फार आनंद झाला. तो विचार करू लागला, हा वस्ताद मंत्री निघून गेला हे बरेच झाले. तो खरा दूरदर्शी मंत्री आहे. बाकीचे मंत्री आंधळे मूर्ख आहेत. माझा डाव उलटण्याची शक्ती आणि युक्ती त्या एकट्याच्याच अंगात होती. इतरांना ते शक्यच नाही. आतां निश्चितपणे ह्या किल्ल्याचा, या घुबडांचा व त्याचे मंत्री सर्वांचा नाश मला करता येईल. दूरदर्शी मंत्र्यांना काढून टाकून मूर्ख मंत्र्यांच्या सल्ल्यावर अवलंबून राहणारा राजा स्वतःची अशीच गत करून घेतो.

काही काळानंतर सर्व गुहेला आग लावून तीत राहणाऱ्या सर्व घुबडांना जाळून भस्म करण्याच्या हेतूने स्थिरजीवी रानांतून वाळक्या काटक्या गोळा करून घेऊन येऊ लागला आणि तो रहात असे तेथे घरट्यात सांचवू लागला. ती गोष्ट कोणाच्याही लक्षात आली नाही. कारण स्थिरजीवीच्या प्रेमाची त्यांना खात्री होती.

त्या सर्व किल्ल्याला आग लावण्यापुरेशा काटक्या जमा झाल्यानंतर एके दिवशी उजाडल्यावर सर्व घुबडे झोपलेली असतां स्थिरजीवी आपला राजा मेघवर्ण याच्याकडे जाऊन म्हणाला—"महाराज, शत्रूच्या किल्ल्याला आग लावून बेचिराख करण्याची सर्व तैयारी झाली आहे. आपण व आपल्या सर्व अनुयायांनी एकेक काडी पेटवून चोचीत धरून आणावी आणि माझ्या



घरटचावर आणून टाकावी. तेथे मी पुष्कळ काटक्या आणून ठेवल्या आहेत. आग भडकेल आणि तुमच्या शत्रूचा तत्काळ सर्वनाश होईल.

ते ऐकून मेघवर्ण आनंदाने म्हणाला—"बाबा रे, तू इतके दिवस काय केलेस ते सर्व सांग. आपण भेटून पुष्कळ दिवस होऊन गेले."

"आत्तांच नाही महाराज! आता काम करायची वेळ आहे, गप्पा मारायची वेळ नाही. शत्रूचे हेर मी कोठे गेलो हे पाहून राजाला सांगतील व सर्व डाव फसेल. हातची संधी गेली तर ती पुन्हा मिळणार नाही. तुमच्या शत्रूचा नाश होऊन निश्चित ... म्हणजे स्वस्थपणे सर्व सांगेन." स्थिरजीवी म्हणाला.

मेघवर्ण व त्याचे सर्व अनुयायी एकेक काडी पेटवून चोचीत धरून घुबडांच्या गुहेपर्यंत उडत गेले आणि स्थिरजीवीने सांगितल्याप्रमाणे त्याच्या घरटचावर त्यांनी ती नेऊन टाकली. मोठमोठ्या ज्वाळा सर्व गुहेत पसरल्या. सर्व घुबडे नरकयातना भोगीत त्या आगीत जळून भस्म झाली.

त्यानंतर मेघवर्ण मोठ्या अभिमानाने आपल्या सिंहासनावर बसला व स्थिर-जीवीची पाठ थोपटून म्हणाला—"बाबा रे, आतां तू गेल्यानंतर काय काय केलेस ते सर्व सांग."

स्थिरजीवीने सर्व काही सांगितले.

"तू त्या घुबडांच्या राजासमोर दररोज वांकून कसा नमस्कार करीत होतास? हे खरोखरी आश्चर्य वाटण्यासारखे आहे!" मेघवर्ण म्हणाला.

"कार्यसिद्धीसाठी असली किती कामं करावी लागतात! अर्जुनासारख्या पराक्रमी वीराला चोळी पोलके घालावे लागले होते. भीमाला सैपाक करावा लागला होता. युधिष्ठिराला एक गरीब ब्राह्मण व्हावे लागले होते. नकुल व सहदेव दोघांना गाईंना चरायला घेऊन जावे लागले होते. द्रौपदीला दासी व्हावे लागले होते."

मेघवर्ण त्याला शाबासकी देत म्हणाला—"तुझे हे असिधारा व्रतच होते."

"त्यात काही शंका आहे का? परंतु ते काम रक्ताक्षी निघून गेल्यावरच मला करता आलं. बाकी सर्व मूर्ख होते. अशा मूर्खांना फसविणे फार सोपं! मूर्खांची स्तुती करावी, अधाशी लोकांना खूप खायला घालावे. लोभी असतील त्यांना खूप चारावं, दरिद्री असतील त्यांना कर्ज द्यावं, विद्वानांना पुस्तकं द्यावीत आणि राजाशी नम्रपणे वागावं—आपलं काम साधतं. परंतु काही दिवस मंदविसर्पाने बेडकांचे ओझे पाठीवर वाहलं तसे नम्रपणे वागावं लागतं." स्थिरजीवी म्हणाला.

"ऐकू तर दे ती गोष्ट!" मेघवर्णाने म्हटले व स्थिरजीवी गोष्ट सांगू लागला.

मंदविसर्प नावाचा एक साप म्हातारा झाला आणि विचार करू लागला की पुढे पोट कसे भरावयाचे? तो काळजीत पडल्याचे सोंग करून बेडकांच्या एका डबक्याजवळ आला.

ते पाहून एका बेडकाने अगदी काठापर्यंत येऊन सापाला विचारले—"काय हो मामा! आज शिकारीला गेलां नाही वाटतं?"

"बाबा रे, माझ्यासारखे फुटके नशीब असणाऱ्याला खायला काय मिळणार? काल रात्री मी भक्ष्य शोधत निघालो तेव्हा एका बेडकाला पाहून धरायला गेलो. टुणदिशी उडी मारून तो तलावात निघून गेला. तला-वाच्या काठी काही ब्राह्मण मंत्रजागर करीत होते. मी एका मुलाचा पाय पाहिला आणि बरोबर दिसत नसल्याने बेडूक समजून तो धरला. तो मुलगा तत्काळ मरून पडला. त्या मुलाचा बापाने मला शाप दिला—'तू जन्मभर बेडकांना पाठीवर वहात रहा.' म्हणून तुम्हांला पाठीवर बसवून ओझं वाहण्यासाठी आलो आहे. सर्व बेडकांना ती बातमी कळली. ते आनंदाने सापाच्या पाठीवर चढून बसा-यला धावले. सर्वात आधी बेडकांचा राजा जालपाद आला. त्याच्या पाठीमागून मंत्री आणि त्यानंतर इतर हुद्यांवर असलेले बेडूक येऊन माझ्या पाठीवर बसले."



## १९६. जिवाची पर्वा नसणारा बहाद्दर

जगातील सर्वांत प्राचीन समजल्या जाणाऱ्या सुमेरियन सभ्यतेवर इ. स. पू. २००० नंतर बॉबिलोनियांनी विजय मिळविला. त्यानंतर ३०० वर्षांनी 'कासेट' जातीच्या लोकांनी बॉबिलोनियनांचा पराभव करून सुमारे सहाशे वर्षे राज्य केले. पूर्वी बॉबिलोनियनांच्या समोर हारलेल्या असिरियन लोकांनी कॉसेट जातीच्या लोकांना जिकून एक साम्राज्य स्थापन केले.

असीरियन शुर व क्रूर होते. असीरियन साम्राज्याचा विस्तार करणाऱ्या द्वितीय सार्गोनसारखे अनेक राजे महा पराक्रमी होते. त्यांच्यातला शेवटचा राजा असुर बनिपाल हा होता. ह्याने इ. स. पू. ६६८–६२८ पर्यंत राज्य केले. त्याच्यासमोर उभे राहणे शक्य न झाल्याने अनेक राजांनी आपल्या मुलींना दासी बटीक म्हणून त्याच्याकडे पाठवून दिले. तो युद्धात नेहमी सैन्याच्या अग्रभागी असे. (चित्रात तो शिकारीला जात असतानाचे दृश्य आहे.) ह्याच्यानंतर १४ वर्षांनी असीरियाचे साम्राज्य छिन्नभिन्न होऊन गेले.





# माया सरोवर

[ २८ ]

[जयशीलला मायासरोवरेश्वर आपल्याबरोबर घेऊन जात असल्याचे कळल्यावर सिद्धसाधक निघाला, त्या वेळी जलवृक राक्षसांविषयींची बातमी कळली. कनकाक्ष महाराज व साधक तेथे पोचले तेव्हा जलवृकांशी देवशर्मा व इतरांचे युद्ध चालू असल्याचे व पळून जात असलेल्या जलवृकांचा नरभक्षक जातीचे लोक पाठलाग करीत असल्याचे दिसले. पुढे–]

स्वतःची भूक भागविण्यासाठी दोघांतिघां जलवृकांना धरतां आले तर त्या प्रयत्नात नरभक्षक जातीचे लोक त्यांचा पाठलाग करीत धावत होते. परंतु जलवृक त्यांना कोठे कोणत्या वाटेने नेत आहेत, याची कल्पनाही कदाचित नव्हती. त्या वेळी दोन जलवृक वाटेवरच्या एका उंच झाडावर चढून दाट फांद्यांच्या आड बसून हे सर्व पहात होते. त्यांचा राजा जलवृकनाथ याच्या आज्ञेने ते सकाळपासून त्या प्रदेशात पाहारा देत होते.

झाडावरचा एक जलवृकशिपाई आपल्या शेजारच्या दुसऱ्याला म्हणाला–"आपल्या राजाला शत्रू किती मोठा आहे, याची कल्पना नाहीशी वाटते. यापूर्वी सरोवरात झालेल्या चकमकीत आपण मायासरोवरातल्या त्याच्या सर्व अनुयायांना पळवून लावले खरे, परंतु त्याच्या मदतीला आणखी



काही जण येत असल्यासारखे दिसत आहेत." दुसरा जलवृक शिपाई पहिला जलवृक राक्षस इतके सर्व बोलला, परंतु ते ऐकून स्वस्थच होता. त्याला ऐकूच गेले नव्हते कदाचित! त्याची दृष्टी मायासरोवराकडे पळून जात असलेल्या त्याच्या जातभाईंवर आणि त्यांच्या पाठीमागून येणाऱ्या नर-भक्षकांवरच फक्त नव्हती तर आणखी थोड्या अंतरावरून लाकडी पाय लावून लंगडत हातात एक काठी धरून चालत येणारा हिरण्यपूरच्या सेनापतीचा मुलगा मंगलवर्मा याच्यावर होती.

जलवृक आपल्या साथीदाराला लंगड्या मंगलवर्माकडे बोट दाखवून म्हणाला— ह्याला पकडून आपल्या महाराजांसमोर उभे केले तर कसं होईल, वाटतं तुला? याच्या कडून अरण्यात नव्याने आलेल्या महाराजांबरोबर सैन्य वगैरे किती आहे, विचारून घेता येईल."

"ते ठीक होईल रे, तरी दोन समूहांत मायासरोवराच्या दिशेने जात असलेल्या शत्रूंविषयीं? त्यांच्यावर एका बाजूने दृष्टी ठेवून ते काय करीत आहेत व काय करण्याच्या बेतात आहेत, ती गोष्ट आपल्या महाराजांना कळवायला हवी, नाही का?" दुसरा जलवृक म्हणाला.

"ते काम तुझं. ते मायासरोवराच्या दिशेने चालले आहेत, त्यांत न कळण्या-सारखे गुपित काहीच नाही. मी या काठीवाल्या मूर्खाला धरून खांद्यावर टाकून महाराजांसमोर उभा करून येतो." असे म्हणत पहिला जलवृक राक्षस झाडावरून उतरून मंगलवर्माच्या पाठीमागून चालू लागला.

मंगलवर्माला त्याच्यावर कोणता प्रसंग येणार आहे, त्या गोष्टीची कल्पनाही नसावी. पायी चालणारे किंवा घोडेस्वारी करणारे दोघेही स्वतःचे मान विसरून माया-सरोवराच्या दिशेने जात होते. तो त्यांच्या पाठोपाठ जात होता. शक्य तितक्या लौकर सरोवरापर्यंत पोचून तेथे जलवृकराक्षसांशी होणा[...] या युद्धात आपल्या[...] शक्य तितकी मदत करण्याचा एकच विचार त्यांच्या मनात त्या वेळी होता. कोण किती शूर आहे हे तो पायी जात होता की घोड्या-वरून जात होता त्याच्या हातात तलवार होती की आणखी काही, यावरून ठरणार नव्हते; तर कोणाच्या अंगात किती धाडस आहे, यावरून ठरणार होते.

मंगलवर्मा ह्याच विचारात गर्क होऊन जात असतां त्याच्या पाठीमागून मोठा आवाज त्याला ऐकू आला व त्याने मागे वळून पाहिले. त्याच वेळी जलवृक राक्षस पाठीमागून जाऊन मंगलवर्मावर अकस्मात वार करून धरण्याच्या विचाराने घाईत धावत पुढे जात असता त्या वाटेवरच्या खाचखळग्यांकडे त्याचे लक्षच नव्हते. म्हणून त्याचा उजवा पाय एका खोल खळग्यात पडला आणि त्याचा तोल जाऊन त्याच्या हातांतील दगडी गदा निसटून दूर जाऊन पडली. त्याने काही ओरडा आरडा केल्या शिवाय आपला पाय बाहेर काढून घेण्याचा प्रयत्न केला, परंतु त्याचा गुढगा मुरगळल्या सारखा झाला.

जलवृक राक्षस मोठ्याने ओरडला— "जलवृकनाथा! तूच वांचव!"

मंगलवर्माला किती थोडक्यात त्याच्या-वरचे गंडांतर टळले, हे कळले. तो जल-



वृकाजवळ जाऊन म्हणाला—"काय रे, तू मला मारायला जाऊन स्वतःचा पाय मोडून घेतलास की नाही? तुला चांगली शिक्षा झाली. आतां तुला पाहिजे असेल तर मी औषधपाणी करून तुला वांचवितो. तुझा राजा जलवृकनाथ कोठेही असो, तो तुला यावेळी वांचवायला धावून येणे शक्य नाही. यापूर्वी तुमच्या जलराक्षसांनी सरोवरे-श्वराच्या निवासस्थानावर हल्ला केला होता, नाही का? त्यात कोण जिकला, कोण हारला रे? तू खरं काय ते सांगि-तलेस तर संजीवनी सारखी बुटी आणून तुझ्या मोडलेल्या पायाला बांधतो आणि तुला चालण्या लायक बरा करतो.



ते ऐकून जलवृक कण्हू लागला व काही उत्तर देऊ शकला नाही. ते सर्व झाडावरून पहात असलेला त्याचा साथीदार दुसरा जलवृक हातातली दगडी गदा वर उचलून धावत येत मंगलवर्माला म्हणाला–"ए मायासरोवरेश्वराच्या गुलाम चाकरा! मी एका क्षणात तुला इहलोकातून प्रयाण करायला लावतो पहा!"

मंगलवर्माने विचार करीत बसण्यात वेळ न घालविता चटदिशी हातातल्या गुप्तीची मूठ धरून वर ओढली. आंतून चकाकणारी एक तलवार बाहेर आली. त्याने त्या तलवारीचे टोक पाय मोडून त्याच्या समोर पडलेल्या जलवृकाच्या कंठाजवळ धरले व दुसऱ्या जलवृकराक्षसाला म्हणाला–"ए लांडग्या! मी एक ते तीन म्हणण्याच्या आत तू आपली दगडी गदा दूर फेकून गुढग्यावर रांगत येऊन माझ्या जवळ शरण मागितलीस तर तुझ्या या साथीदाराला जिवंत सोडीन, नाहीतर प्रथम याची मान उडवून नंतर तुझा समाचार घ्यायला येईन. तर मग एक, दोन..."

मंगलवर्मा 'तीन' म्हणणार त्याच्या आत दुसऱ्या जलवृकाने दगडी गदा दूर फेकली आणि गुढगे टेकून व दोन्ही हात जोडून म्हणाला–"मी शरण मागतो, माझ्या साथीदाराला ठार करू नका."

"बरं तर, पाण्यातल्या लांडग्या! तुझ्या मैत्रीची मी प्रशंसा करतो. ये माझ्या बरोबर तुला औषधी पाला दाखवितो." असे म्हणत मंगलवर्मा जवळच्या झुडपांतून वाट काढीत निघाला.

त्याने लक्षपूर्वक नजर फिरवून पाहिले, त्याला तेथे काही पिकलेली पाने असलेले झाड दिसले आणि त्यांनाच नवीन पालवी-सुद्धा फुटलेली दिसली. त्याने काही पिकलेली पाने व थोडी पालवी तोडून ती तळहातावर चोळली व त्याचा गोळा जल-वृकाला देत म्हणाला–"हा पाला बांध तुझ्या मित्राच्या गुढग्याला. त्याने पडल्या जागी कमीत कमी बारा तास हलल्या शिवाय राहिले पाहिजे [illegible] नाही तर गुढग्यापर्यंतचा पाय तोडावा लागेल."

ते ऐकून दोघे घाबरून गेले. त्यांच्यावर काहीतरी मोठे जबाबदारीचे काम होते, आणि विचारले तर ते सांगणार नाहीत हे ओळखून मंगलवर्मा थोडा पुढे सरकला. तो काही काळ स्वतः मायासरोवरात राहला होता. तिकडे जायची जवळची वाट त्याला माहीत होती, परंतु आपल्या लाकडी पायाने खाचाखळग्यांच्या वाटेने जायचे कसे हा त्याच्या समोर प्रश्न होता.

मंगलवर्मा तसाच लंगडत चारपांच मिनिटं चालत राहिला असेल नसेल, त्याला एका उंच झाडावरून "मंगलवर्मा!" अशी कोणीतरी हाक मारलेली ऐकू आली.

हे कोणतं बुवा भूत झाडावरून बोलतं आहे, असा विचार करीत त्याने मान वर करून पाहिले. झाडाच्या टोकाला फांद्यांच्या व वेलांच्या जाळ्यात अडकून पडलेला एक माणूस त्याला दिसला. तो मायासरोवरे-श्वराचा हंसरथ चालविणारा होता. तो रथ कलंडला त्या वेळी त्यातून खाली पडला आणि या झाडावर अडकून राहिला म्हणून वाचला.

"म्हणजे, तू अजून जिवंत आहेस तर! छान, फार छान! खाली उतरून यायला हाताला एखादी फांदी जवळ मिळाली नाही वाटते?" मंगलवर्मा म्हणाला.

हंसरथ हाकणारा जागच्या जागी थोडी मान वांकवून म्हणाला–"वर्मा! थोडा हळू





बोल रे! यमाच्या दूतासारखा एक माणूस एका भयंकर वनमाणसावर चढून याच वाटेने येतो आहे. त्याच्या बरोबर काही सैनिकसुद्धा आहेत. ते आपला शत्रू जयशील आहे ना, त्याच्या बाजूने दिसतात."

ते ऐकल्यावर मंगलवर्माचा उत्साह वाढला. त्या लोकांच्या बरोबर वैद्यदेव म्हणून येथे ओळखला जाणारा देवशर्मासुद्धा असणार. त्यांच्याबरोबर गेल्यास लौकर मायासरोवरापर्यंत पोचता येईल!

तो म्हणाला—"अरे बाबा! आता ते आपले शत्रू राहिले नाहीत. परंतु ते मित्र तरी आहेत की नाहीत ते सुद्धां मला माहीत नाही. मायासरोवरेश्वर त्या [illegible] जयशील नावाच्या माणसाला धरून माया-सरोवराकडे गेल्याचे मला कळले आहे. आतां तू म्हणतोस त्या लोकांमध्ये आपला वैद्यदेव आहे. माझा एक पाय मोडका, मला झाडावर चढता येत नाही. तुला उतरतां येत नाही. तू त्या येणाऱ्यांना टाळी वाजवून बोलव." मंगलवर्मा म्हणाला.

वैद्यदेव त्या वनमाणसावर चढून येणाऱ्या बरोबर येत असल्याचे कळल्यावर रथ हाकणाऱ्याला हायसे वाटले. आपण असंच काही वेळ त्या झाडावर पडून राहिलो असतो तर आपल्याला कोणीतरी नरभक्षकाने किंवा जलवृकराक्षसाने नक्कीच खाल्ले असते.

रथ हाकणाऱ्याने झाडावरून पाहिले, थोड्या अंतरावर सिद्धसाधक, कनकाक्ष महाराज व त्यांच्या बरोबरचे इतर लोक दिसले. त्यांना ऐकू येईल इतक्या मोठ्याने तो झाडावरून ओरडला—"अहो! मला वाचवा! मी इकडे झाडाच्या टोंकाला अडकून राहिलो आहे."

इतक्या दुरून आलेला आवाज सर्वप्रथम ऐकू आला तो वनमाणसालाच. ते थांबले व मान वर करून पाहू लागले आणि खांद्यावर बसलेल्या सिद्धसाधकाला खुणेने सांगू लागले. तेवढ्यात रथ हाकणारा पुन्हा एकदां मोठ्याने ओरडला.

[illegible] आली. देवशर्मा पुढे येऊन म्हणाला—"तो आवाज मायासरोवरेश्वराचा हंसरथ हाकणाऱ्याचा आहे. तो हंसरथातून येथे पडलेला दिसतो आहे."

"अस्सं, त्याला सोडवून आणून, त्याच्या मालकाची, त्या पाण्यातल्या पक्षाची सर्व गुपिते बाहेर काढतो. जयशील दृष्टीला पडल्यानंतर या सर्वांना झाडाला बांधून महाकालासमोर बली देतो." म्हणत सिद्धसाधकाने वनमाणसाला जोराने हलविले.

वनमाणूस जोराने पळत जाऊन रथ हाकणारा ज्या झाडावर अडकला होता त्या झाडाजवळ जाऊन थांबला. मंगलवर्मा साधकाजवळ जाऊन म्हणाला—"साधका, तू झाडाच्या फांदीवर अडकून राहिले-त्याला सोडवून खाली आण. ते साधेल से वाटतं का रे तुला?"

सिद्धसाधक—"जय महाकाल की!" असा जयघोष करून म्हणाला—"सर्व विचित्रच दिसतं आहे! मायासरोवरेश्वर कनकाक्ष महाराजांच्या मुलांनाच फक्त पळवून घेऊन गेला नाही, तर माझा मित्र जयशील यालासुद्धा धरून घेऊन गेला आहे. त्या दुष्टाला तुम्ही सर्व ओळखता व त्याच्या मित्रासारखे बोलतां आहां!"

देवशर्मा त्याला थोडा शांत करून म्हणाला—"साधका, तूत आपल्याला आणि त्या मायासरोवरेश्वराला सर्वांना शत्रूसारखा त्या सरोवरात आणखी एक मोठा शत्रू



आला आहे. तो म्हणजे जलवृकराक्षसांची जात. सर्वांनी मिळून त्यांना ठार केल्या-शिवाय आपल्या कनकाक्ष महाराजांच्या मुलांना वांचविणे शक्य नाही. आतांपर्यंत ते सरोवर त्या जलवृकराक्षसांच्या ताब्यांत आले आहे, असे मला वाटते. तेवढ्यात तेथे कनकाक्ष महाराज काही सैनिकांना बरोबर घेऊन आले.

झाडावरून रथ हाकणारा पुन्हा मोठ्याने ओरडून म्हणाला–"अहो, मग मला कोण सोडवणार? एक मोठा अजगर मला गिळायला पुढे सरकत येतो आहे, हो!"

त्या पाठोपाठ सिद्धसाधकाने वनमाण-साच्या पाठीवर हात फिरवून झाडाकडे बोट दाखवून वेलांच्या जाळ्यात साप-डलेल्या त्या माणसाला सोडवून आणायला खुणेने सांगितले.

वनमाणूस तुरुतुरू झाडावर चढून टोंकाशी गेले. त्याने एका हाताने अज-गराला धरून ओढले आणि दुसऱ्या हाताने वेलांच्या जाळ्यात सांपडलेल्या रथ हाक-[illegible] वनमाणसाला पाहून घाबरला. एका मोठ्या फांदीला धरून म्हणाला–"आतां मला सोड, मीच येतो उतरून खाली."

तेवढ्यात जलवृकराक्षसांची एक मोठी टोळी पळत तेथे आली व "जलवृकनाथ की जय!" असा जयघोष करीत त्या सर्वांच्या-वर तुटून पडली.

जलवृकराक्षसांपैकी एक जण एका गेंड्यावर बसून आपली दगडी गदा गर गर फिरवीत म्हणाला–"शत्रूंपैकी कोणी जिवंत सुटून पळून जाता कामा नये." या शब्दांत त्याने आपल्या अनुयायांना सावध केले.

झाडावरून हे सर्व वनमाणसाने पाहिले आणि सर्व अरण्य हादरून जाईल अशी आरोळी ठोकली आणि हातात धरलेल्या अजगराला चाबकासारखे जोराने एकदा वाजवून तितक्या उंचावरून गेंड्यावर स्वारी करून आलेल्या जलवृकराक्षसावर उडी टाकली.

(पुढल्या अंकात गोष्ट समाप्त)





# संन्याश्याचा वर

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानच्या दिशेने चालू लागला. तेव्हा प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला राजा–"सत्पात्र दान करावं, असे म्हणतात. परंतु कधीकधी सत्पात्र पाहून दान केले तरी ते निरुपयोगी ठरते. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला मणिगुप्ताची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी अनेक सिद्धी प्राप्त असलेला एक संन्यासी आपल्या शिष्यमंडळीसह एका नगरात आला. त्या नगरात मणिगुप्त नावाचा एक श्रीमंत माणूस रहात असे. तो 'अपर कर्ण' म्हणून प्रसिद्ध होता. त्याच्या घरीच राहण्याचे ठरवून संन्यासी त्याच्या घरी गेला.

वेताळाच्या गोष्टी

मणिगुप्ताच्या घरासमोर सहस्रावधी गरीब लोक उभे होते. मणिगुप्ताचे नोकर पैसे वाटीत होते.

त्या दिवशी त्या श्रीमंत माणसाचा आतिथ्यसत्कार स्वीकारल्यावर पुढल्या मुक्कामावर निघतांना संन्यासी त्या श्रीमंत माणसाला म्हणाला–"मी तुझे दातृत्व प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिले व माझ्या मनाचे समाधान झाले. तू वाटेल तो एक वर मागून घे. कोणतीही इच्छा मनात ठेवून वर मागता कामा नये. तरच तो पूर्ण होईल."

मणिगुप्त नम्रपणे म्हणाला–"आयुष्यभर माझ्या हातून दानधर्म होत राहील एवढी संपदा मिळत राहील असा वर द्यावा."

संन्यासी स्मित करून मान हलवून आपल्या शिष्यांसह निघाला.

वाटेत शिष्याने संन्याश्याला विचारले– "गुरुवर्य! आपण त्या मणिगुप्ताला दिलेला वर लाभेल का?"

संन्यासी म्हणाला–"लाभणार नाही!"

पुढे काही दिवसांनी परिस्थिती प्रतिकूल होत गेली आपले सर्वस्व घालवून बसल्यामुळे त्याने दानधर्म करणे सोडले.

वेताळ येथवर कथा सांगून म्हणाला– "राजा, संन्याश्याने दिलेला वर कां यशस्वी झाला नाही? त्याला वर देण्यापुरती सिद्धी नव्हती म्हणून का? या शंकेचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"मणिगुप्ताने निस्वार्थबुद्धीने वर मागायचा होता तर त्याने गावांत कोणी दरिद्री राहूच नये असा वर मागायला हवा होता. दाता म्हणून आपली कीर्ती व आपले धन चिरस्थायी व्हावे ही इच्छा ठेवून त्याने वर मागितला होता. हा वर निस्वार्थबुद्धीने मागितलेला नव्हता."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# नरबली

छोटू श्रीपुरहून आपल्या कुत्र्याला घेऊन निघाला तो एका डोंगराळ प्रदेशातून पुढल्या मुक्कामावर जात असतां एक विचित्र मिरवणूक त्याला दिसली. काही गिरिजन डफ पिटचा वाजवीत पुढे येत होते. मिरवणुकीच्या मध्यभागी एका रेड्यांच्या गाडीत एका खांबाला एका माणसाला बांधले होते. त्याच्या कपाळावर एक मोठा टिळा लावलेला होता आणि गळ्यात फुलांच्या माळा घातलेल्या होत्या. एकंदर परिस्थिती त्या माणसाला बळी देण्यासाठी घेऊन जात असल्यासारखी छोटूला स्पष्ट झाली. त्या बिचाऱ्याची छोटूला कीव आली. रानटी लोकांचे आचार विचार अमानुष असतात हे त्याला माहीत होते.

छोटूने मिरवणुकीच्या मागे एक म्हातारी चालत होती तिला त्याने माहिती विचारली.

म्हातारी जवळच्या एका वस्तीकडे बोट दाखवून म्हणाली–"तेच आमचे गाव. या डोंगराच्या टोकाला म्हाळसेचे देऊळ आहे. तिथे येऊन ती राहू लागल्याला आज चार वर्षे होत आली. तिची अशी आज्ञा आहे की दरवर्षी एक नरबली व दोन रेड्याचा बळी तिच्या खातर दिला पाहिजे. ती देवी म्हणजे फार मोठी देवी आहे! गेल्या वर्षी नरबली दिला नाही म्हणून पाऊस पडला नाही, पिके वाळून गेली आणि लोक उंदरासारखे पटापट मेले. एका योग्याने एक बोकड बली दिला. नरबली देण्याचे वचन मोडल्याबद्दल देवी रागावली आणि तो योगी रक्त ओकला. आज स्वतः भैरव नरबली देणार आहे, चल पहायला!"

छोटू तिला म्हणाला–"त्या माणसाला आईबाप, त्याला असा बली दिला तर रडणारा जवळचा असा कोणी नाही का?"








"बराच दिसतोस की रे? तो माझा मुलगा आहे. त्याचं केवढं मोठं भाग्य? देवी त्याला सरळ स्वर्गलोकी पाठवील!" म्हातारी म्हणाली.

छोटूला ते ऐकून हसावं की रडावं, कळेना. आई स्वत: पोटच्या पोराला बली द्यायला पाठविते! काय वाटेल ते होवो, या लोकांना या चुकीच्या मार्गावरून मागे फिरविले पाहिजे. पण कसे? एका क्षणात एक युक्ती छोटूला सुचली. त्याने मिरवणूकीला पुढे जाऊ दिले आणि स्वत: त्या गावाकडे धावला. गावात माशी शिंकली तरी ऐकू येणार नाही इतकी शांतता होती. त्याने एका झोपडीला आग लावली आणि पुन्हा धावत परत येऊन मिरवणुकीत सामील झाला.

मिरवणूक म्हाळसा देवीच्या देवळापर्यंत येऊन पोचली होती. म्हाळसा देवीची बुबुळे बाहेर आलेली होती. देवीचे रूप भयंकरच होते. सर्वांनी देवीला प्रदक्षिणा घातली आणि गाडीत बांधून आणलेल्या माणसाला देवीसमोर उभे केले. एक क्रूर दिसणारा माणूस भैरव म्हणून हातात तलवार घेऊन पुढे आला आणि डोळे मिटून मंत्र म्हणू लागला.

छोटूने कुत्र्याला काहीतरी खूण केली. त्या पाठोपाठ कुत्रा भैरवाच्या अंगावर भुंकत धावला. त्याने भैरवाचे मनगट दांतांत घट्ट धरले. सर्व मंडळी ते दृश्य क्षणभर भयचकित होऊन पाहू लागली.

"काहीतरी पाप घडलं आहे आपल्या हातून!" भैरव म्हणाला.

छोटू लगेच पुढे येऊन त्याला म्हणाला—"तू बरोबर ओळखलंस. ते पाप काय ते सांगतो." असे म्हणत छोटू सांगू लागला:

"आम्ही मोतीपूरचे राहणारे. म्हाळसा आमच्या गावातच मूळ जन्मली. ती सर्व देवींमध्ये मोठी देवी. आजपर्यंत आम्ही त्यांच्यासमोर दरवर्षी एकशे एक नरबली देत आलो. परंतु यावर्षी एकशे एक जणांना बली द्यायला तयार केले त्यात एक चुकून ब्राह्मण निघाला. बली जाण्यापूर्वी तो ब्राह्मण कालभैरवाला म्हणाला—'काल रात्रीच म्हाळसेचे माझ्याशी लग्न झाले. आता ती एका उत्तम ब्राह्मण घरातली गृहिणी झाली आहे. म्हणून ती मांसाला हात लावीत नाही. तेव्हा यापुढे तुम्ही बली देण्याची रीत बंद करा. नाहीतर तिचा कोप होईल."

"ते ऐकून आमच्या गावचा कालभैरव खदखदा हसू लागला व म्हणाला—'मरणाची वेळ जवळ आलेली पाहून तुला वेडबीड तर नाही लागलं, ब्राह्मणाच्या लेका? मांस खायचं सोडलं का? तर पहा, तुझ्या डोळ्या देखतच तिला मांस खायला घालतो!" असे म्हणत त्याने एका माणसाला बळी दिला. रक्ताची चिळकांडी भैरवाच्या डोळ्यात गेली. आकाशात वीज कडाडली. भूकंप झाला. झालं! एका क्षणात कालभैरव हा कुत्रा झाला. आकाशातून अग्निवृष्टी





झाली. सर्व गावाला आग लागली. या कुत्र्याचं रूप जाऊन कालभैरवाचे मूळ रूप यावं म्हणून मी याला बरोबर घेऊन तीर्थयात्रा करीत तुमच्या गावापर्यंत आलो आहे."

भैरव चकित होऊन कुत्र्याकडे आणि छोटूकडे पुन्हापुन्हा पाहू लागला.

छोटू त्याला म्हणाला–"हे पहा, भैरवा! मी बली देऊ नकोस असे सांगून तुला अडवीत नाही. आपल्या सारखं आपल्या एका भावाला भोगावं लागू नये म्हणून कुत्र्याच्या रूपात असून सुद्धा तुला वांचविण्याचा याने प्रयत्न केला आहे. कारण म्हाळसा म्हणजे सामान्य देवी नाही. ती गोष्ट तुलासुद्धा माहीत आहेच! तिने लहानपणी लग्न झाल्याबरोबर आपल्या नवऱ्याला गिळलं होतं म्हणे! म्हणून तर आजपर्यंत नरबली घेत आली.

इतक्यात काहीजण धावत पळत येऊन सांगू लागले की गावाला आग लागली आहे. बरेच लोक त्या बाजूला धावले. छोटू म्हणाला त्याचा प्रत्यक्ष दाखला लोकांना दिसला. सर्वांना छोटू म्हणाला ते खरे वाटले.

भैरवाने तलवार दूर फेकून दिली आणि कुत्र्याचे पाय धरून म्हणाला–"कालभैरवा! तुझे उपकार जन्म जन्मांतरात विसरणार नाही. मला कुत्र्याचं रूप तुझ्या कृपेने मिळालं नाही! यापुढे या देवीसमोर नारळ व कोहळा फोडीत जाईन. मीसुद्धा यापुढे मांसाला हात लावणार नाही. अशी त्याने प्रतिज्ञासुद्धा केली.

नंतर छोटूसह सर्व आपल्या गावाकडे गेले. तसे फारसे नुकसान झाले नव्हते. फक्त दोन झोपड्याच जळाल्या. त्या पुन्हा बांधता येतील, परंतु कोणाचा जीव गेला असता तर तो परत आला नसता. असे सर्वांना वाटलं, छोटूलासुद्धा त्याने केलेल्या कृत्याबद्दल पश्चात्ताप वाटला नाही.

नंतर तो आपल्या कुत्र्याला घेऊन पुढल्या मुक्कामाला निघून गेला.





# फुटक्या नशिबाचा

रामू नावाच्या एका लहान शेतकऱ्याने मृत्युसमयी आपलं घर आणि चार एकर जमीन आपल्या दोघां मुलांना वांटून दिली. मरण येण्यापूर्वी रामूने आपल्या धाकट्या मुलाला सल्ला दिला–"बाबा रे! तुला काही हवं असलं तर मोठ्या भावाजवळ माग. संकटसमयी तुझ्या वांटचाच्या जी जमीन आहे तीत ईशान्य दिशेला विहीर खण."

रामूचा मोठा मुलगा रंगा चांगल्या स्वभावाचा होता आणि मेहनती होता. दुसरा सोमू काही काम करीत नसे, ऐदी होता.

पावसाळा सुरू होताच रंगाने आपल्या वांटचाच्या शेतात कामे सुरू केली. सोमूने मोठ्या भावाने सुचविलेल्या गोष्टींकडे दुर्लक्ष केले आणि शेतातली कामे केली नाहीत आणि खाऊन पिऊन भटकत राहिला. रंगा सांगून कंटाळला आणि गप्प राहिला.

दिवसा मागून दिवस जात होते. रंगाचे हिरवे गार शेत पाहून मन आल्हादित होई. सोमूचे शेत ओसाड पडून होते. मोठ्या भावाचे शेत सोमूच्या डोळ्यात सलू लागले.

तो रंगाला म्हणाला–"दादा! मी तुझं म्हणणं ऐकलं नाही त्याबद्दल मला फार वाईट वाटतं आहे. मला शेताची कामं येत नाहीत, हे तुला माहीतच आहे! माझं शेत कोरडं पडलं आहे. ते थोडं मार्गाला लागतं का पहा."

रंगाने त्याला होकार दिला आणि धाकट्या भावाचे शेत त्याने नांगरले.

दोन दिवसांनी सोमू रंगाला म्हणाला–"दादा! तू माझं शेत घे आणि आपलं मला दे. मी पुढची कामं काय ती मी पाहून घेईन.









त्याला सुद्धा रंगाने होकार दिला. दोघांनी परस्परांच्या शेतांची अदलाबदल करून घेतली. रंगाने सोमूचे जे शेत घेतले त्याला पाण्याची सोय नव्हती. रंगाच्या वाटयातल्या शेतात विहीर होती, परंतु तिचे पाणी सोमूच्या वांटयाच्या शेतात चढणे शक्य नव्हते. म्हणूनच बाबांनी त्याला विहीर खणून घ्यायला सांगितले, वाटतं, आणि त्याला शेतीच्या कामाची आवड नाही हे ओळखून त्याला वरची जमीन दिली असावी.

रंगाने बापाच्या सल्ल्याप्रमाणे शेताच्या ईशान्येला विहीर खणायला सुरवात केली. फक्त सहा फूट जमीनच खणून झाली असेल एक हंडा सापडला. त्याचे तोंड घट्ट बंद केलेले होते. रंगाने चकित होऊन त्याचे झांकण काढून पाहिले तर त्यात पैसे होते. ते पैसे वडिलांनी आयुष्यभर मेहनत करून मिळविलेले पैसे आहेत. काही काम न येणाऱ्या मुलाला ते मिळावे म्हणून वडिलांनी शेताचा तो भाग सोमूला दिला होता आणि संकट समयी ईशान्य दिशेला विहीर खणायला सांगितले होते, हे रंगाला कळलं. रंगा तर सर्व कामे करणारा व समर्थ आहे, तेव्हा त्याच्यासाठी निराळी व्यवस्था करण्याची गरज बाबांना वाटली नसावी.

वडिलांची इच्छा पूर्ण व्हावी म्हणून रंगाने ते सर्व धन सोमूला द्यायचे ठरवून ते घरी घेऊन गेला. परंतु त्याने विचार केला होता तसे झाले मात्र नाही.

रंगा शेतात विहीर खणीत असतां सोमूने आपल्या वांटयाचे घर व वडील भावाकडून मागून घेतलेले शेत विकले आणि जे पैसे मिळाले ते घेऊन कोठेतरी निघून गेला. मोठ्या भावाने शेतातली सर्व कामे पुरी केली होती. तरी पीक तयार झाल्यावर ते कापून घरी आणण्याचं सामर्थ्य त्याच्यात नव्हते.

आपल्या धाकट्या भावाचे फुटके नशीब पाहून रंगाला फार वाईट वाटले.





# सीतासागर

मोतीपूरचा जमिनदार रूपराम याची बायको लक्ष्मी ही एक आदर्श गृहिणी म्हणून गावात तिचा फार आदर होई. तिला एक मुलगा झाला आणि एका शुभदिनी आणि शुभघडीला तिला यमाचे बोलावणे आले. तिच्या स्मरणार्थ जमिनदाराने लक्ष्मीसागर नावाचा एक तलाव बांधला. तिचा देह ज्या जागी चितेवर ठेवला होता त्याच जागी लक्ष्मीसागर तलाव तयार करण्यात आला होता. पुढे गावकरी त्या तलावात दरवर्षी लक्ष्मीचा स्वर्गवास झाला त्या दिवशी स्नान करीत व तिच्या स्मरणार्थ उत्सव करीत.

बायकोच्या विरहदु:खाने जमिनदाराने लोकांनी आग्रह केला असूनही दुसरे लग्न केले नाही. पुढे काही काळ लोटल्यावर त्याला दुसऱ्या एका जमिनदाराने आपल्या घरी आमंत्रण पाठवून त्याचा चांगला आदरसत्कार केला. तेथे त्या जमिनदाराची मुलगी सीता हिला पाहून जमिनदाराच्या आग्रहावरून रूपरामने तिच्याशी लग्न केले. सीता दिसायला चांगली होती आणि चांगली शिकलीसवरलेली होती.

सीता मोतीपूरला आली त्या दिवशी गावकऱ्यांनी थाटामाटाने तिचे स्वागत केले. तिचे सौजन्य पाहून प्रत्येकाने नव्या जमिनदारणीची प्रशंसा केली. तिने आपल्या सवतीच्या मुलाला स्वत:च्या मुलासारखे प्रेमाने व वात्सल्याने वाढविले. जमिनदाराला फार आनंद झाला. त्याने आणखी एक तलाव खणून त्या तलावाला सीता सागर हे नाव दिले. परंतु गावकरी लक्ष्मीसागराला जितका पवित्र मानीत तितका सीतासागराला मानीत नसत.

सीता आपल्या खोलीत खिडकीजवळ बसून सीतासागराकडे पाही, तेव्हां तिचे



मन किती उदार होते तरी, लोकांना लक्ष्मीसागरातच जास्त घोळका करून स्नान संध्येला जात असलेले पाहून तिच्या मनात डोम उभा राही.

जमिनदार सीतेच्या भाग्याची जेव्हा जेव्हा प्रशंसा करी तेव्हा सीता डोळ्यातून पाणी काढून म्हणे–"मी लक्ष्मीसारखी भाग्यवती साध्वी कोठे आहे? तिच्यासारखं पर्वंदिनी मरण आलं तरच ते भाग्य मला मिळणार!"

तिने हे म्हटल्यावर जमिनदाराने तिच्या मनातलं दुःख ओळखलं आणि तिच्या मनातले ते दुःख दूर करण्यासाठी काही

जमिनदाराच्या छोटेखानी दरबारात सोमनाथ नावाचा एक जादुगार होता. जमिनदाराचा तो बालमित्र होता. त्याच्या जवळ जमिनदार आपलं कौटुंबिक सुखदुःख बोलत असे. गुपित असे काही नव्हते. त्याने अनेक वेळा जमिनदारासमोरचे गुंतागुंतीचे प्रश्न सहजी सोडविले होते.

एके दिवशी रूपराम बायकोला म्हणाला–"मी सीतासागराच्या काठावर एक सोमेश्वराचे देऊळ बांधायच्या विचारात आहे. म्हणजे लक्ष्मीसागरासारखं सीतासागरसुद्धा एक पवित्र तीर्थ होईल."

"लक्ष्मीसागराला जात्याच पवित्रता लाभली आहे. एक देऊळ बांधले म्हणजे त्यामुळे देवालयाचे महत्व वाढेल, सीता सागराचं महत्व कसं काय वाढेल? शिवाय माझ्यासारख्या वांझोटीच्या पोटी जन्म कोण घेणार?" सीता म्हणाली.

"ते देऊळ तुझ्या वतीने म्हणून बांधवितो आहे. ते आहे, सोमेश्वराचे देऊळ. कोणाला ठाऊक, त्याच्या कृपेने तुला मूल होईल ही कदाचित!" रूपराम म्हणाला.

लौकरच सीतासागराच्या काठावर एक संगमरवरी शंकराचे देवालय उभे राहिले. आता शिवलिंगाची स्थापना व प्राणप्रतिष्ठा तेवढी उरली. तितक्यात सीताला दिवस

ती बातमी कळल्यावर सोमनाथ रूपरामला म्हणाला–"सीताला याचा फार आनंदच होईल. परंतु जोपर्यंत सीतासागराला स्वतःची पवित्रता लाभत नाही, तोपर्यंत तिच्या मनाचे समाधान होणार नाही."

रूपराम म्हणाला–"ते माझ्या हातात आहे का? सीतासागर हेदेखील लक्ष्मीसागरासारखेच पवित्र माना हे मी लोकांना कसे काय सांगायचे? लक्ष्मी पर्वंदिनी वारली, म्हणून लक्ष्मीसागराला लोक पवित्र मानू लागले."

"तू मदत केलीस तर मी एक काम करावे म्हणतो. शिवलिंग तू बाहेरून कोठून आणू नकोस. ते आपल्या गावात स्वयंभू निघाल्याचे नाटक केले पाहिजे." असे सांगून सोमनाथने ते कसे साध्य होईल ते समजावून सांगितले.

दुसऱ्या दिवशी गावात बातमी पसरली की रूपरामला एक दृष्टात झाला म्हणे की देवळात प्राणप्रतिष्ठा करण्यासाठी एक स्वयंभू शिवलिंग कोठे तरी आहे. त्याचा शोध काढण्याची फार गरज नाही. ते कोठे आहे हे आपोआप कळेल, असे देवाने स्वतःच सांगितले.

उद्या सकाळी प्राणप्रतिष्ठा आहे व त्यासाठी मुहूर्त ठरला असल्याचे जाहीर झाले. शिवलिंग कोणत्यातरी तलवात मिळेल असे दिसते आहे. कोणत्या तलावात ते मिळणार हे त्या तलावातल्या पाण्याच्या रंगावरून



कळेल. तेव्हा पाण्याच्या रंगाची परीक्षा करावयाची आहे. ती देवळाच्या समोरच्या पटांगणातच संध्याकाळी होण्याचे ठरलं.

गावातल्या सर्व तलावांचं पाणी मडक्यांतून आणविण्यात येईल व देवाच्या आज्ञेप्रमाणे जमिनदार स्वतःच पाण्याची परीक्षा करतील.

त्याप्रमाणे त्या दिवशी संध्याकाळी गावकरी व शेजारगावची गावकरी मंडळी जमली. निरनिराळ्या मडक्यांत सर्व तलावांचे पाणी आणून ठेवण्यात आले. रूपरामने एकेक काचेचा ग्लास घेऊन प्रत्येकात निरनिराळ्या तलावातून आणलेले पाणी मडक्यातून काढून ओतले आणि एकेक ग्लास उचलून देवाच्या नावाने पंचाक्षरी मंत्र म्हटला. अशा तऱ्हेने राणीसागर, पद्मसागर, देवीपुष्कर, लक्ष्मीसागर वगैरे तलावांचे पाणी घालून ग्लास उचलला तरी पाण्याचा रंग बदलला नाही. परंतु काय अद्‌भुत पहा, सीतासागराचं पाणी ओतून ग्लास उचलून मंत्र म्हणून पाहिल्याबरोबर त्याचा रंग भुरकट लाल होत गेला आणि त्यात काही विशेष असल्याचं प्रगट झाले.

त्यानंतर सीतासागर चारीबाजूने हुडकून पाहिल्यावर देवळात प्रतिष्ठा करण्या लायक शिवलिंग मिळाले. ते वाजत गाजत दुसऱ्या दिवशी देवालयात नेण्यात आले आणि त्याची स्थापना करून प्राणप्रतिष्ठा करण्यात आली. त्या दिवसापासून सीतासागराला सुद्धा सहजी पवित्रता लाभली. दरवर्षी तेथे एक उत्सव होऊ लागला. सीताच्या मनाचे समाधान झाले.

पाण्याला रंग येण्यासाठी सर्व तयारी सोमनाथने करून ठेवली होती. एक काळा दोरा घेऊन त्याला पोटॅशम परमॅग्नेटची पूड लावून तो दोरा सीतासागरचे पाणी भरलेला ग्लास उचलताना हाताच्या आड ग्लासात कोणाला दिसणार नाही अशा तऱ्हेने सोडण्यात आला. त्यामुळे पाण्याचा रंग बदलला.

पुढे काही महिन्यांनी सीताच्या पोटी एक सुंदर मुलगी जन्मली.





# प्रेमपरिक्षा

कांचीपूर येथे धनगुप्त नावाचा एक जव्हेरी रहात असे. त्याच्याकडे एक फार मोठे जहाज होते. परदेशात कमी किमतीत हिरे व माणिक्ये विकत घेऊन स्वदेशात आणून ती मोठ्या किमतीला विकी. अशातऱ्हेने तो एक लक्षाधीश झाला.

धनगुप्ताला पद्मकला नावाची एक कन्या होती. तिची आई मुलीच्या लहानपणी वारली. म्हणून बापानेच मुलीला सर्व लाड पुरवून लहानाचे मोठे केले. आपल्या सारख्याच एखाद्या श्रीमंत मुलाशी मुलीचे लग्न करून द्यायचे त्याने ठरविले.

परंतु पद्मकलेने विद्यागुप्त नावाच्या एका वैश्य तरुणाला मनाने वरले होते. दोघांच्या आणाशपथा झाल्या होत्या. ती गोष्ट धनगुप्ताला माहीत नव्हती. तो चांगल्या स्थळाच्या शोधार्थ हिंडत होता.

वडील आपल्यासाठी वर शोधीत असल्याचे कळताच पद्मकला विद्यागुप्तला म्हणाली—"तुम्ही लौकर माझ्या वडिलांना भेटून मला मागणी घाला. नाहीतर आपणांवर फार मोठा प्रसंग ओढवेल."

विद्यागुप्तने दुसऱ्याच दिवशी धनगुप्ताला भेटून पद्मावतीला मागणी घातली. म्हणाला—"दोघांनी ठरविले आहे. पाहिजे तर पद्मकलेला विचारून पहावे."

धनगुप्ताला ते खरेच वाटले नाही. म्हणून त्याने मुलीला बोलवून विचारले. तेव्हा ती म्हणाली—"मी विद्यागुप्ताशिवाय इतर कोणाशीही विवाह करणार नाही."

विद्यागुप्तची घरची स्थिती कशी आहे, तो स्वभावाने कसा आहे इत्यादी गोष्टी कळल्या शिवाय त्याला आपली मुलगी कशी द्यायची या पेचात धनगुप्त सापडला. मुलीचे मन मोडणे देखील त्याला नको

नव्हते. म्हणून तो विद्यागुप्तला म्हणाला– "हे पहा, विद्यागुप्त! तुम्ही दोन दिवस सवड द्या. आमचे एक जवळचे नातेवाईक आज उद्या एवढ्यात येणार आहेत. त्यांचा सल्ला घेऊन तुम्हांला मी उत्तर देतो. तोपर्यंत तुम्ही आमच्या घरीच रहा." विद्यागुप्तने त्या गोष्टीस मान्यता दिली.

धनगुप्ताचा कोणी नातेवाईक आला नाही. परंतु दुसऱ्या दिवशी एक अत्यंत वाईट बातमी धनगुप्ताच्या कानावर आली. त्याचे गलबत परदेशातून माल घेऊन येत असता समुद्रात बुडाले.

ती बातमी कळल्यावर धनगुप्त घाबरून वेड लागल्यासारखा बोलू लागला. ही अशुभ गोष्ट आपणामुळेच घडली असे वाटून धनगुप्ताचे मन फिरण्याची शक्यता आहे, असे विद्यागुप्ताला वाटले. ती बातमी कळल्या नंतर ज्या लोकांनी धनगुप्तावर विश्वास करून मोठमोठ्या रकमा त्याच्याकडे जमा केल्या होत्या ते त्या रकमा वसूल करायला गडबड करू लागले. धनगुप्त संकटात सापडला. ते पाहून विद्यागुप्त धनगुप्ताला म्हणाला–"मामा! तुम्ही काळजी करण्याचं कारण नाही. कोणत्याही परिस्थितीत तुमची सर्व जबाबदारी उचलायला मी तयार आहे. तेवढी शक्ती माझ्यात आहे. ही सर्व परिस्थिती देवाने आमच्या प्रेमाची परीक्षा घेण्यासाठीच निर्माण केली असावी. तुम्ही भिण्याचे मुळीच कारण नाही. माझ्याबरोबर चला."

धनगुप्ताची सर्व काळजी दूर झाली व त्याला आनंद झाला. म्हणाला–"ही भगवंताने परीक्षा नाही घेतली. तुमच्या स्वभावाची ओळख पटावी म्हणून मीच हे सर्व नाटक रचलं होतं. तुझं माझ्या मुलीवर प्रेम आहे की माझ्या पैशावर तुझी दृष्टी आहे, हे मला पहावयाचं होतं."

पुढे लौकरच विद्यागुप्त आणि पद्मकलेचे लग्न थाटामाटाने पार पडले. त्यानंतर धनगुप्ताने आपला सर्व व्यापार विद्यागुप्तच्या हाती दिला. त्याचे पुढील आयुष्य सुखाचे झाले.





# सारंगाची विरक्ती

सुदर्भ नावाच्या देशात सर्व प्रकारचे दुराचार होते. अस्पृश्यता होती. अस्पृश्यांना गावाबाहेर वस्ती करून रहावे लागे. मोठमोठे हुंडे दिल्याशिवाय मुलींची लग्ने होत नसत. अधिकारी लांच घेतल्याशिवाय काम करायला तयार नसत. जवळ पैसा असो किंवा नसो लोक दारू पिऊन झिंगून गावात फिरत. पैशाचा चुरा होई आणि वर प्रकृती बिघडून जाई.

सुदर्भ देशात सारंग नावाचा एक थोर देवपुरुष रहात असे. देशातले व समाजातले दुर्गुण व दुराचार नाहीसे करावयाचे म्हणजे शिक्षणाचा प्रसार झाला पाहिजे व निरक्षरता निर्मूल झाली पाहिजे असे ठरवून त्याने साक्षरतेच्या प्रसारासाठी आणि दुराचार नष्ट व्हावे यासाठी एक मोठी चळवळ सुरू केली. अनेकांनी त्या चळवळीचा विरोध केला, तरी त्याने तिकडे दुर्लक्ष केले. तरुणांनी त्याच्या या चळवळीचा पुरस्कार केला. राजाने ती चळवळ दाबून टाकण्यासाठी प्रयत्न केला. परंतु सैन्य राजाविरुद्ध प्रजेच्या बाजूने उभे राहिले आणि राजाला पदच्युत केले. सारंगानेच राजपद घ्यावे अशी प्रजेने एकमताने आपली इच्छा प्रगट केली.

परंतु सारंगला राज्यलोभ नव्हता. त्याने आपल्या अनुयायांपैकी सत्यकाम नावाच्या एकाला राजा करून प्रजेतले सर्व दुराचार दूर झाले पाहिजेत या साठी योग्य तो प्रयत्न कर असे त्याला समजावून सांगितले आणि स्वतः तपश्चर्या करण्यासाठी रानात एकांत जागी राहू लागला. पंधरा वर्षे लोटली. दुदर्भ देशात काय बदल झाला पाहून यावे असे त्याला वाटले.

सारंगने सत्यकामकडे आपल्या एका शिष्याला पाठवून देशातली परिस्थिती

एकदा पाहण्याची इच्छा असल्याचे कळविले. सत्यकाम आनंदाने स्वत: एक रथ तयार करवून आपल्या गुरूच्या दर्शनाला आला. सारंगने आपल्या शिष्यांना त्याच्या गैरहजेरीत आश्रमाची व्यवस्था समजावून सांगून सत्यकामच्या बरोबर रथात बसून निघाला.

सुदर्भ देशात सारंगचे मोठ्या उत्साहाने स्वागत झाले. सारंग पर्यटन करीत असता सत्यकाम त्याच्या बरोबर राहिला. सारंगने तुरुंग पहावयाची इच्छा दर्शविली. तेथे कैद्यांच्या गुन्ह्यांची त्याने चवकशी केली. त्यात हुंडा घेणारे, दारू पिणारे, लांच घेणारे अधिकारी आणि इतर गुन्हेगार होते.

शिपाई राज्यभर फिरून गुन्हेगारांना धरून आणतात. गुन्हा करणे आणि गुन्हा करून सुटणे शक्यच नाही." सत्यकाम सुव्यवस्थेचे वर्णन करीत होता.

"हे लोक किती दिवसांपासून तुरुंगात आहेत?" सारंगने विचारले.

"आपल्या सिद्धांतानुसार मी शिक्षा तेवढी कडक वाटू नये म्हणून अशा गुन्ह्याला सहा महिन्यांपेक्षा जास्त शिक्षा करीत नाही. हे लोक एका आठवड्यापूर्वीच तुरुंगात आले असावेत!" सत्यकाम म्हणाला.

सारंग दचकून म्हणाला—"इकडून आतां जाऊ या."

त्यानंतर दोघे एका मंगलकार्यालयात गेले. "जातीबाहेर लग्न करणारांनाच फक्त या मंगलकार्यालयात लग्नासाठी लागणाऱ्या सर्व सोयी करून दिल्या जातात. अंतरजातीय विवाहास प्रोत्साहन देण्यासाठी हे मंगलकार्यालय काढलं आहे. या मंगल कार्यालयात शंभरावर विवाह झाले आहेत. प्रत्येक अंतरजातीय विवाहाला एक हजार वराह पुरस्कार दिले जातात. दहा दिवसांपूर्वीच येथे एक लग्नसमारंभ..."

सत्यकाम उत्साहाने आपल्या या योजनेचे वर्णन करून सांगत असतां सारंगने आपले डोळे पुसले. ते आनंदाश्रू असावेत असे सत्यकामला वाटले. तिकडून दोघे क्रीडास्थल होते तिकडे गेले. तेथे पुष्कळ लोक अनेक प्रकारचे मैदानी खेळ खेळत होते.

"महात्मन्! पाहिलेत आपल्या इच्छेप्रमाणे या देशात किती लौकर हा बदल घडून आला!" सत्यकाम म्हणाला.

"कोणता बदल?" सारंगने विचारले.

"येथे खेळणारात उच्च वर्णीयांबरोबर खालच्या जातीतले अस्पृश्यही आहेत." सत्यकाम म्हणाला.

"ह्यांच्यात अस्पृश्य आहेत हे तुला कसे काय कळले?" सारंगने विचारले.

"येथे सवर्ण व अवर्ण दोघांनी मिळून खेळले पाहिजे. म्हणूनच तर हे क्रीडा मैदान तयार केले आहे. अशा तऱ्हेने अस्पृश्यता निवारणाचा कार्यक्रम चालू आहे. दोघांमधला फरक कळावा म्हणून उच्चवर्णीयांनी निळा गणवेष आणि इतर वर्णीयांनी हिरवा





गणवेषं धारण करावा, असा नियम आहे." सत्यकामवर्णन करून सांगत होता.

सारंगचे डोळे पाणावले. त्याला कोठे पाहिले तरी दिसेनासे झाले.

"उद्या आपण देशाच्या पर्यटनाला निघू या." सत्यकाम म्हणाला.

"पाहिलं ते पुरे आहे. माझ्या मनातून पर्यटनाची इच्छा पार विरून गेली आहे. मी परत जायचा विचार करतो आहे. तू मला परत पोचविण्याची तयारी कर." सारंग म्हणाला.

"असं काय म्हणतां, गुरुदेव!" सत्यकामने आश्चर्यचकित होऊन विचारले.

"मला वाटत होते की देशात अस्पृश्य हा शब्द ऐकायलासुद्धा मिळणार नाही. प्रजेला अजून अस्पृश्यता माहीत आहे आणि अस्पृश्यांबरोबर हिंडणे फिरणे म्हणजे मोठं कार्य मानलं जातं! अंतरजातीय विवाहाला सरकार तर्फे पारितोषिकं वाटली जातात म्हणजे अशा लग्नाला सामान्य मानलेले नाही असाच अर्थ झाला. हुंडा देणे, दारू पिणे, लाच घेणे देणे यांचा नायनाट अद्याप झाला नाही, असंच नाही का? म्हणूनच तर अशा गुन्हेगारांना शिक्षा द्यावी लागते आहे. तू राजा आहेस ही गोष्ट तुझ्या लक्षात आली नाही आणि तू मोठी काही कर्तबगारी केलीस असं समजतो आहेस! कायदे करून दुराचार बंद होणे शक्य नाही. प्रजेची मने पालटली पाहिजेत, माझा सहकारी म्हणून तू शिकलास आणि अशा व्यक्तीच्या राज्यात परिस्थिती अशी असतां, आणखी कोणाच्या हाती राज्य-कारभार आला तर तो पाहून जास्त काही साधू शकेल असे नाही वाटत मला. मी तुला प्रजेचा नायक म्हणून निवड केली ही माझीच चूक! एकदा चूक केली की पुन्हा चूक हातून घडणार नाही याचा काय विश्वास? म्हणून माझे मन विटले तू. तुला आवडेल तसे राज्य कर. मी आपल्या आश्रमात परत जातो. पुन्हा सुदर्भ देशात पाऊल टाकणार नाही." सारंग म्हणाला.





# शेरास सव्वाशेर

सखुबाईच्या नवऱ्याला अकाली मरण आले. तिला तीन मुलांना संभाळण्याची जबाबदारी उचलावी लागली. तिने कसेतरी काही दिवस काढले. परंतु पीकं चांगली आली नाहीत आणि तिला किंवा मुलांना मजुरीची कामे मिळणे सुद्धा अशक्य झालं.

काही काळ थोडा भार कमी झाला तर पहावा, असा विचार करून सखुबाईने मोठ्या मुलाला रंगपूरला आपल्या भावाकडे पाठविले. तिचा भाऊभावजय कोणावर उपकार करतीलच याची खात्री नसूनही तिने एका मुलाला संभाळणे त्यांना जड जाईल का, असा विचार करून पाठविले.

एक आठवडा लोटायच्या आत मोठा मुलगा परत आला. तेव्हा तिने विचारले— "कायरे, इतका लौकर परत आलास?" त्या प्रश्नाला मुलाने उत्तर दिले—"मामीची तब्येत बरी नाही म्हणे. तिची तब्येत सुधारल्यावर मला महिनाभर बोलावून घेईन म्हणाला मामा."

सखुबाई त्यांच्या त्या चिक्कूपणावर खूप चिडली. तिचे दिवस फार कष्टाने जात होते. तांब्या, पातेलं आणि इतर भांडी घरात जेवढी होती ती विकून ती संसाराचे गाडं रेटीत होती. भविष्यकाळाकडे पाहिले तर उपाशी मरण्या व्यतिरिक्त काही दिसत नव्हते. सखुबाईने या खेपेस आपल्या दुसऱ्या मुलाला भावाकडे पाठविले.

रंगपूरला गेलेला दुसरा मुलगा तिसऱ्या दिवशी परत आला.

सखुबाई मुलाला परत आलेला पाहून खूप जळफळली—"कायरे, इतक्यात परत आलास? येथे काय खायला आहे म्हणून परत आलास?" असं म्हणाली खरी, परंतु तोंडावाटे ते शब्द पडल्याबद्दल तिला फार वाईट वाटले व रडू लागली.







आईचा भार थोडा तरी कमी करावा, असा विचार करून तिसरा म्हणाला– “आई, मी मामाकडे काही दिवस राहून येतो!” असे म्हणत तो रंगपूरला निघाला.

रंगपूरला पोचल्यावर तो आपल्या मामाच्या घरी गेला तेव्हा तिची मामी अनरसे खात होती. तिने भाच्याला पाहताच चटदिशी अनरसे झाकून ठेवले आणि तोंडावरून पदर ओढून घेऊन पडून राहिली.

त्याला मामा म्हणाला–“पहारे, मुला! अलीकडे तुमच्या मामीची तब्येत फार बिघडून गेली आहे. सर्व काम मलाच करावं लागतं आहे. तिकडे शेतातली कामं आणि घरी आल्यावर घरची कामं! जीव नको वाटू लागला आहे!” एवढे सांगून आणखी काही सांगायला निघाला.

परंतु तेवढ्यात तिसरा म्हणाला– “मामा, तू इतके कष्ट सहन करीत असतां मी गप्प राहीन का? मी आतां जातो आपल्या गावी आणि आईला आणि दोघां मोठ्या भावांना बोलावून घेऊन येतो. आई सैंपाक व घरातली कामं पाहील आणि आम्ही तिघं बाहेरची व शेतावरची कामं पाहू. तू स्वस्थपणे विश्रांती घे. बरं तर येतो!”

आपला डाव अशातऱ्हेने फसलेला पाहून त्याच्या मामाच्या तोंडावाटे शब्दच उमटेना.

परंतु मामीने येणारा प्रसंग ओळखला व तोंडावरचा पदर बाजूला सारून म्हणाली–“असे वेड्यासारखे गप्प कां हो? पाहिलंत, लहान असला तरी तुमच्या भाच्याला तुमच्यावर किती दया आली ती? मला बरं नाही ऐकल्याबरोबर आईला बोलावून घेऊन येतो म्हणाला! तुमच्या मनात कधी तो विचार तरी आला का? माझ्या आजाराचं काय घेऊन बसलात? तुम्ही शेतावरची कामं पाहून घ्या, आम्ही घरातली कामं पाहून घेऊ.” असं सांगून भाच्याला थांबायला सांगितलं.

आपण डाव जिंकला, याचा विचार करून सखुबाईच्या तिसऱ्या मुलाला आनंद झाला.





# बनी नि मनी

लखुजी हा एका शेतकऱ्याचा मुलगा होता.

त्यांच्या शेताला दर वर्षी पुराची भीती असे. म्हणून त्याने शेतीचा नाद सोडला आणि शहरात जाऊन नोकरी करायचे ठरवून शहराची वाट धरली.

गावात पाऊल टाकायच्या आधी त्याने गावाच्या वेशीवरच्या नदीत आंघोळ केली आणि धुतलेले कपडे घालून निघणार, तेवढ्यात नदीवर पाणी भरायला घागर घेऊन एक काळीसावळी मुलगी आली.

तो त्या शहरात पहिल्यानेच आला होता म्हणून कचेरीत नोकरी करणाऱ्या रामजी पाटलाचे घर कोठे आहे, माहीत आहे का तुला!” असे त्याने त्या काळ्या-सावळ्या मुलीला विचारले.

“रामजी पाटलांच्या घरापलीकडे दोन घरे टाकली की आमचे घर आहे. माझं नाव बनी. रामजी पाटलांची मनी माझी मैत्रीण आहे. त्यांचं घर मारुतीच्या देवळाला लागूनच आहे.” असे म्हणत ती पाण्यात घागर बुडवायला वांकली, परंतु दचकून तिने घागर बाजूला ठेवली व मानेवर व छातीवर हात फिरवून कावरीबावरी झाली.

“काय झालं?” लखुजीने चकित होऊन विचारले.

“गळ्यातली माळ कोठेतरी पडल्यासारखी वाटते आहे. माझी सावत्र आई मला जिवंत राहू देणार नाही!” बनी म्हणाली. ती घाबरून गेली होती. तिच्या बरोबर लखुजीने सुद्धा काठावरची जागा हुडकून पाहिली पण फायदा झाला नाही.

बनीने पदराला डोळे पुसले व घागर भरून घेऊन हताश मनाने घरी निघाली.

लखुजी नंतर गावात निघाला. नदीच्या काठावरच्या देवळात तो थोडा थांबला म्हणत तो बनीच्या थोडा मागे पडला.



अजून लोकांची येजा सुरू झाली नव्हती. तो देवळाच्या बाजूला चारच पावले चालला असेल, त्याला वाटेच्या बाजूला एक सोन्याची माळ पडलेली दिसली. तीच बनीची हरवलेली माळ असावी असे समजून चटकन खाली वाकून त्याने ती उचलली. ती लौकर तिच्याकडे पोचती केली तर तिची सावत्र आई तिला मारहाण करणार नाही असे वाटून तो निघाला.

त्याला देवळाची खूण आठवली. चवकशी करीत तो बनीच्या घरी गेला तेव्हा तिच्या आईने बनीसमोर रासभर भांडी घासायला आणून ठेवलेली दिसली. त्याने माळ काढून वाटेत ही. मला सापडली. हिच्या बद्दल बनीला काही बोलू नका. वाटेत पडली असेल!" असे म्हणत त्याने ती माळ बनीच्या सावत्र आईच्या हातात दिली.

बनीच्या सावत्र आईने चटदिशी ती घेतली व म्हणाली—"आमचा ऐवज आम्हांला पोचला!" बनी ते सर्व आश्चर्य-चकित होऊन ऐकत पहात होती.

लखुजी तेथून रामजी पाटलांच्या घरी गेला. त्याने आपलं नांवगांव सांगितल्या-वर रामजी पाटलांनी सर्वांची विचारपूस केली आणि तुला चांगलेसे काम मिळवून देण्याची खटपट करतो असे वचन दिले आणि त्याच्या जेवणखाण्याची तयारी करायला त्यांची मुलगी मनी हिला काम ते सांगितले. नंतर रामजी कचेरीत निघून गेले. मनी लखुजीशी विशेष बोलली नाही.

जेवण आटोपल्यावर तो बाहेर ओटीवर येऊन बसला. तेवढ्यात बनी घाबऱ्या घाबऱ्या येऊन म्हणाली—"ही माळ माझी नाही. माझी माळ तुटली तेव्हा मी ती पेटीत ठेवून दिली होती. ती गोष्ट मी विसरून गेले होते, तुम्हांला मिळालेली माळ तुम्ही परत घ्या. माझ्या माईने माझा जीव घेतला तरी ही मी ठेवून घेणार नाही. बरं तर येते! माई मला शोधत असेल."

लखुजीने बनीच्या सचोटीपणाविषयी विचार करीत माळ आपल्या पिशवीत ठेवून दिली आणि झोपला. झोपून उठला तोपर्यंत रामजी पाटील घर आले होते. तेव्हा मनी घरात नव्हती; कोणत्या तरी श्रीमंताच्या मुलीच्या लग्नाची तयारी चालली होती ती पहायला गेली होती.

लखुजी व रामजी बोलत बसले असतां चार शिपाई आले व त्यांनी त्यांच्याबरोबर त्या श्रीमंताच्या घरी चलायला लखुजीला सांगितले. कारण कळले नाही, म्हणून रामजी पाटील सुद्धा बरोबर निघाले.

तेथे गेल्यावर लखुजीवर चोरीचा आरोप असल्याचे कळले. खरी घडलेली गोष्ट अशी होती.

त्या श्रीमंताच्या मुलीचा साखरपुडा झाला तेव्हा तिच्या होणाऱ्या सासूने आपल्या सुनेच्या गळ्यात एक उंची सोन्याची माळ घातली होती. ती माळ घालून ती मैत्रिणींबरोबर देवदर्शनाला गेली असतां परत येतांना काळोखात कोणी तरी तो हार तिच्या गळ्यातुन काढून घेतला. ती "चोर! चोर!" म्हणून ओरडली तेव्हा चार चौघे चोराला धरा-यला धावले. परंतु चोर सापडला नाही. तो दागिना असा गेल्यामुळे श्रीमंताच्या



मनी तीच माळ गळ्यात घालून नवऱ्यामुलीला भेटायला आली. आपली माळ ओळखून तिने मनीला विचारले तेव्हा ती म्हणाली—"मला नाही माहीत बाबा! माझ्या बाबांचे लखुजी नावाचे कोणी स्नेही आले आणि त्यांनी मला ही माळ दिली."

लखुजीला चोर समजून शिपाई त्याला धरायला रामजी पाटलाच्या घरी गेले.

सर्व ऐकल्यावर लखुजीला काय झालं, हे कळायला वेळ लागला नाही. आपण पिशवीत माळ ठेवली ती मनीने पाहिली आणि झोपलो असता काढून घेतली. तीच माळ घालून मिरवायला ती त्या श्रीमंता-

"ही माळ तू मनीला दिली होतीस का?" श्रीमंताने लखुजीला विचारले.

"होय!" लखजी म्हणाला.

"म्हणजे तूच आमच्या मुलीच्या गळ्यातून ती काढून घेतली होतीस नाही का?" श्रीमंताने दरडावून विचारले.

लखुजीने घडलेली सर्व गोष्ट सांगितली व म्हणाला–"मी आज सकाळी गावात आलो, काल रात्री नाही. ही माळ चोराच्या हातून खाली पडली असणार. मला वाटेच्या बाजूला सापडली."

मनाचे समाधान झाल्यावर त्या श्रीमंताने लखुजीवर संशय केल्याबद्दल माफी मागितली व म्हणाला–"ही माळ मिळाली हेच आमचे केवढं नशीब! व्याह्यांची बोलणी ऐकावी लागणार नाहीत. त्या संकटातून वांचलो! असे म्हणत लखुजी 'नाही नाही' म्हणत असतां त्या श्रीमंताने बळजबरी करून त्याच्या हातात एक मोठी रक्कम बक्षीस म्हणून ठेवली.

रामजी पाटील घरी आले व म्हणाले–"लखुजी, तू माझी व मुलीची लाज वांचविलीस! तुझे उपकार मी कधी विसरणार नाही. मी आपल्या मुलीचे तुझ्याशीच लग्न करून देतो."

"क्षमा करा, पाटीलसाहेब! तुम्हांला माझ्यात काही चांगला गुण असल्याची खात्री पटली. परंतु मला तुमच्या मुलीची ही वागणूक मुळीच आवडली नाही. नाकी डोळी बेताची असली तरी गरिबाची बनी मला जास्त आवडली. सावत्र आईचा जांच सहन करावा लागेल हे माहीत असून सुद्धा, ती माळ आपली नाही असे सांगून तिने ती मला परत आणून दिली. तीच माळ तुमच्या मुलीने माझ्या पिशवीतून चोरून काढून घेतली. दोघींत जो फरक आहे, तो तुम्हीच पहा. मी काही लहान मोठा धंदा करीन आणि बनीला मान्य असेल तर तिच्याशी लग्न करीन." लखुजी म्हणाला. रामजीला बोलायला जागाच उरली नाही.





# म्हणींचा सल्ला

गोपदेवने बारा वर्षे गुरुगृही राहून विद्याभ्यास केला. परंतु कोणत्याही शास्त्रात प्राविण्य संपादन करू शकला नाही. त्याचे विद्याभ्यासात लक्ष कमी आहे हे ओळखून गुरूने त्याच्याकडून आयुष्यात उपयोगी पडणाऱ्या काही उत्तमोत्तम म्हणी व लोकोक्ती पाठ करून घेतल्या होत्या.

गोपदेव विद्याभ्यास संपवून घरी आलेला पाहून गावकरी खूप झाले, परंतु त्याने काय करावे हे त्याला कळत नव्हते व कोणालाही कळत नव्हते. कारण कोणता उद्योग करावा किंवा काम करावे या संबंधी विचार करण्यालायक त्याला शिक्षण मिळालेच नव्हते. परंतु त्याने ज्या म्हणी व लोकोक्ती समजून पाठ केल्या होत्या त्या सांगून तो गावकऱ्यांना उत्तम सल्लामात्र देऊ लागला. परंतु द्रव्यार्जन करण्यालायक त्याला काही काम येत नाही, याबद्दल त्याच्या आई-वडिलांना वाईट वाटे.

लखुजी एक चांगला शेतकरी होता. तो आपल्या शेतात चांगले पीक काढी. त्याने पुष्कळ पैसे जमविले होते. त्याच्या बायकोने दागिने करण्यासाठी हट्ट केला. असे प्रश्न उद्भवले की लोक गोपदेवचा सल्ला घ्यायला येत. तेव्हा लखुजीने सुद्धा गोपदेवचा सल्ला विचारला.

"तुझ्या बायकोच्या इच्छेप्रमाणे कर. श्रीमंती मिरविण्यासाठी लावलेले धन आपत्काळी उपयोगी पडते." असे सांगून गोपदेवने लखुजीला सल्ला दिली.

लखजीने गोपदेवच्या सल्ल्याप्रमाणे बायकोला सोन्याचे दागिने करून दिले. त्याच्यानंतर दोनच महिन्यांनी एकाएकी लखुजीच्या घराला आग लागली आणि त्यात त्याचे सर्वस्व भस्म झाले. अंगावरच्या

कपड्यानिशी लखुजी आणि बायको व मुले घराबाहेर आली होती म्हणून वाचली. बायकोच्या अंगावरच्या दागिन्यांचा त्या संकटात फार उपयोग झाला. ते विकून लखुजीने लहानसे टुमदार झोपडे बांधले.

गोपदेवच्या सल्ल्यामुळे लखुजी वाचल्याचे कळल्यावर गावकरी मंडळी व शेजार गावचे लोक त्यांच्या समोरच प्रश्न घेऊन गोपदेवकडे येऊ लागले. त्यांचे प्रश्न सुटतही आणि काही लोक गोपदेवला त्याबद्दल काही तरी बक्षीसही देत. तरी त्याला मिळकतीपेक्षा कीर्तीच जास्त मिळाली.

एकदा त्या देशाच्या राजाच्या एका मांडलिक राजाने आपल्या मालकाविरुद्ध बंड केले. राजा एक छोटेखानी सैन्य घेऊन त्या मांडलिक राजाचे पारिपत्य करायला निघाला. वाटेत गोपदेव राही त्या गावच्या प्रमुखांबरोबर गोपदेवला भेटला. राजाने त्या वेळी तो बंडखोराचा पाडाव करण्यासाठी जात असल्याचे सांगून गोपदेवचा सल्ला विचारला.

गोपदेव म्हणाला– "राजा ! बारीक साप असला तरी जाड दांडक्याने त्याला मारावं, असे म्हणतात. म्हणून आपण आणखी थोडं सैन्य घेऊन जाणं बरे ?"

राजाने आणखी काही सैन्य पाठवावे असे सांगून राजधानीला दूत पाठविला. राजा त्याच्या बरोबर जे थोडे सैन्य होते त्या सैन्यानिशी पुढे गेला. राजाकडे असलेल्या सैन्याविषयी हेरांकडून त्या मांडलिक राजाला माहिती कळली होती. म्हणून तो त्या बेताने सैन्य घेऊन युद्धाला आला. त्या मांडलिक राजासमोर राजाला टिकाव धरणे शक्य नव्हते आणि पळ काढण्याची वेळ येऊन ठेपली. ऐन समयी राजधानीकडून कुमक आली. त्यामुळे मांडलिक राजाची गाळण उडून गेली व त्याने पळ काढला.

राजाने राजधानीला परतल्यावर विजयोत्सव साजरा केला. त्याने गोपदेवला आदरपूर्वक बोलावून त्याला आपला एक प्रमुख सल्लागार म्हणून नेमले.



# निरर्थक काम

एक राजा पर्यटन करीत एका डोंगराळ प्रदेशात आला. त्याच दिवशी त्याचा वाढदिवस होता. त्याच्या राज्यातली प्रजा नजराणे घेऊन राजाच्या सत्कारार्थ जमली. त्यावेळी एक रानटी जातीचा माणूस आला आणि एका तपस्वी मुनीने दिलेला नजराणा आणून राजाला सादर केला. त्यात थोडी माती, एका मडक्यात थोडं पाणी, काही दगड गोटे, घोड्याचे केस आणि एक नारळ होता.

राजाने एक थैली भरून सुवर्णमुद्रा घेतल्या आणि सकुटुंब त्या मुनीच्या आश्रमात गेला आणि ती थैली मुनींच्या समोर ठेवून नमस्कार केला. मुनीने त्याला फक्त हात लावला व म्हणाला–"या प्रदेशातील प्रजेच्या हितासाठी हे धन खर्च कर."

ते कळल्यावर शेजारच्या गावातला एका लोभी माणसाने एका गाठोड्यात काही काटक्या, वाळू, वाळलेले गवत, एक दारूची बाटली ठेवून ते गाठोडे नजराणा म्हणून राजाला दिले.

"याचा अर्थ काय ?" राजाने गाठोडे उघडून विचारले.

"मुनीने पाठविलेल्या नजराण्याचा अर्थ, नाही विचारलात, महाराज ?" लोभी म्हणाला.

"त्याचा अर्थ मला कळला. जमीन व पाणी चांगलं असावं; दगडाने किल्ले बांधावेत, घोडेस्वारांचे सैन्य उभे करावं, नारळाच्या कवठीसारख्या कठोर लोकांशी कठोरपणाने वागलो तरी आतल्या खोबऱ्यासारखं मऊ व गोड आपलं हृदय राखावं, असा मुनीश्वरांनी मला आशीर्वाद दिला होता. तुझ्या नजराण्याचा अर्थ कळला नाही." राजा म्हणाला.

त्या माणसाने राजाचे पाय धरून क्षमा मागितली.





# अज्ञात कवी

श्रीपुरं नावाच्या गावी राजशेखर नावाचा एक अज्ञात कवी रहात असे. तो कविता करी ती स्वतःच्या प्रतिभेमुळे सहजी करी. परंतु त्याला स्वतःला आपल्या प्रतिभेची जाणीव नव्हती. त्याने दहा वर्षे सतत प्रयत्न करून एक महाकाव्य लिहून काढले आणि ते कसे आहे हे पाहून मत देण्यासाठी नागभूषण नावाच्या एका सुप्रसिद्ध कवीकडे घेऊन गेला आणि त्या कवीला म्हणाला–

"कविवर्य, मी हे काव्य रचले आहे. यात काव्य लक्षणे काय आहेत, ती आपणच पहा. आपण मर्मज्ञ आहां. आपण प्रोत्साहन दिलेत तर पुढे आणखी असेच काव्य लिहावे, असा विचार करतो आहे. यात्र काव्य असे काहीच नसेल तर हा नाद सोडून दुसरा काही उद्योग करीन." राजशेखर नागभूषण कवीला म्हणाला.

नागभूषण कवीने ते काव्य वरवरून चाळून पाहिले व राजशेखरची प्रतिभा पाहून थक्क झाला. कारण राजशेखर सामान्य कविता तरी लिहू शकेल ही गोष्ट कोणाला त्यापूर्वी माहीत नव्हती, मग इतके उत्तम काव्य तो लिहू शकतो याची कल्पना कोण करणार? ते काव्य चोरून त्याच्या मदतीने राजाच्या दरबारात मान मिळविण्याचा दुष्ट विचार नागभूषणच्या मनात आला. म्हणून तो राजशेखरला आपल्या पांडित्याचा तोरा दाखवीत म्हणाला–

"जरा लक्षपूर्वक वाचलं पाहिजे. मग आपलं मत सांगेन. दोन आठवड्यांनंतर येऊन भेट." असे सांगून त्याने राजशेखरला निरोप दिला आणि त्या काव्याची नक्कल स्वतःच्या हस्ताक्षराने लिहून काढली.

दोन आठवड्यांनी राजशेखरने येऊन विचारले–"कसे वाटले माझे काव्य? आतापर्यंत वाचून झालं असेल?"

नागभूषण आश्चर्याचा आव आणून म्हणाला–"काव्य? कोणते काव्य?"

"दोन आठवड्यांपूर्वी मी स्वतः येऊन, दहा वर्षे मेहनत करून लिहिलेले काव्य आपलं मत कळावं म्हणून वाचून सांगण्यासाठी विनंती केली होती आपणांजवळ? आपण ते ठेवून घेतलं होतं, आठवत नाही का?" राजशेखरने विचारले.

"तुम्ही स्वप्न तर पाहिलं नाही? तुम्ही मला कोणतेही काव्य कधीही दिलेलं नाही. तेव्हां त्या विषयी काही बोलण्याची गरज नाही." असे सांगून नागभूषणने दटावले.

"तुम्ही इतके मोठे कवी आहां आणि आपल्या सारख्या दुसऱ्या कवीशी असा अन्याय करणे आपणांस शोभत नाही." राजशेखर म्हणाला.

"तुम्ही मला काव्य दिलं म्हणतां, त्याला काही पुरावा? त्यावेळी दुसरा कोणी येथे होता का? मी खोटं बोलत असेन तर तो माणूस तरी खरं काय ते सांगेल." नागभूषण म्हणाला.

"दुसरं कोणी नव्हते?" राजशेखर म्हणाला.

"तरमग तुमच्या म्हणण्यावर कसा कोण विश्वास करणार? मेहरबानी करा आणि आल्या वाटेने चालू लागा!" नागभूषण म्हणाला.









दुसऱ्या दिवशी राजशेखर कवी रंगभूपाल महाराजांच्या दरबारात गेला आणि त्याने आपले गाऱ्हाणे निवेदन करून सांगितले. राजाने सहानुभूतीपूर्वक सर्व ऐकून घेऊन आपल्या नोकरांना पाठवून नागभूषण कवीला बोलावून घेतले. नागभूषण आपली प्रत घेऊन दरबारात हजर झाला.

रंगभूपाल राजाने काव्य आणि नागभूषणचे हस्ताक्षर जुळवून पाहिले व एकसारखं असल्याचं त्याला दिसलं.

"महाराज, माझं काव्य यांनी दोन आठवडे स्वतःकडे ठेवून घेतलं होतं. यांनी त्याची नक्कल उतरविली असावी." राजशेखर म्हणाला.

राजाने सुरवातीची काही पाने वाचून, काव्य श्री रामचंद्राला समर्पित केले असल्याचे पाहिले व म्हणाला—"कवींनो! हे काव्य तुम्हां दोघांपैकी कोणी रचले हे सांगणं कठीण आहे. परंतु तुम्हां दोघांपैकी जो कोणी मला हे काव्य समर्पित करायला तयार असेल त्याचा दरबारात मी सत्कार करीन."

लगेच नागभूषण म्हणाला—"होय महाराज! आपल्या सारख्यांनी विचारल्यावर नाही म्हणेन का मी?"

"तुमचा काय विचार आहे?" राजाने राजशेखर कवीला विचारले.

"क्षमा करावी, महाराज! मी आपलं इष्टदैवत श्रीरामचंद्र याला ते काव्य समर्पित केले आहे. ते दरबारांत वाचून पारितोषिक मिळविण्याच्या हेतूने ते मी लिहिलेले नाही. मला कीर्तीची भूकही नाही." राजशेखर निःसंकोचपणे म्हणाला.

हे उत्तर ऐकून राजाला फार आनंद झाला. त्याने नागभूषणला कैद करून तुरुंगात ठेवण्याची शिपायांना आज्ञा केली.

नागभूषण घाबरून गेला आणि राजाचे पाय धरून आपला अपराध मान्य करून त्याने राजाची क्षमा मागितली. राजाने त्याची चांगली कानउघाडणी करून क्षमा केली आणि दरबारात राजशेखरचा सत्कार केला.





# बिंग बाहेर आले

एका गावात एक मांत्रिक रहात असे. खरोखरी त्याला मंत्रतंत्राची मुळीच माहिती नव्हती. तरी त्याला मंत्रशक्तीचे सोंग चांगले करता येत होते. म्हणून भोळ्याभाबड्या लोकांना फसवून तो त्यांना भय दाखवी व त्यांच्याकडून पैसे उकळून आपला धंदा चालवी.

त्याच गावात प्रभाकर नावाचा एक तरुण युवक रहात असे. त्याचा मंत्रातंत्रांवर विश्वासच नव्हता. त्या लबाड मांत्रिकाचे बिंग काहीतरी उपाय करून बाहेर आणायचं त्याने मनाशी ठरविले.

एके दिवशी तो मांत्रिक गावातल्या इतर लोकांकडे जाऊन शिधा मागे तसा प्रभाकरकडे येऊन तांदूळ, डाळ, तेल वगैरे शिधा मागायला आला.

तो मांत्रिक मागायला आला होता भीकच, परंतु त्याच्या बोलण्याची रीत वगैरे अशी होती की त्याचा गर्वच बाहेर दिसे. तो पाहून प्रभाकरला भयंकर राग आला. तो मांत्रिकाला म्हणाला—"सहा महिन्यांकरितां पाहिजे का तुला. एका वेळेचा सुद्धां मिळणार नाही. लबाडा, तू गरीब भोळ्या भाबड्या लोकांना फसवून पैसे उकळतो आहेस आणि पोळासारखा गावभर भटकतो आहेस. पाय काढतोस की धक्के देऊन बाहेर काढू?"

मांत्रिक थोडासुद्धा न कचरतां धमकावून म्हणाला—"अजून तू मला ओळखलेले दिसत नाहीस पोरा! तर मग पहा, उद्या या वेळेपर्यंत तुझी काय गत करून टाकतो ती." या शब्दात नेहमीच्या संवयीप्रमाणे भीती दाखवून हातातली काठी आपटीत तेथून निघून गेला.

प्रभाकर पुष्कळ दिवसांपासून ज्या संधीची वाट पहात होता, ती स्वतः होऊन

चालून आली. तो आपल्या चार मित्रांना भेटला आणि त्या मांत्रिकाचे बिंग कसे बाहेर आणायचे, याची युक्ती योजली. त्याच्या मित्रांना त्याने योजलेली युक्ती पसंत पडली.

दुसऱ्या दिवशी सकाळी प्रभाकर जमिनीवर पडून तडफडू लागला. दोनदा ओकलाही. शेजारपाजारच्या मंडळींनी येऊन विचारले– "हे काय रे?" तेव्हा प्रभाकरचे मित्र म्हणाले–"हे सर्व त्या मांत्रिकाचे काम आहे. त्यालाच आणून प्रभाकरचा इलाज करायला सांगितले पाहिजे."

चार जण मांत्रिकाकडे धावले. म्हणाले–"तू त्या मुलावर काही मंत्रबित्र टाकला आहेस वाटतं. तो ओकतो आहे. येऊन काय तो इलाज कर."

मांत्रिक ऐटित म्हणाला–"ज्याचं कर्म त्यानं भोगावं, मी कशाला मध्ये पडू?"

"तुझ्यावर काहीच जबाबदारी नाही म्हणतोस का? मग उद्या पहा, काय करतो ते असे तू कां धमकावले होतेस त्याला?" विचारीत प्रभाकरचे मित्र त्या मांत्रिकाला बडवू लागले.

मांत्रिक घाबरून गेला व गयावया करीत म्हणाला–"बाबांनो! मी तसलं काही एक पापकर्म केले नाही. मला कोणताही मंत्र येत नाही. त्याला भीती दाखविण्यासाठी तसं म्हटलं होतं. मला सोडा."

इतक्यात प्रभाकर स्वतःच तिकडे आला. "तू म्हणतो आहेस ते खरंच का की तुला काही मंत्रबित्र येत नाही? मग मंत्रशक्ती असल्याचे सांगून तू लोकांना कां फसवीत आलास? एवढ्याच साठी, तुझं डोकं ताळ्यावर आणण्याच्या हेतूनेच आम्ही तुला हा धडा दिला आहे. यापुढे मंत्राचे नाव काढलेस तर पहा, उभा चिरून तुला पुरून टाकू!" या शब्दात मांत्रिकाला प्रभाकरने धमकावले.

ती बातमी 'हां हां' म्हणता गावभरच नव्हे, शेजारच्या गावांतही पसरली. त्यापुढे त्या मांत्रिकाचा त्रास कायमचा बंद झाला.





# महाबली हनुमान

मणिपूर राज्याचा अधिपती मणिध्वज हा एक शूर व पराक्रमी शिवभक्त होता. त्याने शंभर वेळा स्वतःच्या देहाची आहुती यज्ञकुंडात दिली आणि दहा वेळा स्वतःचे डोके शंकराला वाहिले. असे उग्र व्रत करून त्याने शंकराकडून अनेकानेक वर प्राप्त करून एक थोर शिवभक्त म्हणून थोर कीर्ती संपादन केली होती.

शंकराचे त्रिशूल मणिध्वजाने आवाहन करताच येई व शत्रूचा संहार करून परत जाई. शंकराचे पाशुपत अस्त्रसुद्धा त्याच्या इच्छेनुरूप वागे. किंबहुना त्याने इच्छिल्यास स्वतः शंकर पाठीशी येऊन उभा राही. असा वरदेखील मणिध्वजने मिळविला होता. शिवकृपेने तो अजिंक्य असल्याचा आणि स्वतः शंकर आपल्या रक्षणाला सर्वदा हजर असल्याबद्दलचा त्याला गर्व चढला होता.

शंकराला सोडून इतर देवांची आराधना करणाऱ्यांना व धर्ममतावलंबी लोकांना त्याने देशाबाहेर हाकलून दिले होते. एका शंकराच्या देवालयाशिवाय इतर देवांची देवळे त्याने पाडून टाकविली होती. मणिध्वजाच्या अत्याचारामुळे घाबरलेली प्रजा अयोध्येला श्रीरामाच्या आश्रयाला येऊन राहू लागली होती. मणिध्वजाचा काळ संपत आला असल्याचे सांगून श्रीराम त्या गरीब प्रजेच्या मनाचे समाधान करी. तोंपर्यंत तो शरणार्थी प्रजेचे अयोध्येला रक्षण करी.



रामाच्या अश्वमेधयज्ञाचा घोडा स्वच्छंद-पणे विहार करीत मणिपूरची हद्द ओलांडून मणिपूरच्या राज्यात शिरला. ते पाहून मणिध्वजाने त्याला पकडून मणिपूर येथे आपल्या तबेल्यात बांधून ठेविले.

घोडयाला सोडून रामाशी सख्य कर, असा निरोप दूतांकरवी लक्ष्मणाने मणि-ध्वजाकडे पाठविला. मणिध्वजाने तो निरोप ऐकून त्याप्रमाणे वागण्याचे तर सोडाच, उलट त्रिशूल तापवून दूताच्या पाठीवर डाग दिले आणि त्याच्या डोक्यावर ओंजळ भरून भस्म टाकून त्याच्या करवी परत निरोप पाठविला–"रावण इत्यादी

मी भैरवासमोर बली देऊन रामाने केलेल्या त्या पापाचे त्याला प्राय:श्चित देणार आहे. कोटयावधी राम आले तरी मला त्यांची पर्वा नाही. मी त्रिशूल तापवून त्याचे पट्टे त्यांच्या पाठीवर ओढून पाठवीन."

तो निरोप ऐकून युद्धाशिवाय घोडा सोडवून आणणे अशक्य आहे, असे लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न तिघांना वाटले. आतां युद्ध होणार असे ठरवून भरताने पांच-जन्मासारखे युद्धाचे शिंग फुंकले. दशदिशा त्या आवाजाने निनादल्या. तिकडे शत्रुघ्नाने सुदर्शन चक्रासारखे चक्र सोडले. सहस्त्रमुख शेषनागाच्या फूत्कारांसारखा क्रुद्ध होऊन लक्ष्मणाने आपले प्रचंड धनुष्य घेऊन शरवृष्टी सुरू केली. एकाएकी झालेल्या या हल्ल्यासमोर उभे राहणे मणिध्वजला शक्य झाले नाही. तेव्हां त्याने शंकराच्या त्रिशूलाचे आवाहन केले.

तेव्हां मणिध्वजाने बांधलेल्या शंकराच्या देवळातून विजेसारखा लख्ख प्रकाश पाडून वीज पडावी तसा आवाज करीत त्रिशूल लक्ष्मणावर चालून गेले. अगदी ऐन वेळी हनुमान त्या त्रिशूलाच्या व लक्ष्मणाच्या मधोमध आडवा होऊन उभा राहिला. त्याने, हत्ती सोंडेने ऊस तोडून टाकण्यासाठी

असलेले त्रिशूल डाव्या हातात घेऊन शंकरा-सारखेच भैरव रूप धारण केले.

मणिध्वजाला भ्रम झाला की स्वत: शंकरच त्याच्या मदतीला धावून आला आहे. तो त्याला भक्तिपूर्वक हात जोडून नमस्कार करू लागला. ते पाहून हनुमान स्मित करून मणिध्वजला म्हणाला–"अरे, शिवभक्ता! मी शंकर नाही! मी एक वानर आहे, हनुमंत! रामचा दास!" असं म्हणत त्याने गदा उचलली आणि मणि-ध्वजाला ओलांडून पलीकडे गेला.

मणिध्वज हनुमानाची गदा डोक्यात पडते की काय या भीतीने दूर पळून गेला व हनुमानाला पाहतांच भीतीने त्याचा चेहरा पांढरा फट्ट पडला. हनुमानाच्या डोक्यावरचे लांब लांब केस वाऱ्यामुळे उडत होते. त्याचे डोळे अग्नीच्या गोळ्या-सारखे रखरखीत दिसत होते. एका हाताने त्रिशूल जमिनीवर टेकून उभे करून प्रत्यक्ष महादेवासारखा हनुमान उभा होता. आतां आपली सुटका नाही, आपण मरणार असे वाटून मणिध्वजाने तत्क्षण पाशुपतास्त्राचे स्मरण केले. ते हातात येताच धनुष्यावर ठेवून त्याने ते हनुमानावर सोडले.

त्या पाशुपतास्त्राच्या उष्णतेने जवळ-पासचा प्रदेश जळू लागला. लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न आणि त्यांचे सर्व सैन्य तो ताप सहन न झाल्यामुळे बेशुद्ध होऊन जागच्या जागी पडले. हनुमान रामनामाचा जप करीत स्वत:ची छाती उघडून त्या अस्त्राला





सामोरा गेला. पाशुपतास्त्र हनुमंताच्या हृदयाला स्पर्श करून चुरा होऊन त्यातच लीन झाले. हनुमंताने मणिध्वजाचा रथ गदेने तोडून चूरचूर करून टाकला. नंतर मणिध्वजाला ठार करायला पुढे गेला. मणिध्वज मृत्युभयाने समोरून पळून गेला आणि शंकराच्या देवळात जाऊन शिवलिंगावर डोके आपटून ओरडून शंकराचा धावा करू लागला—"हरहर महादेवा! धांव आणि मला वाचव."

त्यावेळी शिवलिंगातून आवाज आला—"हे काय रे, मणिध्वजा! कोट्यावधी राम आले तरी मला त्यांची पर्वा नाही म्हणाला होतास! रामाचा एकटा दास आला आहे त्याला तू तोंड देऊ शकला नाहीस? जा, युद्ध कर, तुझ्या पाठीशी मी आहे!"

दिलेल्या वराप्रमाणे नंदीवाहनावर बसून शंकर रणांगणावर मणिध्वजाच्या मदतीला धावला. हनुमान शंकराला म्हणाला—"मी तुलासुद्धा भिणार नाही. खबरदार!" म्हणत हनुमानाने सिंह गर्जना केली आणि शंकरावर चालून गेला. नंदी शंकराला पाठीवरून खाली टाकून पळून गेला.

शंकर स्वतःला सावरून हनुमंताला म्हणाला—"तू माझे त्रिशूल धरले आहेस. पाशुपतास्त्र स्वतः मध्ये लीन करून घेतले आहेस, एवढे मोठे कार्य एका विष्णूलाच शक्य आहे. तू विष्णू आहेस की विष्णुभक्त आहेस? कोण आहेस तू?"

"तुमच्या देवांशी माझा काही संबंध नाही. मानव देहधारी रामावर माझा विश्वास आहे. मी माकड असलो तरी तो मानव देहधारीच माझा देव आहे. माकडांसारखीच माझी बुद्धीसुद्धा अत्यंत चंचलच आहे. तरी मी एकाग्रबुद्धीने एका मानवोत्तमावर आपले चित्त लावले आणि अपार शक्ती प्राप्त केली आणि साहस व पराक्रम करू शकलो. याला भक्ती म्हटले काय किंवा लक्ष्यसाधना म्हटले काय एकच! लोक कल्याणासाठी मानवाने आरंभिलेला अश्वमेध यज्ञ चालू आहे. तो थांबविण्याची शक्ती कोणत्याही देवाच्या भक्तीत नाही. भक्त म्हणून स्वतःला म्हणविणारा मणिध्वज हा काय अत्याचार करीत आहे? अशा अत्याचारी व स्वार्थी भक्तांचा मदतीला धावणारा देव असू शकेल का?" असे म्हणत हनुमंताने दशदिशांना गदागदा हलवून सोडणारी गर्जना केली.

ते ऐकून शंकर स्मित करून आणि क्रोध नव्हता तरी क्रोधाचा आव आणून म्हणाला—"मी कपाळातला तिसरा नेत्र उघडतो आहे, खबरदार!"

"लौकर उघड! तुझ्या भक्ताचे डोळे उघडतील!" हनुमान म्हणाला.

शंकराने आपला तिसरा डोळा उघडल्याबरोबर प्रलयाग्नीच्या ज्वाळा हनुमानाच्या दिशेने जाऊ लागल्या. हनुमानाने उजवा हात पुढे करून अग्नीला मुठीत धरले शंकराने हलाहल विष प्याले होते तसा तो अग्नी तोंडात टाकून गिळून टाकला.

शंकर मणिध्वजाकडे पाहून म्हणाला—"हे सर्व तू पाहिलेस ना? आतां मी करण्यासारखे काही उरलेच नाही. हनुमान आणखी कोणी नसून माझे आत्मस्वरूपच आहे. माझा अंश घेऊन त्याचा अवतार झाला आहे. म्हणून त्याच्यात माझ्या सर्व शक्ती लीन झाल्या. त्याच्याजवळ भक्ती म्हणजे काय हे



मध्यंतरी जो वेळ मिळाला तेवढ्यात हनुमानाने उड्डाण करून द्रोण गिरीवरून संजीवनी बूटी आणली आणि बेशुद्ध होऊन पडलेल्या लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न आणि त्यांच्या सैन्याला शुद्धीवर आणले.

तेव्हा मणिध्वजाचे डोळे उघडले. तो हनुमंतासमोर गुडघे टेकून बसला व ओंजळ पुढे करून प्राणभिक्षा मागू लागला. हनुमान त्याला म्हणाला—"मणिध्वजा! तुझ्या स्वार्थामुळे तुझी भक्ती किती निरुपयोगी झाली हे तू प्रत्यक्ष पाहिलेच आहेस! स्वतःच्या स्वार्थासाठी शंकराच्या भक्तीचा असा दुरुपयोग करतां कामा नये. ती भक्ती



ईश्वराची कृपा प्राप्त करणे हीच खरी भक्ती! तुझ्यासारख्यांच्यामुळे देवांचे महात्म्य सुद्धा जाते. अशा स्वार्थी भक्तांमुळे आणि गर्विष्ठांमुळे चांगलेचांगले लोकसुद्धा बदलून जातात. आतां तुझे अज्ञान दूर झाले. म्हणून तू द्वेष करण्याचे सोडून सर्वभूती परमेश्वर असे मानून आपज्या प्रजेला सुखी ठेवण्याचे व्रत घे."

तेव्हा मणिध्वज नम्रपणे म्हणाला— "प्रभो, आंजनेया! गर्व चूरचूर होऊन गेल्याशिवाय ज्ञानोदय होत नाही. माझी सर्व घमेंड काढून टाकण्याच्या हेतूनेच शंकराने मी मागितला तो वर दिला असे

यज्ञाचा घोडा धरून बांधला त्याचा मला लाभच झाला. मला ज्ञानप्राप्ती झाली ही सर्व त्या श्रीरामचंद्राचीच कृपा, असे मी मानतो. मी स्वत: रामाकडे जाऊन त्याची क्षमा मागतो आणि मला आपला एक दास करून घे असे त्याच्याजवळ मागणे मागतो." असे सांगून मणिध्वजाने यज्ञाचा घोडा आणून लक्ष्मणाला नम्रपणे दिला.

घोड्याला पुन्हा स्वच्छंदपणे विहार करायला सोडून सर्व त्याच्या पाठोपाठ निघाले. मणिध्वजाने त्या सर्वांना आनंदाने निरोप दिला.

मणिध्वजाला शुभा व शोभा अशा दोन अत्यंत सुंदर मुली होत्या. त्या जुळ्याच होत्या. त्यांना बरोबर घेऊन मणिध्वज जन्मल्या अयोध्येला गेला. तेथे रामाला भेटून त्याने रामाची क्षमा मागितली. रामाने मणिध्वजाचा आपल्या एका मित्रासारखा आतिथ्यसत्कार केला. नंतर मणिध्वजाने आपल्या दोघां मुलींचा लवकुशांबरोबर विवाह करून घेऊन रघुवंशाशी आपले नाते जोडून घ्यावे अशी रामाजवळ विनंती केली. रामाने ते मान्य केले आणि अश्वमेध यज्ञ पुरा झाल्यावर हा लग्न समारंभ करू, असे वचन दिले. मणिध्वजाने ज्यांना राज्या-

आश्रमाला येऊन अयोध्येला राहू लागले होते त्या सर्वांना आदरपूर्वक आपल्या राज्यात बोलावून नेले. त्यानंतर मणिध्वज प्रजेचे हित तीच शिवाची आराधना आणि प्रजेची सेवा तीच शिवभक्ती असे मानून राज्य करू लागला.

रामाच्या यज्ञाचा घोडा पूर्वेकडून दक्षिणेकडे आणि पश्चिमेकडील अनेक देशात फिरत स्वच्छंदपणे अयोध्येला परतला. अश्वमेध यज्ञ पूर्ण होण्याच्या शुभप्रसंगी किष्किंधेहून सुग्रीवादि वानर वीर, लंकेहून बिभीषण आदि राक्षस वीर, मणिपूरहून मणिध्वज आणि अनेक देशांचे राजे मोठमोठे नजराणे घेऊन अयोध्येला आले. बिभीषण कित्येक गाड्या भरून मोती व पोवळी घेऊन आला होता. सुग्रीव हिरे व सोने घेऊन आला होता. मणिध्वज गरुड, पाचू व लालमणि आणि रेशमीवस्त्रे घेऊन आला होता. इतर राजे चांदी सोन्याची पात्रे घेऊन आले होते. त्यांनी रामाचा खजिना भरून गेला.

लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न निरनिराळ्या देशात स्वागत समारंभ उपभोगून दिग्विजय करीत सैन्यासह अयोध्येला पोचले. त्यांच्या पाठीमागून हनुमान, भारद्वाज, गौतम, अत्री, अगस्त्य वगैरे ऋषी आले. रामाला अस्त्र विद्या शिकवून देणारे गुरु विश्वामित्र यांना रामाने विशेष निमंत्रण पाठवून बोलावून घेतले होते.

अश्वमेध यज्ञ थाटामाटाने पूर्ण झाला. रामाने धनधान्य घरोघरी वाटले. राजधानीतल्या सर्व साध्वी स्त्रियांना रत्नहार व दागदागिने देण्यात आले. प्रजेच्या हिताची कामे करणाऱ्या अधिकाऱ्यांना अनेक मूल्यवान उपहार देऊन रामाने त्यांचा सत्कार केला.

त्यानंतर सर्व मणिध्वजाच्या आमंत्रणाला मान देऊन मणिपूरला गेले. मणिपूरला कुशाशी शुभाचा आणि लवशी शोभाचा विवाह आनंदाने व उत्साहाने पार पडला. विवाह प्रसंगी मणिध्वजाने आपले सर्व राज्य लवकुशांना भेट म्हणून दिले. त्यानंतर त्याने वानप्रस्थाश्रमात प्रवेश केला.





## राक्षस रूप पावलेला राजा

सहस्रावधी वर्षांपूर्वी सौदास नावाचा एक राजा अरण्यमार्गाने चालत असतां समोरून शक्ती नावाचा एक तपस्वी येत असलेला दिसला.



"मी राजा आहे, बाजूला हो!" सौदास म्हणाला. "तूच एका तपस्व्याला वाट कां देऊ नयेस?" शक्तीने विचारले. राजाने संतापून त्या तपस्व्याला खूप ठोकले.



"राजा तर नाहीच नाही, मानव म्हणून राहण्याची लायकीसुद्धा तुझ्यात नाही. तू राक्षस हो!" असा शक्तीने त्याला शाप दिला.



झाडावरचा एक ब्रह्मराक्षस तो शाप ऐकून राजाच्या मानेवर बसला. राजा त्याचे काही करू शकला नाही.

तो पळू लागला त्याचं तोंड भयंकर रूप धारण करू लागलं. तो अरण्यातील एका कुटीरासमोर येऊन पोचला, तोपर्यंत तो राक्षस झाला होता.





तो आश्रम आणखी इतर कोणाचा नसून, शक्तीचाच होता. राक्षस झालेल्या सौदासाने शक्तीला धरून गिळून टाकले.

राक्षसाचा राग तेवढ्यावर शांत झाला नाही, अरण्यात शक्तीचे शंभर भाऊ रहात होते. सौदासाने त्यांचा शोध काढून एकेक करून त्यांनाही गिळून टाकले.





शक्ती व त्याचे ते भाऊ वशिष्ठ ऋषींचेच पुत्र होते. आपल्या मुलांची ती दुर्गत झाल्याचे कळल्यावर वशिष्ठांनी आत्महत्या करण्याचे ठरविले.

आत्महत्या करून घेण्यासाठी त्यांनी एका नदीत उडी टाकली. ती नदी लगेच शतधारा होऊन वाहू लागली. व वशिष्ठांना बुडण्या इतकेसुद्धा पाणी मिळालं नाही. त्या नदीचे नाव "शतद्रू" झाले.





वशिष्ठांनी पोहता येऊ नये ह्यासाठी हात बांधून घेऊन आणखी एका नदीत उडी मारली. परंतु नदीतल्या देवतेने हाताला बांधलेली दोरी तोडून त्यांना किनाऱ्यावर ढकलले. त्या नदीला "विपाशा" हे नांव मिळालं.

वशिष्ठऋषी घरी परत येत असतां त्यांना पाठीमागून कोणीतरी वेदपाठ करीत येत असल्याचे ऐकू आले. त्यांनी वळून पाहिले. तेव्हां शक्तीची बायको येत असलेली त्यांना दिसली. तिच्या पोटातला शिशू वेदपाठ करीत होता. त्यावरून आपला वंश चालू राहणार या गोष्टीचा वशिष्ठमुनींना आनंद झाला.





पुढे लौकरच तो राक्षस वशिष्ठमुनींना गिळण्यासाठी आला. त्यांना त्या राक्षसाला निर्मूल करता आले असते. तरी त्यांनी कमंडलातल्या पाण्याने प्रोक्षण करून त्याला पुन्हा सौदास केले.

# गोष्ट मथळा चढाओढ

## या गोष्टीला सुंदर मथळा सुचवून रु. २५ मिळवा!

?

अजामीळ हा एक महापापी असूनही मरणसमयी त्याने आपल्या मुलाला—"नारायणा!" म्हणून हाक मारली. म्हणून त्याला मुक्ती मिळाली, हे ऐकून एका व्यापाऱ्याने आपल्या आठ मुलांना विष्णूची नावे ठेवली. व्यापारधंदा करीत असतां त्याने कोणती पापे केली नाहीत? सगळी केली होती. म्हणून त्याने आपल्या शेवटच्या आजारात आपल्या चौघां मुलांना व्यापार पाहण्याचे काम सांगितले आणि बाकी चौघांना सतत आपल्या पलंगाजवळ रहायला सांगितले.

व्यापाऱ्याला वाटले होते तशी अखेरची वेळ आली. ते कळल्यावर आठही मुलं त्याच्या खाटेजवळ आली. त्यांना पाहून व्यापारी म्हणाला—"कायरे, तुम्ही सर्व येथेच आहां का? दुकानात कोणी नसलात तर चोर चोरी नाही का करणार? चोर, चोर!" म्हणत त्याने प्राण सोडला आणि पुढल्या जंन्मी चोर म्हणून जन्मला.

★ ★ ★

वरील गोष्टीला उपयुक्त होईल असा एक सुंदर मथळा विचार करून एका कार्डावर स्वत:च्या पत्त्यासह लिहून "गोष्ट मथळा चढाओढ", 'चांदोबा', चंदामामा प्रकाशन, २ व ३ अर्काट रोड, वडपळणी, मद्रास ६०००२६ या पत्त्यावर पाठवा.

१० जुलै १९७८ च्या आत पोस्टकार्ड पोंचले पाहिजे. त्या कार्डावर 'फोटो चढाओढ परिचय' देता कामा नये.

चढाओढीचा निकाल सप्टेंबर १९७८ च्या चांदोबात जाहीर करण्यात येईल.

---

मे महिन्यातल्या चढाओढीचा निकाल (मथळा) "ऐहीक त्याग"



# अमरवाणी

अस्वाधीनं कथं दैवं
प्रकारै रभिराध्यते,
स्वाधीनं समतिक्रम्य
मातरं पितरं गुरुम् ॥ १ ॥

[ माता, पिता व गुरु प्रत्यक्ष डोळ्यांसमोर असतां त्यांना सोडून दृष्टीस न पडणाऱ्या देवाला कसे पुजायचे ? ]

स्वर्गो धनं वा, धान्यं वा,
विद्याः पुत्रा स्सुखानि च,
गुरु वृत्त्यनु रोधेन
न किंचिदपि दुर्लभं ॥ २ ॥

[ स्वर्ग असो, धन असो, धान्य असो की विद्या असो, गुरुची आराधना केल्याने त्या सर्वांची प्राप्ती होते; तिच्या योगे असाध्य असे काहीच नाही. ]

देव गंधर्व गोलोकान्
ब्रह्मलोकां स्तथापरान्
प्राप्नुवंति महात्मानो
माता पितृ परायणाः ॥ ३ ॥

[ माता पित्यांची सेवा करणाऱ्या थोर आत्म्यास देव, गंधर्व गोलोक व त्यानंतर ब्रह्मलोकसुद्धा प्राप्त होतात. ]



# कावळा आणि घुबड

[ ६० ]

मंदविसर्प नावाचा साप बेडकांचे ओझे पाठीवर वाहू लागला. बेडकांचा राजा त्या आनंदात म्हणाला–"मला गजारोहणाने किंवा ब्रह्मरथात बसायला मिळाले तरी हा आनंद मिळणार नाही."

दुसऱ्या दिवशी साप मुद्दामच फार सावकाश चालू लागला. ते पाहून जालपाद बेडकाने त्याला विचारले–"आज तू वेगाने चालत नाहीस, काय रे कारण ?"

साप म्हणाला–"प्रभो! काही खायला न मिळाल्यामुळे थकल्यासारखं झालं आहे."

"तरमग त्यात काय? खालच्या जातीच्या बेडकांना खा!" बेडकांचा राजा म्हणाला.

मंदविसर्प आनंदाने म्हणाला–"ब्राह्मणाचा शापसुद्धा तसाच होता की आपल्यासारखे कुलीन बेडूक जे काही खायला सांगतील ते खावे." तेव्हांपासून साप बेडकांना खाऊ लागला आणि थोड्याच दिवसात खूप माजला.

काही दिवसांनी त्या बाजूला आणखी एक मोठा साप आला. मंदविसर्पाला पाठीवर बेडकांचे ओझे वहात असलेला पाहून त्या सापाने चकित होऊन विचारले–"मित्रा, हे बेडूक म्हणजे आपला नैसर्गिक आहार आहेत, नाही का? आणि तू त्यांना आपल्या पाठीवर बसवून फिरतो आहेस?"

"ते मला कळतं रे! तूप पिऊन आंधळ्याचे सोंग करणाऱ्या ब्राह्मणासारखा मी संधी पाहतो आहे!" मंदविसर्प म्हणाला.

"कोणती ती गोष्ट, ऐकू दे तरी!" असं दुसरा साप म्हणाला आणि मंदविसर्प गोष्ट सांगू लागला :



फार पूर्वी यज्ञदत्त नावाचा एक ब्राह्मण होता. त्याची बायको वाईट चालीची होती. ती साजूक तुपाची पक्वान्ने करून आपल्या प्रियकराकडे घेऊन जात असे.

एके दिवशी यज्ञदत्ताने बायकोला विचारले काय ग! तू दररोज ही पंच-पक्वान्ने तयार करून नेतेस तरी कोठे?"

ती म्हणाली–"इथून जवळच देवीचं एक देऊळ आहे. खीर व पक्वान्नांचा देवीला नैवेद्य दाखवायला घेऊन जाते."

त्या दिवशी तो ब्राह्मण बायकोला कळू न देता गुपचूप आधीच देवळात जाऊन देवीच्या मूर्तीमागे लपून बसला. ती त्या दिवशी इतर कोठे न जाता देवळातच गेली. देवळात पाऊल टाकण्यापूर्वी देवळाच्या कुंडात तिने स्नान केले आणि देवळात जाऊन देवीला ओवाळून तिने देवीला नमस्कार केला व मागणे घातले–"देवी! माझा नवरा आंधळा व्हावा, याला काय उपाय आहे?"

मूर्तीमागे लपलेला ब्राह्मण बायकी आवाजात म्हणाला–"दररोज त्याला तुपात तळलेली पक्वान्ने खायला घातलीस म्हणजे लौकरच त्याचे डोळे जातील."

त्यानंतर ब्राह्मणाच्या बायकोने त्याला तुपात तळलेली पक्वान्ने करून वाढायचा सपाटा सुरू केला.

काही दिवस गेल्यावर तो बायकोला म्हणाला–"मला दिसत नाहीसं झालं ग!"

"ओहो, ही देवीचीच कृपा!" ती मनात म्हणाली. तिने ती बातमी आपल्या प्रियकराला जाऊन सांगितली आणि त्याला आपल्या घरी निश्चिंतपणे यायला हरकत नाही, असे सांगितले.

आंधळेपणाचे सोंग करणाऱ्या ब्राह्मणाने बायकोचा प्रियकर आल्याचे त्याला काहीच न कळल्याचे सोंग केले आणि पाठीमागून जाऊन एका सोटयाने त्याचे डोके फोडले. नंतर आपल्या दुष्ट बायकोचे नाक कापून तिला घरातून हाकलून बाहेर काढले. मंदविसर्प दुसऱ्या सापाला ही गोष्ट सांगून म्हणाला– "बाबा रे, मी सुद्धा त्या ब्राह्मण सारखा संधीची वाट पहातो आहे."

कालक्रमाने मंदविसर्पाने एकेक करून जलपादासह सर्व बेडूक खाऊन टाकले आणि शेवटी त्या डबक्यात एकही बेडूक शिल्लक राहिला नाही.

स्थिरजीवी हे सर्व सांगून म्हणाला– "असे सांगतात की, कर्तबगार व्यक्ती किती अडथळे आले तरी त्यांची फिकीर न करता लक्ष्यप्राप्ती करून घेते शक्ती-सामर्थ्याने जे साध्य होत नाही ते चातुर्याने साध्य होते, होय की नाही?"

"हे खरे आहे, बलप्रयोग करून कोणाला फक्त ठार करता येईल, परंतु युक्तीचा उपयोग करून त्या शत्रूला ठार करणे हे एकच नाही, तर त्याच्या विरुद्ध खोटया अफवा उडवून त्याचा नावलौकिक सुद्धा नष्ट करणे शक्य आहे. राजा, आतां तू निश्चिंतपणे राज्य कर. परंतु एक गोष्ट लक्षात ठेव, तू जे काही करशील ते प्रजेच्या हितासाठी कर. कष्ट केल्याशिवाय एखादे झाड देखील पाडता येत नाही, तसेच कष्टाशिवाय कोणतेही काम साध्य होत नाही. चित्ताने दृढ असावे. कापुरुषाला काहीच साध्य होत नाही. काळजीपूर्वक काम कर. आज करायचं काम उद्यावर टाकू नकोस. शत्रू किती लहान असला, संकट किती छोटे असले तरी बेफिकीर राहू नकोस. साप ज्या घरात फिरतात त्या घरात निश्चिंतपणे झोप येऊ शकेल का? त्यांना ठार तरी केले पाहिजे किंवा टोपलीत झाकून ठेवले पाहिजे. तू प्रजेला सुखी कर. नाहीतर अजागलस्तनासारखा तुझा कारभार निरुपयोगी ठरेल. काळ सर्व काही खाऊ गिळू शकतो, राजे, मंत्री, सिंहासने, दरबार कालगर्भात अदृश्य होतात. म्हणून जिवंत असेपर्यंत प्रजे-विषयीच्या आपल्या कर्तव्याचे पालन कर." या शब्दात स्थिरजीवीने कावळ्यांच्या राजाला हितोपदेश केला.

मेघवर्ण स्थिरजीवीने दिलेल्या सल्ल्या-प्रमाणे राज्य करू लागला.



## १९८. कवचधारी राक्षसी पाल

चित्रात दिसत असलेला अस्थिपंजर एका राक्षसी पालीचा आहे. स्जेचिवान् (चीन) प्रांतात सापडलेला हा अस्थिपंजर आतां चुंग किंग् म्यूझियम मध्ये आहे. कवचधारी राक्षसी पालींची हाडे जगात अनेक जागी सापडली आहेत. परंतु आशियात त्यांचा पुरा अस्थिपंजर मिळाला. शाकाहारी असूनही ह्या राक्षसी पाली सात मीटर लांब व अडीच मीटर उंच होत्या. त्यांचे डोके फार लहान व पुढले पाय आखूड होते. ह्या पाली चवदा कोटी वर्षांपूर्वी पृथ्वीच्या पाठीवर चालत होत्या.





# माया सरोवर

[ ३० ]

[ मायासरोवराच्या दिशेने लंगडा मंगलवर्मा जात असता, त्याला झाडाच्या फांद्यात अडकून बसलेला सारथी दिसला. त्याचा आर्तनाद ऐकून सिद्धसाधक व कनकराज महाराज तेथे आले. त्याच वेळी जलवृकांना पळवीत गेंड्यावर बसून येणाऱ्या एकाला पाहून वनमाणसाने झाडावरून त्याच्यावर उडी मारली. पुढे– ]

जलवृकांनी त्यांच्या नायकावर आलेले संकट पाहून चारी बाजूंनी एकदम येऊन आपल्या गदांनी वनमाणसाला बड-वायला सुरवात केली. कनकराज महा-राजांनी आपल्या सैनिकांना हल्ला करायला सांगितले. सिद्धसाधक आपले त्रिशूल घेऊन सापडेल त्याला भोसकू लागला.

अशा तऱ्हेने दोन तीन मिनिटे भयंकर चकमक चालू असतां वनमाणसाला चारी-बाजूंनी गदांचा मार बसल्याने आणि तो असह्य झाल्याने ते बेशुद्ध होऊन गेंड्यावरून खाली जमिनीवर पडले. त्या पाठोपाठ जलवृकांच्या नायकाने गेंड्याला सैनिकांच्या पुढे आणून उभे केले व आपली गदा उगारून म्हणाला–"अरे ए मानव देहधारी प्राण्यांनो! मी कोण आहे असे वाटलं तुम्हांला? मायासरोवराचा सर्वाधिकारी जलवृकराक्षसनाथ आहे मी! मी आत्तां



जाऊन एकट्या पद्ममुखीला सोडून बाकी सर्व कैद करून ठेवलेल्यांना बळी देणार आहे, या गदेचा प्रहार करून!"

वनमाणूस अद्याप चांगले शुद्धीवर आले नव्हते. ते हातवारे करून जोरजोराने दात चावून 'किच किच' करीत होते. त्याला शुद्धीवर आणण्याचे काम करणे, आपला गुलाम झालेल्या एका जलवृकाला शक्य आहे असे वाटून सिद्धसाधकाने मान वळवून त्याला हाक मारून म्हटले–"अरे जलवृक सैनिका! कोठे आहेस रे? तू आपल्या जुन्या साथीदारात सामील होऊन गेलास तर नाहीस ना?"

ते ऐकून तो जलवृक पुढे येऊन सिद्धसाधकाला दंडवत करून म्हणाला–"मालक! जलवृक स्वामिभक्तीत प्रथम असतो. जन्मापासून गुलाम झालेल्या सेवकाच्या ही पुढे एक पाऊल असते त्याचे. तो दिलेले वचन कधी मोडत नाही. काय हुकूम आहे?"

"अरे वृकसैनिका! पहा तर जरा, वनमाणसाला फार लागले तर नाही? त्याला हात देऊन जरा उभा तर कर." सिद्धसाधक म्हणाला.

"मालक, अशा प्राण्यांना फक्त प्राणाची भीतीच काय ती असते." असे म्हणत तो जलवृक वनमाणसाजवळ गेला आणि डाव्या हाताने त्याची मान घट्ट धरून आणि त्याच्या डोक्यावर दगडी गदा ठेवून ओरडला–"तुझं दगडी डोकं फुटणार आहे बघ!"

दुसऱ्या क्षणाला वनमाणूस एक डरकाळी फोडीत उडी मारून उभे राहिले आणि त्याने जलवृकाला दोन्ही हातांनी धरून उचलून दूर फेकून दिले. जमिनीवर तो आदळणार होता, परंतु काही सैनिकांनी त्याला अलगद वर धरले.

वनमाणूस त्याला धरायला पुन्हा धावले, तेवढ्यात सिद्धसाधकाने आपले त्रिशूल आडवे मधे धरून त्याला अडविले व म्हणाला–"वनमाणसा! आता शांत हो! तुम्ही दोघे माझे सेवक आहां, आपसात भांडू नका." नंतर जलवृकांचा नायक गेंड्यावर बसून पळून जात होता त्या दिशेला पाहून म्हणाला–"आता या दुष्टाला कसे पकडायचे? तो मायासरोवरात पोचलाच म्हणावयाचा का? ते किती दूर आहे?"

देवशर्मा जवळ जाऊन म्हणाला–"साधका! मायासरोवर आतां तेवढे दूर नाही, सर्व माझ्या पाठोपाठ चला."

सिद्धसाधकाने होकारार्थी मान हलविली. देवशर्मा पुढे व त्याच्या पाठीमागून इतर सर्व निघाले. कनकाक्ष महाराज देवशर्माच्या जवळून जात त्याला विचारू लागले–"तो जलवृकनाथ म्हणाला की कोणत्या तरी एका पद्ममुखीला फक्त जिवंत सोडणार. तो असं कां म्हणाला ते नाही कळलं मला?"

"महाराज, आपण जे ऐकतो व पाहतो आहो त्यावरून सर्व मायासरोवर जलवृक राक्षसांनी काबीज केले असावेसे दिसते आहे. पद्ममुखी ही मायासरोवरेश्वराची मुलगी. जलवृकराक्षस तिला ठार करणार नाही म्हणाला त्याचं कारण विशेष असं काही नाही. त्याला एक मुलगा आहे ना, तो गुंतला असावा तिच्या फंदात!"

"माझ्या मुलीशी, कांचनमालेशी लग्न करण्याचा विचार आणखी एखाद्या जल-



वृकाच्या मनात असू शकेल!" असे म्हणत असतां कनकाक्ष महाराज घाबरल्यासारखे झाले.

"महाराज! आपण व्यर्थ घाबरून जाण्याचे कारण नाही. त्या मायासरोवराकडे शूर जयशील व स्वतः सरोवरेश्वर जाऊन बराच वेळ झाला."

देवशर्मा कनकाक्ष महाराजांना इकडे धीर देत होता त्याच वेळी जयशील इतरांबरोबर मायासरोवरापर्यंत जाऊन पोचला. ते सरोवर फार मोठे होते. त्याच्या चारी बाजूला उंच डोंगर आणि सरोवराचं पाणी होतं तेथेपर्यंत पसरत आलेले जंगल होते.



जयशीलने तलवारीने सरोवराचे पाणी हलवीत विचारले—"तू राहतोस ते माया-सरोवर हेच वाटते? कांचनमालेच्या इच्छे-नुसार माझ्या गळयात टाकलेला फांस तू काढून टाकलास; ठीक झाले. बरं तर आतां मला सांग, आपण दोघे परस्पराचे मित्र की शत्रू?"

मायासरोवरेश्वर दु:खी मनाने मान खाली करून मौनपणे उभा राहिला. कांचन-माला गद्‌गद् स्वरात म्हणाली—"येथे कोणी कोणाचा शत्रू नाही. मकरकेतू तुला सांगत होता, तेव्हां मी सर्व ऐकले की, तुझ्या हातातली तलवार महाकाल नावाच्या

संहार करून त्यांच्या कैदेत पडलेल्या माझ्या भाच्याला—कांचनवर्माला आणि मायासरो-वरेश्वर मामाची मुलगी पद्ममुखीला वांचविले पाहिजेस!"

"मी एकटयाने सर्व जलवृकराक्षसांचा संहार करायचा? प्रयत्न करतो. तुझे वडील कनकाक्ष महाराज याना वचन दिल्याप्रमाणे तुला व तुझ्या वडील भावाला जलवृकराक्षसांच्या हातून सोडविण्यासाठी मी प्राणपणाने युद्ध करीन. ती जबाबदारी मी घेतली आहे." जयशील म्हणाला.

जयशीलने ते म्हटल्याबरोबर माया-सरोवरेश्वराने पुढे येऊन त्याचे दोन्ही हात आपल्या हातात घेऊन म्हटले—"जयशीला! मी हिरण्यपूरच्या महाराजांच्या दोघां मुलांना अपहरण करून आणवले म्हणून काही मोठा अपराध केला, अशी समजूत करून घेऊ नकोस. मी मकरकेतूला पाठविले होते ते फक्त राजकुमार कांचनवर्मा यालाच धरून आणायला त्याने मूर्खपणाने, कांचनवर्माबरोबर त्यावेळी दृष्टीस पडलेल्या कांचनमालेला सुद्धा अपहरण करून दोघांना इकडे पाठवून दिले. त्यावेळी राजाच्या सैनिकांच्या हाती जखमी झालेला मकरकेतू तुम्हांला दिसला होता आणि आणखी काही

"ते कळले, परंतु कांचनवर्माला अपहरण करून घेऊन येण्यात तुझा काय हेतू होता?" जयशीलने विचारले.

"त्यांत विशेष असे गुपित कांहीच नव्हते व नाही. मला एकुलती एक मुलगी आहे, पद्ममुखी. तिच्याशी त्याचा विवाह करून देऊन हिरण्यपूरला पाठवून द्यायचे व हे सरोवराचे राज्य त्याला देऊन टाकून स्वत: कोठेतरी विश्राम घ्यायचा माझा विचार होता. परंतु पद्ममुखीने कांचन-वर्माशी विवाहाला ती तयार नसल्याचे सांगितले." मायासरोवरेश्वर म्हणाला.

तो म्हणाला त्या सर्व गोष्टी विश्वास करण्यासारख्या असल्याची जयशीलची खात्री झाली. कांचनमाला पाण्यात गेली आणि एक कमलनाळ तोडून घेऊन आली. तिने तो दाबून पिळला आणि त्याच्यातून आलेला रस कपाळाला चोळून म्हणाली—"मामा म्हणाले ते सर्व खरे आहे. आता मायासरोवराचे गुपित सुद्धा सांगून टाकते. या सरोवरात वाढलेल्या कमळनाळाचा रस कोणीही कपाळाला लावला की त्याला पाण्यात राहतां येते आणि तो आयुष्यभर पाण्यात जिवंत राहू शकतो."

"अस्सं का! तर प्रत्यक्ष पाहतोच!" असे म्हणत त्याने पाण्यात बुडी मारली.



आणि मकरकेतू तिघांनी दोन तीन मिनिटे जयशील वर येईल म्हणून वाट पाहिली. परंतु पाच सहा मिनिटे झाली तरी तो बाहेर न आलेला पाहून सर्वांत आधी कांचनमाला घाबरून जाऊन म्हणाली—"जयशीलला काय बरे झाले असावे? जलवृक राक्षस दबा धरून बसून असणार आणि त्यांनी त्याला पकडले तर नसेल?"

परंतु क्षणार्धांत पाणी ढवळून आल्या-सारखे झाले. जयशीलने एका तरुण जल-वृकाला मान धरून वर आणले आणि त्याला फराफरा काठावर ओढीत आणून टाकले. त्याला पाहताच मकरकेतू म्हणाला—



सापडला तर! ह्याच तो जलवृकनाथाचा मुलगा! कैद करून ठेवलेल्या आपल्या लोकांना ह्याच्या बापाने काही त्रास दिला तर ह्याला उभा चिरून काढायचा!"

काय रे, तू पाण्याच्या बुडाशी लपून राहून आमचे सर्व संभाषण ऐकत होतास नाही का? तुझा बाप तो दुष्ट जलवृकनाथ कोठे आहे?" मायासरोवरेश्वराने तलवार वर उचलून विचारले.

"माझे बाबा जंगलात आलेल्या कोणत्या तरी राजाला आणि कापालिकाला ठार करायला गेले आहेत. परत येऊन तुम्हां सर्वांना ठार करून कावळ्या गिधाडांसमोर

"ते नंतर पाहू. प्रथम हे सांग, कांचनवर्मा आणि पद्ममुखी कोठे आहेत?" जयशीलने विचारले.

"त्यांना कोठे गुप्त जागी कैद करून ठेविले आहे, ते एकट्या माझ्या बाबांनाच माहीत आहे." तरुण राक्षस म्हणाला.

इतक्यात दुरून आरडा ओरडा व घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकू येऊ लागला. सर्वांत आधी गेंड्यावर जलवृकराक्षसांचा राजा व त्याच्या पाठीमागून जलवृकांची एक टोळी आपापल्या दगडी गदा हवेत फिरवीत येत असलेले दिसली आणि "गुपचूप शरण मागा!" असे ओरडू लागली.

लगेच जयशील मकरकेतूला म्हणाला—"मकरकेतू! तू आपल्या जलग्रहाला खूण करून सोंडेने या जलवृकराक्षसाच्या पोराला उचलून वर धरायला सांग!"

मकरकेतू ओरडला—"जलग्रहा!" आणि खूण केली. त्या बरोबर जलग्रहाने तरुण राक्षसाला सोंडेने उचलून आकाशात अधांत्री धरले.

जयशील त्याच्या बाजूला येत असलेल्या जलवृकांना ओरडून म्हणाला—"अरे दुष्टांनो! तुम्ही आमच्यावर हल्ला करायला आलात तर सर्वांत आधी तुमच्या नायकाचा पोरगा

त्याच वेळी पाठीमागून वनमाणसावर बसून वेगाने येणारा सिद्धसाधक ओरडला—"महाराज! आपल्या सैन्यासह या दुष्टांच्या चारीबाजूंनी घेरा घाला. तो पहा, जयशील!" म्हणत साधक त्याच्या जवळ जाऊन वनमाणसावरून उतरून उभा राहिला.

जयशीलने त्याच्याबरोबरच्या सर्वांची ओळख करून दिली. तेवढ्यात जलवृकराक्षसांचा नायक गेंड्याच्या पाठीवर उभा राहून हातातली दगडी गदा दूर फेकून देत ओरडला—"मी आपल्या अनुयायांसह शरण मागतो आहे. तुम्ही कैद केलेल्या माझ्या मुलाला ठार करू नका. मी कैद करून ठेवलेल्या तुमच्या सर्व लोकांना आत्तां येथे बोलावून आणायला पाठवितो."

त्याच वेळी जयशीलच्या जवळ कनकाक्ष महाराज आले. कांचनमालेने धावत जाऊन वडिलांना मिठी मारली म्हणाली—"बाबा! मायासरोवरेश्वर मामाला कोणत्याही प्रकारचे नुकसान होईल असे काही करू नका. झाल्या गोष्टीबद्दल ते पश्चात्ताप करीत आहेत."

"त्याची मुलगी पद्ममुखी तुमची सून व्हायची होती. परंतु मध्येच माशी शिंकली." असे म्हणत जयशील हसू



"पद्ममुखीच्या मनात काय आहे, ते मला माहीत आहे. तिला देवशर्माशी विवाह करावयाचा आहे." कांचनमाला म्हणाली.

देवशर्माने जलवृक राक्षसांच्या नायकाचे दोन्ही हात मागच्या बाजूला बांधून ठेवले व चार सैनिकांसह जयशीलाजवळ येऊन म्हणाला—"ह्या दुष्टाने बंदी करून ठेवलेल्या पद्ममुखीला व कांचनवर्माला आणण्यासाठी आपल्या अनुयायांना पाठविले आहे. त्यात काही लबाडी नसावी असं वाटतं मला."

"काही लबाडी झाली तर हा याच्या मुलाबरोबर जलग्रहाच्या पायाखाली

सुमारे पंधरा मिनिटांनी चार जलवृकांबरोबर कांचनवर्मा व पद्ममुखी येत असलेले दिसले. त्यांना पाहून कनकाक्ष महाराजाना आणि मायासरोवरेश्वराला अपार आनंद झाला.

सिद्धसाधकाने जयघोष केला—"जय महाकाल! मी आता येथे ऐकले त्यावरून पद्ममुखीचा देवशर्माशी विवाह निश्चित झाला म्हणावयाचा. शुभ आशीर्वाद! आतां कांचनमाले विषयी?"

कनकाक्ष महाराज जयशीलकडे वळून म्हणाले—"अपहरण झालेल्या माझ्या मुलांना सोडवून आणणाऱ्या शूरवीराला मी अर्धे-राज्य देईन असे जाहीर केले होते. ते काम जयशीलने करून दाखविले व महा पराक्रमी म्हणून त्याने अपार कीर्ती सुद्धा मिळविली."

"कांचनमाला त्याच्यासारख्या पराक्रमी पुरुषा योग्य आहे! होय की नाही कांचना?" साधकाने विचारले.

कांचनमाला लाजेने मान खाली घालून वडिलांच्या आड जाऊन उभी राहिली.

सिद्धसाधक खदखदा हसत म्हणाला—"जयशील व कांचनमालेचा आणि देवशर्मा व पद्ममुखीचा हे दोन्ही विवाह हिरण्यपूरला मोठ्या थाटामाटाने व्हायला हवेत! तर सर्व आतां निघा!"

"साधका! आणि तू रे?" जयशीलने विचारले.

"मी या मायासरोवराच्या काठी आणखी काही दिवस महाकालाची आराधना करणार आहे. येथे राहणारे जलवृकराक्षस आणि नरभक्षक जातीचे लोक माझे दास व शिष्य होतील!" असे म्हणत साधकाने आपले शूल वर उचलून धरले.

जयशील, कनकाक्ष महाराज आणि मायासरोवरेश्वर आपापल्या मुलांबरोबर व अनुयायांबरोबर तेथून निघाले. काही अंतर चालून गेल्याबरोबर जलवृक राक्षस व झाडाझुडपाआड लपलेले नरभक्षक लोक सिद्धसाधकाच्या चारीबाजूला घोळका करून उभे राहिले व त्याचा जयजयकार करू लागले आणि नाचू लागले. (संपूर्ण)





# भुतांची कर्जमुक्ती

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला, तेव्हा प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तू एवढे श्रम करीत आहेस ते स्वार्थासाठी की निस्वार्थबुद्धीने ते मला माहीत नाही. परंतु पूर्वी पर्वत नावाच्या एका माणसाने तोंडओळखसुद्धा नसलेल्या एका माणसाला मदत केली होती. मी तुला त्याची गोष्ट सांगतो लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वीची गोष्ट आहे, एका लहानशा गावाच्या टोकाला गरिबांच्या झोपड्या होत्या. एका झोपडीत अगदी दरिद्री असा पर्वत नावाचा माणूस व त्याची बायको रहात असत. त्यांच्या झोपडीला लागून



आणखी एक झोपडी मोडकळलेल्या स्थितीत होती. त्या झोपडीत एक म्हातारा येऊन राहू लागला. तो म्हातारा रोगी होता. त्याला मूलबाळ किंवा दुसरा कोणी नातेवाईक नव्हता. गरीबीमुळे त्या म्हाताऱ्याला काही मदत करण्याच्या स्थितीत पर्वत नव्हता.

ती गोष्ट तो तोंडावाटे बोलला की त्याची बायको त्याला म्हणे, स्वतःचे पोट भरायची मारमार आणि गावातल्या गरिबांचा उद्धार करायला निघालात? गेल्या जन्मी केलेल्या पापाची फळे तो भोगतो आहे. आज उद्यांच तो राम म्हणेल बायको म्हणाली त्यात पर्वताला खोटं काहीच दिसले नाही. कारण तो म्हातारा रात्रंदिवस खोकत पडलेला असे व पर्वताला मुळीच झोप लागत नसे. त्याचा गळा दाबून त्याला त्या कष्टातून मुक्त करावे म्हणजे आपल्याला शांत झोप लागेल व कदाचित् त्याबद्दल आपल्याला पुण्यच लाभेल असेही त्याला वाटले.

इतक्यात एक विचित्र गोष्ट घडली. एके दिवशी रात्री म्हाताऱ्याच्या खोकण्यामुळे झोप येत नाहीसे वाटून पर्वत कोठल्यातरी झाडाखाली पडावे असा विचार करून निघाला. झोपडीच्या बाहेर पाऊल टाकतांच त्याला एक विचित्र आकृती दिसली. पर्वत ने त्याला विचारले– "कोण तू?"

ती व्यक्ती म्हणाली–"मी आहे भूत!"

ते ऐकताच पर्वताला आपादमस्तक घाम सुटला. थरथर कापत त्याने विचारले– "काय पाहिजे तुला?"

"या गाठोड्यात पैसे आहेत. त्या म्हाताऱ्याला शहरात घेऊन जाऊन या पैशाचा उपयोग करून त्याचा औषधोपचार कर." ते भूत म्हणाले.

इतक्या परोपकारी भुताला पाहून पर्वत तो भ्याला असल्याचे पार विसरून गेला व कीव येण्याचे कारण काय? जिवंत माणसांपैकीसुद्धा त्याला कोणी विचारीत नाही?"

भुताने त्याचे उत्तर म्हणून पूर्व कथा सांगितली. म्हणाले–"तो म्हातारा किती थोर पुरुष आहे, तुला त्याची कल्पना होणेच शक्य नाही. तो एकेकाळी फार श्रीमंत होता. त्याहून मोठी गोष्ट म्हणजे तो एक फार मोठा दानी आहे. मी एका लक्षाधीशाजवळ नोकरी करीत असे. एकदा माझ्या मालकाने मला दहा हजार वराह देऊन शहरातून काही मूल्यवान वस्तू खरेदी करून घेऊन यायला सांगितले. मी एका धर्मशाळेत उतरलो होतो. रात्री ते पैसे चोरीला गेले. माझ्या मालकाचा माझ्यावर पूर्ण विश्वास होता. चोरांनी पैसे चोरून नेले असे मी जाऊन सांगितले तर माझ्या निष्काळजीपणाबद्दल आपल्याला दोष लागेल. आणि जर मालकाने माझ्या म्हणण्यावर विश्वास केला नसता तर मला मरण येणे बरें वाटले असते. म्हणून मी नदीत उडी टाकून आत्महत्या करण्यासाठी निघालो. नदीतून मला चार जणांनी मिळून बाहेर काढले. जीव द्यायला कां गेला होतास रे, म्हणून दहा जणांनी विचारले व मी खरे तेच उत्तर दिले. परंतु



एका तरुणाने मला आपल्या घरी बोलावून नेले व मला गुप्तपणे दहा हजार वराह देऊन, समजावून सांगितले की इतकी मोठी रक्कम जवळ ठेवून धर्मशाळेत राहणे धोक्याचे असते. नंतर त्याने, पुन्हा कधी त्या गावाला आल्यास त्याच्याच घरी उतरायला बजावून सांगून मला प्रेमादराने निरोप दिला. तो तरुणच हा म्हातारा आहे. मी जिवंत असेपर्यंत कधी त्याला पुन्हा भेटू शकलो नाही. मध्यंतरी मला मरण आले व मी त्याचे कर्ज फेडू शकलो नाही, म्हणून मी भूत झालो. त्याची अशी स्थिती झालेली मला कळली. म्हणून मी



करून मला कर्जमुक्त कर. तुला पुण्य लागेल." असे सांगून पर्वताला पैशाची थैली देऊन भूत अदृश्य झाले.

उजाडल्यावर काय करावे हे ठरवू, या विचारात पर्वताने पैशाची पिशवी नेऊन घरात ठेवली. तेवढ्यात कोणीतरी दार वाजविले. पर्वताने दार उघडले तर त्याला भूत दिसले. "काय रे, पुन्हा आलास?" पर्वताने भुताला विचारले.

"पुन्हा कोठे, हा पहिल्यानेच तर येतो आहे. मी तुझ्या शेजारच्या झोपडीत राहणाऱ्या म्हाताऱ्याकडून कर्ज घेतले होते. हे पैसे त्याला देऊन सांग की शहरात

दुसऱ्या भुताने पर्वताला आणखी एक पैशाची पिशवी दिली.

पर्वताने आश्चर्यचकित होऊन दुसऱ्या भुताला विचारले–"तू म्हाताऱ्याकडून कर्ज कां घेतले होतेस?"

दुसऱ्या भुताने त्याच्या कर्जाचे वर्णन केले,–"माझ्यावर कुटुंबाचा मोठा भार होता. प्राप्ती फारच कमी. माझ्या पांच वर्षाच्या मुलीला जीवावरचे दुखणे आले. शहरात मुलीचे औषध पाणी करणारे वैद्य भेटतील व मुलगी वांचेल असे वाटले. बायकापोरांसह शहरात गेलो. एका वैद्याला मुलीला दाखविले तर त्याने सहामहिने औषधोपचार करावा लागेल आणि पांचसहा हजार वराह तरी खर्च होतील असे सांगितले. शिवाय शहरात सकुटुंब इतके दिवस रहायचे म्हणजे आणखी पाचसहा हजारांचा खर्च. मुलीची आशा सोडून मी रडत बसलो. शेजारीच एक मध्यम वयाचा माणूस रहात होता. त्याने येऊन चौकशी केली. मुलीच्या जिवापेक्षा पैसा जास्त आहे कारे, असे सांगून माझ्या हातात त्याने दहा हजार वराह आणून दिले. सहा महिने मुलीचा औषधोपचार झाला व मुलगी वांचली. परंतु त्या माणसाचं कर्ज तसंच राहून गेले. म्हणून मेल्यावर भूत

तुझ्या शेजारचा म्हातारच आहे. पिशाच्च योनीतून सुटका व्हावी म्हणून मी आलो आहे."

असे सांगून व पैशाची पिशवी पर्वताला देऊन दुसरे भूत अदृश्य झाले.

पर्वताने दोन्ही पिशव्या बायकोला जागी करून दाखविल्या व विचारले–"काय-ग, तू इतके पैसे जन्मभरात कधी पाहिले आहेस का?" पैसे कसे मिळाले हे कळल्या-वर बायको म्हणाली–"पैशाने हा म्हातारा वांचणे शक्य नाही. आपल्यासमोर अजून सर्व आयुष्य आहे. आपल्याला मुलं होतील, त्यांचीं लग्नकार्ये सगळी व्हायची आहेत. आपणच हे पैसे ठेवून घ्यावेत!"

"छे, छे! म्हाताऱ्याला देऊन टाकू या!" पर्वत म्हणाला.

"एक पिशवी म्हाताऱ्याला देऊन एक आपण ठेवून घेऊ!" बायको म्हणाली.

पर्वत बराच विचार केल्यावर म्हणाला– "नको!" आणि त्याने दोन्ही पिशव्या त्या म्हाताऱ्याला देऊन टाकल्या.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले– "राजा, पर्वताने तसे करण्याचे कारण त्याची निस्वार्थ बुद्धी होती की भुताने दिलेल्या धनाला हात लावायला तो भ्याला? या प्रश्नांची उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"दोन्ही पैकी एकही कारण नाही. एका माणसाचं कर्ज घेऊन ते फेडू न शकल्यामुळे मेल्यावर पिशाच्च योनी मिळाल्याचं त्याने ऐकलं होतं. त्याला भुतांनी दिलेले धन त्या म्हाताऱ्याचे होते. ते वापरले तर त्या म्हाताऱ्याचे कर्ज आपल्या डोक्यावर बसणार व त्यामुळे आपल्याला पिशाच्च योनीत जावे लागणार, या भीतीने पर्वताने दोन्ही पिशव्या म्हाताऱ्याला नेऊन दिल्या."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



# नीतीरीत एकच

राजू एका गवळ्याचा मुलगा होता. बापाच्या हाताखाली शिकून त्यानेसुद्धा गवळ्यांचाच धंदा केला आणि चार पैसे जमविले. ते पाहून त्याच्याच जातीच्या सोमू नावाच्या एका श्रीमंत शेतकऱ्याने आपली मुलगी येसू हिचं त्याच्याशी लग्न करून देऊन आपली सर्व इस्टेट जावयाच्या नावी लिहून दिली आणि स्वतः जावयाकडेच येऊन राहू लागला.

राजूकडे भाकड होऊन गेलेल्या बऱ्याच गाई होत्या, त्यांना कसायाला विकून टाकण्याऐवजी तो त्यांना गोठ्यातच बांधून पोशीत असे. ते पाहून येसू नवऱ्याला म्हणाली–"म्हाताऱ्या गाईचं पोषण करणं फुकटच नाही का हो? त्यांना कसायाला विकून टाकले तर चार पैसे तरी मिळतील." राजूने तिला समजावून सांगितले की त्यांनी आयुष्यभर आपलं पोषण केलं. म्हातारपणी त्यांचं पोषण करणं आपलं कर्तव्य नाही का? येसूला ते मान्य झाले नाही.

दुसऱ्या दिवशी राजू सासऱ्याला म्हणाला–"मामा! तुमची सेवा करणे म्हणजे व्यर्थ खर्च होतो आहे! तेव्हा तुम्ही स्वतःची काय ती व्यवस्था करून घ्या!" येसू ओरडली–"त्यांची सर्व इस्टेट स्वतःच्या नावी करून घेऊन त्यांना घराबाहेर पाठविणार काय? ही काय नीती झाली?"

"काल तू हीच नीती तर मला शिकविलीस!" राजू म्हणाला.

त्यानंतर येसूने भाकड गाईंची गोष्टच कधी काढली नाही.





चीन देशातली ही एक गोष्ट आहे.

चियांग व चुंगवान हे दोघे शेजारी शेजारी रहात असत. चुगवान चिक्कू होता. चियांगला चुंगवानच्या चिक्कूपणाची फार चीड होती. एकदां चियांग एक गमतीदार बाहुल्यांची पेटी भाड्याने घेऊन आला.

ती पाहून चुंग-वाननेसुद्धा ती पेटी चियांगजवळ येऊन बघायला मागितली.

तेव्हा चियांग म्हणाला–"तू आहेस चिक्कू, दातांत दमडी धरून बसणारा! याच्या बद्दल तू परत मला काही लागल्यास द्यायला तयार असशील तर तुला मी ही बाहुल्यांची पेटी देईन. परंतु ती तू आमच्या घरातच बसून पाहिली पाहिजेस!"

चुंग-वानने ती अट मान्य केली आणि चियांगच्या घरी जाऊन पेटीतला बाहुल्यांचा खेळ पाहिला.

त्यानंतर एकदा चियांगला घरातली जमीन सारखी करायला घम्मीसाची गरज पडली. चुंग-वानजवळ धम्मीस होते. सामान्यपणे तो आपली वस्तू कधी कोणाला देत नसे. परंतु बाहुल्यांची पेटी पहायला घेतांना, पुढं कधी कशाची गरज असल्यास देईन याची कबुली दिली होती म्हणून चियांग त्याच्याकडे धम्मीस मागायला गेला.

त्यावेळी चुग-वान घरीच होता. चियांग त्याला म्हणाला–"अरे, चुग-वान थोडावेळ मला तुझं घम्मीस देतोस का?"

"घे की, नको म्हटलं का? परंतु तू ते आमच्या घरातच वापरले पाहिजेस!" चुंग-वान म्हणाला.

ते उत्तर ऐकून चियांग चिडला. पण काही बोलला नाही. त्याच्या या चिक्कूपणाची खोड मोडली पाहिजे आणि याची

कान उघाडणी केली पाहिजे असे त्याने ठरविले.

चुंगवानजवळ एक बकरी होती. आठवड्याच्या बाजारात ती नेऊन विकण्याचं त्याने ठरविलं. बाजाराला जायचं म्हणजे एक कालवा ओलांडून जावे लागे. चियांगने त्या कालव्यावर फळ्यांचा एक पूल बांधला होता. तो पूल पार करणाऱ्याला मग तो माणूस असो की जनावर प्रत्येकी एक पैसा द्यावा लागे. चियांगचा त्यावरच उदरनिर्वाह चाले.

बकरी व्यायला झाली होती. तेव्हाच चुंगवान तिला विकायला निघाला. गाभण बकरीला चांगली किंमत मिळेल असे त्याला वाटले होते. त्याने स्वत:साठी व बकरीसाठी म्हणून एकेक पैसा भाडे दिले व चियांगजवळून पावती लिहून घेऊन निघाला.

परंतु कालवा पार करतांना पुलावरच बकरी व्यायली. चुंगवानला फार आनंद झाला. कारण पुलावर पाय ठेवण्यापूर्वी व्यायली असती तर कोकरासाठी एक पैसा जास्त द्यावा लागला असता.

कालवा पार केल्याबरोबर चुंगवानने कोकराला उचलून खांद्यावर घेतले आणि बकरीला ओढीत पुलावरून उतरवू लागला. परंतु चियांगने त्याच्या हातातून कोकराला ओढून घेऊन चुंगवानला बकरी घेऊन जायला सांगितले.

चुंगवान कोकरू त्याचे असल्याबद्दल भांडू लागला. चियांग म्हणाला–"नाही माझे आहे."

लोकांना या भांडणात रस वाटू लागला. दोघांचे भांडण चालू असता लोक जमले. जमलेल्या लोकांना चुंगवानने न्याय करायला सांगितले.

चियांग म्हणाला–"पावती पहा, तीत फक्त तू आणि बकरी आहे."

सर्व चियांगच्या बाजूनेच बोलू लागले. कारण चुंगवानचा चिक्कूपणा सर्वांना माहीतच होता. त्याला त्या दिवशी चांगलीच अद्दल घडली, सर्वांना तेच हवे होते.



# सर्वच भोळे अन् भाबडे

श्रीपुर गावचे गावकरी सर्वच भोळे व भाबडे होते. त्यांना गाव कुळकर्णी सांगे ते प्रमाण व खरे वाटे. कुळकर्ण्यांचे मित्र म्हणजे पाटलांच्या शब्दावरही त्यांचा तसाच विश्वास.

कुळकर्णी गावकऱ्यांना सांगत की त्यांना दररोज महाराज स्वप्नात भेटतात आणि ते सल्ला देतात तसे मी करतो.

एकदा कुळकर्ण्यांना उजाडल्यावर दु:खी व उदास होऊन बसलेले पाहून काही जणांनी कारण विचारले.

तेव्हा कुळकर्णी डोळ्यातून पाणी काढून म्हणाले–"आज महाराजांनी स्वप्नात दर्शन दिले नाही. त्यांनी परलोक गमन केले, हाच त्याचा अर्थ!"

महाराजांच्या 'मृत्यूची वार्ता' गावात थोड्याच वेळात पसरली. सर्व गावातल्या कचेरीजवळ जमून मृत महाराजांचे कौतुक करीत अश्रू ढाळू लागले. ते कळताच पाटील तिकडे धावले व म्हणाले–"कशाला तुम्ही सर्व शोक करता आहां? महाराज परलोकी गेले नाहीत. काल रात्रभर ते स्वप्नात माझ्याशी बोलत होते. म्हणून त्यांना कुलकर्ण्यांना स्वप्नात दर्शन द्यायला वेळच मिळाला नाही!"





# वैकुंठगमन

लक्ष्मीपतीने अनंत पापे केली आणि अंत समयी त्याला त्याच्या पापकर्माबद्दल भीती वाटू लागली. त्याने केलेल्या पापांमुळे कित्येक लोक भुते होऊन त्याला खायला धावतील अशी त्याने धास्ती घेतली. त्याला स्वप्नात भुते दिसत. लक्ष्मीपतीने संन्यास घ्यायचे ठरवून बायकोला बोलावून ते सर्व सांगितले.

"तुम्ही गेलात तर मला तरी हा सर्व संसार कशाला? मी सुद्धा तुमच्याबरोबरच येते." लक्ष्मीपतीची बायको म्हणाली.

"करता सवरता मुलगा संन्यास घ्यायला निघाला तर मी काय त्याला पहात निरोप द्यायला येईन? मलासुद्धा बरोबर घेऊन चल." म्हातारी आई म्हणाली.

"सर्वच जण निघण्याची तयारी करू लागले असतां, या घरात मी एकटा राहू का?" मुलगा म्हणाला.

आपल्यावर आपल्या लोकांची एवढी माया आहे हे पाहून लक्ष्मीपतीला परमानंद झाला. म्हणाला—"तरमग एक काम करू या. मी आणखी कोठे दूर जात नाही. गावाबाहेर एक मठ बांधून त्यात हरिभजन करीत राहतो. तुमच्या सर्वांच्या बरोबर राहिल्यासारखं होईल आणि कित्येक दिवसांपासून माझ्या मनातली इच्छाही पूर्ण होईल."

तो ठराव घरात सर्वांना पसंत पडला.

एका आठवड्याच्या आत गावाच्या वेशीबाहेर एक पर्णकुटी बांधून आश्रमासारखी तयार झाली. उत्तमोत्तम सैंपाकी नेमण्यात आले व रात्रंदिवस भजन होत रहावे म्हणून मजुरी किंवा दक्षिणा देऊन लोकांना तेथे आणण्यात येऊ लागले. खर्च फार होऊ लागलेला पाहून लक्ष्मीपतीला सुरवातीला वाईट वाटले, परंतु हे सर्व आपल्याच साठी तर होत आहे, असा विचार करून त्याने मनाचे समाधान करून घेतले.

आश्रमाची ख्याती गावभर पसरली. प्रत्येक घरातले लोक मुलाबाळांना घेऊन दररोज सायंकाळी आश्रमात येऊ लागले. लक्ष्मीपतीला काय वाटत असेल हे सांगणे कठीण आहे, परंतु बाहेरून येणारे लोक भक्तिसागरात मग्न होऊन जात.

एके दिवशी रात्री लक्ष्मीपती भजन वगैरे संपल्यावर पंचपक्वानांचे भोजन करून झोपला, तेव्हां त्याला एक स्वप्न पडले. तेव्हा देवाने प्रत्यक्ष दर्शन दिले व म्हणाला—"लक्ष्मीपती! तुझ्या मनातही आलं नसेल, परंतु तू गावाचं भलं केलंस! गावात माझ्या भक्तांची संख्या तू वाढविलीस! त्याचं प्रतिफल म्हणून मी तुला वैकुंठाला घेऊन जायला उद्याच विमान पाठवितो. त्यात बसून ये!"

लक्ष्मीपतीला आनंद गगनात मावेनासे झाले. त्याने आपल्या बायकोला बोलावून ते सांगितले व म्हणाला—"तू इतके दिवस माझ्या पापापुण्याची वाटेकरीण होऊन माझ्याबरोबर सुखाने संसार केलास. तुलासुद्धा मी बरोबर वैकुंठलोकी घेऊन जाणार आहे?"

"मी येते हो, पण मुलाला एकटा सोडून जाऊन मला एक क्षणभरही करमणार नाही. त्यालासुद्धा घेऊन जाऊ या. बोलवा त्याला" बायको म्हणाली.



लक्ष्मीपतीने मुलाला हाक मारून, "चल रे वैकुंठाला जाऊ या!" म्हणाला.

"माझ्या बरोबर माझी बायकोसुद्धा येणार!" मुलगा म्हणाला.

इतके सगळे लोक येणार तर आपल्या म्हाताऱ्या आईने कां येऊ नये असा विचार करून लक्ष्मीपतीने आईला बोलाविले.

ती म्हणाली–"काय रे ए, दोघे एका पोटी जन्मलात आणि धाकट्या भावाला सोडून तू वैकुंठाला जाणार का? तुला मान्य असेल कदाचित् पण मला नाही मान्य!"

नाइलाजाने लक्ष्मीपती धाकट्या भावाच्या घरी गेला आणि त्यालासुद्धा वैकुंठलोकी चलायला आमंत्रण केले. धाकट्या भावाबरोबर त्याची बायको देखील निघाली.

उजाडण्याच्या सुमारास आश्रमात विमान उतरले. त्यात लक्ष्मीपती बरोबर त्याची आई, बायको, मुलगा, धाकटा भाऊ त्याची बायको व मुलं विमानात चढून बसली. विमान उडू लागले.

"आपण इतके जण विमानात बसलो खरे, इतक्यांना घेऊन हे उडू शकेल का?" असा विचार लक्ष्मीपतीच्या मनात आला मात्र, विमान वादळात सापडलेल्या तारूसारखे डोलू लागले.

"वाटलं होतं तसंच झालं! हे फक्त एकट्याला घेऊन जाणारं विमान दिसतं आहे! मला जाऊ द्या एकट्याला तुम्ही सर्व उड्या टाका बाहेर." असे लक्ष्मीपती ओरडला.

विमान कोणत्याही क्षणाला उलटणार असे दिसूं लागलं.

एक जण देखील उडी मारायला तयार नव्हता. वर "तू सगळ्यांना सोडून एकटाच वैकुंठाला जाणार का?" असे म्हणत सर्वांनी लक्ष्मीपतीलाच विमानातून खाली ढकलले.

आकाशातून खाली पडताना लक्ष्मीपतीला आकाशातल्या भुतांनी धरले.

झालं! मोठ्याने किंकाळी फोडून लक्ष्मीपती उठून बसला. ते सर्व स्वप्न होते, हे कळायला त्याला थोडा वेळ लागला.



# भाव कसा करावा

रामू खेड्यात राहणारा एक भोळा भाबडा माणूस होता. तो शहरात खरेदीसाठी काही पैसे घेऊन निघाला. ते कळल्यावर त्याचा एक मित्र त्याला म्हणाला–"बाबा रे! शहरातले लोक फार फसवेगिरी करतात, म्हणून एखाद्या वस्तूची दुकानदाराने किंमत सांगितली की आपण अर्धी सांगावी." रामूने मित्राच्या सल्ल्याची खुणगाठ बांधून घेतली.

शहरात गेल्यावर रामू खूप हिंडला व हिंडत हिंडत एका छत्र्यांच्या दुकानात गेला. त्याने एका छत्रीची किंमत विचारली. दुकानदाराने दहा रुपये सांगितली. रामूने लगेच विचारले–"पांच रुपयाला देतोस का?"

रामू खेड्यातला माणूस आहे हे त्याच्या चेहऱ्या मोहऱ्यावरूनच दिसत आहे. म्हणून गमतीखातर दुकानदार म्हणाला–"सहा रुपयाला देईन."

लगेच रामू म्हणाला–"तीन रुपयांना दे."

"फुकट देतो!" दुकानदार म्हणाला.

"तर मग दोन छत्र्या देशील का?" रामूने विचारले.

"आता मेहरबानी करा!" असे म्हणत दुकानदाराने बाहेरची वाट दाखविली.





# पंगु

**त्या** गावात हिरोजी हे एक श्रीमंत आणि हुशार गृहस्थ मानले जात. त्यांना तीन मुलगे होते. थोरल्या दोघांची नावे अनुक्रमे चिंतामणी व मोरेश्वर अशी होती. अंगापिंडाने दोघे चांगले होते आणि बापाला शेतकामात चांगली मदत करीत. तिसरा रंगनाथ थोडा मंदबुद्धीचा होता. हिरोजीला नेहमी त्याचीच काळजी वाटे. रंगनाथाच्या मंदबुद्धीत काही फरक होतो का हे पाहण्यासाठी हिरोजीने सर्व तऱ्हेची औषधे केली व मंत्रतंत्र केले, परंतु सर्व प्रयत्न निरुपयोगी ठरले.

"आता म्हातारपण आलं, मला काम होत नाही. थोरले दोघे समर्थ आहेत. घेतील संभाळून सर्व काळजी काय ती रंगाचीच. त्याचं कसं व्हायचं ते त्या परमेश्वरालाच माहीत!" हिरोजी आपल्या एका मित्राला म्हणाला.

"रंगाकरिता तू काही करण्याची गरज नाही. तू त्याच्यासाठी तो जिवत असेपर्यंत त्याला काही कमी पडू नये, एवढ्याची व्यवस्था करून ठेव, म्हणजे झालं." मित्र म्हणाला. अशा परिस्थितीत एकदा दारासमोर एक गाडी थांबली. गाडीतून शंकर नावाच्या माणसाने मोरेश्वरचा उजवा पाय आखूडन बांधलेला होता.

"काय झालं? काय झालं रे?" हिरोजीने घाबरून जाऊन विचारले.

"मोठ्या अंब्याच्या झाडावरून खाली पडला. आणि पाय मोडून घेतलान! लगेच नेऊन वैद्याला दाखविला तर वैद्यबुवा म्हणाले–'हाड मोडलं आहे, ते जोडणं आता शक्य नाही." शंकरने हिरोजीला सांगितले.

"ह्याला शहरात घेऊन जाऊ या व चांगल्या एका वैद्याला दाखवू या. पैसा खर्च झाला तरी चालेल, नीट चालता आलं म्हणजे झालं." हिरोजी म्हणाला.

"काही उपयोग नाही हो. त्याचा पाय बरा होणे शक्य नाही, असे वैद्याने खूप तपासून पाहून सांगितले." शंकर म्हणाला.

मोरू देखील शंकरच्या स्वरात 'हो' ला 'हो' लावीत त्याचा पाय बरा होणे शक्यच नाही असे अधीरपणे दाखवीत म्हणाला–"होय बाबा! मी कायमचा लंगडा झालो आहे हो!" आणि रडला देखील, परंतु शहरात जाऊन वैद्याला दाखविण्यासाठी त्याने तितकासा उत्साह दाखविला नाही.

त्यानंतर वेळी अवेळी मोरू आपल्या लंगडेपणाचा उल्लेख करून लंगडत वडिलांजवळ जाऊन रडे–"बाबा! आता माझे पुढे कसं होणार हो?"

ते पाहून हिरोजीला त्याच्याबद्दल सहानुभूती वाटण्याऐवजी थोडासा रागच येई.

गावच्या पाटलासमोर हिरोजी आपल्या इस्टेटीचे वाटे करून मोकळा होणार हे सर्व गावकऱ्यांना कळले. सर्वजण पाटलाच्या घरी त्या दिवशी जमले.

हिरोजी आपली कालव्याखालची वीस एकर जमीन, बैल, नांगर वगैरे थोरल्या



मुलाच्या नावी व धाकट्या आणि मुलाच्या नावी अर्धे अर्धे वाटे करून लिहून देतो, म्हणाला त्याच्याकडे असलेल्या सर्व गाई आणि घर मधला मुलगा मोरेश्वर याला द्यायचा विचार असल्याचे त्याने सांगितले.

हिरोजी म्हणाला ते ऐकून तेथे जमलेली सर्व मंडळी चकित झाली. सर्व गावकऱ्यांना न्याय अन्याय शिकविणारा हिरोजी आपल्या मधल्या मुलाच्या बाबतीत असा अन्याय करील असे कोणाला स्वप्नातही वाटले नव्हते. तसं त्याने कां करायचं ठरविलं असावं, त्या गोष्टीचा कोणालाही अंदाज लागेना.

"बाबा, हा अन्याय आहे! इस्टेटीतला तीन चतुर्थांश वांटा त्या दोघांना देऊन मला चवथा वांटा देणे न्यायाचे नाही. कोणताही बाप आपल्या मुलांच्या बाबतीत असा अन्याय करणे शक्य नाही. तुमच्या हातून हा अन्याय करविणारा कोण तो येथेच असला पाहिजे. त्याचे नाव तरी सांगा. त्याचे काळीज बाहेर काढतो." असे म्हणत मोरू दात ओठ चावीत आपल्या वडील भावाकडे डोळे वटारून पाहू लागला.

हिरोजीने एकदा तेथे जमलेल्या मंडळी कडे पाहिले व म्हणाला–"होय! मोरू म्हणाला ते खरे आहे. मी असा अन्याय करायला निघालो त्याला कारण असलेली व्यक्ती येथेच हजर आहे. त्याचे नाव मोरेश्वर. लहानपणापासूनच मोरूची नजर पैशावर जास्त. मंदबुद्धीच्या रंगनाथाची मी बाजू घेई. ती गोष्ट मोरूला आवडत नसे. इस्टेटीचे वांटे होण्यापूर्वी माझी सहानुभूती आपल्या बाजूला वळवून घेण्यासाठी मोरूने अंब्याच्या झाडावरून पडून पाय मोडल्याचे सोंग केले. या कामी त्याला मदत करणाऱ्या शंकरला आणि वैद्याला त्याने पैसे सुद्धा चारले. प्रथम मला वाटले की मोरूचा पाय खरोखरच मोडला आहे. परंतु लौकरच मला खरं काय ते सर्व कळले. इस्टेटीचे वांटे होईपर्यंत तो पायाची पट्टी सोडणार नाही हे ओळखूनच मी वांटे करण्याची गोष्ट काढली. मला मोरूच्याबद्दल सहानुभूती वाटण्याऐवजी त्याची चीडच जास्त आली."

पाटील मोरूला म्हणाले–"काय रे, तु खरोखरच लंगडा व पंगू असशील तर तुझ्या बापाने तुझ्यासाठी म्हणून दिलेला वांटा चांगलाच आहे की! पाय नसेल तर शेत कसे रे नांगरणार तु? घरात 'स्वस्थ पडून रहा."

आपलं सोंग बाहेर पडलं व त्याचा फायदा न झाल्याने ओळखून मोरूने पायाची पट्टी सोडली व मान खाली घालून दोन्ही पायांनी तेथून चालत निघून गेला.



# नैसर्गिक इच्छा

एका देशाच्या दरबारी विदूषकाला मुलगा 'नाही नाही' म्हणता चाळीशी उलटल्यावर एक मुलगा झाला. बाप त्याला पंचप्राण्यापेक्षा जास्त मानून त्याला सुखी करण्यासाठी काय वाटेल ते करायला तयार होता. तो आपल्या मुलाला दररोज पैसे देत असे. ते पैसे खर्च करून तो मुलगा त्याला काय वाटेल ती वस्तू खरेदी करीत असे.

अशा तऱ्हेने लाडात वाढविल्याने मुलगा थोडा चढेलच झाला. मुलाचा तो चढेलपणा पाहून बापाला राग येई. एकदा त्याने जोराने त्याच्या मुस्कुटात दिली. परंतु दुसऱ्या क्षणाला बापाचे हृदय कळवळून आले. कधी मुलाला एका शब्दाने तो बोलला नव्हता आणि आज त्याने त्याच्या थोबाडीत मारली!

नंतर त्याने मुलाला जवळ ओढून घेऊन त्याला प्रेमाने एक रुपाया देत विचारले–"बाळा, तुला लागलं का रे? काय वाटलं रे तुला?" राग गेल्याचे दाखविण्याठी ते म्हणाला.

मुलाने होकारार्थी मान हलविली.

"काय वाटलं रे?" बापाने विचारले.

"तू दररोज असे मारीत राहिलास तर बरं!" मुलगा म्हणाला.





# राजकन्येचे चातुर्य

विदर्भ देशाची राजकन्या रत्नमंजरी एकदा आपल्या सर्व सखीदासींबरोबर वनविहाराला गेली असतां तेथल्या सरोवरात तिने स्नान केले. ती त्या बाजूला जेव्हा जेव्हा येई तेव्हा तेव्हा त्या सरोवरात स्नान करीत असे. त्या दिवशी स्नानाला उत-रण्यापूर्वी तिने आपले सर्व दागिने काढून एकाजागी ठेवले. काही वेळ जलक्रीडा करून ती काठावर आली व दागिने अंगा-वर घालू लागली तेव्हां करंगळीत घालायची हिऱ्याची अंगठी नसल्याचे आढळले.

तसे पूर्वी कधी झालं नव्हतं. इतर राजकन्या स्नान करीत असतां त्या बाजूला कोणी आलं तर त्याला अडवायला तिच्या सखी व दासी होत्या. अर्थात् अंगठी कोणी दासीनेच चोरलेली असणार हे स्पष्टच होते. झडती घेतली असती तर अंगठी मिळाली असती. परंतु एकटीने केलेल्या चुकी बद्दल सर्वांची झडती घेणे राज-कन्येला बरे वाटले नाही. कोणाला ही न विचारतां न दुखविता चोर कसा मिळणार?

गावात प्रश्नांची उत्तरे सांगणारे ज्योतिषी होते. कोठे चोरी झाली तर गावकरी ज्योतिष्याकडून चोराचे नाव गाव विचारून घेत. ती गोष्ट राजकन्येने अने-कांच्या तोंडी ऐकली होती. तसा तिचा असल्या ज्योतिष्यांवर थोडादेखील विश्वास नव्हता. परंतु अशाच एखाद्याच्या मदतीने चोराचा शोध काढता येईल असा तिने विचार केला.

अंत:पुरातील बायका एका ज्योतिष्याचे नाव सांगून म्हणाल्या–"त्याला विचारले तर तो अंगठी कोठे आहे, हे बरोबर सांगेल." राजकन्येने कोणाला कळू न देता त्या ज्योतिष्याकडे निरोप पाठविला. तो राजकन्येला एकांतात येऊन भेटला.

… माझ्या हातातील बिलवर आज सकाळपासून दिसत नाही. कोणी काढून नेला असेल सांगू शकाल का?"

ज्योतिष्याने काही वेळ उभ्या आडव्या-रेषा काढून काहीतरी गणित केले व म्हणाला–"राजकुमारी! तो बिलवर आतां-पर्यंत कित्येकाच्या हातून निघून गेलेला आहे. आणखी पंधरा दिवसांनी तो आपो-आप आपल्याकडे चालून येईल."

"सगळं खोटे! माझा बिलवर चोरीला गेलाच नाही. मी फक्त तुमची परीक्षा घेण्यासाठी खोटे बोलले. तो बिलवर माझ्या दागिन्यांच्या पेटीत सुरक्षित आहे. खरी चोरीला गेली आहे ती अंगठी. ती माझ्या दासींपैकीच कोणीतरी उचलली आहे. चोराला पकडायला तुमचे ज्योतिष्य पुरणार नाही. म्हणून मी सांगेन तसे कराल का?" राजकन्येने ज्योतिष्याला विचारले.

"जी, आपण आज्ञा कराल तसं मी करायला तयार आहे." ज्योतिषी म्हणाला.

राजकन्येने त्याला जे सांगावयाचे होते ते सांगून त्याला गुप्तदाराने बाहेर पाठवून दिले. त्यानंतर काही वेळाने राजकन्येला भेटायला कोणी ज्योतिषी आल्याचे एका



राजकन्या आपल्या सर्व दासींना बोला-वून म्हणाली–"माझी हरवलेली अंगठी कोठे आहे, हे सांगण्यासाठी हा ज्योतिषी येतो आहे." असे सांगून तिने ज्योतिष्याला घेऊन यायला सांगितले.

ज्योतिषी राजकन्येच्या महालात आला. राजकन्या त्याला म्हणाली–"तुम्हांला मी दोन कारणांनी बोलाविले आहे. आज सकाळी माझ्या हातातला बिलवर कोणी तरी लांबविला आहे. त्या चोराला तुम्ही धरून दिले पाहिजे. दोन दिवसांपूर्वी आणखी एक लहानशी चोरी झाली. माझ्या करंगळीतली अंगठी चोरीला गेली. ती

ज्योतिष्याने उभ्या आडव्या रेघोट्या काढून काहीतरी गणित केले व म्हणाला– "राजकुमारी आपला बिलवर कोणीसुद्धा चोरून नेलेला नाही. तो तुमच्या दागिन्यांच्या पेटीत सुरक्षितपणे ठेवलेला आहे. आपणच पेटीत तो ठेवलात आणि विसरलात!"

राजकन्येने आपल्या एका दासीला पाठवून दागिन्यांची पेटी मागविली व उघडून पाहिली तर त्यात बिलवर होता. तो बाहेर काढून आश्चर्य वाटल्याचे सोंग करून राजकन्या म्हणाली–"तुमचं ज्योतिर्गणित खरं दिसतं आहे. काही मंत्र आहे तुमच्या जवळ. तरसग तुम्ही माझी अंगठी कोठे आहे, हे देखील सांगा. ती चोरणारी व्यक्ती अंतःपुरातलीच असेल तर त्या व्यक्तीची मानच जाईल आज!"

"चोराला इतकी कडक शिक्षा तुम्ही करणार असाल तर चोराचे नाव सांगून त्याचा जीव घ्यायला कारण होण्याची माझी इच्छा नाही. लहान मोठी शिक्षा करणार असाल तर मी तत्क्षण त्याचे नाव सांगतो." ज्योतिषी म्हणाला.

"चोराने स्वतःचा अपराध आधी कबूल केला तर मी तुमच्या समाधानासाठी त्याला क्षमा सुद्धा करीन. परंतु तुमच्या तोंडून चोराचे नाव कळलं तर त्यानंतर मात्र शिरच्छेदाची शिक्षा होणारच." राजकन्या म्हणाली. ती ते म्हणाली त्यानंतर लगेच सुनंदिनी नावाची दासी राजकन्येचे पाय धरून रडत म्हणाली–"माझी अक्कल चरायला गेली होती, म्हणून हे कृत्य माझ्या हातून घडले. ही लहानशी अंगठी माझा जीव घेईल असे मला स्वप्नातही वाटले नव्हते."

"शिक्षा ही अंगठीच्या किमतीवरून ठरत नाही. स्वामिद्रोहाबद्दल आहे. तुला अंगठी पाहिजे होती तर माझ्याकडे मागायची होतीस. काहीतरी कारण काढून दिली नसती का? आता यापुढे असलं काम पुन्हा करू नकोस." असे सांगून राजकन्येने दासीला क्षमा केली आणि ज्योतिष्याला बक्षिस देऊन निरोप दिला.





# चीनच्या राजकन्येचे लग्न

फार प्राचीन काळातली गोष्ट आहे, चीन देशातल्या एका प्रदेशात एक राजा राज्य करीत असे. त्याला एकुलती एक नात होती आणखी कोणी जवळचा नातेवाईक नव्हता. नातीचे नाव होते स्यूची. ती तीन वर्षांची मुलगी असतांनाच तिचे आई वडील दोघे ही परलोकी गेले. राजाने तिला फार प्रेमाने तेव्हांपासून लहानाचे मोठे केले.

स्यूची अत्यंत लावण्यवती तर होतीच, त्याच बरोबर विविध कलात व शास्त्रात तिने प्राविण्य संपादन केले होते. तीच सिंहासनाला वारस होती. तिला सोळावे वर्ष लागताच राजाने तिच्या विवाहाची तयारी सुरू केली. तिच्यासाठी उत्तम वर शोधून ठरविण्यासाठी राजाचे दूत चहूंदिशी पाठविण्यात आले. तिच्या बरोबर राज्यसुद्धा सहजी प्राप्त होईल म्हणून देशातलीच तरुणमंडळी तिच्याशी विवाह करण्यास तयार झाली.

तरुण वर योग्य मिळावा यासाठी राजाने त्याच्यासाठी परीक्षा ठेवून स्यूचीशी विवाह करण्या व्यतिरिक्त सर्व राज्याची जबाबदारी घेण्याची लायकी असलेल्या तरुणालाच निवडायचे ठरविले. देशातले तरुण व इतर देशातले तरुण मिळून पंचवीस एक उमेदवार होते.

परंतु स्यूचीने त्यापूर्वीच एका तरुणाला मनाने वरले होते. तो होता प्रधान मंत्र्याचा मुलगा चू वांग. तो सुंदर होता आणि विद्यासंपन्न होता. शिवाय राजनीतीतही निपुण होता. स्यूची व तो दोघं लहानपणापासून बरोबर खेळली होती. त्या दोघांचा विवाह झाला तर किती बरं होईल, असंच सर्वांना वाटे. परंतु राजाने परीक्षा ठेवली होती. राजा त्याने ठेवलेल्या परीक्षेत न

उतरणाऱ्या तरुणाशी नातीचा विवाह करून देणे त्याला मुळीच मान्य नव्हते.

त्याने ठेवलेल्या परीक्षेत प्रथम स्थान होते रूप व सौंदर्याला व उत्तम शरीर-यष्टीला.

राजकुमारीशी विवाहाच्या इच्छेने आलेल्या पंचवीस एक तरुणांपैकी फक्त दहाच या पहिल्यापरीक्षेत निवडले गेले. बाकी पंधरा जण आले तसे परतले. निवडलेल्या दहा जणात चू वांग होता.

नंतर क्रमाने युद्ध कौशल्याची आणि विविध खेळांची व सहनशक्तीची आणि प्रसंगावधानाची परीक्षा झाली. धनुर्विद्येतच सहा जण हारले आणि चार जणच उरले. ती फार कडक परीक्षा होती. काही दिवस नुसते चालणे, दोरीच्या सहाय्याने कडा चढून जाणे वगैरे परीक्षांत आणखी एक जण मागे पडला. आता तिघेच उरले.

धैर्य व साहसाच्या परीक्षेसाठी तिघांना तीन निरनिराळ्या गुहांत एकेकटयाला ठेवण्यात आले. त्यात भुते असतात असे सांगण्यात आले. दुसऱ्या दिवशी उजाडण्याच्या सुमारास एक जण बेशुद्ध होऊन पडलेला आढळला. सरते शेवटी सर्व परीक्षा पार करून आलेले दोघेच उरले. त्यांत मंत्र्याचा मुलगा चू वांग हा एक आणि दुसरा दूर देशाचा एक राजकुमार हुवांग खो हा होता. दोघेही स्यूचीशी विवाह योग्य ठरले. परंतु एकीशी दोघांचे लग्न होणे शक्य नव्हते म्हणून दोघांमध्ये जो कोणी … अद्भुत करून दाखवील त्याच्याशी स्यूचीचे लग्न करून देईन असा राजाने आपला निर्णय सांगितला. राजाला ह्या परीक्षेची सूचना दरबारी जादुगार चुंगचिंग याने केली होती. त्याची स्यूची व चू वांग दोघांवर फार माया होती. त्या दोघांचे लग्न व्हावे असे त्याला फार वाटत होते.

राजाने दोघां प्रतिस्पर्धीना बोलाविले व म्हणाला—"तुमच्यापैकी जो कोणी काही अद्भुत करून दाखवील त्याच्याशी मी स्यूचीचा विवाह करून देईन.'

चू वांग त्या पूर्वीपासूनच चंग चिंग याच्या जवळ जादू शिकत होता आणि त्यात त्याने चांगले प्राविण्य संपादन केलें होते.

परंतु हु वांग खोला तशी जादू काही येत नव्हती. त्याने लहान लहान हातचलाखीचे काही प्रयोग करून दाखविले. परंतु त्यात अयशस्वी होऊन बाजूला झाला. हारला तरी तो घरी निघून गेला नाही. चू वांग दुसऱ्या दिवशी कोणते दिव्य करून दाखवितो ते बघण्यासाठी थांबला.

दुसऱ्या दिवशी स्यू ची दरबारात हजर होती. चू वांग आपल्याबरोबर दोन फूट लांब एक रेशमी दोरी घेऊन आला. त्याने त्या दोरीची दोन्ही टोके स्यू चीच्या दोन्ही हाताला बांधली. त्याने तिला एक बांगडी द्यायला सांगितले. तिच्या हातात बांगड्या नव्हत्या म्हणून तिने तिची बांगडी आपल्या दासी कडून मागवून त्याला देवविली.





त्यानंतर स्यूचीचे दोन्ही हात कोपरांपर्यंत एक टॉवेल टाकून झांकण्यात आले. चू वांगने आपल्या हातातली बांगडी दरबारी जादुगाराला देऊन ती विहिरीत टाकायला सांगितले. चुंग चिंगने काही जणांना बरोबर घेऊन जाऊन बांगडी विहिरीत टाकली व परत आला.

"काय हो, तुम्ही स्यूचीची बांगडी खरोखरच विहिरीत टाकलीत का?" असे चु वांगने चुंग चिंगला विचारले.

त्याने होकारार्थी मान हलविली.

ते कसे शक्य होईल? स्यूचीशीच माझे लग्न व्हावे असा विधिनिर्णय खरोखरच असेल तर तिची बांगडी तिच्याच हातात असेल. महाराज, मेहरबानी करून तिच्या हातावरचा टॉवेल काढता का?" चू वांग म्हणाला.

टॉवेल काढला तेव्हां स्यूचीच्या मनगटांना बांधलेल्या रेशमी दोरीला बांगडी लोंबत असलेली दिसली. ते पाहून सर्व आश्चर्यचकित झाले. हू वांग खोने अत्युत्साहाने पुढे येऊन चू वांगचे मनःपूर्वक अभिनंदन केले.

राजाच्या नातीचे प्रधानाच्या मुलाशी थाटामाटाने लग्न झाले.

चू वांगने जी जादू म्हणून दिव्य करून दाखविले त्यातलं गुपित एवढेच की चू वांग, स्यूची आणि चुंग चिंग या तिघांनी मिळून जुळवून आणलेले ते एक नाटक होते. स्यूचीने बांगडीच्या जोडीतली एक बांगडी आपल्या कोपराजवळ आणून ठेवली होती व तिच्यावर लांब हाताचे पोलके घातले होते. जोडीतली दुसरी बांगडी तिने आपल्या दासीकडून आणविली. तिच्या दोन्ही हातांना रेशमी दोरी बांधून त्यावर टावेल टाकला तेव्हा तिने तिच्या हाताच्या वरच्या बाजूला असलेली बांगडीखाली सरकवली आणि दोरीत आणून ठेवली.

हीच जादू प्रधानाच्या मुलाने केली होती. लग्न वगैरे झाल्यावर स्यूचीने दरबारी जादुगाराचा फार मोठा सत्कार केला.



# सचोटी

पद्मपुरी राज्याच्या सिंहासनावर अग्निपर्ण नावाचा राजा राज्य करीत असता राज्यात सर्वत्र सुखशांती नांदत होती, खजिना नेहमी भरलेला असे. परंतु राजा खजिनदारावर हजार डोळ्यांनी नजर ठेवीत असे. त्यांनी द्रोह केलेला आढळला की त्यांना शिक्षा करून नवीन खजिनदार नेमत असे.

मल्लिकार्जुन नावाचा एक नवा खजिनदार नुकताच नेमला होता. राजा सामान्य नागरिकाचा वेष करून काळोख पडल्यावर मल्लिकार्जुनाकडे गेला व म्हणाला–"आपल्याला भेटायला आलो आहे."

एक दिवा लावून हिशोब करीत बसलेला खजिनदार म्हणाला–"क्षणभर थांबा. हातांतलं काम पुरं करतो." असे सांगून त्याने हिशोब पुरा केला व दिवा मालवून व नंतर दुसरा एक दिवा लावून विचारले–"बोला, माझ्याशी आपलं काय काम आहे?"

राजाने चकित होऊन विचारले–"तुम्ही तो दिवा मालवून हा दिवा कां लावलात?"

"खजिन्याच्या कामाला खजिन्याचा दिवा वापरला. माझ्या स्वतःच्या कामासाठी स्वतःचा दिवा लावला." मलिकार्जुन म्हणाला.

आपल्याला इमानदार खजिनदार मिळाल्याबद्दल राजा फार खूष झाला.





# चोराची हृदयपालट

महेंद्रपुरीचा राजा एक समर्थ शासकच होता, परंतु त्याच्या राज्यात आकस्मिकपणे चोरांचा सुळसुळाट वाढला. एकाही चोराचा पत्ता लागेना. चोरांच्या राहण्याची जागा कोठे तरी जंगलात असावी असे मात्र वाटत होते. कारण जंगलातून येणाऱ्या लोकांनाच ते लुटीत.

राजाने आपल्या दहा निवडक सैनिकांना जंगलात कोठे चोर दिसतात का पाहून यायला पाठविले. तिसऱ्या दिवशी ते सर्व परत आले तेव्हां सर्वांचे मुंडन झाले होते. परंतु एका गोष्टीची माहिती काढून ते आले. त्यांना चोरांच्या नायकाचे नाव कळले.

त्यानंतर चोरांना धरून आणायची प्रतिज्ञा करून प्रधानाचा मुलगा गेला. तिसऱ्या दिवशी तो परत आला तेव्हां त्याच्या हातात बांगड्या होत्या व चोळी पोलके व लुगडे नेसून तो आला होता. परंतु त्याला हे कळले की जंगलात चोरांचा नायक कोणत्या बाजूला राहतो.

त्यानंतर राजाने चोरांना धरून आणायला आपल्या सेनापतीला पाठविले. तो परत आला तो एका गाढवावर. त्याला कोणीतरी गाढवाच्या पाठीवर बसवून बांधून ठेवले होते. त्याच्या अंगावर होळीत रंग उडवितात तसा रंग उडविलेला होता. परंतु तो चोराच्या घराचा दिंडी दरवाजा प्रत्यक्ष पाहून आला होता.

या खेपेस राजाने स्वतःच चोरांना धरून आणण्यासाठी कंबर बांधली व जंगलात गेला. तो लाकूडतोड्याचा वेष करून गेला. आतापर्यंत चोरांना धरून आणण्यासाठी गेलेल्यांनी जी माहिती आणली होती त्याचा पूर्ण उपयोग करून तो सरळ चोराच्या नायकाच्या घरात शिरला.

त्या वेळी चोरांचा नायक महेंद्र चोरी करायला बाहेर गेलेला होता. त्याचा तान्हा मुलगा झोपलेला होता. राजाने घरात शिरून महेंद्राच्या बायकोला कसलंतरी औषध हुंगवून बेशुद्ध केले आणि तिच्या मुलाला उचलून घेऊन राजवाड्यात आला.

चोरांच्या नायकाने आपल्या मुलाचा खूप शोध काढला व तो राजवाड्यात आहे हे कळल्यावर म्हाताऱ्या संन्याशाचे सोंग करून राजाच्या दर्शनासाठी आला.

राजाने संन्याशाचे प्रेमादरपूर्वक स्वागत केले, परंतु तो काहीतरी काळजीत पडल्यासारखा दिसत होता. संन्याशाने, राजाला त्याला काही काळजी करण्यासारखे झाले आहे का, विचारले. राजा संन्याशाला आत घेऊन गेला आणि त्याला दोन निरनिराळ्या पाळण्यात झोपलेल्या दोघां मुलांना दाखविले. दोघे बेशुद्धावस्थेत पडून होते.

त्या दोघां मुलांपैकी एक त्याचा मुलगा आहे, हे चोराने ओळखले.

"ही दोन मुलं जुळीं, म्हणजे एकाच आईची मुलं दिसत नाहीत? काय झालं आहे त्यांना?" चोराने राजाला विचारले.

राजा महेंद्र चोराच्या मुलाला उचलून घेऊन आल्याचे सांगून म्हणाला—"मी या मुलाला उचलून घेऊन आल्यानंतर चोऱ्या थांबल्या खऱ्या, परंतु चोर मुलाच्या शोधार्थ या बाजूला आलेला दिसला नाही. नंतर माझ्या मुलाला व चोराच्या मुलाला



दोघांना कसला तरी भयंकर ताप आला आहे. वैद्य या आजाराच्या निवारणार्थ कसलीशी मुळी आणायला जंगलात गेले आहेत."

इतक्यात एक वैद्य एक औषधी मुळी घेऊन घाईघाईने आला व म्हणाला— "महाराज, मुळी मिळाली, परंतु थोडीच आहे, एका रोग्यापुरती. एका मुलापुरेसे औषध तयार केले आहे. ते युवराजांना देतो."

राजा लगेच म्हणाला—"नको, नको! पहिल्याने दुसऱ्या मुलाला द्या. नंतर आणखी औषध मिळाल्यावर युवराजांनाद्या."

वैद्याने चकित होऊन राजाने सांगितले तसे केले.

चोरांचा नायक महेंद्र संन्यासी वेषात हे सर्व पहात व ऐकत होता. त्याने महाराजांना विचारले—"हे काय, महाराज? आपल्या मुलापेक्षा चोराचा पोर मोठा का? समाजकंटकाच्या मुलाला वाचविणे जास्त महत्वाचे आहे का?"

"हे मूल समाजकंटक नाही, निष्पाप आहे. मी चोरासारखा त्या मुलाला उचलून घेऊन आलो. चोर मिळाल्यावर मी या मुलाच्या आईच्या हातात याला सुस्थितीत पोचते केले तरच मला चोराला अपराधी ठरवून शिक्षा करण्याचा अधिकार आहे. माझ्या भाग्याने माझा मुलगा यथावेळी बरा होईलच." राजा म्हणाला.

"मीच तो अट्टल चोर महेंद्र, महा पापी, मी अपराधी आहे!" असे म्हणत चोराने महाराजांचे पाय धरले.

मध्यंतरी आणखी एका जंगलात हवी असलेली मुळी मिळाली. तिचे औषध देऊन युवराजाची तब्येत सुद्धा सुधारली. दोघे मुलगे आजारातून चांगले बरे झाले.

महेंद्रने आपल्या सर्व अनुयायांसह त्याने लुटलेल्या सर्व दौलतीसह महाराजांच्या आश्रयाला शरण मागितले. राजाने त्या सर्वांना माफ करून त्यांच्या उदरनिर्वाहासाठी त्यांना धंदा लावून दिला.





# चढाओढीचा दुष्परिणाम

एका गावात सोमू आणि श्यामू नावाचे दोघे शेतकरी परिस्थितीप्रमाणे मित्रासारखेच परस्परांशी बोलत व काम करीत. त्यांची घरे व शेते शेजारी शेजारीच होती. दोघे मिळून शेतावर जात व मिळूनच संध्याकाळी घरी परत येत. अशा-तऱ्हेने जोडीने काम करीत असल्यामुळे दोघे घनिष्ट मित्रासारखेच वाटत. परंतु त्यांच्या मनात मात्र तो मैत्रीभाव नव्हता. प्रत्येक नहल्यावर दहल्या टाकण्याच्याच प्रयत्नात असे. प्रत्येक जण स्वार्थबुद्धीने परस्परांना फसवाफसवीच करी. दोघे एकाच तऱ्हेचे पीक काढीत व एकाहून दुसरा जास्त चांगले पीक काढण्यासाठी चढाओढ करी.

सोमूच्या शेताहून श्यामूचे शेत थोडे खालच्या बाजूला होते. म्हणून सोमूने शेताला लावलेले पाणी श्यामूच्या शेताला सुद्धा सहजी मिळत असे. मुख्य करून पाणी कमी होऊ लागले की सोमू आपल्या शेतातले पाणी श्यामूच्या शेतात सोडीत असे. दोघे कधी कधी परस्परांच्या कामाबद्दल दोघही दाखवीत. परंतु सोमूला काही करता येत नसे. दोघांच्या शेतांमध्ये जो बांध होता तो सोमू पुष्कळ काळजीपूर्वक पाही. तरी कधी कधी उंदीर भोके पाडीत व श्यामूच्या शेतात नेमके पाणी जाई. पाणी कमी असूनही सोमूला त्यामुळे नाइलाजाने तसेच नांगरावे लागे. ते पाहून श्यामू त्याला ऐकू जाईल इतक्या मोठ्याने चिडविण्यासाठी हसे.

हळू हळू दोघांचे परस्परांशी बोलणे बंद झाले.

एकदां दोघांनी आपापल्या शेतात मका लावला. पीक हाताला येण्याची वेळ आली तेव्हा दोघांनी आपापल्या शेतात माचे



बांधले व पाहरा देऊ लागले. थंडीचे दिवस होते आणि एके दिवशी फारच थंडी पडली होती. स्वतःच्या पिकाबरोबर आपल्या पिकावरही श्यामूने पाहरा द्यावा असे सोमूला वाटले. म्हणून त्याने गवताचे एक बाहुले केले व त्याला आपला अंगरखा घालून धोतर नेसवले व माच्यावर उभे करून ठेवले. नंतर स्वतः कांबळे अंगावर घेऊन घरी जाऊन झोपला.

दररोज तो तसेच बाहुले मांच्यावर उभे करून ठेवून पहाटे येऊन ते उतरवून ठेवू लागला. ते बाहुले आहे हे न कळल्यामुळे श्यामूच दोन्ही शेतांची राखण

काही दिवस लोटल्यावर श्यामूची बायको त्याला म्हणाली–"सोमू रात्रभर घरी छान झोपतो. तुम्हांला त्याने राखण करायला ठेवले आहे वाटते?"

श्यामूला बायको म्हणाली ते खरे वाटले नाही. "दोघांचे भांडण लावतेस होय? रोज सकाळी दोघे भेटतो. रात्र भर परस्परांना पाहतो आणि राखण करतो. म्हणून तर मी घरी झोपायला येत नाही." श्यामू बायकोला म्हणाला.

तरी श्यामूच्या मनात एक विचार आला. सोमू रात्रभर उभा राहून राखण करतो आहेच. मग त्याला कळू दिल्या शिवाय घरी जाऊन झोपायला काय हरकत आहे?

असा विचार करून श्यामू मांजराच्या पावलांनी मांच्यावरून उतरला व एके दिवशी रात्री घरी आला. तेव्हा त्याला सोमूच्या घरातून हसण्याचा पुरुषी आवाज ऐकू आला.

"तो सोमूचाच आवाज! तो दररोज रात्री घरीच तर असतो, म्हणून मी सांगितले तर तुम्हांला ते खरे वाटले नाही. आतां तरी कळलं का?" श्यामूची बायको म्हणाली.

"तुझं तोंड! अग मी स्वतःच्या डोळ्यांनी माच्यावर सोमूला उभा पाहिला'

बोलावूनच आणतो आणि ही शंका मिटवितो." असे म्हणत श्यामू शेतावर धावत गेला. आणि हाक मारू लागला– "अरे सोमू! जरा आपल्या घरी जाऊन पहा तर तिकडे काय भानगड आहे ती?"

माच्यावरचे गवताचे बाहुलं हललंसुद्धा नाही. श्यामूने माच्यावर चढून बाहुले पाहिल्यावर मनात म्हणू लागला– "आपल्याला या दुष्टाने असं फसविलं का इतके दिवस? माझ्याकडून स्वतःचे काम काढून घेत राहिला! बायकोने सांगितलं, पण आपल्याला ते खरं वाटलं नाही. आता एकच उपाय आहे. इतके दिवस सोमूने केलेलं आपण त्या पूर्वीपासूनच करीत आलो आहो, याची बतावणी केली पाहिजे."

श्यामूने सुद्धा गवताचे एक बाहुले करून त्याला आपले कपडे घालून ते मांच्यावर उभे करून ठेवले आणि घरी जाऊन झोपला. तो सुद्धा सोमूसारखा उजाडण्याच्या आत शेतावर जाऊन बाहुले उतरवून ठेवू लागला.

पीक कापायला झालं तोपर्यंत दोन्ही शेतांची राखण गवताची बाहुली करीत राहिली. एके दिवशी मध्यरात्रीच्या सुमारास चोर शेतात शिरले. माच्यावरची बाहुली पाहून व राखणदार आहेत असे वाटून ते जरा आडवे झाले की लगेच शेत कापून नेता येईल या विचाराने शेतातच दबा धरून बसून राहिले. कोंबडा आरवण्याची वेळ झाली तेव्हा सोमू व



श्यामू आले व माच्यांवर चढून त्यांनी बाहुली काढली व त्यांच्या जागेवर स्वत: उभे राहिले. चोरांनी ते सर्व पाहिले.

वस्तुस्थितीची चोरांना चांगली कल्पना आली, म्हणून दुसऱ्यादिवशी रात्री चोरांनी येऊन निश्चितपणे सर्व कणसे कापून घेतली आणि पसार झाले. जाते वेळी श्यामूच्या माच्यावरून बाहुले काढून सोमूच्या माच्या-वरच्या बाहुल्यासमोर ते उभे करून ठेवले नंतर दोघांच्या तोंडांत एकेक काडी सुलगावून ठेवली व निघून गेले.

थोड्या वेळाने श्यामू शेतावर आला. येताच त्याला त्याचे बाहुले सोमूच्या माच्यावर उभे दिसले आणि दोन्ही बाहुली बिडी पीत गप्पा मारीत उभी असल्यासारखी दिसली. तो धावरून घरी पळत गेला. त्याला वाटेत सोमू भेटला. त्याने विचारले—"काय झालं रे श्यामू? चोर शिरले का?"

श्यामूने स्वत: केलेली लबाडी सांगून टाकली व म्हणाला—"दोन्ही बाहुली तुझ्या मांच्यावर गप्पा मारताहेत." दोघे आश्चर्य चकित झाले. शेतावर गेले व ते दृश्य प्रत्यक्ष पाहून म्हणू लागले—"हीं भुताटकी दिसते आहे!" पाहतां पाहतां दोनी बाहुली एकाएकी जळू लागली.

सोमू व श्यामू परस्परांकडे पाहून 'बापरे!' म्हणाले. त्यांच्या तोंडावाटे शब्दच उमटेना. आणखी काही वेळाने छान उजाडल्यावर चोरांनी सर्व कणसे कापून नेल्याचे कळले.

"आपल्या दोघांच्या अकलांच्या चढा-ओढीचा हा परिणाम झाला तर!" सोमू म्हणाला.

"आतां यापुढे आपण दोघांनी दुसऱ्याहून आपण जास्त शाहणे आहो, हे दाखवायचे नाही." श्यामू म्हणाला.

दोघांमध्ये परस्पर प्रेम व विश्वास असता तर दोघे पाळीपाळीने दोघांच्या शेताची राखण करू शकले असते आणि दोघे घरी जाऊन स्वस्थपणे झोपू ही शकले असते. मेहनतीचे फळ त्यांना उपभोगतां आले असते.






रामराज्यात न्याय मिळविण्यासाठी कमी जास्त काही करण्याची गरजच नसे. सरळ राजदरबारी जाऊन आपले गाऱ्हाणे निवेदन करता येत होते व न्याय मिळविणे शक्य होते. एके दिवशी रात्री एक कुत्रा रक्तबंबाळ स्थितीत प्राण कंठाशी आले असता रामाच्या राजवाड्यासमोर उभा राहून भुंकू लागला.

राम उठून बाहेर आला आणि कुत्र्याला कुरवाळून त्याला त्याने उगा केले. त्याच्या वेदना कमी झाल्या व तो म्हणाला—"रामा! एका तरुण माणसाने मला इतकं मारलं आहे की मी थोड्याच वेळाने मरणार आहे. त्याला काही काम-धंदा नसल्यामुळे तो गावात भटकतो आहे. त्याला एखाद्या मोठ्या देवळाचा व्यवस्थापक कर, असे निवेदन करायला मी आलो आहे."

रामाने चकित होऊन त्याला विचारले—"त्याला मृत्यदंडाची कठोर शिक्षा द्यायला सांगायचं सोडून त्या अपकाऱ्यावर उपकार करायला सांगतो आहेस का?"

"त्यात विशेष असं काही नाही. मी मागच्या जन्मी एका मोठ्या देवळाचा प्रमुख अधिकारी व मुख्य पुजारी होतो. धर्मार्थं आलेलं सर्व गडप करून वाटेल ती कुकर्मे केली. त्यामुळे कुत्रा होऊन जन्मलो. त्या तरुण मुलाला कुत्रा होऊन माझ्या-सारखेच कष्ट सहन करावे लागावेत असे मला वाटले होते. परंतु तुझ्या पतितपावन अशा स्पर्शाने माझ्या मनातली सूडबुद्धी



नष्ट झाली. मला उत्तम गती प्राप्त होणार आहे." असे म्हणत त्या कुत्र्याने प्राण सोडला. त्यानंतर त्या तरुण मुलाला ते सर्व कळले व त्याला पश्चात्ताप झाला.

* * *

अश्वमेध यज्ञ संपल्यावर रामाने काही काळ राज्य केल्यानंतर एके दिवशी यम ब्राह्मण' रूप घेऊन आला व म्हणाला– "रामा! तुझ्याशी मला एकांतात बोलावयाचे आहे. आपण दोघे बोलत असतां मध्येच कोणी आला तर त्याचा शिरच्छेद झाला पाहिजे!"

रामाने ते मान्य करून लक्ष्मणाला ते सांगितले व त्याला दारावर पहारा

उभा करून यमाबरोबर एकांतस्थानी बोलायला गेला.

यम म्हणाला–"रामा, तू महाविष्णू आहेस. तू ज्या कार्यासाठी अवतार घेतलास ते पूर्ण झाले आहे. सीता लक्ष्मी होऊन माहेरी क्षीरसागरात तुझी वाट पहात आहे. शेषनाग व शंखचक्र हे तुझी भावंडे होऊन जन्मले त्यांच्यासह तू आता क्षीरसागरात परतले पाहिजेस."

त्याच वेळी दुर्वासा ऋषी घाईघाईने येऊन लक्ष्मणाला म्हणाले–"मला आत्ताच्या आता रामाला भेटायचे आहे! नाही तर रघुवंशाचा नाश होईल, असा शाप देईन!"

वंशनाश होण्यापेक्षा आपला शिरच्छेद झालेला पत्करला असा विचार करून लक्ष्मण दुर्वासा ऋषी भेटायला आले असल्याची बातमी द्यायला आत गेला. तत्क्षण यम अंतर्धान पावला.

रामाने वचन दिल्याप्रमाणे लक्ष्मणाला शिरच्छेदाची शिक्षा करण्याचे ठरविले. वडीलधाऱ्यांनी सल्ला दिला की हद्दपारीची शिक्षा ही शिरच्छेदा इतकीच कठोर शिक्षा आहे. म्हणून लक्ष्मणाला ती शिक्षा करावी. ते सर्व ऐकून लक्ष्मणाने स्वतःच राजधानी-बाहेर अयोध्येची सरहद्द पार करून सरयू नदीत प्रवेश करून अवतार समाप्ती

लक्ष्मणाने सरयू नदीत प्रवेश केल्यावर रामाने भरत व शत्रुघ्नाला बोलावून सर्व सांगितले व लवकुशांच्या राज्याभिषेकाची सर्व तयारी करायला सांगितली. अयोध्या नगरी तोरणे व पताका बांधून सजविण्यात आली. घरोघरी रेशमी वस्त्रे, दागदागिने आणि हळदीकुंकू पाठविण्यात आले.

रामाने लवकुशांचा राज्याभिषेक करून हनुमंताला बोलाविले व म्हणाला– "हनुमंता! मी दीर्घकाल राज्य केले आणि आता विश्रांती घ्यावी, म्हणतो. मी असलो काय की नसलो काय तू लवकुशांवर नजर ठेव व त्यांना कोणतीही उणीव भासू नये याची काळजी घे. राज्याच्या रक्षणाचा सर्व भार मी तुझ्यावर टाकीत आहे. तू दोघांचा पालक आहेस, ते चुका करतील त्या सुधारण्याची जबाबदारी तुझी."

रामाने सरयू नदीवर जाण्यासाठी एका मोठ्या मिरवणुकीची तयारी केली. त्या दिवशी महोदय पर्वदिन होता. मंगलवाद्ये वाजू लागली. ब्राह्मण वेदपाठ करू लागले. शिंग फुंकले गेले आणि राम सरयू तीरी प्रस्थान करण्यासाठी निघाला. भरताने श्वेत छत्र रामाच्या डोक्यावर धरले आणि शत्रुघ्नाने चवरी धरली. दुतर्फा वाड्यातून सौभाग्यवती स्त्रिया पुष्पवृष्टी करीत होत्या. हनुमान देहभान विसरून रामाच्या पाठी-



मागून मंदगतीने एकेक पाऊल टाकीत चालत होता. राम सरयू नदीवर कशासाठी जात आहे हे न कळल्यामुळे प्रजा परस्पर निरनिराळे तर्क करीत हळू हळू चालत होती. मिरवणूक सरयूनदीतीरी पोचली.

राम सरयू नदीत उतरला. भरताने शंख वाजविला. शत्रुघ्नाने कापूर लावून रामाला ओवाळले. ब्राह्मण सामवेदाचा पाठ उच्च स्वराने करू लागले. मंगल वाद्यांच्या नादाने सर्व दिशा दुमदुमून गेल्या. भरत व शत्रुघ्नसुद्धा नदीत उतरून रामाच्या दोन्ही बाजूला उभे राहिले.

राम हळूहळू नदीत पुढे जात खोल पाण्यात गेल्यावर प्रजेला आशीर्वाद देण्या-



साठी उजव्या हाताचा तळहात उभा करून म्हणाला–"आनंदाने सर्व आपापल्या घरी जा. सुखासमाधानाने रहा!"

सरयू नदीच्या काठावर प्रजा मूर्तिवत उभी राहून मौनपणे ते दृश्य पहात होती. लवकुशांच्या शेजारी उभा राहून हनुमान स्वतःला आवरू न शकल्यामुळे गदगद कंठाने म्हणाला–"रामा! थांब! तुझ्या आधी मी नदीला हा देह सोपवितो. तू नसशील तर मी कशाला जगायचं?" असे म्हणत छाती बडवीत त्याला नदीत उतरू लागलेला पाहून राम नाकावर बोट ठेवून त्याला म्हणाला–"हनुमंता! अरे तू चिरंजीवी आहेस! मी तुला सांगितले होते ते सर्व विसरलास का? लवकुशांना घेऊन लौकर परत फीर!"

हनुमान लवकुशांना घेऊन राजवाड्यात परतला.

राम सरयू नदीत आणखी खोल पाण्यात गेला व अदृश्य झाला. रामाच्या पाठोपाठ भरत व शत्रुघ्न नदीत अदृश्य झाले. रामावतार समाप्त झाला.

क्षीरसागरात लक्ष्मण त्यापूर्वीच पोचून आदिशेष होऊन स्थिर झाला होता. पृथ्वीच्या पोटातून सीता लक्ष्मी रूपे शेषनागाच्या पाठीवर बसली होती व विष्णुरूप घेऊन येणाऱ्या रामाची वाट पहात होती. राम विष्णुरूप धारण करून शेषनागाच्या पाठीवर येऊन बसला. भरत व शत्रुघ्न शंखचक्र होऊन त्याच्या हातात येऊन बसले. लक्ष्मी विष्णूचे पाय चेपू लागली.

* * *

एके दिवशी लवकुश सिंहासनावर बसले असतां माता पित्याची आठवण झाल्यामुळे त्यांच्या डोळ्यातून अश्रुधारा वहात होत्या. ते पाहून हनुमान त्यांचे सांत्वन करीत म्हणाला–"तुम्ही रघुवंशाचे दीपक आहांत. तुम्ही स्वतःला सावरून राज्याचे पालन केले पाहिजे, असे दुःख करीत बसणे शोभते का? तुम्हांला कधी सीतारामांना भेटावेसे वाटेल, तेव्हां मला सांगा. मी त्यांचे दर्शन घडवितो." असे म्हणत हनुमानाने आपली छाती फाडून दाखविली. त्यात स्मित वदनाने व वात्सल्याने पहात आशीर्वाद देत असलेल्या माता-पित्यांना पाहून लवकुशांना फार आनंद झाला.

कुशलव तरुण वयात आले व सर्व राज्यव्यवस्था उत्तम तऱ्हेने पाहू लागले. पूर्वेला मणिपूर येथे शुभासह कुश आणि पश्चिमेला मथुरा येथे शोभासह लव राहून दोन्ही दिशांना शांती व सुखासमाधानाने राज्य करू लागले.

त्या सुमारास देशावर एकाएकी एक फार मोठे संकट येऊन कोसळले. राक्षसांहून ही जास्त क्रूर घोरकली नावाचा नररूप राक्षस शक, कुषाण, पाषाण वगैरे डोंगरी जातींच्या टोळ्या घेऊन स्वारी करीत वायव्य दिशेकडून टोळधाडी सारखा देशावर चालून आला. एकाएकी झालेल्या हल्ल्यामुळे पश्चिमोत्तर प्रदेशात गोंधळ उडून गेला.

घोरकलीच्या बरोबरच पश्चिमेकडून कालकली नावाचा नररूप राक्षस मोठे थोरले आरमार घेऊन कालकेय नावाच्या समुद्री राक्षसांच्या सैन्यानिशी समुद्रमार्गे चालून आला. कालकलीच्या आज्ञेप्रमाणे कालकेय सैन्य राज्यामागून राज्यात धुमाकूळ घालीत जाळपोळ करीत आणि अलोट



धनधान्य लुटून आपल्या बेटांवर घेऊन जाऊ लागले.

प्रजा घाबरून गेली. प्रत्येक जण आपआपले घरदार व धनधान्याचे रक्षण करण्यासाठी खटपट करू लागला. तेव्हा हनुमान तेथे गेला. त्याने प्रजेला समजावून सांगितले की प्रत्येकाने स्वतःच्या पुरती रक्षणाची तयारी करणे बरोबर नाही, सर्वांनी एकजुटीने देशाचे रक्षण केले पाहिजे. रामसेना नामे त्याने सैन्य उभे केले व सर्व प्रजेला त्या सैन्यात भर्ती केले.

रामाने ज्या रामराज्याची स्थापना करून ते वाढविले त्या राज्यात सर्वत्र रामसेना उभी केली तर कोणतीही भीती प्रजेला



असण्याचे कारण नाही व कोणतेही काम करणे प्रजेला अशक्य नाही. असा प्रजेला बोध करून हनुमानाने येणाऱ्या संकटाला तोंड देण्यास प्रजेत उत्साह निर्माण केला. हनुमंताच्या नेतृत्वाखाली सर्व प्रजा घोरकली व कालकलीशी युद्ध करण्यास सिद्ध झाली. त्या वेळी हनुमान दोन्ही रणांगणावर सहस्त्ररूप धारण करून युद्ध करू लागला. जिकडे पहावे तिकडे हनुमानाचे दर्शन होई. म्हणून त्याला सहस्त्ररूप आंजनेय हे नाव प्राप्त झाले.

कुशने मोठा पराक्रम गाजविला. त्याने आग्नेयास्त्र सोडून घोरकलीचा वध केला. रामसेनेने त्याच्या सैन्याशी युद्ध करून त्या सैन्याचा पराभव केला.

लवने कालकलीशी युद्ध करून त्याला वारुणास्त्राचा प्रयोग करून ठार केले. रामसेनेने कालकलीच्या कालकेय सैन्याचा संहार केला. हनुमंताने आपल्या शेपटीचे वळे टाकून सर्व आरमार जमिनीत बुडवून टाकले. आरमाराबरोबर कालकेय सैन्यातले उरलेले राक्षस बुडून मेले.

अशा दोन मोठ्या युद्धात विजय मिळाल्यावर हनुमान प्रजेला म्हणाला–" रामाने जेथे राज्य केले त्या भूमीवर राहणारी प्रत्येक प्रजा लवकुशांना भावासारखी आहे व रामसेना म्हणून परस्परांना मदत करणे प्रत्येक प्रजेचे कर्तव्य आहे. कोणा एकावर संकट आले तर ते सर्वांवरचे संकट आहे, असेच प्रत्येकाने मानले पाहिजे व त्या संकटांतून मार्ग काढला पाहिजे. हीच खरी देशभक्ती होय." असा उपदेश करून हनुमानाने प्रजेच्या मनात आत्मविश्वास व परस्पर सहानुभूति उत्पन्न केली.

विजयचिन्ह म्हणून हनुमानाने दिलेल्या प्रोत्साहनाने कुशने कुशावती नावाची एक नगरी व लवने लवंतिका नावाची नगरी स्थापन केली.

लवकुश उत्तम तऱ्हेने राज्य करू लागले. त्यांच्या शौर्यपराक्रमावर हनुमंताचा विश्वास बसू लागला. ते 'रामराज्य' हे नाव चिरस्थायी करू लागलेले पाहून तो कुश-

लवांना म्हणाला—“आता मी गंधमादन पर्वतावर परत जातो.”

लवकुश मोठ्या उत्साहाने हनुमानाला गंधमादन पर्वतापर्यंत पोचवून आले.

हनुमानाने रामराज्य लवकुशांच्या देख-रेखीखाली उत्तम तऱ्हेने चालेल व त्यांच्या राज्याची सदैव भरभराट होत राहील असा आशीर्वाद दिला. “रामसेना या नावे नवीन उभी झालेली सेना देशभर एकजूटीने राहून देशाचं रक्षण करीत राहील व तिला अशक्य असे एकही काम राहणार नाही.” असे सांगून हनुमानाने त्यांना निरोप देऊन अयोध्येला परत जाण्यास सांगितले.

प्रजेने हनुमंताला प्रणाम करून हात वर करून—“महाबली हनुमान की जय” असा जयघोष केला. हनुमान गंधमादन पर्वतावर तपश्चर्या करण्यासाठी निघून गेला.

लवकुश व त्यांचे वंशज ‘रामराज्य’ हे नाव चिरस्थायी करून आणि रघुवंशाची

राहिले.

हनुमान गंधमादन पर्वतावर रामनामाचा जप करीत तपश्चर्या करू लागला.

* * *

अशा तऱ्हेने गंधमादन पर्वतावर मग्न झालेल्या हनुमानाचे ध्यान एकाएकी भंग झाले व त्याने डोळे उघडले. त्यावेळी त्याला मोठमोठे पर्वत लहान लहान टेकड्यांसारखे, मोठमोठे वृक्ष लहान लहान रोपट्यांसारखे व हत्ती उंदरासारखे भासले. सप्तर्षीमंडळ ध्रुव नक्षत्रापासून थोडे दूर सरकलेले होते; त्यावरून युग पालटले असे हनुमानाला वाटले.

त्याच वेळी त्रिकालदर्शी नारदमुनी तेथे प्रगट होऊन म्हणाले—“आता द्वापर युगाचे प्रथम चरण सुरू झाले आहे. हनुमंता! या द्वापर युगाच्या चवथ्या चरणात तुला रामाचे दर्शन घडेल.” असे सांगून नारद मुनी निघून गेले.

हनुमान पुन्हा तपश्चर्येत ध्यानमग्न झाला.





## दक्षयज्ञ

फार पूर्वी प्रजापतींपैकी दक्ष नावाच्या प्रजापतीने आदिशक्तीची आराधना करून तिला त्याची मुलगी होऊन जन्म घेण्यास विनंती केली. आदि-शक्तीने ते मान्य केले व त्याच्या पन्नास मुलींपैकी एक होऊन त्याच्या पोटी जन्मली.

तिचे नाव सती. सती ही आदिशक्तीचा अवतार आहे हे दक्षाला कळले नाही. ती नेहमी तपश्चर्येतच लीन असे.





लग्नाचे वय झाल्यावर तिने शंकरा-शिवाय इतर कोणाला वरणार नाही असे सांगितले. दक्षाने त्या गोष्टीस नकार दिला. परंतु देवांनी स्वतःवर जोखिम घेऊन शिवसतीचा विवाह संपन्न केला. सती शंकराबरोबर कैलास पर्वतावर निघून गेली.



त्यानंतर दक्षाने एक मोठा यज्ञ आरंभिला. त्याने आपल्या सर्व मुलींना व जांवयांना यज्ञाचे बोलावणे पाठविले. शिवसतींना निमंत्रण पाठविले नाही.



कैलास पर्वतावर रहात असतां सतीला पित्याने आरंभिलेल्या यज्ञाची गोष्ट कळली. ती यज्ञाला निघाली. तेव्हां शंकराने तिला विचारले—"तुला कोणी बोलाविले आहे?" ती म्हणाली—"वडिलांच्या घरी जायला आमंत्रणाची गरज असते का?"



शंकराने नाइलाजाने होकार दिल्यावर सती दक्षाच्या घरी आली. तिचा तो तापसीचा वेष पाहून दक्ष संतापला व शंकराला उद्देशून वाटेल ते बोलला. सती पित्याचे तोंड बंद करु शकली नाही.

पिता पतीला उद्देशून जे काही बोलला ते सहन न झाल्यामळे सतीने प्राणत्याग केला. सतीबरोबर आलेल्या प्रमथादि दूतांनी ती वार्ता शंकराला जाऊन कळविली. शंकर उठून उभा राहिला व त्याने आपली जटा सोडून क्रोधाने ती जमिनीवर झाडली.





तत्काळ असंख्य भुते व प्रेते उपजली. त्यांनी दक्षाच्या यज्ञवेदीपर्यंत जाऊन त्याचा यज्ञ ध्वंस केला. यज्ञमंडप स्मशान भूमीसारखा झाला.

थोड्या वेळाने तेथे शंकर आला. त्याने सतीचे शव उचलले व प्रलय तांडव नृत्य सुरु केले. त्रिलोक थरथर कापु लागले.





ते पाहून सर्व देव भयभीत झाले आणि विष्णूकडे जाऊन त्यांनी शंकराचे ते प्रलय तांडव नृत्य थांबविण्यास विनविले. विष्णूने सुदर्शन चक्राचा प्रयोग केला.



सुदर्शन चक्राने सतीच्या देहाची खांडोळी केली. ती सर्व भारतात ५१ स्थानी जाऊन पडली. शंकर हळूहळू शांत झाला.



सतीच्या देहाची खांडोळी ज्या ज्या स्थानी पडली ती पुण्यक्षेत्रे झाली. आदिशक्तीच्या देहाचा स्पर्श झाल्याने तो प्रदेश पवित्र झाला असे मानून हिन्दू त्या स्थानांचे पूजन करतात.

# गोष्ट मथळा चढाओढ

## या गोष्टीला सुंदर मथळा सुचवून रु. २५ मिळवा!

?

एक वैष्णव आचार्य काळोख पडू लागला त्या वेळी एका गावी पोचले. कोणी सांगितले की त्या गावात वैष्णवच राहतात. वैष्णवाचार्य एका घरासमोर उभे राहून म्हणाले– "यजमान! मी वैष्णव आहे, आपणही वैष्णव असलात तर मला आज आपल्या घरी आश्रय द्यावा!"

ते पाहून त्या घरचा मालक म्हणाला–"क्षमा करा, मी वैष्णव नाही, माझ्यासारख्या सामान्य माणसाच्या घरी राहून आपण अपवित्र होऊ नका."

वैष्णव आचार्य एका मागून एक सर्वांच्या घरी जाऊन तेच म्हणाला व प्रत्येक घरचे लोक वैष्णव नसल्याचे त्याला कळले.

शेवटी वैष्णव आचार्यांनी वाटेत एका माणसाला थांबवून विचारले–"काय हो, या गावात सर्व वैष्णवच राहतात. परंतु सर्व वैष्णव नसल्याचे सांगतात हे कसे काय?"

"अहो! या गावातले सर्व लोक वैष्णवच आहेत. परंतु विष्णुभक्ताला अहंकार असता कामा नये. म्हणून आपण स्वतःला वैष्णव सांगून विचारलेत तर कोणी आपल्याला आश्रय देणार नाही. दुसऱ्या तऱ्हेने विचारून पहा, कदाचित काम भागेल!"

त्यानंतर वैष्णव आचार्य एका घरी जाऊन म्हणाले–"अहो! मी एक क्षुद्र जीव आहे, आपल्या घरी मला आश्रय मिळेल का?" "आत यावे!" त्या घरचा मालक म्हणाला.

★ ★ ★

वरील गोष्टीला उपयुक्त होईल असा एक सुंदर मथळा विचार करून एका कार्डावर स्वतःच्या पत्त्यासह लिहून "गोष्ट मथळा चढाओढ", 'चांदोबा', चंदामामा प्रकाशन, २ व ३ अर्काट रोड, वडपळणी, मद्रास ६०००२६ या पत्त्यावर पाठवा.

१० ऑगस्ट १९७८ च्या आत पोस्टकार्ड पोचले पाहिजे. त्या कार्डावर 'फोटो चढाओढ परिचय' देता कामा नये.

चढाओढीचा निकाल ऑक्टोबर १९७८ च्या चांदोबात जाहीर करण्यात येईल.

---

जून महिन्यातल्या चढाओढीचा निकाल (मथळा) "मनी वसे ते स्वप्नी दिसे"



# अमरवाणी

यो हि दत्त्वा द्विपश्रेष्ठं
कक्ष्यायां कुरुते मनः
रज्जु स्नेहेन कं तस्य
त्यजतः कुंजरोत्तमम् ? ॥ १ ॥

[एखाद्या उत्तम जातीच्या हत्तीला दान म्हणून देते वेळी त्याला बांधायच्या दोरीचा मोह ठेवण्यात अर्थच काय ?]

सुपात्र दानाच्च भवेद्धनाढ्यो,
धनप्रभावेण करोति पुण्यम्,
पुण्यप्रभावा त्सुरलोकवासी,
पुनर्धनाढ्यः पुनरेवभोगी, ॥ २ ॥

[माणूस सुपात्रदान केल्याने धनी होतो. धन हातात असल्यामुळे पुण्यकार्य करतो. पुण्य करून त्याला स्वर्गप्राप्ती होते आणि धनी होऊन तो पुन्हा सुखोपभोग घेतो.]

कुपात्र दानाच्च भवेद्दरिद्रो,
दारिद्र्यदोषेण करोति पापम्,
पापप्रभावा न्नरकं प्रयाति,
पुनर्दरिद्रः, पुनरेव पापी ॥ ३ ॥

[माणूस अपात्र दान करून दरिद्री होतो; दरिद्री झाला की पाप करतो; पाप करून नरकात जातो; पुन्हा दरिद्री होतो व पाप करतो.]



# लब्ध प्रणाश

[ ६१ ]

विष्णुशर्मा म्हणाला–"हातात आलेली वस्तू कधीकधी मूर्खपणामुळे घालवून बसावी लागते. नरमगरीला जे मिळाले होते ते मूर्खपणामुळे नष्ट झाले."

"आम्हांला ती गोष्ट सांगा!" राजकुमार म्हणाले. तेव्हा विष्णुशर्माने ती गोष्ट सांगितली.

समुद्राच्या किनाऱ्यावर एका खोलगट जागेत असलेल्या वाळूत एक जांभळाचे झाड होते. त्या झाडाला जांभळाचे अनेक घड लागलेले होते. रक्तमुख नावाचे एक माकड त्या झाडावर रहात असे आणि खोल पाण्यात करालमुख नावाची एक नर मगर रहात असे.

एके दिवशी ती नर मगर पाण्यातून पोहोत बाहेर वाळूत आली आणि उन्हात पडून राहिली. तू माझा अतिथि पाहुणा आहेस. म्हणून मी तुला अमृतासारखी गोडगोड जांभळे खायला देतो, ती खा. वैश्वदेव झाल्यानंतर त्या सुमुहूर्तावर आलल्या अतिथीला जेवायला वाढले, मग तो मित्र असो की शत्रू असो, पंडित असो की मूर्ख असो त्यामुळे स्वर्गप्राप्ती होते. वैश्वदेव झाल्यानंतर येणाऱ्या अतिथीचा, "तुझी शाखा कोणती, तू कोणत्या जातीचा, तू काय शिकलास?" इत्यादी प्रश्न विचारल्याशिवाय सत्कार करावा व त्याला जेवायला वाढून तृप्त करावे, असे मनूचे सांगणे आहे. वैश्वदेश पूर्ण होत असता दमून भागून आलेल्या अतिथीचा सत्कार केला तर उत्तम लोकाची प्राप्ती होते. अतिथीला परत पाठविले तर किंवा त्यांनी निघून जावे यासारखे वागले तर देव व पितर पाठ फिरवितात." असे सांगून







माकडाने त्या नर मगरीला जांभळांची फळे दिली.

मगर जांभळे खाऊन माकडाजवळ काही वेळ बोलत राहली व आपल्या निवासस्थानी निघून गेली. त्या दिवसापासून मगर व माकड दररोज भेटून बराच वेळ नीतिशास्त्रावर चर्चा करीत बसू लागले.

एके दिवशी नरमगरीने पोटभर जांभळे खाल्यावरही बरीच जांभळे उरली. तिने ती घरी नेली व आपल्या बायकोला खायला दिली. बायकोने जांभळे खाल्यावर विचारले–"दिलवरा! ही अमृतासारखी गोड जांभळे कोठे रे मिळाली?"

नर म्हणाला–"प्रियतमे! रक्तमुख नावाचा माझा एक मित्र आहे. तो आहे वानर. माझ्यावरच्या प्रेमामुळे मला तो खूप जांभळे खायला देतो."

"अशी अमृततुल्य जांभळे खाणाऱ्या माकडाचे काळीज किती गोड असेल नाही? तुझे माझ्यावर खरे प्रेम असेल तर तू त्या माकडाचे काळीज घेऊन ये. मी ते खाल्ल्यावर मला "जरा-मरणाची भीती उरणार नाही, मला नित्य यौवन लाभेल. तुझ्याबरोबर राहून सर्व सुखोपभोगाचा अनुभव घेऊ शकेन."

"प्रिये, असं बोलू नकोस. ते माकड मला धाकट्या भावासारखं आहे. शिवाय त्याला ठार करणे मला शक्य देखील होणार नाही. म्हणून तू हा हट्ट सोड. सत्संगामुळे प्राप्त झालेली मैत्री सर्वोत्तम असते आणि सख्खा भाऊ सुद्धा अशा मित्रानंतर मान्य असतो. दोघांच्या अंगात एकच रक्त वहात असले तरी त्या भावापेक्षा मित्र मोठा असतो, असं थोरामोठयांचे सांगणे आहे." नर मगर म्हणाला.

"तू आजपर्यंत माझी एक तरी इच्छा पुरी केली आहेस का? त्यावरून मला असा संशय येऊ लागला आहे की तुला ही जांभळे देणारे माकड मादी असली पाहिजे. म्हणूनच तू तिच्याबरोबर दिवसभर राहतोस. रात्री माझ्याबरोबर बोलत सुद्धा नाहीस. तुझे मन दुसऱ्या स्त्रीवर गेले असल्याचे त्यावरून स्पष्ट दिसते आहे!" मगरीण म्हणाली.

नर आपल्या बायकोचे पाय धरून तिचा राग कमी करण्याचा प्रयत्न करू लागला. म्हणाला–"हे सुंदरी! तुझा राग उतरविण्यासाठी तुला मनापासून प्रेम करणारा माझ्याशिवाय दुसरा कोण आहे? मी तुझा दास आहे. आपला राग आवर, तुझे पाय धरून विनंती करीत आहे."

मगरीण घळघळा अश्रू ढाळीत म्हणाली–"त्या बयेने तुझे मन चोरले आहे. तिच्या मुठीत असलेल्या, तुझ्या हृदयात मला स्थान कोठे आहे? दुष्टा! तुझे हे पाय धरण्याचे नाटक पुरे कर. ती तुझी प्रियतमा नाही म्हणतोस तर मी तिला ठार कर असे म्हटले असता तू टाळाटाळ कां करतो आहेस? त्या माकडिणीवर तुझे प्रेम आहे हे या वरून कळत नाही का? या सर्व गप्पा कशाला? तू तिचे काळीज मला खायला आणून दिले नाहीस तर मी उपाशी राहून जीव देईन."

बायकोचे ते बोलणे ऐकून नर विचार करू लागला–"शिरस, मूर्ख माणूस, स्त्री, खेकडा, मासा, दारुड्या आणि मोरचूद यापैकी काही चिकटलं तर जीव घेतल्याशिवाय सुटत नाही, हे थोरा मोठ्यांनी सांगूनच ठेवले आहे! तरमग या परिस्थितीत मी काय करावे बरे? माकडाला ठार कसे करायचे?"





# १९९. सुरवातीचे शेतकरी

जगात सर्वात प्रथम मानव सभ्यता सुरू झाली ती टाइग्रिस व यूफ्राटिस नद्यांच्या खोऱ्यातल्या "मेसोपोटेमिया" मध्ये. त्यालाच सुमेरियन सभ्यता म्हणतात. ८-९ हजार वर्षांपूर्वी हल्लीच्या इराक देशात राहणाऱ्या रहिवाशांनी शेतीची कामे सुरू केली, शहरे वसविली आणि सुमेरियन सभ्यतेचा पाया घातला. चित्रात हस्सुनानगराचे जुने अवशेष आहेत. त्यांचा निर्माण ज्यांनी केला त्यांना गृहनिर्माण व इतर उद्योगधंदे येत असत. येथे गारगोटीच्या दगडाचे कोयते व सुऱ्या मिळाल्या आहेत.





# अल्लूक मांत्रिक

फार प्राचीन काळातली ही गोष्ट आहे. ब्रह्मपुत्र नदी तीरावरच्या जंगलातील एका गावी कालीवर्मा नावाचा एक क्षत्रिय युवक रहात असे. त्याचा बाप एक शूर योद्धा होता आणि चंद्रशिला नगरीच्या राजाच्या पदरी एक सरदार होता. एकदां युद्ध करीत असतां पराक्रम गाजवून त्याने वीरगती प्राप्त केली. त्यावेळी कालीवर्मा दहा वर्षांचा एक मुलगा होता. त्याची आई पतीच्या निधनानंतर विरहाने आजारी पडून मरण पावली. परंतु बलभद्र नावाचा एक स्वामिभक्त नोकर होता. त्याने कालीवर्माला आईबापांची उणीव भासू दिली नाही. त्याला क्षत्रियोचित सर्व शस्त्रास्त्र विद्या शिकवून लहानाचे मोठे केले.

कालीवर्माला विसावे वर्ष लागले तेव्हा बलभद्र त्याला म्हणाला–"आतां तू हे लहानसे गाव सोडून राजधानीच्या नगरीत जा आणि तेथे राजदरबारात चांगलीशी नोकरी मिळविण्यासाठी प्रयत्न कर."

कालीवर्माच्या मनांतही अशाच तऱ्हेचे विचार घोळू लागले होते. तो राजाच्या पदरी नोकरी करावी की नाही या विचारात पडला. कारण राजा प्रजेचे रक्षण करण्यात असमर्थ असल्याचे त्याने पाहिले होते. चोर आणि लुटेरे गावे लुटून नेत आणि गाव-कन्यांचे रक्षण करण्यासाठी राज्यातर्फे काहीच बंदोबस्त नव्हता. कर वसूल करण्यात मात्र राजाचे अधिकारी कसूर करीत नसत.



कालीवर्मा बलभद्राला त्या गोष्टीचा उल्लेख करून म्हणाला–"चंद्रशिला नगरीचा राजा जितकेतू अयोग्य व भित्रा आहे. अशा राजाच्या पदरी नोकरी करून पोट भरणे म्हणजे स्वतःचा अपमान करून घेण्यासारखे आहे. म्हणून मी आणखी कोठे तरी जाऊन मर्दमुकीच्या बळावर स्वतःचा उदरनिर्वाह चालविण्याच्या विचारात आहे."

वृद्ध बलभद्र थोडा वेळ विचार करून म्हणाला–"कोणत्याही राज्याची सुव्यवस्था ही त्या राज्याच्या राजापेक्षा त्याच्या दरबारी अधिकाऱ्यांच्या मर्दुमकी व कर्तबगारीवर जास्त अवलंबून असते. जितकेतूचे वडील शूर पराक्रमी योद्धे होते. शूर राजा परलोकी गेल्यावर जितकेतूच गादीला वारस होता. मला असे वाटते आहे की राजा स्वार्थी आणि होयबा दरबारी लोकांच्या घोळक्यात सापडला आहे."

"असेल कदाचित्! परंतु अशा राजाचा उद्धार मी एकट्याने कसा काय करणार? त्यापेक्षां मी या गावात राहून शेत नांगरणे जास्त चांगले होईल असे मला वाटते." कालीवर्मा म्हणाला.

"परंतु ते काम तुझ्यासारख्या क्षत्रिय तरुणाला शोभणारे नाही. शिवाय तुझ्या बाबांनी मृत्युसमयी मला काय सांगितले होते, ते तुला माहीत आहे का?" असे सांगून बलभद्र कालीवर्माला एका खोलीजवळ बोलावून घेऊन गेला. ती खोली आजपर्यंत बंदच होती. ती उघडून बलभद्र कालीवर्माला आत बोलावून घेऊन गेला.

त्या खोलीत कालीवर्माचा बाप वापरी ती सर्व हत्यारे व आयुधे आणि कवच होते. त्यांशिवाय सोन्याची मूठ असलेली एक तलवार होती. बलभद्राने ती कालीवर्माच्या कंबरेला बांधली आणि त्याला कवच घालून म्हणाला–"पाहिलेस, ही सर्व आयुधे जणुकाही तुझ्यासाठीच तयार करून ठेवलेली आहेत! तुझ्या वडिलांनी तू एक शूर क्षत्रिय म्हणून नावलौकिक मिळवावा, अशी त्यांची इच्छा असल्याचे तुला सांगायला मला सांगितले होते. याउपर तुझी इच्छा!"

बापाने मुलासाठी ठेवलेले कवच व तलवार धारण केल्यावर कालीवर्माचा उत्साह वाढला. त्याने तलवार उपसून तिची धार कशी आहे, हे निरखून पारखून पाहिले. तलवारीचे पाणी पाहून म्हणाला–"बलभद्र! मी बाबांच्या आज्ञेचेच पालन करण्याचे ठरविले आहे. माझे भविष्य बनविणारा नांगराचा फाळ नसून ही तलवार आहे.

ते ऐकून बलभद्राला आनंद झाला. त्याने कालीवर्माच्या प्रवासाची सर्व तयारी करून कंबरेला तलवार बांधली. बरोबर खर्चासाठी शंभर सुवर्णमुद्रा घेऊन कालीवर्मा घोड्यावर बसला आणि चंद्रकळा नगरीच्या दिशेने निघाला. निघताना त्याने बलभद्राला राजदरबारात कामावर रुजू झाल्यावर सहा महिन्यांनी येऊन भेटेन, असे वचन दिले.

जंगलाच्या वाटेने दुपार होईपर्यंत कालीवर्माचा प्रवास निर्विघ्न पार पडला. उन्हाची वेळ होती म्हणून त्याने खाऊन पिऊन थोडी विश्रांती घ्यायचे ठरविले. तो कोठे ओढा किंवा तलाव आहे का शोध काढीत निघाला. एका चिंचोळ्या वाटेने त्याचा घोडा पुढे गेला. तो थोडेच अंतर गेला असेल, त्याला झाडावरून कोणीतरी कण्हत असल्यासारखा भास झाला.



कालीवर्मा चकित होऊन झाडाच्या पानाआड फांदीवर कोणी आहे का, लक्षपूर्वक पाहू लागला आणि आश्चर्य म्हणजे त्याच वेळी एक माणूस झाडावरून ओरडत खाली पडला. कालीवर्मा घोड्यावरून उतरून त्या असहाय माणसाकडे धावला. तो एक म्हातारा माणूस होता. सुदैवाने इतक्या उंचावरून पडला असूनही त्याला विशेष लागले नव्हते. म्हातारा माणूस कंबर धरून उठण्याचा प्रयत्न करीत होता. परंतु उठता न आल्याने पुन्हा खाली पडला.

त्याच वेळी कालीवर्मा त्याच्याजवळ जाऊन म्हणाला–"आजोबा! तुम्हांला उठता सुद्धा येत नाही आणि झाडावर



चढून कशाला हो बसला होतां? एखादं मधाचं पोळं दिसलं वाटतं?"

म्हाताऱ्याने कालीवर्माकडे खोल नजरेने निरखुन पाहिले व म्हणाला–"बाळा! तू कोणी राजाचा शिपाई दिसतो आहेस? मी म्हणालो, ते खरं आहे ना? पिकाची कापणी सुरू झाली म्हणजे तुम्ही येतां, इतर वेळी या प्रदेशात तुम्ही कधी दृष्टीस पडत नाही, होय की नाही?"

"मी राजाचा शिपाई नाही. ती नोकरी मिळावी म्हणून राजधानीच्या वाटेने निघालो आहे. परंतु मी विचारलेल्या प्रश्नाचं उत्तर नाही दिलंत तुम्ही? कोठे आहे, मधमाशीचे पोळे? तुमच्या हाताला किंवा पायाला लागलं तर नाही? नशीब बलत्तर आहे तुमचे?" कालीवर्मा एका श्वासात हे सर्व बोलला.

म्हातारा काही बोलल्याशिवाय कसा-बसा उठून उभा राहिला. चारपांच पावले चालून मनाची खात्री झाल्यासारखी मान हलवून म्हणाला–"तुझ्या म्हणण्याप्रमाणे माझे नशीब बलवत्तर तर खरेच! तसे नसते तर या खेपेस लुटेऱ्यांनी गांव लुटले त्या वेळी गावात त्यांचा मार खाऊन हातपाय मोडून नसते का घेतले?"

म्हातारा म्हणाला ते ऐकून कालीवर्माला सारांश कळला. म्हातारा, लुटेरे आले तेव्हा स्वतःला वांचविण्यासाठी पळून आला होता. झाडावर चढून लपून बसला होता व पाय घसरून खाली पडला.

तो म्हाताऱ्याला म्हणाला–"आजोबा! या प्रदेशात चोर आणि लुटेऱ्यांचा सुळ-सुळाट फार वाढला असल्याचे मी ऐकतो. परंतु दिवसाढवळ्या हे लोक गावात शिरून लुटालूट करतात हे मात्र मी ऐकले नव्हते. तुमच्या गावातले इतर लोक आहेत कोठे?"

"बाळा, लुटेरे येत असलेले पाहून सर्व लोक पळून गेले. चोर निघून गेल्यावर सर्व गावकरी एकेक परत येतील. हे सर्व नित्य घडत असते," म्हातारा म्हणाला.

राजाचा बेफिकीरपणा चांगला माहीत असून कालीवर्मा म्हाताऱ्याच्या तोंडीं वदवून घेण्याच्या हेतूने म्हणाला–"आजोबा, तरमग तुम्ही राजाला कां नाही कळविलेत? राजा शिपाई पाठवून चोरांचं पारिपत्य नाही का करणार?"

म्हातारा उदास व हताश झाल्यासारखा होऊन म्हणाला–"आम्ही त्यांना कळ-विणार? ते त्या आधीच येतात आणि अर्धे पीक उचलून घेऊन जातात. उरलेले पीक डोंगराळ प्रदेशात राहणारे लुटेरे गावात शिरून लुटून घेऊन जातात. राजाला हे माहीत नाही, असे वाटते का तुला?"

त्या वेळी झाडाआडून चार चोर समोर आले आणि धट्टेने म्हणाले–"म्हाताऱ्याने आम्हांला आज एक गुपित सांगितले की! यापुढे राजाचे शिपाई येण्यापूर्वीच आम्ही येत जाऊ. राजाचा वांटासुद्धा आम्हीच उचलून नेऊ." असे म्हणत त्यांनी तलवारी उपसल्या व कालीवर्माला दरडावून म्हणाले–"तुझे कवच, तलवार आणि घोडा पाहून तुझ्याजवळ नक्कीच रोख पैसे असले पाहिजेत याची आम्हांला खात्री आहे. मुकाट्याने पैशांची पिशवी खाली ठेव आणि चार पावले दूर जाऊन उभा रहा."

कालीवर्माने एकदांच चोरांकडे तीक्ष्ण दृष्टीने पाहिजे आणि घोड्याजवळ जाऊन भाकऱ्या बांधून आणल्या होत्या त्यांची पोटली काढून जमिनीवर ठेवली व चार पावले बाजूला सरकला. चोरांपैकी एकजण





घाईघाईने ती पोटली उचलायला वाकला मात्र, कालीवर्माने तलवार उपसून त्याची मान उडविली आणि विद्युत् वेगाने आणखी दोघा चोरांना तलवार भोसकून खाली पाडले.

चवथा चोर प्राणभयाने ओरडला आणि पळण्याचा प्रयत्न करू लागला. परंतु कालीवर्मा त्याच्या पाठीमागून धावला आणि त्याचे केस धरून त्याच्या कंबरेत लाथ मारली. तो जमिनीवर आदळल्यावर त्याला फरपटत म्हाताऱ्याजवळ ओढून घेऊन आला.

एकाएकी डोळ्यासमोर पटापट तिघे चोर मेलेले पाहून व चवथा स्वतःचा जीव वाचविण्यासाठी धडपडत असलेला पाहून म्हाताऱ्याचा स्वतःच्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. म्हणाला—"मुला! तू मोठाच पराक्रमी दिसतोस की रे! आमच्या गावात तुझ्यापेक्षा जास्त बळ असलेले तरुण कितीतरी आहेत. परंतु त्यांच्यापैकी एकाने देखील हे साहस दाखविले नाही!"

"हे काम त्या तरुणांकडून करवून घेईन. मी राजधानीच्या वाटेने जाईन. बाकीचे पाहायचे त्यानंतर पाहता येईल. तुम्ही भाकऱ्यांची ही पोटली उचला आणि आपल्या गावाची वाट धरावी. मी घोड्या-वर बसून या चोरालासुद्धा बरोबर घेऊन येतो." कालीवर्मा म्हणाला.

म्हातारा आणि कालीवर्मा तेथून निघणार तेवढ्यात काही गावकरी तेथे धावत धापा टाकीत आले आणि विचारू लागले—"आजोबा! काय हो झालं? तो ओरडा आम्ही ऐकला. ते ओरडणारे कोण होते हो?"

कालीवर्माने फक्त एकदांच त्या सर्वांकडे, कसे भित्रे आहेत, असे मनात म्हणत पाहिले व म्हणाला—"तुमच्यापैकी कोणी वाचला तर दिसत नाही मला! गावावर हल्ला करणाऱ्या चोरांना सर्वांनी मिळून तोंड देण्याऐवजी तुम्ही सर्व भित्र्यांसारखे पळून जातां? तुम्ही माणसं आहां की मेंढरं आहां?"

ते ऐकून सर्व लोक मान खाली करून उभी राहिले. तेव्हां म्हाताऱ्याने थोडक्यात घडलेला वृत्तांत त्यांना सांगितला व म्हणाला—"अरे ऐका तर! या आसपासच्या सर्व गांवात जे म्हातारे आहेत त्यांना सोडून बाकी सर्व या तरुणाला आपला पुढारी करून डोंगरात लपून राहणाऱ्या चोरांचा संहार करा. आपण दिवसासुद्धा घरदार सोडून आणखी किती दिवस जंगलात लपून आपला जीव वाचविणार? आपण माणसं आहों की हरणे आणि सशांसारखी भित्री पळपुटी जनावरे आहोत?"

ते ऐकून कालीवर्मा मनाचे समाधान झाल्यासारखा मान हलवून म्हणाला—"मी तुम्हांला सांगणार होतो तेच या म्हाताऱ्या आजोबांनी सांगितले आहे. आमच्या हातात सापडलेल्या या चोराच्या मदतीने चोरांच्या गुप्त गुहांचा शोध काढणे कठीण नाही. तुमच्यापैकी ज्यांना ज्यांना लाठी व भाला हाती धरता येतो ते सर्व माझ्या बरोबर चला. एका आठवड्याच्या आत सर्व चोरांना वाटेला लावून मी आपल्या वाटेने निघून जाईन."

त्यानंतर गावकरी कालीवर्माला आदर-पूर्वक आपल्या गावात घेऊन गेले. त्याला त्यांनी मेजवानी दिली. त्या दिवशी संध्या-काळी तरुणमंडळी दूरदूरच्या गावी जाऊन



त्या गावच्या तरुणांना बोलावून घेऊन आली. कालीवर्माने त्यांना चोरांना कसे वठणीवर आणायचे, हे समजावून सांगितले.

कालीवर्माने धरून आणलेल्या चोराने घाबरून जाऊन कालीवर्माला इतर चोर कोठे राहतात वगैरे गोष्टी सांगितल्या. किती कोणकोणत्या गुहेत राहतात आणि तेथपर्यंत जायची वाट कोणती, सर्व त्याने सांगितले.

कालीवर्माने गावातल्या तरुणांनाबरोबर घेऊन चोरांच्या गुहांवर छापा मारला आणि कित्येक चोरांना ठार केले. जे चोर वाचले ते राज्याची हद्द पार करून डोंगरांपलीकडच्या जंगलात पळून गेले.









चोरांना पळवून लावून कालीवर्मा राजधानीच्या वाटेने निश्चित होऊन जाऊ लागला. पंधरा दिवस प्रवास केल्यावर जंगल पार करून तो चंद्रशिला नगरीच्या शिवेवर पोचला असेल. एके दिवशी सूर्योदयाच्या सुमारास अचानक दहा घोडेस्वारांनी त्याला गराडा घातला. कालीवर्माला तलवार उपसायला संधीच मिळाली नाही.

घोडेस्वारांचा सरदार कालीवर्माकडे करड्या नजरेने पहात म्हणाला–"कालीवर्मा तूच ना? लुटेऱ्यांना राज्याच्या हद्दी बाहेर शेजारच्या राज्यात पळवून लावण्याचे धाडस करणारा तूच ना?"

"होय, मीच ते काम केले. असे साहसाचे काम करणाऱ्या माझ्या सारख्याला आदरपूर्वक राजधानीत बोलावून नेण्याऐवजी तुम्ही मला असा गराडा घालून कां उभे आहां? मी चोरी केली की कोठे दरोडा घातला?" कालीवर्माने आश्चर्यचकित होऊन घोडेस्वारांना विचारले.

ते उत्तर ऐकून घोडेस्वारांचा सरदार थट्टेच्या स्वरात हसत म्हणाला–"तू महाराज जितकेतूच्या राज्याविरुद्ध फार मोठा गुन्हा केला आहेस. आमच्या राज्यातून पळून गेलेल्या लुटेऱ्यांनी शेजारच्या राज्यात लूटपाट सुरू केली आहे. तेथील राजा आमच्यावर हा आरोप लावून की आम्हीच त्यांच्या राज्यात चोरांना पाठविले आमच्या महाराजांवर चिडला आहे आणि आमच्या राज्यावर स्वारी करण्याच्या धमक्या देत आहे. या सर्व गडबडीच्या मुळाशी तू आहेस. म्हणून तुला फाशी देऊन तुझे प्रेत आम्ही शेजारच्या राजाकडे पाठविणार आहो."

"तुमच्या राजाबरोबर तुमची डोकीसुद्धां फिरली आहेत की काय?" असे म्हणत कालीवर्मा तलवारीच्या मुठीवर हात ठेवणार तेवढ्यात घोडेस्वारांनी त्याला कैद केले आणि त्याला घोड्यावर बसवून राजधानीच्या दिशेने निघाले.

(क्रमशः)





# व्यर्थ परीक्षा

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हा प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! मला माहीत नाही की कोणी तुमची परीक्षा तर पहात नाही ना! काही लोक व्यर्थ परीक्षा घेत राहून अनावश्यक कष्ट देत राहतात. अशा परीक्षा घेऊन त्याना काही साध्य होते असेही नाही. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला कांचनवर्माची मुलगी रत्नप्रभा हिची गोष्ट सांगतो लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार प्राचीन काळी सिंहपुरीला कांचनवर्मा नावाचा एक राजा होता. त्याला रत्नप्रभा नावाची एक मुलगी होती. रत्नप्रभा वयात आल्यावर राजाने तिचे

## वेताळाच्या गोष्टी




लग्न करायचे ठरविले. परंतु एकाएकी राजा आजारी पडून मरण पावला. त्याच्या गादीवर वारस म्हणून रत्नप्रभा आली. ती राज्यकारभार पाहू लागली आणि लौकरच तिने त्यात आपल्या पित्यापेक्षाही जास्त यश प्राप्त केले. प्रजेचे दुःख व कष्ट आधीच समजून घेऊन ते वेळीच दूर करणे हेच शासनाचे खरे गुपित होय, असे ती सांगे.

सिंहपुरीच्या शेजारचे राज्य विजयपुरी येथील रविवर्मा नावाच्या राजाला रत्नप्रभेशी विवाह झाल्यास दोन्ही राज्यांचा अधिपती होण्याचा गौरव मिळू शकेल असे त्याला वाटत होते. शिवाय त्याला असेही वाटले की राज्य कारभारात दक्ष अशी एक राणी मिळाली तर अपार कीर्ती सुद्धा संपादन करता येईल.

तो विचार मनात येताच रविवर्माने रत्नप्रभेकडे दूत पाठवून विचारपूस करण्या ऐवजी स्वतःच जाऊन तिला मागणी घातली. तिने शांतपणे सर्व ऐकून घेतले व म्हणाली–"आपण स्वतः माझ्याशी विवाह करण्याची इच्छा व्यक्त केलीत, हे मी आपले परम भाग्यच मानते. परंतु मी असा विचार केला की जी व्यक्ती माझे पती होण्याची इच्छा मनात बाळगते आहे तिची एक लहानशी परीक्षा घ्यावी. ते आपल्याला मान्य आहे का?"

"कां नाही, ती परीक्षा द्यायला मी आनंदाने मान्य करीन आणि त्या परीक्षेत यश मिळविण्याचा यत्न करीन." रविवर्मा म्हणाला.

"परीक्षा तशी मोठी नाही. हिमालय पर्वतावर शंखवृक्ष नावाचे एक झाड आहे. आपण त्याची फुले आणावी." रत्नप्रभा म्हणाली.

"एवढेच, ही काही परीक्षा झाली का!" असे म्हणत रविवर्मा त्या झाडाच्या शोधार्थ निघाला.

तो घोड्यावर निघाला. परंतु हिमालयात शेकडो मैल प्रवास केल्यावरही शंखवृक्ष नावाचे झाड कोणते व कोठे मिळेल हे कोणी सांगू शकला नाही. हिमालय पर्वतातल्या दऱ्याखोऱ्यात हजारो मैल वणवण फिरत राहिल्यावर राजाची खात्री झाली की शंखवृक्ष नावाचे झाडच नसावे आणि तो परत आला.

रविवर्मा आपल्या देशाच्या सीमेवर पोचला तेव्हा त्याला कळले की शेजारच्या राजाने त्याच्या राज्यावर स्वारी करून ते काबीज केले आहे. अशातऱ्हेने तो दोन्ही बाजूनी अयशस्वी झाला. त्याने ती गोष्ट रत्नप्रभेला जाऊन सांगितली.

रत्नप्रभा त्याबद्दल सहानुभूती दाखवीत म्हणाली–"राजा! मी असे ऐकते की आपल्या गैरहजेरीत कालनेमी नामक राजाने आपले राज्य बळकावले आहे. परंतु आपण काळजी करण्याचे कारण नाही. मी आपले सैन्य पाठवून आपल्याला पुन्हा आपले राज्य मिळवून देईन."





तिने म्हटल्याप्रमाणे रविवर्माला त्याचे राज्य परत मिळवून दिले आणि त्याला पुन्हा गादीवर बसवून म्हणाली–"निदान यापुढे तरी आपण आपले राज्य सुरक्षित राहील याची काळजी बाळगावी."

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, आता तूच सांग, रविवर्माची परीक्षा रत्नप्रभेने घेतली त्याचा काही अर्थ आहे का? तिने रविवर्माचे राज्य गेल्याबद्दल सहानुभूतीसुद्धा दर्शविली आणि त्याला त्याचे राज्य परत मिळवून दिले. अशा परिस्थितीत तिला त्याच्याशी लग्न करून घेता आले असते. तसे तिने का केले नाही. या शंकेचे समाधानकारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर तुला त्याचा परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य राजा म्हणाला–"रत्नप्रभा राजनीतीत दक्ष होती. रविवर्माने तिच्याशी विवाह करण्याची इच्छा प्रगट केली तेव्हांच त्याच्या मनात दोन्ही राज्यांवर राज्य करण्याची इच्छा असल्याचे तिने ओळखले. परंतु राज्याचे रक्षण करण्याची क्षमता त्याच्यात किती आहे, ही गोष्ट कळावी, या हेतूनेच तिने ती परीक्षा घेतली. जर तो राज्यकारभारात हुशार असता तर त्याला रत्नप्रभा घेत असलेली परीक्षा व्यर्थ असल्याचे नक्कीच कळले असते. ते कळत नसल्यामुळेच त्याला कित्येक दिवस हिमालय पर्वतात भटकत फिरावे लागले व तो आपले राज्य गमावून बसला. तो राज्य घालवून बसला त्याला कारण रत्नप्रभाच होती. म्हणून तिने ती जबाबदारी ओळखून त्याला त्याचे राज्य परत मिळवून दिले. परंतु तो आपला पती होण्यालायक नाही, हे मात्र तिला चांगले माहीत झाले!"

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# यशस्वी योजना

एका गावात कमला आणि विमला नावाच्या दोघी विधवा रहात असत. कमलाला वैद्यनाथ नावाचा मुलगा होता आणि विमलाला जानकी नावाची मुलगी होती. कमलाच्या पतीने व विमलाच्या पतीने परस्पर विचार करून त्यांची मुले वयात आल्यावर दोघांचा विवाह करून परस्परांशी नाते जोडून घ्यायचे ठरविले होते. परंतु दोघांची अपत्ये लहान असतांनाच दोघे एका अपघातात प्राणास मुकले.

पुढे वैद्यनाथ व जानकी मोठी होऊ लागली तसतसा कमला आणि विमला दोघींच्या विचारात बदल होत गेला. कमलाने विचार केला की वधुपित्याकडून मोठी रक्कम हुंड्याच्या नावाने घेता येईल. तिकडे विमला तिच्या मुलीचे लग्न शहरात राहणाऱ्या चांगल्याशा सुशिक्षित तरुणाशी करून द्यायच्या विचारात होती.

वैद्यनाथ व जानकी दोघांच्या मनात परस्परांशी विवाह व्हावा असे होते. परंतु दोघांच्या मातांनी दुसऱ्या स्थळाचा शोध सुरू केला तेव्हा त्या दोघांनी ते प्रयत्न हाणून पाडायचे ठरविले.

एके दिवशी सदाशिवराव नावाचे एक श्रीमंत गृहस्थ वैद्यनाथच्या स्थळाची चौकशी करायला कमलाच्या घरी आले. कमलाने फार उत्साहाने सदाशिवरावांचा आतिथ्य सत्कार केला. त्यावेळी वैद्यनाथ शेतावर गेला होता. त्याच्या स्थळाची चौकशी करायला कोणी आले असल्याचे कळल्यावर तो रिकाम्या हाताने घरी परत आला. त्याला पाहून त्याच्या आईने विचारले–"बाळा, कुदळ फावडे वगैरे कोठे आहेत रे?"

तो म्हणाला–"कुऱ्हाड मी तोडत होतो त्या झाडाजवळ आहे, आणि कुदळ फावडे शेतात."

"पण ते झाड कोठे आहे रे?" आईने विचारले. "कुऱ्हाड आहे तेथेच झाड आहे!" तो म्हणाला.

सदाशिवराव वैद्यनाथचे ते उत्तर ऐकून चकित झाले. परंतु कमला प्रसंग सावरण्यासाठी म्हणाली—"होय रे! परंतु तू इतका वेळ करीत काय होतास?"

"मी नारळाच्या झाडावर चढून बसलो होतो." वैद्यनाथ म्हणाला.

"झाडावर? कशाला?" आईने विचारले.

"वासरासाठी गवत आणायला!" तो म्हणाला.

दोघांचे संभाषण ऐकून काही बोलल्याशिवाय सदाशिवरावांनी तेथून पाय काढला.

कमला चिडून म्हणाली—"तुझ्या नशिबांत चांगलं स्थळ लिहिलेले नाही!"

तो म्हणाला—"जानकीपेक्षा आणखी चांगली मुलगी कोठे मिळणार आहे का?"

तिकडे जानकीला पहायला शहरातून कोणी बाई आल्या होत्या. त्यांनी तिला विचारले—"मुली, वरणाला खमंग वास यावा यासाठी काय केले पाहिजे ग?"

"चुलीत घातलं की छान स्वादिष्ट होते!" जानकी म्हणाली.

ती बाई उत्तर ऐकून थक्कच झाली. इतक्यात एक कोंबडी घरात शिरली. जानकीने तिला केरसुणीने मारून पळविले.

"हे काय ग? कोंबडीला केरसुणीने मारायला तू धावलीस?" जानकीची आई तिला रागावून म्हणाली.

"आई, मला ती माझी सासू आहे असं वाटलं ग!" जणू तिचे चुकल्यासारखं तिने उत्तर दिलं.

त्या बाई त्यानंतर उठल्याच आणि घराबाहेर पडल्या.

तेव्हा कमला व विमलाला कळलं की त्यांनी आणलेले एकही स्थळ त्यांच्या मुलांना पसंत नाही. त्यांनी स्वतःच्या मनाविरुद्ध वैद्यनाथ व जानकी दोघांचा विवाह करून दिला. दोघींच्या पतींची इच्छा पूर्ण झाली.



# दान

एक जमिनदार फार मोठा दानी म्हणून प्रसिद्ध होता. तो एका अत्यंत विश्वासातल्या सल्लागाराबरोबर कोठे तरी जात होता. त्या वेळी एक भिकारी जमिनदाराजवळ येऊन म्हणाला—"मालक! काहीतरी अंगात घालायला द्यावे. मला थंडीचा फार त्रास होतो."

त्यावेळी जमिनदाराचा सल्लागार आपल्या मेहुण्याला काहीतरी काम द्यावे म्हणून शिफारस करण्याच्या हेतूने जमिनदाराशी बोलत होता. त्याने जमिनदाराऐवजी स्वतःच मोठ्या औदार्याने म्हटले—"अरे, उद्या ये माझ्या घरी आणि घेऊन जा."

त्या भिकाऱ्याने जमिनदाराच्या सल्लागाराच्या घरी अनेक चकरा घातल्या. तेव्हा अगदी कंटाळून त्या सल्लागाराने एक जुना फाटका सदरा त्याच्या अंगावर फेकला.

त्या भिकाऱ्याने त्या सदऱ्यावर 'हा जमिनदाराने दिलेला सदरा' असे लिहिले आणि तो सदरा घालून गावात हिंडू लागला.

एकदा जमिनदाराने त्याला तो सदरा घातला असतां पाहिले आणि विचारले—"मी तुला हा जुना फाटका सदरा दिल्याचे मला आठवत नाही?"

भिकारी म्हणाला—"आपल्या तर्फे आपल्या सल्लागारांनी तो दिला होता, मालक!"

ते ऐकून जमिनदाराने चांगले कपडे त्याला देवविले.





# सोन्याच्या नाण्याचे गुपित

रतनपूरचा राजा भानुगुप्त निवर्तल्यावर त्याचा मुलगा सोमगुप्त गादीवर बसला. रतनपूर ही व्यापाराची एक मोठी पेठ होती. भानुगुप्तने आपल्या कारकीर्दीत राज्याची आर्थिक स्थिती चांगलीच सुधारली.

सोमगुप्त लहान वयातच गादीवर आला. राजाचा एकुलता एक मुलगा होता, फार लाडात वाढला होता. त्याची मित्रमंडळी देखील चांगली नव्हती. मयत राजाला प्रधान नेहमी सल्ला देई की युवराजांना राजनीती व अर्थशास्त्र शिकविण्याची महाराजांनी व्यवस्था करावी. परंतु राजा उत्तर देई–"अजून लहान आहे, शिकेल सावकाश!"

परंतु ऐन वयात भानुगुप्तला मरण आले. म्हणून सोमगुप्तावर लहान वयात राज्य कारभाराची जबाबदारी येऊन पडली. तो आपल्या दुष्ट मित्रांचा सल्ला मानून काम करी. त्याने आपल्या चांगल्या कर्तबगार अधिकाऱ्यांना मित्रांच्या सल्लयाने कामावरून कमी केले. परंतु कित्येक वर्षांपासून काम करीत असलेल्या वृद्ध प्रधानाला तो काढू शकला नाही. कारण प्रजा त्याला फार मानीत असे.

एकदा राज्याच्या उत्तरेच्या सरहद्दीवर डोंगराळ मुलखात बंड झाले. तो मुलुख एक भिल्ल सरदाराच्या अधीन होता. सेनापतीला बंडाची बातमी फार पूर्वीच मिळाली होती. त्याने वेळीच छापा मारून भिल्ल सरदाराच्या अधिकाराला बराच मुलख काबीज केला. परंतु सोमगुप्तच्या मित्रांपैकी एकाची भिल्लसरदाराशी मैत्री होती. त्याने राजाचे कान भरले की सेनापतीने भिल्ल सरदाराच्या ज्या मुलुखावर अधिकार केला आहे तो परत भिल्ल सरदाराला परत करून त्याबद्दल त्याची माफी मागावी.

तेव्हा सेनापतीने राजाला समजावून सांगितले की महाराज, मयत महाराजांच्या ऐन मृत्युसमयी त्या भिल्ल सरदाराने शत्रूशी संगनमत करून राज्याविरुद्ध एक कट केला होता. ते कळतांच मी मनाशी ठरविले होते मी प्राणपणाने हे बंड मोडणार असे.

परंतु सोमगुप्त करड्या आवाजात म्हणाला–"माझा हुकूम आहे, आणि तू त्याचे पालन केले पाहिजेत."

"तर मग मला या पदावरून काढून टाकावे, महाराज!" सेनापती तितक्याच स्पष्ट शब्दात म्हणाला.

ते ऐकून सोमगुप्त थोडा नरमला. कारण सेनापतीच राजीनामा देऊन बाजूला झाला तर सैन्यात बंडाळी माजण्याची त्याला भीती वाटली. कारण सैन्यातल्या प्रत्येक सैनिक सेनापतीचा आदर करीत असे. म्हणून सोमगुप्तला सेनापतीच्या इच्छेप्रमाणेच त्याला वागावे लागले.

त्या काळात रतनपूर राज्यात खऱ्या सोन्याची नाणी होती. देशात जवढं सोने होते ते सर्व सुवर्ण मुद्रारूपेच होते. त्या नाण्यांना शेजारच्या परकीय राज्यातसुद्धा चांगली किमत होती. म्हणून देशात व्यापाराची चांगली भरभराट होत होती.



परंतु सोमगुप्ताच्या एका मित्राने त्याला असा सल्ला दिला–"महाराजांनी आपल्या वाडवडिलांच्या जुन्या काळातली नाणीच चालू ठेवली आहेत. हे बरोबर नाही. त्या खऱ्या सोन्याच्या नाण्यात थोडे तांबे मिसळले तर बरेच सोने वाचेल आणि ते महाराजांच्या स्वतःच्या मालकीचे होईल."

त्यानंतर सोमगुप्तने त्या सल्ल्याप्रमाणे टंकसाळेत तांबे मिसळलेल्या सोन्याची नाणी पाडायला आज्ञा केली. ती गोष्ट अर्थातच सर्व दरबारी मंडळींना आवडली नाही. भरल्या दरबारात खजिन्याचा मुख्य अधिकारी म्हणाला–"महाराज! आपण माझ्याशी सल्ला मसलत केल्याशिवाय तशी



आज्ञा काढायला नको होती. आपल्या वडिलांच्या कारकीर्दीत अशी गोष्ट कधीच घडली नाही."

सोमगुप्त म्हणाला–"हे पहा, आता काळ बदलला आहे. ही राजवट आता माझ्या वडिलांची नसून माझी आहे. मला जे बरे वाटेल तेच मी करणार."

अधिकारी ते उत्तर ऐकून संतापला व म्हणाला–"क्षमा करा, महाराज! आपल्याला किंवा आपल्याला सल्ला देणाऱ्या मित्रांना नाण्याच्या प्रचलनशास्त्राची माहितीच किती आहे?"

"ए थेरड्या! तुला तरी चलनशास्त्राचे ज्ञान किती आहे रे? नाण्यात सोन्याचा अंश कमी केल्याने काय नुकसान होणार आहे? नाण्यावर जी किंमत लिहिलेली असते तीच त्याची किंमत असते. आले का लक्षात?" राजा दरडावून म्हणाला.

"महाराज चुकता हेत! माझ्यासारख्या जुन्या अधिकाऱ्यांना मिसळलेल्या सोन्याची नाणी आणि खऱ्या सोन्याची नाणी दोन्हीतील फरक फक्त वासाने कळतो." अधिकारी तितक्याच उच्चस्वरात म्हणाला.

तो तेवढ्यावरच थांबला नाही. रागाच्या भरात तो राजाला मूर्ख, आततायी सुद्धा म्हणाला. ते ऐकून राजाच्या मित्रांनी शिपायांना संबोधन करून आज्ञा केली–"याला कैद करा!" राजाचा अपमान केल्याबद्दल खजिन्याच्या मुख्य अधिकाऱ्याला कैदेत टाकण्यात आले.

सोमगुप्ताचा तो आततायीपणा कोणालाच आवडला नाही. परंतु कोणीच उघडपणे राजाच्या विरुद्ध बोलू शकले नाहीत. खजिन्याच्या अधिकाऱ्याला कैद केल्याबद्दल ज्यांना राग आला होता, किंवा वाईट वाटले होते त्यात दरबारी जादुगार मायाधरदेखील एक होता. तो तुरुंगात खजिन्याच्या अधिकाऱ्याला जाऊन भेटला व त्याच्याशी काहीतरी महत्वाचे बोलला व बोलणे झाल्यावर मनाचे समाधान झाल्यासारखा घरी परतला.

सोमगुप्त लहानपणी मायाधरच्या मागे-मागे असे. कारण त्याला त्याचे जादूचे प्रयोग फार आवडत.

एके दिवशी सोमगुप्त एकांतात विश्राम करीत असतां मायाधर तेथे गेला आणि खजिन्याच्या अधिकाऱ्याची गोष्ट काढून म्हणाला–"महाराज! मला वाटते तो म्हणतो आहे त्यात काही अर्थ असू शकेल. कधीकधी अनुभवाने माणसाला अद्भुत सिद्धी प्राप्त होतात. कदाचित खऱ्या सोन्यात व मिसळीच्या सोन्यात जो फरक आहे, तो नुसता वास घेऊन त्यांना कळत असेल. शिवाय तो अधिकारी चलन-शास्त्राचा तज्ज्ञ आहे. तेव्हां त्याला खऱ्या खोट्या नाण्यातील फरक ओळखण्याची सिद्धी प्राप्त आहे की नाही याची परीक्षा करवून पाहण्यात काय हरकत आहे? त्याला खरोखरच ती सिद्धी प्राप्त असेल तर त्याला माफ करावे. तो आपल्याला थोडा चढेलपणे बोलला असला तरी त्याने इमाने इतबारे दीर्घकाळ महाराजांच्या राज्याची सेवा केली आहे!"

"त्याला प्राप्त असलेल्या सिद्धीची परीक्षा कशी घ्यायची?" सोमगुप्तने मायाधरला विचारले.

"चार मिसळ असलेली नाणी आणि फक्त एक खरे नाणे एकाच तऱ्हेच्या



पिशव्यांतून बंद करून त्या पिशव्या मिसळून ठेवायच्या, आणि त्याला खरे नाणे ठेवलेली पिशवी कोणती ते ओळखायला सांगायचे. तसे तो करू शकला तर तो नाण्यांच्या शास्त्रांचा खरोखरच तज्ज्ञ आहे हे मानावे लागेल. काय वाटते आपल्याला?" मायाधरने विचारले.

सोमगुप्तने त्या गोष्टीस मान्यता दिली. त्यानंतर महाराजांच्या परवानगीने मायाधरने खजिन्याच्या अधिकाऱ्याची परीक्षा घेण्यासाठी योग्य ती तयारी केली. त्याने एकाच लांबीरुंदीच्या व रंगाच्या पांच पिशव्या घेतल्या. एका पिशवीचे तोंड आपल्या बाजूला करून उघडले. एक बारीक

पातळशी काडी पिशवीच्या एका कोपऱ्यात गोंद लावून चिकटवून ठेवली. उरलेल्या चार पिशव्यां मात्र जशाच्या तशाच ठेवल्या.

अधिकाऱ्याची परीक्षा होती त्या दिवशी दरबार खचाखच भरला होता. टेबलावर चार मिसळ असलेली नाणी आणि एक खरे नाणे होते. मायाधरने अधिकाऱ्यासमोर एकेक नाणे घेऊन एकेका पिशवीत ठेवले आणि पिशव्यांची तोंडे बंद केली. नंतर पांचही पिशव्या एका मोठ्या भांड्यात टाकल्या. नंतर अधिकाऱ्याच्या डोळ्यांवर पट्टी बांधण्यात आली. भांड्यावर एक फडके टाकण्यात आले. अधिकाऱ्याला भांड्या-जवळ आणण्यात आले. त्याला भांड्यात हात घालून खरे नाणे कोणत्या पिशवीत आहे ती पिशवी काढून दाखवायला सांगण्यात आले. अधिकाऱ्याने एकदोन मिनिटातच आतल्या आत पिशव्या तपासून त्याला हवी होती ती पिशवी बाहेर काढली.

अधिकाऱ्याने काढून दाखविलेल्या पिशवीचे तोंड फाडून मायाधरने एक नाणे बाहेर काढले. ते खरे नाणे होते. ते पाहून सर्व दरबारी व राजा चकित झाले.

त्याच वेळी सेनापती काही परदेशी नागरिकांना अटक करून दरबारात घेऊन आला. त्या लोकांना पाहून सोमगुप्तच्या मित्रांचे चेहरे पडले. ते तेथून पाय काढण्याच्या प्रयत्नात असतां सेनापतीने त्यांना कैद करण्यास आज्ञा केली.

परदेशी लोकांनी आपला अपराध स्वीकार केला. त्यांनी कबूल केले की काही इतर देशांतील लोकांनी सोमगुप्तच्या मित्रांच्या मदतीने रत्नपूरवर स्वारी करण्याचा कट केला आहे. तेव्हां सोमगुप्तचे डोळे उघडले व त्याने त्या दिवसापासून मंत्र्यांच्या सल्ल्याप्रमाणे वागण्याचे ठरविले.

मायाधरने ज्या पिशवीच्या एका कोपऱ्यात काडी चिकटवून ठेवली होती, त्याच पिशवीत खरे नाणे ठेवलेले होते. इतर पिशव्यात खोटी नाणी ठेवली होती. म्हणून अधिकाऱ्याला खरे नाणे कोणत्या पिशवीत आहे, हे ओळखणे शक्य झाले.



# विचित्र फेरीवाला

सत्यशील नावाच्या राजाचा एक नियम होता. त्याच्याकडे दररोज सकाळी कोणी फेरीवाला एखादी वस्तू विकायला घेऊन आला की तो मागेल ती किंमत देऊन राजा ती विकत घेत असे. असे केल्याने त्याचे स्वतःचे व देशाचे हित होईल असे त्याला वाटे.

त्या गावात एक गरीब ब्राह्मण रहात असे. त्याने विचार केला की आपले दारिद्र्य आपल्याला कधी सोडणार नाही. ते आपण राजाला विकून टाकावे. त्याने आपली फाटकी घोंगडी आणि फाटक्या वहाणा एका गाठोड्यात बांधून उजाडतांच राजवाड्यासमोर ओरडू लागला—"घ्या हो घ्या, अनमोल सौदा, कधी न पाहिलेला !"

राजाने नोकराला पाठवून त्याला बोलावून घेतले आणि विचारले—"काय आणलं आहेस विकायला ?"

तो म्हणाला—"मी आपले दारिद्र्य विकतो आहे ! कित्येक पिढ्यांपासून ते माझ्या वंशात आले आहे !"

"कितीला विकणार आहेस ?" राजाने विचारले.

"पांचशे सुवर्णमुद्रांना, महाराज !" ब्राह्मण म्हणाला.

राजाने पांचशे मुद्रा देऊन ते गाठोडे विकत घेतले.





# पुत्र वात्सल्य

शारदा नावाच्या एका श्रीमंत बाईला चंद्रशेखर नावाचा एकुलता एक मुलगा होता. चंद्रशेखर लहान असतांनाच त्याचे वडील वारले. म्हणून शारदानेच मुलाच्या सर्व शिक्षणाची वगैरे व्यवस्था करून तो मोठा झाल्यावर सुभद्रा नावाच्या मुलीशी त्याचे लग्न करून दिले.

सुभद्रा सासरी आली. तिला तिच्या सासूची सर्व कामे पसंत पडली, तिला नाही आवडली ती फक्त तिची दानवृत्ती. शारदा सढळ हाताने खर्च करी. कोणी अडी-अडचणीच्या वेळी मागायला आला तर काय वाटेल ते उचलून देई. त्यात सुभद्रेला वाईट वाटून घ्यायचे कारणच नव्हते. कारण शारदा मुलाच्या मिळकतीतला एक पैसा देखील उचलत नसे. तिची स्वत:ची मोठी इस्टेट होती. परंतु सुभद्राच थोडी चिकट स्वभावाची होती. तो हा विचार करून दु:खी होई की तिच्या नवऱ्याची मिळकतच सासू उडवून टाकते आहे.

मनातले हे दु:ख ती फार दिवस लपवू शकली नाही. ती उघड एकदां तसे सासूला म्हणाली सुद्धा. तेव्हा शारदा तिला म्हणाली–"मुली! आपल्या जवळ चार पैसे आहेत त्यातले दोन पैसे उचलून गरजू गोरगरिबांना देण्यात काही चूक आहे का? ही एवढी इस्टेट आपण आपल्याबरोबर घेऊन जाणार आहो का?"

तरी सासूला दान करताना पाहून सुभद्रा चिडत असे. शेवटी त्रासून जाऊन शारदा सुनेला म्हणाली–"तू आपल्या माहेरून जे काही घेऊन आली आहेस, त्यातले काही उचलून मी कोणाला दिले आहे का? मग तू का एवढे मनाला लावून घेतेस?"

आता सुभद्रेला वाटू लागले की सासूची ती संवय जाणे शक्य नाही. एके दिवशी ती आपल्या पतीला म्हणाली–"आपल्या मातीश्रींचा व्यवहार तुम्ही पाहतांच आहां! त्या अशाच दानधर्म करीत राहल्या तर आपल्याला एके दिवशी चौपट्टी हाती घ्यावी लागेल." म्हणून तुम्ही त्यांना काय ते नीट समजावून सांगा!"

"आईला मी समजावून सांगणार? तिच्यापेक्षा आपल्याला जास्त कळते का?" असे सांगून चंद्रशेखरने बायको म्हणाली तिकडे दुर्लक्ष केले. परंतु तिचे टुमणे चालूच होते. शेवटी कंटाळून जाऊन त्याने बायकोला विचारले–"आतां मी काय करू म्हणतेस?"

"पुढे आपला संसार नाही का? म्हणून आतांपासुन संभाळून नको का रहायला? निराळं रहावं म्हणजे बरं!" सुभद्रा म्हणाली.

बायकोच्या बोलण्यात येऊन चंद्रशेखरने वांटणी करविली व बायको बरोबर निराळा संसार थाटला. काही दिवसांनी सुभद्रेला मुलगा झाला.

एके दिवशी संध्याकाळी चंद्रशेखर घरी परत आला तेव्हां त्याची बायको शेजा-रणीला समजावून सांगत होती–"आप-ल्याला मुलांची काळजी नको का घ्यायला?" शेजारीण म्हणत होती–"आपण इतके कष्ट करतो आणि त्यांना शिकवितो, पण पुढे ही मुलं आईवडिलांची फिकीर करतीलच हे



कोणी सांगू शकेल का? वडीलधारी मंडळी म्हणतात की बालपणी ही मुले आई-वडिलां कडून लाड पुरवून घेतात, परंतु मोठी झाल्यावर बायकोच्या हातचे बाहुलं होतात."

त्याला उत्तर म्हणून सुभद्रा म्हणाली– "मला इतर कोणाचं सांगू नका. परंतु मी आपल्या मुलाला तसा होऊ देणार नाही. मी त्याला आपली सर्व शक्ती खर्च करून चांगलं वळण लावीन, म्हणजे मोठा झाल्यावर तो आईवडिलांच्या मिळकतीवर उडाणटप्पू व स्वार्थी होणार नाही."

चंद्रशेखरने ते सर्व ऐकले आणि दुसऱ्या दिवशी आईकडे जाऊन रहायचे ठरविले.

ते पाहून सुभद्रेने विचारले–"हे काय चालविले आहे हो तुम्ही? डोकं फिरलं तर नाही?"

"नाही, आतांपर्यंत फिरलं होतं, ते आतां ठिकाणावर आलं आहे. सुभद्रा, तुझा मुलगा स्वार्थी अप्पलपोटा होऊ नये, असेच तुला वाटते ना? पण तुझा नवरा मूर्खपणा करू लागला तर तो तुला गैर वाटत नाही. हेच मला दाखवायचे आहे."

सुभद्रा आदल्या दिवशी शेजारणीशी जे बोलली होती, ते तिला आठवले व निरुत्तर झाली.

नंतर चंद्रशेखरने तिला समजावून सांगितले–"हे पहा, सुभद्रा! तू आपल्या मुलाला जितक्या प्रेमाने वाढविते आहेस, तितक्याच प्रेमाने माझ्या आईने मला लहानाचे मोठे केले आणि तिला साहजिकच असे वाटत राहिले की म्हातारपणी मुलगा तिची काळजी वाहील. परंतु मी तुझ्या बोलण्यात येऊन तिचा अनादर केला."

ते ऐकल्यावर सुभद्रेचे डोळे उघडले व ती आपल्या सासूचा आदर करू लागली आणि तिला सुखी करण्याचा प्रयत्न करू लागली.





# राक्षसाचा शोध

छोटू आपल्या कुत्र्याबरोबर एका पर्वताजवळ आला. त्या पर्वताच्या पायथ्याशी कांचनपूर नावाचे गाव होते. छोटू गावाबाहेरच्या तलावाचे पाणी पिऊन विश्रांती घ्यायला बसला. इतक्यात एक विचित्र गोष्ट त्याला दिसली.

त्या गावातला एक माणूस एका गाढवाला आणि एका बोकडाला हाकत एका गुहेजवळ आला. गाढवाच्या पाठीवर धान्याची गाठोडी आणि काही भाजलेल्या कोंबड्या होत्या. गुहेजवळ पोचल्यावर त्या माणसाने बोकडाला त्या गाढवाच्या गळ्याला बांधले आणि त्यांना गुहेत हाकून बाहेर उभा राहिला. बकरा "बें बें" करीत होता तरी गाढव त्याला ओढून गुहेत घेऊन गेले.

छोटूने त्या माणसाला विचारले–"गुहेत कोण राहतो रे? तू गाढवावर इतकं धान्य व कोंबड्या कशाला आणि कोणासाठी पाठविल्या आहेस? आणि तू बाहेर असा कां उभा आहेस?"

तो माणूस काही वेळ आश्चर्याने छोटूच्या तोंडाकडे पहात उभा राहिल्यावर म्हणाला–"सांगण्यासारखं काय आहे? परंतु सांगतोच. आमच्या गावावरचे हे संकट केव्हा टळेल, हे त्या परमेश्वरालाच ठाऊक! तूर्ततरी आमच्या गावकऱ्यांना निद्रा व आहार सुखाने मिळत नाही."

"हे पहा, मी गांवगांव हिंडतो. मी काही गावांना असल्या संकटांतून वांचविले आहे. ऐकू दे तरी तुमच्या गावावर कोणता असा प्रसंग ओढवला आहे तो. कदाचित् मला सुचेल काही मार्ग. मी प्रयत्न करून पाहतो. ऐकू दे तरी कोणते संकट आहे ते!" छोटू म्हणाला.

तेव्हा तो माणूस हसू लागला. म्हणाला– "अरे बाबा! असली संकटं मंत्रातंत्रांनी













दूर होणारी असती तर आमच्या गावच्या भूतवैद्याने ती केव्हाच दूर केली असती. त्यालाच खाऊन टाकणाऱ्या राक्षसाला तू मारणार आहेस का? तो तर तुला पाहताच उभा गिळून टाकील. असे सांगतात की त्या राक्षसाने फार पूर्वी या गुहेत राहून आमच्या गावातल्या सर्व लोकांचा फडशा उडविला होता. आतां गावात जे लोक आहेत ते तेव्हा गावाबाहेर पळून गेले होते, म्हणून वाचले. त्यानंतर एका वर्षाने पुन्हा हळूहळू गावात येऊन राहू लागले. त्यांना वाटले की राक्षस गुहेतून निघून गेला असावा. नंतर गेले काही महिने गावातली मेंढरे व बकऱ्या नाहीशा होऊ लागल्या. एके दिवशी भूतवैद्याच्या शिष्यांना या डोंगरात ताडामाडा एवढा एक मोठा राक्षस दिसला. भूतवैद्य फार धाडसी होता. तो एकटा गुहेत गेला. राक्षसाला भेटून त्याने त्याला समजावून सांगितले की गावकरी त्याच्याकडे पाळीपाळीने अन्न व इतर आहार पाठवीत राहतील. त्याने कोणाला विनाकारण त्रास देऊ नये. राक्षसाने ते मान्य केले. परंतु एकदा गावकऱ्यांनी राक्षसाबरोबर झालेल्या ह्या समेटाविरुद्ध काम केले. म्हणून गावावर पुन्हा मोठे संकट आले. भूतवैद्याच्या कुटुंबातली माणसं आणि त्याच्या चार शिष्यांच्या कुटुंबातले लोक एकदा जत्रेला निघाले. ते याच गुहेच्या वाटेने गेले होते. त्यांच्यापैकी एक माणूसही परतला नाही. गावकऱ्यांना अशी शंका वाटली की त्या राक्षसाने त्यांना ओढून गुहेत नेलं असावे आणि खाऊन टाकलं असावे. भूतवैद्याला सुद्धा तेच वाटलं आणि त्याला फार राग आला. तो सामान्य माणूस नव्हता. त्याच्या समोर मोठमोठी भुतं चळचळ कांपत. त्याला त्या राक्षसाचा अत्याचार असह्य वाटला. एके दिवशी तो आपल्या चार शिष्यांना बरोबर घेऊन गुहेत गेला, परंतु त्यांच्यापैकी एक जणही परतला नाही. राक्षसाने त्यांनासुद्धा खाऊन टाकले असावे. त्यानंतर गावकऱ्यांनी सभा केली आणि देवावर भरंवसा ठेवून राक्षसाकडे अन्न कोंबड्या आणि बोकड दररोज पोचते करायचे ठरविले. तेव्हांपासून आम्ही जीव मुठीत धरून गावात कसे बसे रहात आहो."

छोटूला सर्व वृत्त ऐकल्यावर एक शंका वाटली. त्याने त्या गावकऱ्याला विचारले— "काय रे, त्या राक्षसाने भूतवैद्याला आणि त्याच्या चार शिष्यांना खाल्ले म्हणालास तू, तर असं सांग की त्यांनंतर कोणी गावकऱ्याने त्या राक्षसाला कधी पाहिले का?"

"नाही, राक्षस आम्ही पाठविलेल्या अन्नामांसावर तृप्त झाला असावा. नाही तर त्याने आमचे गाव उध्वस्त केले नसते का?" तो माणूस म्हणाला.

छोटूला ती राक्षसाची गोष्ट पूर्ण खोटी असल्यासारखे वाटले. कारण ज्या लोकांनी राक्षसाला पाहिले होते, त्यांना राक्षसाने खाऊन टाकले म्हणे. त्यानंतर गांवकऱ्यांनी अन्न व मांस पाठवायला सुरवात केली. तेव्हापासून तो राक्षस कोणाच्या वाटेला गेला नाही, ही गोष्ट कशी मान्य होणार? जर राक्षसाची गोष्ट कपोलकल्पित आहे तर ती गोष्ट भूतवैद्याला माहीत नसेल, असे होणेच शक्य नाही. कारण त्यानेच राक्षसाशी समेट घडवून आणला होता, म्हणे. आणि आतां राक्षसाची गोष्ट जर



केवळ कपोलकल्पित गोष्ट असेल, तर तो भूतमांत्रिक व त्याचा शिष्यवर्ग सकुटुंब गुहेतच असला पाहिजे. त्यांना गावकरी आहार पुरवीत आहेत.

आपला अंदाज बरोबर असला पाहिजे अशी मनाची खात्री पटल्यावर छोटू हे बिंग कसे फोडायचे हे मनाशी ठरवून आपल्या कुत्र्याबरोबर गावात गेला.

त्या दिवशी काळोखात छोटू गुहेजवळ गेला आणि कानोसा घेऊ लागला. गुहेत त्याला पुष्कळ लोक असल्याचा भास नव्हे, खात्री झाली. गुहेतून दिव्याचा उजेड बाहेर येत असलेला दिसला. तो मांजराच्या पावलांनी गुहेत गेला. त्याला अंधुक उजेडात

पंचरावीस स्त्रीपुरुष व मुलंबाळं दिसली. ते सर्व खात बसले होते. मांसाचा उग्र वास येत होता. परंतु राक्षस कोठेच दिसला नाही.

दुसऱ्या दिवशी छोटूने गारातल्या तरुण मंडळींना बोलावून त्यांना त्याने जे पाहिले होते ते वर्णन करून सांगितले. म्हणाला–"मी काल रात्री गुहेत जाऊन प्रत्यक्ष पाहून आलो. गुहेत एक नाही, कित्येक राक्षस आहेत. परंतु ते भयंकर राक्षस मात्र नाहीत. असल्या राक्षसांना मी यापूर्वी चांगला धडा शिकविला आहे. अशा दुष्टांना भिऊन तुम्ही अर्धपोटी राहणे आणि त्यांना चारणे मूर्खपणा आहे."

छोटू म्हणाला ते ऐकून तरुणमंडळी तो पुढे काय म्हणतो ते ऐकायला उत्सुक दिसली. छोटू पुढे म्हणाला–"मी तुम्हांला जे सांगितले ते चांगलं समजून घ्या. एकदां एखाद्या राक्षसाला किंवा रानटी जनावराला माणसाचं मांस खायला मिळालं की ती बकऱ्या मेंढरांच्या मांसाला शिवत [illegible] नरमांस खायला गुहेबाहेर कधीच आले नाहीत. म्हणून या राक्षसांची शिकार केली पाहिजे. चला गुहेच्या तोंडावर लाकडे ठेवून त्यांना आग लावू या. राक्षसांना जीव कोंदटल्यावर बाहेर यावे लागेल. मग आपण त्यांना चांगलं चोपून काढू या."

छोटूने सुचविलेली योजना लौकरच अमलात आणली गेली. गुहेच्या तोंडावर जाळ केल्यावरोबर आतले लोक गुदमरून घाबरून ओरडत बाहेर आले.

छोटू म्हणाला–"पहा रे, सर्व डोळे उघडून, हे राक्षस तुमच्या चांगले ओळखीचे आहेत. येथे राक्षस आल्याचे सांगून या सर्वांनी इतके दिवस गावकऱ्यांना फसविले.

त्या दिवसापासून भूतवैद्य आणि त्याचा शिष्यवर्ग तोंड काय दाखविणार? गाव सोडून सर्व निघून गेले.

छोटू गावकऱ्यांचा निरोप घेऊन पुढल्या मुक्कामाला निघून गेला.



# हा फरक कां?

विजयनगरच्या राजाचे प्रधान तिम्मरसू यांच्या घरी दोन नोकर काम करीत असत. दोघेही स्वामिभक्त व विश्वासपात्र होते. प्रधान दरवर्षी त्यांच्या पगारात वीस सुवर्ण मुद्रांची वाढ करीत असत.

एका वर्षी तिम्मरसूने एका नोकराच्या पगारात वीस सुवर्ण मुद्रांची आणि दुसऱ्याच्या पगारात चाळीस सुवर्ण मुद्रांची वाढ केली. पहिला नोकर गप्प राहिला. परंतु जास्त पगार-वाढ ज्याला मिळाली त्या नोकराने प्रधानाला तसा फरक करण्याचे कारण विचारले.

प्रधान म्हणाला–"तुझ्यात मला परोपकाराची भावना दिसली, दुसऱ्यात ती नाही."

"मालक, हे आपल्याला कसं काय कळलं?" नोकराने विचारले.

"काल रात्री एका भिकाऱ्याने त्याच्या घरी जाऊन भीक मागितली, तेव्हा त्याने त्याला दारासमोरून हाकलून लावले. त्यानंतर तो भिकारी तुझ्या घरी भीक मागायला गेला. तू त्याला पोटभर जेवायला वाढून अंगभर कपडेसुद्धा दिलेस. म्हणून मी विचार केला की तुला जास्त पगारवाढ दिली तर ती दानधर्म करण्यात खर्च होईल." प्रधान म्हणाला.

"परंतु भिकाऱ्याशी वागणुकीची गोष्ट आपल्याला कशी कळली?" नोकराने विचारले.

"तो भिकारी मीच होतो." तिम्मरसू म्हणाला.





# अज्ञात चोर

एकदा विदर्भदेशाच्या पश्चिमेकडील प्रदेशात अतिवृष्टीमुळे कित्येक गावे पाण्यात बुडून गेली. त्याचबरोबर फार मोठी जीव-हानीही झाली. म्हणून राजाने संजीव नामक एका तरुण अधिकाऱ्याला पुरामुळे नुकसान सोसणाऱ्या प्रजेच्या मदतीसाठी पुष्कळसे धन देऊन पाठविले.

संजीव जेव्हां त्या प्रदेशात गेला तेव्हा त्याला तेथल्या डोंगराळ प्रदेशात खंडोजी नावाचा एक अट्टल चोर भेटला. त्या पूर्वी अनेक वेळा दरोडे घालीत असतांना तो पकडला गेला होता आणि त्याने अनेक वेळां तुरुंगवास भोगला होता. तो तुरुंगात असतांना संजीवने त्याच्यावर दया दाखवून त्याला तुरुंगवास त्रासाचा वाटू नये यासाठी थोडी मदत केली होती.

खंडोजीने संजीवला पाहतांच लवून नमस्कार केला आणि आपल्या घरी बोलाविले. संजीव त्याच्या विनंतीला मान देऊन त्याच्या घरी गेला. त्या निर्जन प्रदेशात संजीवला जो अतिथिसत्कार मिळाला त्याबद्दल त्याला आनंदच झाला आणि संजीवच्या मनात अनेक विचार येऊ लागले. त्याने विचार केला की खंडोजीला सामील करून घेतले तर राजाने दिलेलें सर्व धन गडप करता येईल.

खंडोजीला सई नावाची एक रूपवती मुलगी होती. तिनेच सैंपाक करून संजीवला वाढले होते. संजीवने खंडोजीला एकांतात आपल्या मनातली योजना सांगितली. म्हणाला—"मी तुझ्या मुलीशी लग्न करावे, म्हणतो. म्हणून तुला तुरुंगात जावे लागले तरी तुला तुरुंगातून लौकर सोडविण्याची जबाबदारी मी स्वतःवर घेतो."

संजीव म्हणाला त्याप्रमाणे करण्यास खंडोजीने मान्य केले. त्यानंतर संजीवने आपले कपडे फाडले आणि अंगावर जागो-जागी लहान मोठ्या जखमा करून घेतल्या आणि राजाकडे जाऊन म्हणाला—"महाराज! डोंगराळ प्रदेशात खंडोजी नावाच्या अट्टल चोराने आपल्या अनुयायांसह येऊन मला गाठले आणि मारहाण करून माझ्याबरोबर आपण पाठविलेले सर्व धन लुटून नेले."

राजाने लगेच शिपायांना पाठवून खंडोजीला कैद करून आणविले. खंडोजीने स्वतःचा बचाव करण्याचा प्रयत्न मुळीच केला नाही. उलट अटक करून घ्यायला तयार असल्यासारखा सिद्ध झाला. खंडोजी इतका सहजी पकडला गेल्याबद्दल राजाला आश्चर्यच वाटले. तसा पाहायला खंडोजी धनी व चोरांच्या टोळीचा नायक दिसला नाही. तरी राजाने खटला संपल्यावर त्याला फाशीची शिक्षा सांगून पाठवून दिले.

खंडोजीला फाशीची शिक्षा राजाने दिल्याचे ऐकल्यावर संजीवला डोक्या-वरून ओझे उतरल्यासारखे वाटले. तसा खंडोजीच्या मुलीशी विवाह करण्याचा विचार संजीवच्या मनात मुळीच नव्हता. म्हणून त्याच्या घरी येऊन रहात असलेल्या सईला संजीवने नोकरांकरवी मारहाण करून हाकलून लावले. त्याने तोपर्यंत एका श्रीमंताच्या मुलीशी लग्न करण्याचे ठरविले होते. तो त्याच्या तयारीत मग्न झाला होता. त्याच सुमारास एके दिवशी खंडोजी अचानक त्याच्या घरी आला व त्याला धमकी देत म्हणाला—"संजीव, तू









माझ्याशी लबाडी केली आहेस. माझ्या मुलीशी लग्न करतो असे सांगून तू आज दुसऱ्या एका मुलीशी लग्न करायला निघाला आहेस का? लक्षात ठेव, तुला हे पाप व्याजासकट फेडावे लागेल."

संजीव घाबरून जाऊन म्हणाला—"तुझा गैरसमज झालेला दिसतो आहे. मी तुझ्याच मुलीशी लग्न करण्यासाठी ही सर्व तयारी केली आहे! परंतु तू हे सांग, तू कैदेतून बाहेर कसा पळून आलास?"

"मी या म्हाताऱ्याच्या मदतीने तुरुंगातून बाहेर पळून आलो." असे सांगून खंडोजी म्हाताऱ्याकडे बोट दाखवून करड्या स्वरात म्हणाला—"संजीव! आतां यापुढे माझा तुझ्या एकाही शब्दावर विश्वास नाही. माझा वांटा मला देऊन टाक!"

"तुझा वांटा? म्हणजे तुम्हां दोघांचा असा काही करार झाला होता की काय?" म्हाताऱ्याने संजीवला विचारले.

संजीवने आपला सर्व वृत्तांत म्हाताऱ्याला सांगितला व नम्रपणे खंडोजीला म्हणाला—"मी सईच्या बरोबर लग्न न करता दुसऱ्या एकीशी लग्न करण्याचे ठरविले ही माझी चूक आहे. मला क्षमा कर!"

परंतु त्याच वेळी म्हाताऱ्याने संजीवच्या हातात हातकड्या घातल्या आणि वेष पालटून समोर उभा राहिला. तेव्हां संजीवला तो म्हातारा दुसरा तिसरा कोणी नसून स्वतः महाराज असल्याचे कळले.

तेव्हा राजाने संजीवचे बिंग कसे बाहेर आले थोडक्यात सांगितले. म्हणाला—"खंडोजी इतका सहजी कैद झालेला पाहून मला संशय आला. या कटात तू सामील असावास अशी मला शंका आली. फाशीची शिक्षा मी सांगितल्यावर खंडोजीने खरी गोष्ट सांगितली. त्याचे म्हणणे तुझ्या बोलण्यावरून खरे असल्याची माझी खात्री झाली. खंडोजीसारख्या खऱ्या चोरांपेक्षा तुझ्यासारखे खोटे अधिकारी जास्त धोक्याचे. तुझ्यासारख्यांना देशाबाहेर हाकलून लावले तरच प्रजा सुखी होईल."





# चेतसिंह शिपाई

चेतसिंह शिपायाचे अंग दिवसेंदिवस सुटत चालले होते. रात्री गस्त घालणे आणि पाहरा देणे हे त्याचे काम होते. परंतु अंग सुटले असल्या कारणाने त्याला धावत जाऊन चोराला पकडणे जमत नसे.

एकदा त्याच्या अधिकाऱ्याने त्याला विचारले—"कायरे, गेले कित्येक दिवस मी पाहतो आहे, तू एकाही चोराला धरून आणले नाहीस?"

चेतसिंह लगेच म्हणाला—"जमादार साहेब! माझं नाव ऐकूनच चोरांचा थरकाप उडतो. म्हणून कोणी इकडे फिरकत नाही."

तरी चोऱ्या होत होत्या आणि तक्रारी येतच होत्या. म्हणून चेतसिंहाला जाब द्यावा लागे. तेव्हा त्याने वाटेल ते करून एखाद्या गुन्हेगाराला पकडून अधिकाऱ्यासमोर उभे करण्याचे ठरविले.

गुन्हेगाराला पकडण्यात चेतसिंहाचा फायदाच होता. त्याने आपल्या बायकोला दिवाळीपर्यंत एक चंद्रहार करून देण्याचे वचन दिले होते. म्हणून त्याने गुन्हेगारांकडून धमकावून थोडेथोडे करून तीनशे रुपये जमा केले होते. परंतु चंद्रहाराला आणखी दोनशे रुपयांची गरज होती. एखादा चांगला गुन्हेगार पकडला तर त्याच्याकडून दोनशे रुपये काढता येतील असा त्याने विचार केला.

एके दिवशी रात्री चेतसिंह गस्त घालीत गावातल्या देवळापर्यंत आला तेव्हा त्याला कोणीतरी काळोखात येऊन देवळाच्या ओटाच्या आड लपून बसलेला दिसला.

चेतसिंहाने दरडावून विचारले—"कोण रे तू? मध्यरात्रीच्या वेळी तू येथे काय करतो आहेस?" ते ऐकून पंधरा वर्षाचा एक मुलगा चेतसिंह जवळ येऊन उभा



राहिला. चेतसिहाने एका हाताने लाठी उगारली व दुसऱ्या हाताने त्याची मान धरून विचारले–"कोण रे तू? चोर दिसतो आहेस!"

मुलगा कापऱ्या स्वरात म्हणाला– "हुजूर! मी चोर नाही. माझे बाबा मला ठार करायला निघाले म्हणून मी येथे लपून बसलो होतो."

"तुझा बाप तुला ठार करायला निघाला? तो कां?" चेतसिहाने चकित होऊन विचारले.

"मला ते काय माहीत? मी संध्या-काळी घरी परतलो तेव्हा माझी आई म्हणाली–'तुझे बाबा तुझा व माझा जीव घेतील. म्हणून मी भिऊन इकडे येऊन लपलो होतो." मुलगा म्हणाला.

चेतसिहाला त्याच्या कर्तव्याची आठवण झाली. एका खुनी माणसाच्या हातून एका भोळ्या मुलाला वांचविले पाहिजे.

चेतसिहाने त्या मुलाला धीर दिला व त्याच्या बरोबर त्याच्या घरी आला. चोराला चोरी करण्यापूर्वी पकडले पाहिजे, या नीतीप्रमाणे खुन्याला खून करण्यापूर्वी धरले पाहिजे असे त्याने ठरविले होते.

चेतसिह त्या मुलाला म्हणाला–"आपण चाहूल लागू दिल्याशिवाय घरात शिरले पाहिजे." म्हणून मुलगा मागच्या दाराने जाऊन भितीवर उडी मारून आत गेला. चेतसिह मोठ्या कष्टाने मागच्या बाजूच्या भितीवर चढला. परंतु ती भित मातीची होती व पावसाने भिजली होती. चेतसिहाच्या वजनाने ढासळली. चेतसिह खाली पडला. त्याला वाटले त्याची कंबर मोडलीच!

इतक्यात घरातून बायकी आवाजात कोणी म्हटले–"नका मारू, नका मारू!" चेतसिह देहभान विसरला व अपराधी सापडला, या उत्साहाने धावला. त्याने मागचा दरवाजा ढकलला. आतल्या बाजूने कडी लावलेली होती. तरी चेतसिहाने जोराजोराने धक्के मारल्यामुळे ते जुने दार मोडून पडले.

चकित होऊन चेतसिह आतले दृश्य पाहू लागला. मुलाची आई खाटेवर बसली होती व मुलाचा बाप काठीने उंदीर मारीत होता.

उंदराला मारल्यावर त्याने काठी फेकून दिली आणि चेतसिहाला दरडावून विचारले– "तुम्ही शिपाई आहांत आणि दार फोडून घरात शिरतां आहां! दारावर थाप मारून किंवा कडी वाजवून हाक मारता आली नसती का?"

"तू आपल्या बायकोचा खून करायला निघाला होतास, म्हणून तिला वांचविण्या-साठी मी दार फोडून आत आलो." चेतसिह म्हणाला.

मुलाचा बाप रागावून म्हणाला–"तू तोंडाला आलं ते बोलतो आहेस, मी बायकोचा खून करायला कां जाईन? उजाडल्यावर मी चावडीवर जाऊन कोत-वालाकडे आपली तक्रार नोंदवतो."

तेव्हा चेतसिहला काय बोलावे, सुचेना. म्हणून त्याने मुलाकडून जे ऐकले होते ते सांगितले.

वस्तुस्थिती निराळीच होती. तो मुलगा आईवडिलांचा एकुलता एक मुलगा होता. लग्न झाल्यावर फार उशिरा जन्मला. त्याचा बाप न्हावी होता. मुलगा मंद-बुद्धीचा होता. बापाने त्याला आपला धंदा



शिकविण्याचा विचार केला. परंतु त्याचे सर्व प्रयत्न फुकट गेले. शेवटी बापाने त्याला त्याच्या नशिबावर सोडले.

त्याचे घर पडू लागले होते. त्याची दुरुस्ती करून रंग लावायचा होता. नवे कपडे विकत घ्यायचे होते. म्हणून त्याने आपली म्हैस विकून ही डागडुजी करण्याचे ठरविले होते. परंतु दुसऱ्याच दिवशी तो आजारी पडला आणि व आठवड्याच्या बाजाराला जाऊ शकला नाही. आईला मुलगा अगदीच कुचका-माचा नाही हे दाखवायचे होते. म्हणून मुलाला पाठवून तिने म्हैस विकून टाकायचे ठरविले.

न्हाव्याने बजावून सांगितले होते की मुलाने ठीक तऱ्हेने म्हैस विकून पैसे आणले नाहीत तर आईची व मुलाची पाठ रंगविली जाईल. नंतर त्याने मुलाला समजावून सांगितले की तू म्हशीची किंमत सव्वाशे सांग व शंभरापर्यंत ती विकून टाक. शंभर रुपयाला कोणी घेणारा मिळाला नाही तर म्हैस विकू नकोस. घरी निघून ये."

मुलगा म्हशीला घेऊन बाजारात गेला. कोणी शंभर रुपयाला घ्यायला तयार होईना. संध्याकाळपर्यंत बाजारात राहून तो घरी परत आला.

आईने विचारले–"तू किती रुपयाला विकलीस रे म्हैस?"

"मी नाही विकली आई! कोणी शंभर रुपयाला घ्यायला तयारच होईना." मुलगा म्हणाला.

"मग म्हैस कोठे आहे?" आईने विचारले.

"बाबा म्हणाले होते ना म्हैस विकली नाहीस तर घरी निघून ये. म्हशीला परत आणायला नव्हते सांगितले." मुलगा म्हणाला.

ते ऐकून आई कपाळ बडवीत म्हणाली–"आतां तुझा व माझा जीव घेतील तुझे बाबा! चालता हो कोठे तरी! मुलाने खोलीत वाकून पाहिले, त्याचा बाप वस्तऱ्याला धार करीत होता. ते पाहून मुलगा भ्याला आणि जो पळाला तो सरळ देवळात जाऊन लपला.

मुलाचा बाप शिपायाला दरडावून म्हणाला–"तू या मुळ्याच्या बोलण्यावर विश्वास करून आमची भित पाडलीस व दार फोडलेस. उजाडू दे, मी कोतवालाला सांगून तुला नोकरीवरून काढवतो."

"नको बाबा! मी हात जोडतो, पायां पडतो. माझ्या पोटावर गदा आणू नकोस. मी तुला नुकसान भरपाई देतो!" असे सांगून चेतसिंह धावतच घरी गेला आणि बायकोच्या चंद्रहारासाठी सांठवून ठेवलेले तीनशे रुपये आणून न्हाव्याला दिले आणि आपली मान सोडविली.





# पुराणातली वांगी पुराणात

एका गावी शंकर व पार्वती नावाचे एक जोडपे रहात असे. त्यांना गणू नांवाचा एक मुलगा होता. शंकर शेतात काम करी व चांगले पीक काढी. त्याचा संसार सुखाने चालला होता.

एकदा शेजारचा रघू शंकरकडे येऊन म्हणाला–"अरे शंकर! तू दिवसभर उन्हात उभा राहून घाम गाळतोस. आज देवळात चल. एका पुराणिकबुवांचं पुराण आहे. चल, थोडी विश्रांती मिळेल व थोडा ज्ञान-बोधही होईल."

शंकरला पुराण कीर्तन वगैरेची मुळीच माहिती नव्हती. तरी तो रघूच्या आग्रहाला बळी पडून गाईगुरांवर लक्ष ठेवायला बायकोला सांगून पुराण ऐकायला गेला.

त्या दिवशी पुराणाची कथा देव-लोकावर होती. दुसऱ्या दिवशी शंकर ताडी पिऊन घरी आला. ते पाहून पार्वती थक्क झाली. तिने नवऱ्याला चांगलेच फैलावर धरले.

तेव्हां शंकर तिला स्मित करून म्हणाला–"अग, देवलोकातले देवसुद्धा सोमरस नावाचे एक मद्य पितात, तुला माहीत आहे का? पुराण ऐकण्यापूर्वी ताडीमाडी पिणे पाप आहे, अशी माझीसुद्धा समजूत होती. पुराणात पौराणिकांनी सांगितले की देवसुद्धा सोमरस पितात." पार्वतीला कळेना नवऱ्याची समजूत कशी घालावी.

दुसऱ्या दिवशी शंकर गणूला पुराण ऐकायला घेऊन गेला. त्या दिवशी पुराणा-तली कथा सांगत असता पौराणिकांनी इंद्राने सगराचा घोडा कसा पळावून नेला होता त्याची कथा सांगितली.

दुसऱ्या दिवशी पार्वती कोनाड्यात ठेवलेले सुटे पैसे घ्यायला गेली, तर ते नाहीसे झाले होते. पार्वतीने नवऱ्याला

"पैसे घेतलेत का," विचारले. तो म्हणाला– "बग, मी तुझ्या पैशाला कशाला हात लावायला जाऊ? नीट शोधून पहा."

त्या दिवशी रात्री गणू जेवतांना खाल्ले-ल्या बर्फीचे वर्णन करू लागला. तेव्हा पार्वतीने विचारले–"मुला, तुला पैसे कोठे मिळाले रे? तू माझ्याकडून पैसे मागून घेतले नव्हतेस?"

"मी कोनाडयातले पैसे घेतले होते आई!" गणू म्हणाला.

"अरे तू असे चोरून का उचललेस? आपल्या घरात आजपर्यंत असे कधी घडले नाही?" पार्वती म्हणाली.

"आई, इंद्राने नव्हती का घोडयाची चोरी केली? मी केली तर त्यात काय चुकले?" गणूने उलट प्रश्न केला.

त्यानंतर दोन दिवस शंकर व गणेशने पुराणात कायकाय ऐकले, नकळे. शंकरने शेतावर जाणे बंद केले आणि गणूने शाळेत जायचे सोडले. शंकर रामनामाचा जप करीत घरी बसून राही.

शंकरने शेतात जायचे सोडले तर गृहस्थी कशी चालणार? म्हणून पार्वतीने विचार केला की नवऱ्याला पटेल असा काहीतरी उपाय केला पाहिजे. दुसऱ्या दिवशीं शंकर नित्याप्रमाणे स्नान करून बायको जेवायला बोलवील म्हणून वाट पहात होता. परंतु बराच वेळ झाला तरी तिने खायला बोलाविले नाही. म्हणून घरात गेला तेव्हा पार्वती फुलांची माळा ओवीत बसलेली दिसली.

शंकर संतापून म्हणाला–"तुला आतां फुलं ओवीत बसायची काय गरज होती ग? तू सैंपाक केला नाहीस वाटतं?"

पार्वती स्मित करून म्हणाली–"मी असं ऐकले की इंद्राची राणी शची नेहमी फुलांच्या माळा ओवून पतीची पूजा करते. तिने कधी सैंपाक केल्याचे पुराणात कधी कोणी ऐकलं आहे का?"

ते ऐकल्यावर शंकर व गणूच्या डोक्यात लख्ख प्रकाश पडला आणि त्यांच्या लक्षात आलं की पुराणातली वांगी पुराणातच सोडायची असतात.





# सासू व सून

सरला लग्न होऊन सासरी आली. तिच्या नवऱ्याचे नाव होते रघुनाथ. सरलाने जे बारचौघांच्या तोंडी ऐकले होते आणि पुस्तकात वाचले होते त्याच्या आधारे तिचा असा समज झाला होता की सासवा सुनांवर फार अधिकार गाजवतात व त्यांना छळतात. परंतु सासरी आल्यावर तिला निराळाच अनुभव आला. ती आपल्या सुनेला प्रेमाने वागवी. महिने होऊन गेले तरी त्या व्यवहारात मुळीच फरक पडला नाही. ती सुनेला मुलीपेक्षा जास्त प्रेमाने वागवी. तरी सरलाच्या मनात शंका राहूनच गेली बायका सुरवातीला मोठा प्रेमाचा आव आणतात. परंतु तो ओसरल्यावर त्यांची वागणूक पार बदलून जाते.

रघुनाथ उजडताच शिळा भात किंवा भाकरी खाऊन जाई व संध्याकाळी घरी परत येई. त्याचे बायकोवर जेवढे प्रेम होते तेवढीच मातृभक्तीपण त्याच्या मनात होती. त्याला वाटत होते की बायको आल्यापासून तीच घरातली सर्व कामे करीत असणार व आईला आतां खूप विश्रांती मिळत असणार.

एके दिवशी रात्री तो जेवायला बसला तेव्हा बायकोची थट्टा करण्यासाठी म्हणाला– "आज तुला काय झालं आहे ग? असा काय सैंपाक केला आहेस?"

सरला चकित झाली. कारण तो दररोज जेवताना सैंपाक उत्तम झाल्याचे सांगे. परंतु त्या दिवशी त्याच्या तोंडचे ते बोलणे ऐकून ती म्हणाली–"आज तुम्हांलाच काय झालं आहे हो? दररोज आईच तर सैंपाक करतात." ते ऐकून रघुनाथला आश्चर्यच वाटले. "मग तू तिच्या मदतीला कां नाही जात?" त्याने तिला विचारले.

"म्हणजे तुम्हांला मी दिवसभर झोपून असते असे म्हणावयाचे आहे का? माझ्या








माहेरी मला कोणतेही काम करावे लागत नसे." सरलाने थोडेसे ताठरपणानेच उत्तर दिले.

तेव्हा रघुनाथला राग आला. तो म्हणाला–"तरमग तू माहेरीच जाऊन रहा. येथे राहायची गरजच काय?"

सरलाला रडू कोसळले. नवऱ्याच्या तोंडचे ते शब्द ऐकून तिला सासरी एक क्षणभरही रहावेसे वाटले नाही. ती आपल्या माहेरी निघाली. सासूला वाटले की सुनेला माहेरचे वारे लागले की काय? ती काहीच बोलली नाही.

सरला माहेरी जातांच आईला मिठी मारून रडत म्हणाली–"आई! मी आता सासरी जाणार नाही. तेथे मला कोणी विचारीत नाही."

"रडू नकोस, उगी रहा मुली! जावई बापूंना आपली चूक आज नाही तर उद्या कळेल. ते पश्चात्ताप करून तुला आज नाही तर उद्यां नक्कीच घेऊन जातील." आईने मुलीची समजूत घातली.

[illegible] होता. त्याचेही लग्न सरलाचे लग्न झाले त्याच वेळी झाले. तिच्या भावजयीचे नाव होते सुशीला. तीच घरातली सर्व कामे करी. सरलाने चकित होऊन आईला विचारले–"आई, सैपाकीण बाई कोठे गेल्या ग?"

"अग वेडे, सुनबाई आल्यावर सैपाकिणीची गरजच काय?" आई म्हणाली.

त्यानंतर सरलाला हे पाहून आश्चर्य वाटले की तिची आई उजाडल्याबरोबर सुशीलेला उठविते आणि संध्याकाळपर्यंत सुनेकडून सर्व कामे करून घेते. तिला दिवसभरात पांच मिनिटे देखील विश्रांती घ्यायला मिळत नाहीत. आपल्यासारखीच सासरी आलेल्या सुनेला आईने असे वागवावे हे सरलाला मुळीच आवडलं नाही.

ती आईला खूप बोलली व म्हणाली–"तू आपल्या सुनेला नीट वागविलं नाहीस तर मी माहेरी कधी येणारच नाही." त्यानंतर ती आपल्या सासरी निघून गेली.





# महाबली हनुमान

द्वापर युगात श्रीकृष्णाने यदुवंशात जन्म घेऊन कंस आदि अनेक दुष्टांचा संहार केला आणि द्वारकेला राज्यस्थापना करून आपल्या आठही राण्यासह सुखाने राहू लागला. त्याचे वडील भाऊ बलराम यादवांचे प्रमुख होऊन राज्यकारभार पाहू लागले. कृष्णाचे वाहन असा जो गरुड तो द्वारकेलाच येऊन राहू लागला.

श्रीकृष्णाने काही काळ लोटल्यावर सत्यभामेसह नरकासुराशी युद्ध करून त्याचा संहार केला. सत्यभामेने या युद्धात श्रीकृष्णाला मदत केली. तेव्हांपासून तिच्या मनात अहंकार वाढला की श्रीकृष्णाच्या आठ पत्नींत तीच जास्त मोठी आहे व श्रीकृष्णावर तिचाच अधिकार जास्त आहे.

ही गोष्ट नारदाला कळली व त्याने तिला चिडविण्यासाठी देवलोकातून पारिजातकाचे फूल आणून रुक्मणीला दिले. सत्यभामेला ती गोष्ट कळतांच ती संतापली आणि रुसून बसली की श्रीकृष्णाच्या अष्टपत्नींत तीच श्रेष्ठ असतां तिला ते पुष्प न मिळता रुक्मिणीच्या हाती कसे गेले?

श्रीकृष्णाला तिची समजूत घालण्यासाठी तिला बरोबर घेऊन गरुडवाहनावर देवलोकी जावे लागले. श्रीकृष्णाने पारिजातक वृक्ष मुळासकट उपटला आणि त्याचे हरण करून येऊ लागला. तेव्हा इंद्राने श्रीकृष्णाचे वाहन गरुड याच्यावर वज्रायुधाचा प्रहार केला. गरुडाने आपल्या पंखांनी वज्रायुधाला थांबविले आणि दूर फेकून दिले. तेव्हा



गरुडालासुद्धा आपल्या शक्तीचा गर्व चढला. सत्यभामेने पारिजातक वृक्ष आपल्या महालाच्या आवारात लावला आणि त्याबद्दल गर्व करू लागली.

बलरामाने अनेक बलशाली दुष्टांचा संहार केला होता. त्याने नरकासुराचा मित्र द्विद नावाच्या विनशेपटीच्या एका भयंकर वानराचा संहार केला होता. म्हणून त्याला सुद्धा त्याच्या स्वतःच्या बळाचा गर्व चढला होता.

सत्यभामा, गरुड आणि बलराम या तिघांचा गर्व दिवसेदिवस वाढतच गेला. श्रीकृष्ण तो उतरविण्याची संधी पहात होता.

एके दिवशी गरुड एका नागबालकाला धरायला धावला. तेव्हा त्याची कांचनहेला नावाची आई धावत पळत आली व मुलाला उचलून घेऊन पळून गेली. गरुड तिच्या पाठीस लागला. तेव्हा ती नागीण 'वांचवा वांचवा' असे ओरडत पळू लागली. नारदाने येऊन तिला समजावून सांगितले की रामनामाचे स्मरण करून ती हनुमानाला शरण गेली तर तो तिचे रक्षण करू शकेल. हनुमान तेव्हा गंधमादन पर्वतावर तपश्चर्या करीत असल्याचेही नारदाने तिला सांगितले.

तेव्हा कांचनहेला हनुमानाकडे त्याच्या आश्रयाला धावली. तिने आपल्या मुलाला हनुमानाच्या पायावर ठेवून म्हणाली—"आम्हांला वांचवा! राम, राम!"

हनुमानाने डोळे उघडून तिला अभय दान दिले व म्हणाला—"माझ्या आश्रमात तुम्ही निर्भयपणे रहा." त्याच सुमारास गरुड त्यांना खायला म्हणून तेथे आला. हनुमान त्याला म्हणाला—"पक्षिराजा! तुम्हांला आपली भूकच भागवायची असेल तर माझ्या देहाचे लचके तोडून तुम्ही वाटेल तेवढे मांस खा!"

"माझा आहार फक्त सापच आहे. तू वानर आहेस, माझा आहार कसा होऊ शकशील?" असे म्हणत गरुड हुंकार करून आश्रयाला आलेल्या नागांना खायला धावला. तेव्हा हनुमानाने आपल्या शेपटीने गरुडाचे पंख पिळवटून बांधले आणि त्याला गरगर फिरवून फेकून दिले. मग गरुड द्वारकेला बलरामाच्या समोर कपाळी झालेल्या फटकाऱ्या घेऊन कोसळला.

कांचनहेला हनुमानाला प्रणाम करून आपल्या मुलाबरोबर पाताळ लोकात तिचा भाऊ वासुकी याच्याकडे पोचली. तिकडे गरुडाचा असा अपमान झालेला पाहून बलराम म्हणाला—"गरुडा, मी त्या माकडाला चांगली अद्दल घडेल असे काही करतो. तू फक्त त्याला जाऊन एवढेच सांग की, बलरामाने त्याला त्यांच्या सेवेसाठी हजर राहण्यास हुकूम पाठविला आहे!"

गरुड भीतभीत हनुमानाकडे गेला आणि त्याने बलरामाचा निरोप पोचता केला. परंतु हनुमानाने तिकडे लक्षच दिले नाही. तेव्हा जोर जोराने पंख फडफडवून त्याने आरडाओरडा केला आणि तो निरोप सांगितला. तो बलरामाकडे परतला तेव्हा कृष्ण बलरामाजवळ राजकार्यासंबंधी काही मंत्रणा करीत होता. गरुडाच्या तोंडी सर्व काही ऐकल्यावर कृष्ण म्हणाला—"तू लगेच परत जाऊन सांग की रामाने तुला बोलाविले आहे!"

तो निरोप ऐकून हनुमान गरुडाबरोबर द्वारकेला आला आणि उच्च स्वराने हाक मारू लागला—"रामा, माझ्या रामा!"



तेव्हा बलराम गर्वाने डोलत उठून हनुमानाजवळ जाऊन म्हणाला—"राम नसून मी बलराम आहे! तू तीनदां बलराम देवाय नमः म्हणून उच्चार केलास तर मी तुला माफ करीन."

हनुमानाला त्याचा राग आला. तो दातओठ चावून गरजला—"काय म्हणालास? तू बलराम आहेस की अबलराम?"

तेव्हा बलरामाने रागाने हलायुध हनुमानावर उगारले. हनुमानाने ते आपल्या शेपटीने गुंडाळून दूर फेकून दिले. नंतर बलराम हनुमानाला मारायला धावला,



तेव्हा हनुमानाने त्याला दोन्ही हातांनी वर उचलले. बलराम त्या धक्क्याने बेशुद्ध झाला. त्या बेशुद्धावस्थेत स्वप्न पडल्या-सारखी काहीतरी जुनी कथा त्याला आठविली.

रामचंद्राच्या राज्याभिषेकसमयी लक्ष्मण पंगत खदखदा हसू लागला होता. त्या सभेत हजर असलेले सर्वजण असा विचार करून की लक्ष्मण त्यांची थट्टा करीत आहे, माना खाली करून बसले. तेव्हा राग आल्याने रामाने तलवार उपसून लक्ष्मणा-वर उगारली. हनुमानाने तेव्हा रामाला अडविले होते. लक्ष्मणाच्या हसण्याचे कारण विचारता सभासदांना हनुमान म्हणाला—

"वनवासात रात्रंदिवस सीतारामांच्या रक्षणार्थ पाहारा देता यावा व त्यासाठी आपल्याला झोप येऊ नये म्हणून त्याने निद्रा-देवीला विनंती केली होती की, चवदा वर्षे तिने त्याच्याजवळ येऊ नये. तेव्हा निद्रा देवीने लक्ष्मणावर दया करून उर्मिलेत प्रवेश केला. चवदा वर्षे निद्रा व आहार केल्याशिवाय राहल्यामुळे लक्ष्मणाला इंद्र-जिताचा वध करण्याची शक्ती प्राप्त झाली होती. आता चवदा वर्षे पुरी झाली असल्या कारणाने निद्रादेवी पुन्हां त्यांच्या मानेवर बसली. ती गोष्ट आठवल्याने लक्ष्मण स्वत:वर हसला होता.

हनुमानाच्या तोंडी तो वृत्तांत ऐकून रामाने विचारले—"मी वनवास समयी लक्ष्मणाला एक केळे खायला दिले होते. त्याचे त्याने काय केले?"

तेव्हा लक्ष्मणाने चटदिशी सुरीने आपली मांडी कापून केळे काढून दाखविले व म्हणाला—"दादाने मला एवढ्या प्रेमाने जे केळे दिले होते ते मी रामाचा प्रसाद म्हणून जपून ठेवले होते. तो प्रसाद खाऊन मी आज आपला उपास सोडतो!" असे सांगून लक्ष्मणाने ते केळे खाल्ले.

राम लक्ष्मणाला प्रेमाने भेटून म्हणाला—"लक्ष्मणा! पुढल्या जन्मी मी तुझा धाकटा भाऊ होऊन तुझे हे ऋण फेडीन."

बलरामाला आपल्या पूर्वजन्माचा वृत्तांत आठवल्यावर व तो मागच्या जन्मी लक्ष्मण होता हे स्मरल्यावर हनुमानाला म्हणाला—"हे संजीवीराया! तू त्या जन्मी मला संजीवनी बूटी आणून देऊन वांचविले होतेस. यावेळी मला बेशुद्धावस्थेतच त्या गोष्टीची आठवण झाली. चल, तू आपल्या रामाला जाऊन भेट!"

श्रीकृष्ण हनुमानाला पाहताच मूठ आवळून त्याला मुष्टियुद्धाला आव्हान करीत म्हणाला—"माझा वडील भाऊ बल-राम, त्याचा तू अपमान केलास का? तर स्वत:ला संभाळ!"

त्यानंतर बराच वेळ श्रीकृष्ण व हनुमानाचे मुष्टियुद्ध चालू होते. श्रीकृष्ण खूप कौशल्याने स्वत:चा बचाव करीत हनुमानावर मुष्टिप्रहार करीत असलेला पाहून हनुमानाने आपली सर्व शक्ती एक वटून श्रीकृष्णावर जोराने एक मुष्टिप्रहार केला आणि त्याला खाली पाडले. कृष्ण वास्तविक दमलेला होता तरी विजय उल्हासाने देहभान विसरलेल्या हनुमानाच्या छातीत कृष्णाने उडी मारून एक ठोसा दिला. तेव्हा गडबडीत अचानक कृष्णाचा पाय हनुमानाच्या अंगाला लागला.

श्रीकृष्णाचा चरणस्पर्श होताच हनु-मानाला रामचंद्रानेच श्रीकृष्णरूपे अवतार



घेतल्याचे कळले. त्या पूर्वी म्हणजे लंकेत सीतेच्या अग्निप्रवेशाच्या वेळी रामाने सीतेला संबोधन करून जी कठोर वाक्यें म्हटली होती, ती ऐकून सीता रडू लागली होती. तेव्हा हनुमानाला राग आला व तो मूठ आवळून रामाला म्हणाला—"रामा! तू प्रथम माझ्याशी युद्ध कर!"

तेव्हा राम स्मित वदनाने म्हणाला होता—"हनुमाना! मी आतां तुझ्याशी युद्ध करण्यास असमर्थ आहे. परंतु पुढे केव्हांतरी तुझी इच्छा नक्कीच पुरी करीन."

हनुमानाला त्या गोष्टीची आठवण झाली. म्हणाला—"रामा! रामचंद्राच्या रूपेच मला दर्शन देऊन माझ्यावर अनुग्रह कर."



"हनुमाना! तु काही वेळ धीर धर. लक्ष्मण तर येथेच आहे. परंतु सीतेलासुद्धा प्रवेश करू दे." असे सांगून सीतेच्या रूपे प्रवेश करायला सत्यभामेकडे श्रीकृष्णाने निरोप पाठविला.

सत्यभामेला गर्व चढला की ती कित्येक जन्म रामाची पत्नी म्हणून राहिली आहे. ती त्याच गुंगीत खूप श्रृंगार करून व आपल्या वेणीत पारिजातकाच्या फुलांचा गजरा घालून ऐटीत श्रीकृष्णाच्या शेजारी येऊन उभी राहिली.

परंतु हनुमान सत्यभामेला पाहताच म्हणाला–"ओहो! आपण तर चंद्रसेना आहात. म्हणजे रामाने कृष्णावतारात आपल्या, आठ पत्नींपैकी एक पत्नी म्हणून आपणाला स्वीकारीन, असे जे वचन दिले होते त्याचे पालन केले म्हणायचे!"

ते ऐकल्यावर सत्यभामेला आपल्या पूर्वजन्मीचा वृत्तांत आठवला. ती आपला अहंकार सोडून रुक्मिणीकडे जाऊन म्हणाली–"ताई! सीता आपण आहात, आपणच हनुमानावर अनुग्रह करावा."

त्यानंतर रुक्मिणी सीता रूपे आली. श्रीकृष्णाने धनुर्धारी रामाच्या रूपे हनुमानाला आपल्या उजव्या हाताने आशीर्वाद दिला. बलराम लक्ष्मण होऊन विनयाने श्रीरामांसमोर उभा राहिला. हनुमान रामचरणी एक चित्ताने दृष्टी लावून अनिर्वचनीय आनंदाचा अनुभव करू लागला. सीतेने हनुमानाला आशीर्वाद दिला–"चिरंजीवी भव!"

त्यानंतर आपल्या रामावताराचा उपसंहार करून श्रीकृष्णाने हनुमानाची पाठ थोपटली व म्हणाला–"हनुमाना! तू हिमालयाच्या कदलीवनात रहा. तेथे तुझा धाकटा भाऊ वायुसुत भीम येईल. त्याला गदायुद्ध व मल्लयुद्ध दोन्हींचे गुपित सांग."

त्यानंतर सत्यभामा समोर येऊन म्हणाली–"पूर्वजन्मी तू रामचंद्राला माझ्याजवळ घेऊन आलास आणि या जन्मी या रूपात त्याची सेवा करण्याचे भाग्य लाभण्यास

कारण झालास. त्याबद्दल मी कोणत्या शब्दात आपली कृतज्ञता व्यक्त करू?"

हनुमान सत्यभामेला प्रणाम करून म्हणाला–"माते! तू सत्यभामा आहेस. ईश्वर नेहमी सत्याला वशीभूत होतो, ह्या गोष्टीची यथार्थता पटावी म्हणून श्रीकृष्णाने तुला आपली राणी केले आहे. तुझ्यावर प्रेम करून आणि तुझी प्रत्येक इच्छा पुरी करून सत्यभामापती म्हणून त्याने नाव मिळविले आहे. तू धन्य आहेस व सीतेसारखीच मला वंद्य आहेस."

हनुमान म्हणाला ते ऐकून सत्यभामेला फार आनंद झाला. ती कृष्णाचे पाय धरून म्हणाली–"इतक्या दिवसांनंतर हनुमानाच्या वाणीवरूनच मला सत्याचा बोध झाला. आजपासून मी आपला अहंकार सोडला."

त्यानंतर हनुमान रुक्मिणी व श्रीकृष्ण दोघांना नमस्कार करून निघाला. तेव्हा बलराम हनुमानाला कडकडून भेटला व म्हणाला–"संजीवराया! तुझ्यामुळेच मला वस्तुस्थितीची कल्पना होऊ शकली. मीदेखील आपला गर्व सोडून आपली पायरी पाहून पुढे वागेन. मी तुझा फार आभारी आहे."

आता गरुड हनुमानाला प्रणाम करून म्हणाला–"महाबली हनुमाना! मला आता चांगले आठवू लागले आहे की विष्णूने एकदा मला सांगितले होते की क्षीरसागरात माझ्याबरोबर तूसुद्धा राहणार आहेस." असे सांगून गरुड हनुमानाबरोबर कदली वनापर्यंत त्याला पोचवायला गेला.

कदलीवन उंच केळघांच्या झाडांनी भरलेले एक सुंदरवन होते. हिमालयाच्या शिखरावरून वहात आलेल्या ओहोळांमुळे त्याचे सौंदर्य जास्तच खुलून दिसत होते.

हनुमानाने कदलीवनात प्रवेश केला आणि वृद्ध वानरासारखा एका उंच केळघाच्या खांबाला टेकून व पाय पसरून बसला. त्याची शेपटी पसरलेली होती. तिच्यामुळे हिमालय पर्वतावर जाण्याची वाट अडली होती. हनुमानाच्या हाताजवळ गदा पडलेली होती. हनुमान डोळे झांकून व रामाचे ध्यान करून रामनामाचा जप करू लागला.



# दधीचीचा त्याग



विश्वकर्म्याच्या मुलाचा इंद्राने वध केला. त्याची प्रतिक्रिया म्हणून विश्वकर्म्याने यज्ञ केला तेव्हां यज्ञकुंडातून वृत्रासुर नावाचा राक्षस उत्पन्न झाला.



वृत्रासुराने विश्वकर्म्याची इच्छा पुरी करण्याची प्रतिज्ञा केली आणि ब्रह्मदेवाचे ध्यान धरून शंभर वर्षे तपश्चर्या केली.



ब्रह्मदेवाचा वर वृत्रासुराने प्राप्त केला तर त्याला जिंकणे अशक्य आहे हे ओळखून देवांनी वृत्रासुराची तपश्चर्या भंग करण्याचे ठरविले.













वृत्रासुराला एकाग्रचित्ताने तप करता येऊ नये यासाठी देवांनी अप्सरांना पाठविले. अप्सरा नाचू व गाऊ लागल्या. परंतु काही उपयोग झाला नाही. वृत्रासुराने त्यांच्याकडे वळून पाहिले देखील नाही.

देव वृत्रासुराच्या केसालाही धक्का पोचवू शकले नाहीत. आणि त्याच्या समोरून त्यांना पळून जावे लागले. इंद्र एकटा वृत्रासुराशी युद्धाला आला. त्याला वृत्रासुराने गिळून टाकले.



शेवटी वृत्रासुराला ब्रह्मदेवाने दर्शन देऊन वर मागायला सांगितले. त्याने असा वर मागितला की रात्री असो की दिवसा असो लाकडी किंवा कोणत्या धातूच्या आयुधाने त्याच्यावर कोणी प्रहार केला तरी मरण येणार नाही.





देव त्यांचे गुरु बृहस्पतीकडे गेले व त्यांच्यावर ओढवलेला प्रसंग वर्णन करून सांगितला. बृहस्पतीने जांभईची सृष्टी केली.



त्यानंतर वृत्रसुराने आपले राक्षस सैन्य नेऊन देवलोकावर स्वारी केली व देवांना खूप त्रास दिला. ते युद्ध दीर्घकाळ चालू होते.

जांभई वृत्रासुराच्या अंगात शिरली. त्याने जांभई घेतल्याबरोबर इंद्र बाहेर आला.





वृत्रासुराचा वध कोणत्याही आयुधाचा किंवा अग्नीचा प्रयोग करून होणे शक्य नव्हते. एखाद्या महर्षींच्या अस्थीच्या सहाय्याने वृत्रासुराचा वध करता येईल, हे कळल्यावर इंद्राने दधीची ऋषींजवळ जाऊन ती गोष्ट सांगितली.

दधीचीच्या मनात इंद्रावर तितके प्रेम नव्हते. परंतु वृत्रासुर लोककंटक होता. तो मेला पाहिजे असा विचार करून मुनी समाधिस्थ झाले आणि देह सोडला. तोच दधीची ऋषींचा अपूर्व त्याग ठरला.





दधीची ऋषींच्या अस्थीचे वज्रायुध तयार करून दिवसही नाही किंवा रात्रही नाही अशा संध्याकाळी इंद्राने वृत्रासुराचा वध केला.

# गोष्ट मथळा चढाओढ

## या गोष्टीला सुंदर मथळा सुचवून रु. २५ मिळवा!

?

एका राजाकडे एकदा दोन चित्रकार आले; दोघांनी दोन चित्रे काढून राजाच्या हातात दिली. दोन्ही चित्रात राजा स्मित करीत होता.

पूर्वेकडून जो चित्रकार आला होता, त्याच्या चित्रात राजाच्या चेहऱ्यावर नैसर्गिक सुरकुत्या असल्यामुळे राजाचा चेहरा रडका दिसत होता.

पश्चिमेकडून आलेल्या चित्रकाराने काढलेल्या चित्रात राजाचा चेहरा, तसा सामान्य दिसत होता, परंतु हसतमुख होता आणि सुंदर दिसत होता.

राजाने पश्चिमेकडून आलेल्या चित्रकाराला मोठे बक्षिस दिले व पूर्वेकडून आलेल्या चित्रकाराला काही दिले नाही. त्यानंतर राजा पश्चिमेकडील चित्रकाराने काढलेल्या चित्राकडे टक लावून पहात स्मित करू लागला.

मग काय? राजाच्या चेहऱ्यावर सुरकुत्या दिसू लागल्या. त्याचे स्मित रडक्या चेहऱ्यासारखे दिसू लागले. ते पूर्वेकडील चित्रकाराने काढलेल्या चित्रासारखे होते.

★ ★ ★

वरील गोष्टीला उपयुक्त होईल असा एक सुंदर मथळा विचार करून एका कार्डावर स्वतःच्या पत्त्यासह लिहून "गोष्ट मथळा चढाओढ", 'चांदोबा', चंदामामा प्रकाशन, २ व ३ अर्काट रोड, वडपळणी, मद्रास ६०००२६ या पत्त्यावर पाठवा.

१० सप्टेंबर १९७८ च्या आत पोस्टकार्ड पोचले पाहिजे. त्या कार्डावर 'फोटो चढाओढ परिचय' देता कामा नये.

चढाओढीचा निकाल नव्हेंबर १९७८ च्या चांदोबात जाहीर करण्यात येईल.

---

जुलै महिन्यातल्या चढाओढीचा निकाल (मथळा) "शेवटचे शब्द"



# अमरवाणी

असत्य स्सर्वलोकेस्मिन्
सततं सत्कृता: प्रियै:,
भर्तारं नानु मन्यंते
विनिपात गतं स्त्रिय: ॥ १ ॥

[या जगात दुष्ट स्त्रिया, पती त्यांच्या इच्छा पूर्ण करून त्यांना सुखी करीत असूनही त्याची दुरवस्था झाली तरी तिकडे लक्ष देत नाहीत.]

एष स्वभावो नारीणाम्
अनुभूय पुरा सुखम्,
अल्पा मप्यापदं प्राप्य
दुष्यंति प्रजहा त्यपि ॥ २ ॥

[स्त्रियांचा स्वभाव असा असतो, पूर्वी कितीही सुख उपभोगायला मिळाले असले तरी पतीला थोडी कष्टदशा आली की लगेच पतीला दूषण देतात व सोडूनही जातात.]

असत्यशीला, विकृता
दुर्ग्राह्य हृदयास्सदा
युवत्य: पापसंकल्पा:
क्षणमात्रा ह्विरागिण: ॥ ३ ॥

[असत्य भाषण करीत राहल्याने विकृत स्वभावाच्या होऊन त्यांच्या मनात काय आहे ते कळत नाही व पापबुद्धीने क्षणभरात त्यांचा मनोभंग होतो.]



# लब्ध प्रणाश

[ ६२ ]

मगर (नर) माकडाकडे गेली. ती उशिरा तर आलीच होती, शिवाय तिचा चेहरा उतरलेला होता. तो पाहून माकडाने तिला विचारले—"मित्रा, आज तुला यायला उशीर झाला की रे? आणि तुझ्यावर आकाश कोसळल्यासारखं तुझं तोंड दिसतं आहे की रे?"

मगर (नर) म्हणाली—"मित्रा, माझी बायको माझ्यावर खूप रागावली व म्हणाली—'कृतघ्ना, आपले तोंड मला दाखवायला तुला लाज नाही वाटत का? तू दररोज ते माकड तुला जांभळे देत आहे, ती खाऊन त्याच्यावर काही प्रत्युपकार केलास का? निदान त्याला आपल्या घरी तू बोलाविलेस तरी का? तुझ्या या कृतघ्नपणाला प्राय:श्चित्तच नाही. म्हणून मला दिरासारखा असलेल्या त्या माकडाला आज आपल्या घरी घेऊन ये. आपण योग्य ते सर्व करू. एवढे तू केले नाहीस तर मी आपल्या गळ्याला फास लावून घेईन. नंतर पुन्हा आपली भेट होईल ती परलोकातच!" असे तुझी वहिनी, म्हणजे माझी बायको म्हणाली. तिला वचन द्यावे लागले, म्हणून मला यायला उशीर झाला. तर मग तू माझ्याबरोबर चल. तुझी वहिनी रांगोळी घालून तुझ्या स्वागतासाठी तुझ्या वाटेवर डोळे लावून उभी असेल."

"वहिनीचे म्हणणे गमतीदारच आहे! कोष्टी दिवसभर धागे ओढीत राहतो तशी शहाण्या माणसाने टकळी चालू ठेवणे बरे नाही. देणे घेणे, गुप्त गोष्ट सांगणे ऐकणे, खाणे नि खायला घालणे या सहा गोष्टी आपुलकी व मनाचा आल्हाद व्यक्त करण्याच्या रीती आहेत. परंतु मी झाडावर



राहणारा व तू पाण्यात राहणारा. मी तुझ्या घरी कसा काय येणार? म्हणून तू माझ्या वहिनीलाच इकडे घेऊन आलास तर मी तिच्या पायावर डोके ठेवून तिचा आशीर्वाद मिळवीन." माकड म्हणाले.

तेव्हा मगर (नर) म्हणाला–"मित्रा या पाण्याच्या तळाला वाळूचा एक डोंगर आहे. त्याला लागून आमचे घर आहे. म्हणून तू माझ्या पाठीवर बसून निश्चित-पणे चल."

एक नवी गंमत पहायला अनुभवायला मिळेल, या मोहाला बळी पडून माकड म्हणाले–"तसं असेल तर उशीर कशाला? मी बसलो!" असे म्हणत माकड मगरीच्या पाठीवर बसले.

मगर काठावरून निघाला. ती खोल पाण्यात जाऊ लागली तेव्हा माकड घाबरून जाऊन म्हणाले–"इतक्या वेगाने जाऊ नकोस गड्या! लाटांनी माझे अंग भिजते आहे!"

"येथे पाणी फार खोल आहे. माकड स्वत:ला वाचवू शकणार नाही. ते आता पूर्णपणे माझ्या मुठीत आहे. म्हणून त्याला मी कां घरी नेत आहे, हे सांगायला काही हरकत नाही." असा मनात विचार करून मगर (नर) माकडाला म्हणाली–"मित्रा! माझ्या बायकोच्या इच्छेप्रमाणे तुला ठार करण्यासाठी मी तुला फसवून इकडे घेऊन आले. तुझं मरण आता जवळ येऊन ठेपले आहे. म्हणून तू आपल्या इष्ट दैवताचे स्मरण कर."

ते ऐकून माकड म्हणाले–"मित्रा! मी तुझ्याशी किंवा तुझ्या बायकोशी असा कोणता द्रोह केला की तुम्ही माझा जीव घ्यायचे ठरविलेत?"

"तू अमृतासारखी जांभळे खातोस म्हणून तुझ्या काळजात अमृत पोचले आहे म्हणे. तुझे काळीज खाल्ले तर तिला म्हातारपण किंवा मरण येणार नाही, असे घरात पाऊल टाकू देणार नाही असे सांगून पाठविले होते." मगर (नर) म्हणाली.

माकडाला तत्क्षण एक युक्ती सुचली. ते (नर) मगरीला म्हणाले–"अरेमित्रा! तू ही गोष्ट काठावरच कां नाही सांगितलीस? मी नेहमी आपले काळीज जांभळाच्या झाडावर लपवून ठेवतो. दररोज मी कितीदा झाडावर चढतो व उतरतो ते कशासाठी वाटलं तुला? ते सुरक्षित आहे की नाही हे पाहण्यासाठीच तर! वहिनीला ते हवं आहे तर मी नाही म्हणेन का? परंतु मुळात तिला हवं असलेले काळीज नसता मला घेऊन गेलास तर काय फायदा?"

मूर्ख (नर) मगरीला आनंद झाला. म्हणाली–"तसं असेल तर मी तुला पुन्हा झाडाजवळ घेऊन जाते. तू मला आपले काळीज तेवढे दे. ते नसेल तर माझी बायको उपाशीच राहील." असे सांगून मगर परत फिरली आणि जांभळाच्या झाडाजवळ आली.

वाटेत माकड सुखरूप परत पोचण्यासाठी देवाचा धावा करीत होते. झाडाजवळ पोचताच उडी मारून झाडावर चढले आणि एका उंच फांदीवर पोचल्यावर दम घेऊन मनात म्हणाले–"देवा, वांचलो! अपात्र माणसांवर कधी विश्वास करू नये, विश्वास करण्या योग्य माणसावरही फार जास्त विश्वास करू नये, तसा विश्वास केल्यास जिवाला धोका असतो, असे सांगतात ते उगीच का? माझा आज पुनर्जन्मच झाला तर!"

तिकडे माकड असा विचार करीत असता मगर म्हणाली–"मित्रा! तू आपले काळीज दिलेस तर ते मी तुझ्या वहिनीला नेऊन देऊन तिचा उपवास सोडवितो."

माकड तोंड वेंगाडून हसत म्हणाले–"मूर्ख कोठला, चालता हो! कृतघ्न साऱ्या जगातला! कोणाला काळीज काढून ठेवता येते का, मूर्खा! आलास तसा चालता हो! या जांभळाच्या झाडाखाली पुन्हा येण्याची गरज नाही. एकदा कोणी मित्रद्रोह केल्यावर पुन्हा त्याच्यावर विश्वास करणा-राचे मरण निश्चित!"



## २००. ७ हजार वर्षांपूर्वीचे गांव

चीन देशाच्या आग्नेय तीरावर चिकियांग प्रांतात झालेल्या खोदकामानंतर ७ हजार वर्षांपूर्वीच्या प्रस्तर युगातील संस्कृतीचे दर्शन घडविणाऱ्या एका गावाचा शोध लागला आहे. तेथे लाकडाची घरे, धान्याचे व टरफलाचे ढीग आढळून आले. तेथील रहिवासी हाडांची हत्यारे वापरीत. अशी हत्यारे १,८०० व मडक्यांची खापरे २ लक्ष मिळाली आहेत. फक्त वर्णन करण्या पुरती परंतु प्रत्यक्ष न दिसणारी दंताळी या खोदकामात सापडली आहेत.

येथे कमीतकमी ४८ प्रकारच्या प्राण्यांची हाडे सापडली आहेत त्यांत जास्त आहेत ती हरणे, कासवे. इतर प्राण्यात पक्षी, मासे, अस्वले, माकडे, वाघ, गेंडे, हत्ती सुद्धा आहेत. त्या युगातले लोक गुहेत रहायचे सोडून आहाराच्या शोधार्थ हिंडत व शेतीभाती करीत, गृहनिर्माण करीत. हे सर्व ७ हजार वर्षांपूर्वी ते करीत.













## भल्लूक मांत्रिक

[ २ ]

[ कालीवर्मा नावाचा क्षत्रिय तरुण नोकरीच्या शोधार्थ राजधानीच्या शहराकडे जात असता त्याला वाटेत लुटेऱ्या चोरांविषयी गांवकऱ्यांनी सांगितले. कालीवर्माने तरुण गावकऱ्यांच्या मदतीने लुटेऱ्यांची जणुकाही शिकारच केली. त्यानंतर तो राजधानीच्या जवळ येत असतां जितकेतू राजाच्या घोडेस्वारांनी त्याला अकस्मात हल्ला करून कैद केले. पुढे–]

चंद्रशिला शहराच्या घोडेस्वारांनी कालीवर्माला अटक करून राजधानीत आणले. इतके घोडेस्वार एकट्याला घोड्याच्या पाठीवर बांधून घेऊन जात असलेले पाहून रस्त्यावर चालणारी प्रजा आश्चर्यचकित झाली. त्यांच्यापैकी काही जणांनी, 'घोड्यावर तुम्ही बांधून जातां आहां तो कोण हो?' अशी चौकशी केली. तेव्हा घोडेस्वारांचा नाईक ऐटीत म्हणाला–"हा कैदी का? याचे नाव आहे कालीवर्मा. हा आपल्या राज्याचाच फक्त शत्रू नसून शेजारच्या दुर्मुख राजाच्या उपयगिरी नगराचा सुद्धा शत्रू आहे. याला जंगलात धरण्यासाठी आम्हांला फार त्रास सोसावा लागला."

चंद्रशिला व उपयगिरी दोन्ही राज्यांचा कालीवर्मा हा शत्रू असल्याचे कळल्यावर त्याचा जास्त वृत्तांत कळेल असे वाटून काही लोक राजवाड्याच्या दिशेने चालू



लागले. घोडेस्वारांच्या नायकाने आपल्या बरोबरच्या घोडेस्वारांना राजवाड्यासमोरच्या मैदानात थांबायला सांगितले व स्वतः राजवाड्यात गेला व एका सैनिकाला पाठवून जितकेतू राजाला कालीवर्माला धरून आणल्याची बातमी कळविली.

त्या वेळी जितकेतू, शेजारच्या राजा स्वारी करणार असल्याचे दूताकडून कळल्यावर त्याविषयी प्रधानाला सल्ला विचारीत होता. कालीवर्मा कैद झाल्याची बातमी कळताच त्याला परमानंद झाला. तो प्रधानाला म्हणाला–"प्रधान, कालीवर्मा नावाच्या या क्षत्रिय तरुणामुळे आपलं दुर्मुख राजाशी वितुष्ट आलं. आता कालीवर्मा सांगितला आहे. त्याला दुर्मुखाकडे जिवंत स्थितीत पाठवून देऊ या का? की त्याला फाशी देऊन त्याचे फक्त प्रेत पाठवून देणे जास्त बरोबर होईल?"

"महाराज, दुर्मुख राजाच्या पत्राप्रमाणे आपण कालीवर्माला दोन्हीपैकी कोणत्याही एका स्थितीत लौकर पाठविलेत तरी चालेल. तरी ही गोष्ट सिद्ध झाली पाहिजे की आपल्या घोडेस्वारांनी ज्याला अटक करून आणले तो उदयगिरी राज्यात चोरांना पळवून लावणारा कालीवर्माच आहे की आणखी कोणी? तसं नसेल तर आपण वचन दिल्याप्रमाणे केलं नाही असंच नाही का होणार? राजा दुर्मुखाचा जास्तच राग होण्याची शक्यताही आहे." प्रधान म्हणाला.

"आपल्या घोडेस्वारांच्या नायकाने पकडून आणलेला माणूस कालीवर्माच असल्याचेच कळविले आहे." राजा म्हणाला.

"एवढ्या मोठ्या चंद्रशिला नगर राज्यात कित्येक जण कालीवर्मा नावाचे असणार. तेव्हा आपण स्वतः जाऊन ज्या माणसाला कैद करून आणलं आहे तो आपल्याला हवा असलेला कालीवर्माच आहे की आणखी कोणी, या गोष्टीची खात्री करून द्यावी, त्यानंतरच त्याला योग्य शिक्षा द्यावी." प्रधान म्हणाला.

[illegible]
राजा व प्रधान राजवाड्याच्या समोरच्या मैदानात पोचले त्या वेळी तेथे गंमत पहायला आलेल्यांची पुष्कळ गर्दी जमली होती. प्रधानाच्या आज्ञेवरून घोडेस्वारांनी कालीवर्माला त्याला घोड्यावरून उतरविले.

कालीवर्मा घोड्यावरून उतरल्यावर निर्भयपणे राजा व मंत्री दोघांकडे पहात म्हणाला–"महाराज, आपल्या सैनिकांनी माझ्यावर अकस्मात् हल्ला करून मला कैद केले. त्यांनी माझा फार अपमान केला आहे. त्याबद्दल त्यांना आपण योग्य ती शिक्षा करावी अशी विनंती करतो."

ते ऐकून जितकेतू आश्चर्यचकित होऊन प्रधानाला म्हणाला–"प्रधान, याला कोणासमोर कसे बोलावे हे कळत नाहीसे दिसते आहे. मी गेली दहा वर्षे राज्य करतो आहे, परंतु आजपर्यंत कोणी इतक्या उर्मटपणाने बोललेला मी पाहिला नाही!"

प्रधान हात वर करून दरडावून म्हणाला–"ए घमेंडखोर पोरा! तू महाराजांच्या अनुज्ञेशिवाय बोललास याबद्दल तुला तत्क्षण शिरच्छेदाची शिक्षा द्यायला हवी. परंतु तू कोण हे विचारून घ्यायचे असल्या कारणाने तू वाचलास. चंद्रशिला नगर राज्यातून उदयगिरी राज्यात चोरांना तूच पळवून लावलेस, होय की नाही? तुझे नाव काय?"

"माझे नाव कालीवर्मा. मी या राज्याचाच एक नागरिक आहे. राज्यातील खेडेगावांवर रात्री अपरात्री हल्ला करून प्रजेचे





धनधान्य लुटून नेणाऱ्या काही चोरांना त्याच खेडे गावातील तरुणांच्या मदतीने मी ठार केले, हे खरे आहे. त्यांच्यापैकी काहीजण घाबरून जाऊन सरहद्दीला लागून असलेल्या उदयगिरी राज्यात पळून गेले असावेत. त्याबद्दल मी जबाबदार कसा काय होईन?'' कालीवर्मा म्हणाला.

ते उत्तर ऐकून प्रधानाला जास्तच राग आला. म्हणाला—''महाराज, मी विचारलेल्या लहानशा प्रश्नाचे सरळ उत्तर देण्याऐवजी उर्मटपणाने हा एवढे बोलला आणि वर उलट प्रश्न मलाच करतो आहे. मग उशीर कां, आरोपीला योग्य ती शिक्षा ताबडतोब द्यावी.''

[illegible] वेळ निरखून पाहिले व म्हणाला—''म्हणजे आपण शिक्षा करायची ठरविली होती तोच कालीवर्मा आहे तर! काय रे, वर्मा! तू माझ्या अनुज्ञेशिवाय माझ्या काही नागरिकांना ठार केलेस आणि काही जणांना शेजारच्या राज्यात पळवून लावून त्या राजाच्या अधिपतीशी वितुष्ट आणण्यास कारण झालास. त्याबद्दल तुला मी शिरच्छेदाची शिक्षा करीत आहे.''

ते ऐकून कालीवर्मा क्षणभरच किंकर्तव्यविमूढ स्थितीत उभा राहिला, परंतु थोड्याच वेळात स्वतःला सावरून म्हणाला—''आपण दिलेली शिक्षा ही कायदा व न्यायाला धरून आहे का? माझे वडील आपल्या पदरी एक स्वामीभक्त सैनिक म्हणून काम करीत असता युद्धात त्यांना वीरगती प्राप्त झाली. मी आपलं गाव सोडून आपली सेवा करण्याच्या हेतूने आपल्या प्रजेला पिडणाऱ्या चोरालुटेऱ्यांना ठार केले त्याबद्दल मलाच ही शिक्षा?''

''तुझा हा उर्मटपणा बंद कर!'' असे म्हणत प्रधान सैनिकांना म्हणाला—''महाराजांची आज्ञा तुम्ही ऐकलीत की नाही? राजधानीच्या वेशीवर शिरीषवन आहे त्यात याला घेऊन जाऊन फाशी द्या आणि [illegible] कडे पाठवून द्या.''

प्रधानाने ती आज्ञा करतांच तेथे जमलेल्या नागरिकांना आश्चर्य वाटल्यासारखे त्यांच्या बोलण्यावरून दिसले. काहीजण मोठ्याने ओरडून म्हणाले—''हा अन्याय आहे! महाराज, आपण दिलेल्या या शिक्षेबद्दल पुन्हा थोडा विचार करावा!''

''ओ हो! म्हणजे महाराजांना सुद्धा सल्ला देणारे शहाणे राजधानीत आहेत, म्हणावयाचे! आश्चर्य आहे!'' असे म्हणत प्रधान दांतओठ चावीत सैनिकांना म्हणाला—''त्या ओरडणाऱ्या राजद्रोह्यांना कैद करून तुरुंगात टाका!''

प्रधानाची आज्ञा होताच घोडेस्वारांनी आपले घोडे नागरिकांवर सोडले. लोक घाबरून जाऊन वाट फुटेल तिकडे पळू लागले. ते पाहून जितकेतू त्याच्या मनाचे समाधान झाल्यासारखा हसून म्हणाला—''या बंडखोर प्रजेला काबूत ठेवायला दंडनीती एकच उपयोगी होते. प्रधान, आपण ऐन वेळी बरोबर आज्ञा केलीत!'' या शब्दात प्रधानाची स्तुती करून जितकेतू आपल्या महालाकडे निघाला. त्याच्या पाठोपाठ प्रधानही निघाले.

प्रजेला दूर पळवून लावल्यावर घोडेस्वारांचा नाईक कालीवर्माजवळ येऊन



म्हणाला—''तू महाराजांची आज्ञा ऐकली आहेसच! या लहान वयात तुला हे जग सोडून जावे लागत आहे, या गोष्टीमुळे मला फार वाईट वाटत आहे. परंतु काय करणार राजाज्ञा आहे.''

कालीवर्मा ते ऐकून संतापला आणि आपली तलवार उपसायला निघाला, परंतु ते शक्य नाही हे ओळखून घोडेस्वारांच्या नायकाला म्हणाला—''तू म्हणतो आहेस ती राजाज्ञा किती मूर्खपणाची आहे, ही गोष्ट येथे जमलेल्या नागरिकांशिवाय तुमच्यापैकी एकाच्या ही लक्षात आलेली दिसत नाही. परक्या राजाला भिऊन जाऊन प्रजेचे हित करणाऱ्या मला हा



जितकेतू राजा फाशी द्यायला निघाला आहे!"

"राज्याचे रक्षण कसे करावयाचे हे राजालाच कळणार, तुला कसे कळणार? बरं तर आता चल, तुला फाशी द्यायची आहे, त्या शिरीष वृक्षवनात पोचण्यापूर्वी, महाराजांनी कीव करून तुझी फाशीची शिक्षा रद्द करून आज्ञापत्र पाठवितीलही. मागे काही गुन्हेगार असे फाशीच्या शिक्षेतून वाचले आहेत." घोडेस्वारांचा नाईक म्हणाला.

कालीवर्माला तशी आशा किंवा, अपेक्षा थोडीदेखील नव्हती. काहीतरी युक्ती काढून या सैनिकांच्या हातातून आपली सुटका करून पळून जायचा तो विचार करू

केल्यावरच करायचा त्याने ठरविले.

घोडेस्वारांच्या नायकाने आपल्या अनुयायांना सावध केले व कालीवर्माला म्हणाला—"आतां तुझ्या हातात हातकड्या घातल्या पाहिजेत. हात पुढे कर पाहू!" म्हणत तो पुढे आला.

"आणखी काही मिनिटांतच मला तुम्ही फाशीवर चढवणार आहां, मग या हातकड्यांचं सोंग कशाला? मी पळून जाईन हीच ना भीती, तुम्हांला? तर मग ही घे माझी तलवार. तुम्ही इतके हत्यारबंद मला घेरून असता मी निःशस्त्र एकटा कसा काय पळून जाणार?" म्हणत कालीवर्माने म्यानेतून तलवार काढून नायकाला दिली.

नाईक तलवार घेऊन मनाची खात्री झाल्याचे दाखवून म्हणाला—"कालीवर्मा, मरायला निघालेल्याची शेवटची इच्छा पूर्ण करण्यात पुण्य आहे, असे सांगतात. तू जर पळून जायचा प्रयत्न केलास तर आम्ही दहा घोडेस्वार आहों, हं! दहा तलवारींचे वार तुझ्यावर होतील व तुला परलोकातच पाठवू, लक्षात असू दे!"

नंतर कालीवर्माला मधोमध चालायला सांगून सर्व घोडेस्वार नगराच्या बाहेर जाण्यासाठी चालू लागले. तेव्हा नागरिक त्यांच्या चारीबाजूला असलेल्या गल्लयांच्या

राजाच्या दुष्टपणाविषयी बोलू लागले.

एका तासाभराने सर्वजण नगराच्या वेशीवरच्या शिरीषवृक्षवनाजवळ येऊन पोचले. उंच झाडांच्या बाजूला उंच डोंगर होते. एका उंच डोंगराच्या दरीतून एक ओढा वेगाने वहात होता आणि त्याचे पाणी वीस पंचवीस फुटावरून खाली पडत असल्याने त्याचा छान धबधबा झाला होता. त्याच्या आवाजाने सर्वांच्या कानठळ्या बसत होत्या.

घोडेस्वारांबरोबर झाडीच्या आत शिरत असतां कालीवर्मा म्हणाला—"येथेच नाही का तुम्ही मला फाशीची शिक्षा देणार?" असे म्हणत असतां घोडेस्वारांच्या हातावर

तुरी देऊन पळून जायला वाट आहे का हेही तो पहात होता.

घोडेस्वारांचा नाईक उत्तर देणार, इतक्यात एका रेड्याच्या पाठीवर बसून येणारी एक काळीकभिन्न आकृती त्यांना दिसली. घोड्याच्या पाठीवर बसलेल्या व्यक्तीने डोक्यापासून पायापर्यंत काळा बुरखा घातलेला होता. बुरख्याला डोळ्याजवळच फक्त भोके होती.

रेड्यावर स्वारी करून येणारा तो स्वार आपल्या हातातला परशु वर उचलून घोडेस्वार होते त्या दिशेने रेड्याला भरधाव पळवीत येत म्हणाला—"कोण तुम्ही? या शिरीष वृक्षवनात पूर्वी फाशी झालेल्यांची प्रेते आहां की कोणाचे डोके उडविण्यासाठी



आत्तां आलां आहां ?” त्याने कर्कश आवाजात दरडावून विचारले.

रेड्याला धावत येत असलेला पाहून घोडे बिचकून वाट फुटेल तिकडे पळू लागले. पळून जायला चांगली संधी असल्याचे ओळखून कालीवर्मा आपल्या घोड्याला पुढे उडी मारायला खूण करणार, इतक्यात रेड्यावरचा स्वार विद्युत्‌वेगाने तेथे आला आणि घोड्याचा लगाम धरून दरडावून म्हणाला–“शिरीषवृक्ष म्हणजे भूत, प्रेत व पिशाच्चांना फार आवडतात! म्हणूनच राजा चोरांना, देशद्रोह्यांना येथेच मृत्युदंड देण्याची व्यवस्था करतो. तू चोर आहेस की देशद्रोही ?”

“मी त्या दोघांपैकी एकही नाही. तू कोणत्या जातीचे पिशाच्च आहेस ?” कालीवर्माने विचारले आणि त्याच वेळी रेड्यावरच्या स्वाराच्या हातातली लगाम त्याने सोडवण्यासाठी ओढली.

इतक्यात पळून गेलेले घोडेस्वार तेथे आले. त्यांचा नाईक रेडेस्वाराला संतापून म्हणाला–“काय रे, तू हे सर्व काय आरं-

[illegible] आहे वाटत ?”

रेडेस्वाराने कालीवर्माच्या घोड्याचा लगाम सोडला व म्हणाला–“मी या नगराचा मुख्य चांडाळ आहे. मला ‘अरे तुरे’ म्हणतो आहेस का रे तू? महाराज, तुला केव्हां तरी फाशीची शिक्षा सांगून माझ्याकडे पाठवितीलच. तेव्हां मी वाळक्या ओणक्यावर आपली कुऱ्हाड मारून ते तोडतो तशी तुझ्या मानेवर मारून तुझा शिरच्छेद करीन !”

“दारुड्या, मूर्खा! मला हा अपमान सहन होणार नाही !” असे म्हणत नायकाने आपली तलवार उपसली. दुसऱ्या क्षणाला विद्युत् वेगाने कालीवर्माने चांडाळाच्या हातातली कुऱ्हाड हिसकावून घेतली आणि घोडेस्वारांच्या नायकाच्या मानेवर घातली.

नायकाचे डोके जमिनीवर लोळू लागले. त्याच वेळी दुरून “जय आदि भल्लूक की! धैर्यशाली वीर युवक की!” असा जयजयकार ऐकू आला. (क्रमशः)





# चंदनवृक्ष

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला– “राजा, तू जो एवढे श्रम करीत आहेस ते पाहून तुला कोणी अविवेकी मूर्ख समजेल! परंतु काही लोक मूर्ख अविवेकी दिसले तरी कधीकधी अचानकपणे विवेकपूर्ण शहाणपणा दाखविल्याने शाहणे म्हणूनच ओळखले जातात. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला विक्रमवर्मा राजाची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक.” असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

विक्रमवर्मा मगध देशाचा एक सुशील राजा होता. विषकुंभ नावाचा एक अत्यंत दुष्ट व कारस्थानी माणूस त्याचा प्रधान होता. तो सर्व प्रमुख हुद्द्यांवर आपल्या

## वेताळाच्या गोष्टी



नातेवाइकांना आणि अनुयायांना नेमीत असे आणि मनाला वाटेल तसा राज्यकारभार करीत असे. इतर ठिकाणी तो कितीही दुष्टपणाने वागला तरी राजासमोर मात्र अत्यंत विनम्रपणे वागे.

राजाला वाटे की प्रधानावर नेहमी स्वतःचा अंकुश ठेवण्याऐवजी त्याला पूर्ण स्वातंत्र्य देऊन त्याला त्याच्या स्वतःच्या कर्तबगारीचा प्रयोग करण्यास मोकळीक दिली पाहिजे. म्हणून प्रधानाविरुद्ध तक्रारी आल्यातरी राजा त्यांकडे दुर्लक्ष करी. राजाच्या औदार्याला प्रधान त्याचा भित्रेपणा व कमकुवतपणा मानी आणि स्वेच्छापूर्वक कारभार चालवी. म्हणून प्रजा दुःखी

लागली.

राजाने प्रधान मंत्र्याला जे स्वातंत्र्य दिले होते त्याचा दुरुपयोग करून प्रधान प्रजेला पिळू लागला आणि प्रजेकडून कर वसूल करून अर्धे अधिक स्वतःच गिळंकृत करू लागला. कोणी त्याच्याविरुद्ध बोलला की प्रधान त्या विरोध्याचा कांटा काढून टाकून बाकी लोकांना आपला दरारा दाखवू लागला.

विक्रमवर्माचे बालवयातले गुरुवर्य रामशर्मा यांना प्रधानाच्या दुष्कृत्यांची चांगली कल्पना होती. अनेक वर्षे लोटली तरी राजाने प्रधानाला वेसण घातली नाही तेव्हा रामशर्मांना वाटले की राजाला कदाचित प्रधानाच्या कृत्यांची माहितीच नसावी. ती कळावी या हेतूने रामशर्मा राजाच्या भेटीस निघाले.

रामशर्मा भेटीला आले तेव्हा राजाने श्रद्धाभक्तीपूर्वक आपल्या गुरुचे स्वागत केले आणि थोडा वेळ औपचारिक बोलणे झाल्यानंतर राजाने आपल्या गुरुवर्यांना येण्याचे कारण विचारले.

रामशर्मांनी तेथे बसलेल्या वृद्ध मंडळीकडे उडती नजर टाकून सहेतुक एकदा पाहिले व म्हणाले–"राजा, तसे काही विशेष नाही. मी तुझ्या राज्याची स्थिती

...भेटीला आलो आहे एवढेच."

राजाने नम्रपणे विचारले–"गुरुवर्य! माझ्या राज्यकारभाराविषयी आपले काय मत आहे?"

"राज्यव्यवस्था म्हणशील तर फार चांगली आहे. सर्व प्रजेला चंदनवृक्षासारखी उत्तम सावली लाभली आहे आणि चंदनाचा सुवास तर सर्वत्र दरवळतो आहे." रामशर्मा म्हणाले.

राजा क्षणभर गंभीर विचारात गढून गेला. नंतर काही वेळाने शांतपणे म्हणाला–"गुरुवर्य! आपण माझे डोळे उघडले. त्याबद्दल मी कोणत्या शब्दात आपले आभार मानू?"

रामशर्मा व राजा दोघां गुरुशिष्यांचे काही वेळ इतर गोष्टींवर बोलणे झाले. त्यानंतर राजाने त्याच दिवशी आपले विश्वस्त हेर पाठवून प्रधानाच्या सर्व कारवायांची चवकशी करून माहिती मिळविली आणि त्याची प्रधानकी काढून घेतली. त्यामुळे प्रजेत उत्साह व आनंदाची लहर पसरलेली पाहून राजाची खात्री झाली की त्याने वेळीच प्रधानविरुद्ध जी कृती केली ती बरोबर होती.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, माझ्या मनात काही शंका आहेत.



राजाचे गुरु रामशर्मा राजाला प्रधानाविरुद्ध सावध करायला म्हणून आले होते. परंतु त्यांनी प्रधानाच्याविरुद्ध काही एक तक्रार केली नाही, उलट राजाच्या कारभाराची प्रशंसाच केली. हे कसे काय? नंतर इतके दिवस प्रधानाविरुद्ध कागाळ्या येत असूनही राजाने त्याच्याविरुद्ध काहीच कृती केली नाही, आणि रामशर्मांनी राजाच्या प्रश्नाचे सरळ उत्तर देऊन राज्यात चालू असलेल्या गोंधळाविषयी एक चकार शब्दही न काढतां राज्यकारभाराची प्रशंसाच केली. मग त्याने प्रधानाला कां काढून टाकले. या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर तुला

परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

तेव्हा विक्रमादित्य म्हणाला–"रामशर्मा ज्या कामासाठी राजाकडे आला होता ते त्याने केले. सरळ न बोलतां सांकेतिक भाषेत त्याने उत्तर दिले. कारण एक तर मोकळेपणाने सर्व खुलासा करण्या लायक दोघांची भेट एकांतात झाली नव्हती. समोर अनेक दरबारी वृद्धमंडळी होती. 'एकांतात बोलू या का' अशी सूचना रामशर्मांना करतां आली असती. परंतु त्यामुळे प्रधानाला तत्काळ संशय आला असता. तो आततायी व स्वेच्छाचारी होता. राजाचा जीव धोक्यात पडण्याची शक्यता होती. म्हणून रामशर्माने सांकेतिक भाषेत सुचविले यात गुरूचा सूज्ञपणाच दिसतो. शिवाय राजाची कुशाग्रबुद्धी अद्याप जिवंत आहे की नाही हे देखील रामशर्मांना पहायचे होते. म्हणून सांकेतिक शब्दात आपले मत दिल्यास दोन्ही हेतू साध्य [illegible] दिल आणि जर राजाची बुद्धी बोथट झाली असेल तर त्याला सावध करूनही काही फायदा होण्यासारखा नव्हता. उलट त्यामुळे नुकसान होण्याचीच शक्यता जास्त होती. म्हणून रामशर्माने जे केले त्यात त्यांचा सूज्ञपणाच दिसून येतो. त्यांनी सांकेतिक भाषेत राजाला सावध केले की चंदनाच्या मोहक वासाने साप चंदनाच्या वृक्षाच्या छायेत येतात. राजाला तेवढी सूचना मिळाली व तो सावध झाला. त्याने गुरूचे आभार मानले. रामशर्माने जे सांगितले त्यांत आणि राजाच्या कानावर प्रधानाविरुद्ध ज्या कागाळ्या आल्या होत्या त्यांत बरेच अंतर आहे. रामशर्माने सांकेतिक भाषेत केलेल्या सूचनेवरून स्थिती हाताबाहेर झाली आहे हे राजाला कळले. म्हणून त्याने तत्काळ कृती केली."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



# विचित्र कर्ज व वसूली

एका गृहस्थाने आपल्या मुलीच्या लग्नासाठी मोठे कर्ज काढल्यावर त्याला तो दिवाळखोर झाला असल्याचे जाहीर करावे लागले. त्याने आपली सर्व इस्टेट दहा गावप्रमुखांच्या हाती देऊन विनंती केली की त्यांनी न्यायोचित कर्जाची फेड करावी.

ते कळल्यावर सर्व कर्ज देणारे त्या गावप्रमुखांकडे येऊन त्यांनी दिलेल्या कर्जाच्या रकमा हिशोबाप्रमाणे वसूल करू लागले.

एकजण आला आणि गावप्रमुखांना म्हणाला की त्याला त्या गृहस्थाकडून पंधरा रुपये येणे आहेत. कारण त्याने त्या ऋणकोच्या मुलाच्या लग्नात पंधरा रुपये आशीर्वाद म्हणून दिले होते. आता त्या ऋणकोने दिवाळे काढले असल्याने त्याला परत आशीर्वाद म्हणून काही देता येणार नाही. म्हणून त्याच्या डोक्यावर पंधरा रुपयांचे कर्ज झाले.

गावप्रमुखांपैकी एकाने विचारले–"आम्ही ऐकतो की लग्नप्रसंगी त्यांनी पंचपक्वान्नांची जेवणे दिली होती, खरे आहे का?"

"होय तर! आज तशी जेवणे दिली तर प्रत्येक पानामागे दहा तरी नक्कीच खर्च होतील" तो माणूस म्हणाला.

"तुमच्या घरून लग्न घरी जेवायला कितीजण गेले होते?" ग्रामप्रमुखाने विचारले.

"आम्ही चारजण गेलो होतो?" तो म्हणाला.

"तरमग तुमच्यावरच पंचवीस रुपयांचे कर्ज आहे. ती कर्जफेड करा!" ग्रामप्रमुख म्हणाला.





# वरपरीक्षा

**श्री**पूरच्या जमिनदाराचे नाव लक्ष्मीकांत होते. तो फार लोभी होता. त्याला गौरी नावाची एकुलती एक मुलगी होती. तिचे लग्नाचे वय झाले तेव्हा तिच्यासाठी वरशोधन सुरू झाले. लक्ष्मीकांत विचार करू लागला की आपल्या इस्टेटीला मुलगीच वारस आहे. तेव्हा नवरामुलगा मितव्ययी असणे चांगले. खर्चिक स्वभावाचा असता कामा नये.

लग्न जुळविणाऱ्या मध्यस्थांना लक्ष्मीकांतने ती गोष्ट सांगून त्याप्रमाणे स्थळ शोधायला सांगितले. मध्यस्थ अनेक स्थळे घेऊन आले. मुलीला पहायला कोणी मुलगा आला की तो लक्ष्मीकांतने अंगणात हंडयात भरून ठेवलेले पाणी घेऊन पाय धुवून घरात येत. मध्यस्थाबरोबर आलेला मुलगा पाय धुवायला किती तांबे पाणी घेतो त्यावर लक्ष्मीकांतची नजर असे. लक्ष्मीकांतची अशी समजूत होती की जो तरुण पाणी वापरतांना सावधगिरी बाळगत नाही त्याला कमी खर्चात आयुष्य घालविणे जमणारच नाही. अशा कसोटीवर मध्यस्थांनी आणलेला एकही तरुण लक्ष्मीकांतला पसंत पडला नाही.

म्हणून मध्यस्थ केशवभट यांनी स्थळे घेऊन यायचे सोडून दिले. गौरीलासुद्धा वडिलांची ही पद्धत आवडली नाही. तिला वाटू लागले की आपले लग्न करून देण्याची इच्छाच वडिलांच्या मनात नसावी. कारण गौरी ज्या मुलांशी लग्न करायला तयार होती त्यांना सुद्धा एकेक करून तिच्या वडिलांनी परत पाठविले होते. मुलीला मुलगा पसंत आहे की नाही, याची लक्ष्मीकांतने कधी चौकशीसुद्धा कधी केली नाही. तिला वाटू लागले की आपल्या नशिबांत लग्न व्हायचे लिहिलेच नसावे. ती गोष्ट तिने आपल्या उमा नावाच्या एका मैत्रिणीला सांगितली. तिचा चुलत भाऊ एकदा तिच्या घरी भेटायला आला होता. त्याने शेजारच्या खोलीत दोघां मैत्रिणींचे जे संभाषण चालू होते ते ऐकले.

त्यानंतर काही दिवसांनी केशवभटजी एका तरुण मुलाला लक्ष्मीकांतच्या घरी मुलीला दाखवायला घेऊन आले. केशवभटजी सवयीप्रमाणे पाय धुवून घरात गेले. परंतु तो तरुण मुलगा पाय धुतल्या शिवाय घरात गेला. ते पाहून लक्ष्मीकांतला वाटले की त्या मुलाला खरुज फोड वगैरे काही झाले असावे, किंवा वहाण लागली असावी. कारण तो मुलगा आपल्या नवीन चपला हातात घेऊन आला होता. म्हणून लक्ष्मीकांतने मुलाला पाय धुवून यायला सांगितले. परंतु तिकडे दुर्लक्ष करून तो आत खुर्चीवर येऊन बसला. तेव्हा लक्ष्मीकांतला वाटले की कदाचित तो बहिरासुद्धा असावा.

तो तरुण खुर्चीवर बसल्यावर आपल्या पायाला बांधून ठेवलेले जुने फाटके कागद काढून म्हणाला—"मी पाय धुतले नाहीत त्याबद्दल आपण काही गैरसमज करून घेऊ नये. आपण कित्येकदा बाहेर जातो आणि बाहेरून घरी परत येतो. म्हणून प्रत्येकवेळी व्यर्थ पाणी खर्च करणे मला आवडत नाही. म्हणून मी हे रद्दी कागद प्रत्येक वेळी पायाला बांधून घेतो."

मुलाचे पाय स्वच्छ होते व तो बहिरासुद्धा नाही याची खात्री पटली. परंतु









लक्ष्मीकांतने त्याला विचारले–"परंतु काय हो, तुम्ही बरोबर चपला आणल्या होत्यात, नाही का? त्या घालून कां नाही आलात?"

"मी चपला विकत घेतल्या त्या रस्त्यावर घासून फेकून द्यायला का?" मुलाने तो प्रश्न करून लक्ष्मीकांतच्या शंकेचे निरसन केले.

"तरमग एवढा खर्च करून चपला विकत घेण्याची गरजच काय होती?" लक्ष्मीकांतने विचारले.

तो तरुण थोडा रागावल्यासारखा होऊन म्हणाला–"मी चपला हातात घेऊन एवढ्यासाठी हिंडतो की तुमच्या सारख्याने कोणी मला दरिद्री भिकारी म्हणू नये की याच्यात चपला खरेदी करायची लायकी सुद्धां नाही. चपला पायात घातल्या काय किंवा हातात नेल्या काय त्यात काही लहानपणा किंवा मोठेपणा थोडाच असतो?"

त्या तरुण मुलाचा तो मितव्यय पाहून लक्ष्मीकांत चकित झाला. तरी त्याच्या मनात एक शंका राहून गेली. म्हणून त्याने विचारले–"हे बघा, मी गोष्ट विचारतो त्याबद्दल तुम्ही रागावू नका. हे रद्दी कागद फुकट मिळतात का? त्यांची सुद्धा थोडी फार किंमत असतेच! ते नाही का व्यर्थ..." असं पुढे काही म्हणू लागला.

तो तरुण मुलगा मध्येच त्याला थांबवून म्हणाला–"तुम्हांला कशी किफायत करावी हे कळत नाही वाटतं? आमच्या घरी दररोज सैंपाक कसा होतो, वाटलं तुम्हांला? या रद्दीकागदांचा जाळ करूनच!"

ते ऐकून लक्ष्मीकांत अवाक् झाला. त्याने गौरीचे लग्न त्याच्याशी करून दिले.

लक्ष्मीकांतच्या जावयाचे नाव गोपाळ होते. त्याने लक्ष्मीकांतच्या घरी येण्यापूर्वी त्याच्या चिक्कूपणाची सर्व माहिती चांगली करून घेतली होती. चांगली स्थळे आली असूनही लक्ष्मीकांत कां नकार देत आला हे त्याला माहीत झाले होते. चिक्कूपणाची कमाल करून दाखविण्याची योजना उमा व केशवभटाच्या सल्लयाने त्याने योजली आणि त्याला त्यात यश मिळाले.





# भुताचे नाटक

एका गावात गणूशेट नावाचा एक व्यापारी रहात असे. त्याने अपार धन संपादन केले आणि ते सर्व आपला मुलगा लखूशेट याचे नावी ते ठेवून देऊन कायमचे डोळे मिटले. लखूशेटने जेव्हा प्रत्यक्ष डोळ्यांनी ते धन पाहिले तेव्हा तो थक्कच झाला. त्याने तिजोरी उघडून पाहिली सोने, चांदी आणि दागिन्यांचे ढीग त्याला दिसले. त्याला आनंद व्हायच्या ऐवजी त्याच्या हृदयाचा थरकांप उडून गेला. एवढे धन घरात बाळगून ते व स्वतःचा जीव चोरापासून वांचविणे सोपे नव्हते.

म्हणून लखूशेटने आपल्या संपत्तीच्या रक्षणासाठी एक युक्ती योजली. त्याने सर्व धन दोन हंड्यांत भरले आणि मध्यरात्रीच्या वेळी गावाबाहेरच्या वडाच्या झाडाखाली ते पुरून ठेवले. लोक रात्री अपरात्री त्या बाजूला भुतांच्या भीतीने फिरकत नसत. वडाच्या झाडावर भुते आहेत असे गावकऱ्यांना वाटे. लखूशेटने त्या झाडावर भुते असल्याची खात्री व्हावी यासाठी नाटक रचले. तो स्वतः वेष पालटून भुताचे नाटक करीत असे.

त्याने वडाच्या झाडाखाली धन पुरून ठेवले असल्या कारणाने त्यालाच त्या निर्जन स्थानी पाहारा द्यावा लागे. तो कोणाच्या नजरेस न पडता भुताचा वेष धारण करून झाडाखाली रात्रभर हिंडे आणि उजाडण्यापूर्वी घरी परत येई.

गावात अशी अफवा पसरली की वडाच्या झाडाखाली कोणीतरी भूत रात्रभर फिरते. लखूशेटने गावात ती अफवा पसरवितांना असेही सांगितले की त्याचा बापच भूत झाला आहे आणि वडाच्या झाडावर त्याने आपले ठाणे केले आहे. मध्यंतरी कित्येक गावकऱ्यांनी भूत पाहिले



देखील होते. म्हणून गावकऱ्यांचा त्या गोष्टीवर विश्वास बसला की गणूशेट भूत होऊन तेथे रहात आहे. म्हणून गावकरी त्या वडाच्या बाजूलाच काय तर आसपास जायला धजत नसत. ज्यांनी झाडाखाली भुताला पाहिले होते ते ताप येऊन आजारी पडले. हळूहळू गावकरी भुताचे वर्णन करताना पराचा कावळा करू लागले.

भुताच्या दहशतीमुळे गावातली सर्व कामे बंद पडू लागली. शेतात राखण करायला जायला कोणी धजेनासा झाला. शेजारच्या गावातून चोर येऊन पिके कापून नेऊ लागले. गावात कोणी माणूस किंवा असल्याचे सर्व मानू लागले. अशा तऱ्हेने गावातले जीवन अस्तव्यस्त होऊन गेले.

गावात दारिद्र्य दिवसेंदिवस वाढू लागले. ते सुद्धा लखूशेटला फायद्याचे झाले. आपल्या दुकानातला माल तो वाढत्या भावाने विकून खूप पैसे मिळवू लागला.

अशा परिस्थितीत एके दिवशी छोटू आपल्या कुत्र्यांबरोबर त्या गावी आला. गावात पाऊल टाकताच त्याने गणूशेट भूत झाल्याची गोष्ट ऐकली आणि त्याला गावकऱ्यांची कीव आली. त्याला फार वाईट वाटले. त्याने विचार केला की गावात भुताची जी दहशत वाढली आहे ती दूर झाली तरच गावकरी सुखी होतील. परंतु ते साध्य व्हावे यासाठी उपाय करण्यापूर्वी गणूशेटचे भूत आहे कसे हे पाहिले पाहिजे.

त्या दिवशी रात्री छोटू ज्या निर्जन प्रदेशात भूत राही त्या वडाच्या झाडावर चढून बसला. मध्यरात्रीच्या सुमारास लखूशेट तेथे आला आणि भुताचा वेष धारण करून झाडाखाली हिंडू लागला. तेव्हा छोटूच्या मनात निरनिराळे विचार येऊ लागले. कोणीतरी गणूशेटचा अभिनय करून प्रजेला भीती दाखवीत आहे. परंतु हे नाटक तो कां बरे करीत असावा? त्या पाठीमागे त्या माणसाचा काहीतरी गावकऱ्यांना नानाप्रकारे छळणाऱ्या या दुष्ट माणसाचे बिंग फोडले पाहिजे.

असा विचार करून उजाडण्यापूर्वी जेव्हा लखूशेट घरी परत जाऊ लागला तेव्हा छोटू त्याच्या पाठीमागून चालू लागला. तो ज्या घरात गेला त्या घरात कोण राहतो वगैरे सर्व माहिती गावकऱ्यांना विचारून घेतली. गावकऱ्यांकडून त्याला कळले की लखूशेट हा गणूशेटचा मुलगा असून बापाने त्याच्यासाठी अपार धन मागे ठेवले आहे. आता बाप भूत झाला असून गावकऱ्यांना छळतो आहे.

छोटूला आतां भुताच्या नाटकाचे कथानक चांगले कळले. हा लबाड माणूस बाप भूत झाल्याची अफवा पसरवून स्वतः भुताचा वेष धारण करतो व गावकऱ्यांना भीती दाखवतो आहे. याच्या पाठीमागे त्याचा काहीतरी स्वार्थ नक्कीच असला पाहिजे. आपल्या घरातले धन कोणीतरी चोर लुटेरा घेऊन जाईल याची मुळीच काळजी न करता तो वडाच्या झाडाखाली रात्री फिरतो आहे, म्हणजे त्याच्या मुळाशी काहीतरी कारण असले पाहिजे.

त्या दिवशी काळोख पडताच छोटू नकली दाढीमिशा लावून लखूशेटच्या घरी गेला आणि मोठमोठ्याने हाका मारू लागला—"गणूशेट, ए गणूशेट! दार उघड!" लखूशेटने दार उघडून छोटूकडे खोल दृष्टीने पहात विचारले—"तू कोण, काय पाहिजे तुला?"





"मी गोविंदसिंगाचा मुलगा! गणूशेटला भेटायचे आहे." छोटूने खुर्चीवर बसत उत्तर दिले.

छोटू म्हणाला ते ऐकल्यावर चकित होऊन लखूशेटने विचारले—"ते माझे वडील होते. ते वारल्याला पुष्कळ दिवस झाले. असे काय काम होतं तुम्हांला त्यांच्याजवळ?"

छोटू तोंडावर काळजी वाटत असल्याचे सोंग करून म्हणाला—"माझ्या वडिलांना तुमच्या वडिलांकडून एक लाख रुपये यायचे आहेत. मी ते वसूल करायला आलो आहे."

लखूशेटने दचकून विचारले—"काय कडून एक लाख रुपये कर्जाऊ घेतले होते? ते मी फेडले पाहिजेत? वा रे वा! माझ्याजवळ हे राहते घर सोडून दुसरे काही एक नाही, एक कवडीदेखील नाही. पाहिजे तर घराची झडती घेऊन पहा. मला दोन वेळचं खायला मिळण्याची मारामार आहे!" असे सांगून लखूशेटने तिजोरी उघडून दाखविली.

सर्व घरात हुडकून पाहिल्यावर वस्तुस्थिती छोटूच्या लक्षात आली. लखूशेट सर्व धन त्या भुतांच्या झाडाजवळ लपवून ठेवून रात्री भुताचा वेष धारण करून तेथे पाहारा देतो आहे आणि रात्री त्या बाजूला कोणी येण्याचे साहस करू नये यासाठी त्याने हे नाटक रचले आहे.

त्याचा तर्क ठीक असल्याची खात्री पटल्यावर छोटू लखूशेटला दरडावून म्हणाला—"हे बघ, लखुशेट! कर्जाचा अर्थ कर्ज आहे! तू पाहिजे तर आपले घर वीक आणखी नाहीतर स्वतःला वीक; माझ्या वडिलांनी दिलेले कर्ज तू फेडले पाहिजेस. कदाचित तुला माझ्या वडिलांच्याविषयी माहीत नसेल!"

तेव्हा संतापून लखुशेट म्हणाला—"पुन्हा तू असे काही म्हणालास तर तुझे प्रेतच येथून परतेल. माझे बाबा भूत होऊन घर पडले तर गाईगुरं गवताला तोंड लावीत नाहीत. तुझा बाप गोविंदसिंह माझं काय करणार रे?"

ते ऐकून छोटू मोठ्याने हसून म्हणाला—"अस्सं! माझे बाबासुद्धा मेल्यावर भूत झाले आहेत आणि गांवाच्या आसपास सारखे फिरत असतात. भूत झाल्यानंतर त्यांनी ज्यांना ज्यांना कर्ज दिलं होते त्यांच्या मानगुटीला बसून कर्ज वसूल केले आहे. जो कोणी कर्ज फेडीत नाही तो रक्त ओकून कर्जाची फेड करीत आहे. ते तुझ्या वडिलांवर हल्ला केल्याशिवाय राहणार नाहीत. ते भेटले नाहीत तर तुझ्या मानगुटीला बसतील. म्हणून कर्ज वसूल करायला मी आलो आहे. तू मला रिकाम्या हातांनी परत पाठविलेस, तर तुझ्या जिवाचे काय होईल ते मला नाही सांगता येणार. माझ्या जवळ पैसे नाहीत अशी बनवाबनवी तू माझ्या जवळ एक वेळ करशील, परंतु भुताला तू कोठे धन ठेवले आहेस ते कळणार नाही असे वाटले का तुला! कर्जाची गोष्ट तुला माहीत नाही असं तुझं म्हणणं आहे का? बरं तर, मी निघालो." असे धमकावून सांगून छोटू तेथून निघून गेला.

लखुशेटला वाटू लागले की तो घेरी येऊन पडणार. भुताचे सोंग करून दुसऱ्याला भीती दाखविणे सोपे आहे. परंतु खरोखरचे भूत पाठीशी लागलं तर आपली काय स्थिती होईल?









तरी त्या दिवशी रात्री लखूशेट भुताचा वेष धारण करून वडाच्या झाडाखाली हिंडू लागला. परंतु त्याचे पाय थरथर कापत होते. कारण त्याला सारखी धास्ती वाटत होती की कोणत्याही क्षणाला गोविंदसिंगाचे भूत त्याच्या समोर उभे राहील. त्या निर्जन स्थानी एकट्याने भुताशी दोन हात करण्यापेक्षा आपले धन घेऊन घराची वाट धरणे जास्त शहाणपणाचे होईल. चोरांची भीती भुतांपेक्षां कमीच वाटली त्याला.

असा विचार करून लखुशेटने जेथे त्याने दोन्ही हंडे पुरून ठेवले होते तेथे खणून ते बाहेर काढले. त्याच वेळी छोटू झाडावरून खाली उडी मारून लखूशेटच्या समोर दत्त म्हणून उभा राहिला. लखुशेट भीतीने थरथर कापत मोठ्याने किंकाळी फोडून ओरडला. छोटूने त्याला धरून वडाच्या झाडाला बांधून ठेवले आणि आपल्या कुत्र्याला त्याच्यावर नजर ठेवायला तेथे ठेवून गावकऱ्यांना बोलावून घेऊन आला. म्हणाला—"चला सर्व, मी गणूशेटच्या भुताला बांधून ठेवले आहे. त्याला दाखवितो." गावकऱ्यांनी लखुशेटला ओळखले. छोटू म्हणाला—"तुमच्या पैकी कोणाला कल्पनादेखील नसेल की गणूशेटने मरण्यापूर्वी गावकऱ्यांना पिळून लुटून किती पैसे जमविले होते ते. ते गावकऱ्यांना कळू नये म्हणून त्याच्या लेकाने या हंड्यात भरून येथे आणून पुरून ठेवले आहे आणि गांवकऱ्यांत अशी अफवा पसरविली आहे की त्याच्या बापाचे भूत रात्रभर पाहारा देते आहे. आता गावकऱ्यांनीच ठरवायचे आहे की यातला गांवकऱ्यांचा वाटा किती आहे? सर्वांना हे परत मिळाले पाहिजे. ते कोणत्याही रूपात मिळो. भूताची भीती दाखवून लखूशेटने गावकऱ्यांना छळले त्याबद्दलही याला अद्दल घडेल असे काहीतरी घडले पाहिजे."

त्यानंतर छोटूने दोन्ही हंडे धनाची विल्हेवाट लावण्यासाठी गावप्रमुखाकडे ठेवले आणि आपल्या कुत्र्याला घेऊन पुढल्या मुक्कामाला निघाला.





# शहराचें वारें

सखाराम हा आपल्या गावातला खाऊन-पिऊन सुखी असा गावकरी होता. शेतीभाती बरोबर त्याच्या नारळाच्या व आंब्याच्या बागाही होत्या.

त्याचा भाचा केशव दहा वर्षाचा झाला तेव्हा त्याचे आईबाप वारले व तो अनाथ झाला आणि मामाच्या घरी येऊन राहू लागला. सखाराम दर आठवड्याला गाडीत फळे भरून शहरातल्या बाजारात विकत असे. त्या वेळी तो भाच्याला बरोबर नेई. वाटेत केशवने एखादे फळ खाल्ले तर सखाराम त्याला काही म्हणत नसे. उलट केळं किंवा आंबा स्वत:च्या हाताने काढून त्याला खायला देत असे. परंतु शहरात गेल्यानंतर तो केशवला एकाही फळाला हात लावू देत नसे. त्याने कुजक्या फळाला हात लावला तर म्हणे—"हे विकले तर दोन पैसे मिळतील. खाल्लेस तर काय मिळेल रे?" परंतु शहर सोडल्याबरोबर मात्र मामाचा व्यवहार एकदम बदले.

केशव मोठा झाला तेव्हा सखारामाने आपल्या मुलीशी त्याचे लग्न करून दिले व म्हणाला—"केशव, तू आता एक जबाबदार गृहस्थ म्हणून राहलं पाहिजेस. तुला मुलंबाळं होतील. खेडेगावात काय मिळणार? शहरात खूप पैसे मिळविता येतात. तू आपल्याबरोबर भांडवल म्हणून पाहिजे तितके पैसे घेऊन जा आणि व्यापारधंदा कर."

केशवला गावातच राहणे आवडत होते. शेतीभातीत त्याला रस वाटे. म्हणून तो मामाला म्हणाला—"मामा! मी शहरात राहू लागलो तर येथे शेतीभातीची कामे कोण पाहणार? तुम्हाला नको का मदतीला कोणी?"

सखारामाने केशव म्हणाला त्याकडे दुर्लक्ष केले व म्हणाला—"माझी काळजी

करू नकोस. माझं काय ठीक चाललं आहे. इकडची सर्व कामे मी पाहून घेईन. तू शहरात जाऊन व्यापार कर."

शेवटी नाइलाजाने केशव बायकोला घेऊन शहरात राहू लागला. तेथे त्याने एक चहाचे हॉटेल काढले. दोन महिने झाले. तिकडे खेडे गावात एकटा सखारामच सर्व कामे पाही. तरी थोडावेळ काढून तो भाच्याचा धंदा पहायला शहरात आला.

हॉटेलातून केशवने सखारामाला येत असलेला दुरून पाहिले. तो लगेच गल्ल्यावरून उठला आणि आपल्या जागी एका नोकराला बसवून म्हणाला–"मी थोड्या वेळाने येतो, तू गिऱ्हाइकांकडून पैसे घे." असे सांगून तो बाहेर निघून गेला.

शोधत हॉटेलात आला. तेव्हा केशव कोठेतरी गेला असल्याचे त्याला कळले. त्याला भूक लागली होती. त्याने खूप पोट भरून खाऊन घेतले व गल्ल्यावर बसलेल्या नोकराला म्हणाला–"मी केशवचा मामा आहे बरं का रे! मी त्याच्या घरीच जातो आहे. त्याला मी आलो असल्याचे सांग."

"होय, पण तुम्ही खाल्लेत त्याचे पैसे देऊन जा." नोकर म्हणाला.

"पैसे कसले रे? हे हॉटेल माझ्या भाच्याचेच तर आहे?" सखाराम म्हणाला.

"असे किती लोक मामा काका होऊन येतात. पहिल्याने पैसे द्या आणि मग जा कोठे ते!" नोकर म्हणाला.

सखाराम भीतभीत म्हणाला.

थोड्यावेळाने केशव परत येऊन पाहतो तर सखाराम कणीक भिजवीत बसलेला दिसला. म्हणाला–"पाहिलंस केशव! आज माझ्यावर काय प्रसंग ओढवला आहे तो!" असे सांगून त्याने घडलेला सर्व वृत्तांत सांगितला.

केशव म्हणाला–"मामा! शहरातले सर्व लोक असेच. आपण त्यांना खरे सांगितले तरी त्यांचा विश्वास बसत नाही." त्याने मामाच्या मनाचे सांत्वन केले.

रात्री घरी दोघे जेवायला बसले असतां केशवची बायको वाढतांना म्हणाली–"ज्या नोकराने बाबांचा असा अपमान केला त्याला कामावरून काढून टाकावे."

"परंतु त्याची त्यात चूक काय? ती चूक अज्ञानाने झाली आहे. उद्यांपासून त्यांना हॉटेलात काय वाटेल ते खाऊ दे. मामा खाणार नाही तर कोण खाणार?" केशवने बायकोची समजून घातली.

ते ऐकून सखारामाच्या मनाचे समाधान झाले. परंतु दुसऱ्या दिवशी सखाराम हॉटेलात गेला तेव्हां तेथे त्याचा भाचा जसा वागला ते पाहून सखाराम थक्कच झाला.

केशव स्पष्ट शब्दात त्याला म्हणाला–"तुम्हांला काय वाटेल ते खा. परंतु जाताना त्याचे पैसे देऊन जा. प्रत्येक पैचा












हिशोब ठेवावा लागतो. नाहीतर मामा या शहरात व्यापार कसा काय हो होणार?"

त्या दिवशी रात्री केशव घरी आला तेव्हा बायको म्हणाली—"तुम्ही बाबांना हॉटेलात मिठाई वगैरे काहीच खायला दिली नाहीत वाटते? मीच घरी करून वाढते आहे!"

ते ऐकून केशव तिलाच रागावून म्हणाला—"काय म्हणालीस? पक्वान्नं करून वाढणार? वा रे वा! आमचं घर म्हणजे धर्मशाळा आहे का? वाटेल त्याने यावं आणि वाटेल ते खाऊन चैन करावी. मामांची गोष्ट सोड. तरी पक्वान्नं खाऊन काय मिळणार आहे ग? विकली तर चार पैसे तरी मिळतील. बेकार खर्च करणे मामांनासुद्धा आवडत नाही."

जेवणखाण आटोपल्यावर सखाराम केशवला म्हणाला—"केशव, तुझे हे वागणे मला मुळीच आवडले नाही."

"मामा! मी तरी काय करू? या शहरातलं राहणं हे असंच असतं! तुमच्या पाहून कोणती गोष्ट [illegible] आहे? लहानपणी तुम्हीसुद्धा असेच नव्हता का सांगत? तुम्ही माझ्या सर्व इच्छा पूर्ण करून मला तुम्ही हीच तर शिकवण दिलीत. मला घरी वाटेल ते खायला प्यायला घातलेत. परंतु बाजारात पोचताच तुम्ही कधी एकाही फळाला हात लावू दिला नाहीत. मी तुम्हांला पूर्वीच सांगितले होते की मला शहरात राहणे बिलकुल आवडत नाही. परंतु तुम्ही माझं ऐकलंत नाही!" असं सांगून केशव गप्प झाला.

सखाराम रात्रभर विचार करीत होता. सकाळी गावी परत जाताना म्हणाला—"केशव! आता हे शहरी जीवन आपल्याला नको. हॉटेल विकून टाक आणि तुम्ही घरी निघून या."

ते ऐकून केशवला परमानंद झाला. एका आठवड्यातच त्याने आपल्या हॉटेलाचा व्यवहार कोणाला तरी सोपविला आणि बायकोला घेऊन आपल्या मामाच्या गावी परतला.



# भिकारी

विजयपुरीचा राजा जयदेव याला असे वाटले की राज्यात कोणी भिकारी म्हणून असता कामा नये. ती व्यवस्था करण्याच्या हेतूने त्याने दवंडी पिटविली की राज्यातल्या सर्व गरिबांनी राजवाड्यासमोरच्या पटांगणात जमावे. सर्वांच्या अन्न, वस्त्र व घर यांची व्यवस्था करून देण्यात येईल.

ठरल्या वेळेला सहस्रावधी गरीब राजवाड्यासमोरच्या मैदानात जमा झाले. एवढ्या मोठ्या संख्येने जमा झालेल्या लोकांना पाहून राजा विचारात पडला की इतक्या लोकांची गरज भागवायला खजिन्यातले धन कसे पुरणार?

परंतु प्रधान हुशार होता. तो सर्व जमलेल्या लोकांना म्हणाला—"ज्यांना घर हवे असेल त्यांनी पहिल्याने राजधानी लगतच्या डोंगरावरील दगड फोडून आणावेत. बाकी सामान दरबारातर्फे पुरविले जाईल."

ते ऐकून अधिकांश लोक भिकारी असूनही मेहनत करण्याची तयारी नसल्यामुळे आले तसे निघून गेले. थोडेच लोक उरले. राजाने त्या सर्वांना कामधंदा मिळवून दिला आणि घरे बांधून दिली.





# आगलावी भुते

एकदा एका जिल्ह्याचा अधिकारी आपल्या अधीन असलेल्या प्रदेशातल्या प्रजेची स्थिती कळावी म्हणून खालच्या नोकर-वर्गाबरोबर दौऱ्यावर निघाला. वाटेत काळोख पडू लागला. काही वेळ चालत राहिल्यावर त्याला दूर टिमटिमणारे दिवे दिसले.

तो नोकरवर्गाला म्हणाला–"ते दिवे दिसत आहेत, त्या दिशेने जाऊ या."

नोकर म्हणाले–"मालक! ती तर आगलावी भुतं आहेत. तेथे स्मशान असावं."

"काही हरकत नाही. तेथे स्मशान असेल तर जवळच गावही असणार!" अधिकारी म्हणाला.

वास्तविक ते दिवेच होते व तेथे एक गावच होते. अधिकाऱ्याच्या आज्ञेने काही लोकांनी जाऊन गावचा पाटील रघुजीला बोलावून आणले. पाटलाने अधिकाऱ्याला लवून नमस्कार केला आणि त्या दिवशी अधिकाऱ्याच्या उतरण्याची व खाण्या-पिण्याची उत्तम व्यवस्था करून दिली.

उजाडल्यावर अधिकाऱ्याने गावाची पाहणी केली. गावाची स्थिती अगदी वाईट होती. जागोजागी रस्त्यात जमलेले पाणी, कचरा आणि घाण. शाळा एका पडक्या घरात होती. औषधपाण्याची व्यवस्था नाही.

अधिकाऱ्याने पाटलाची हजेरी घेतली. विचारले–"गावाची ही स्थिती आहे, तर तू काय झोपा काढीत होतास? योग्य व्यवस्था तू कां केली नाहीस? वरच्या अधिकाऱ्यांना कां कळविले नाहीस?"

"सरकार! मी कित्येक वेळा गावाची स्थिती अर्ज पाठवून कळविली. परंतु काही फायदा झाला नाही. वरचे अधिकारी आपला वांटा मागू लागले. पिके चांगली

आहेत. आणि आतां अधिकाऱ्यांची पोटे भरायला मी शेतकऱ्यांकडून कसे पैसे वसूल करणार?" रघुजी भीतभीत म्हणाला.

जिल्हाधिकारी ते उत्तर ऐकून थक्कच झाला. त्याने जागच्या जागी दहा हजार रुपये मंजूर करून रघुजीला दिले आणि गावात सुधारणा करण्यास त्याला आज्ञा केली. त्याला मदत करण्यासाठी त्याने ग्रामपंचायत विभागाच्या काही अधि-काऱ्यांना नेमले.

त्यानंतर जिल्हाधिकारी आपल्या दौऱ्या-वर पुढल्या मुक्कामाला निघाला.



दुसऱ्याच दिवशी कोणतातरी सण होता. पाटलाच्या घरी जांवईबापू, मुलगी व त्यांची मुले आली. त्यांच्याबरोबर पाटलाचा वेळ गप्पात व जेवणावळीत गेला. आन-दाच्या भरात पाटलाने एक हजार रुपये खर्चून मुलीसाठी एक सोन्याचा हार बनविला आणि जांवईबापू व मुलांना नवीन कपडे करविले.

पाटलाच्या बायकोने तिला सोन्याचा कंबरपट्टा करून द्यावा, म्हणून हट्ट धरला. मुलीसाठी आणि जांवईबापू व नातवंडां-साठी जो खर्च केला होता ती रक्कम कशी भरून काढायची पाटील या विवंचनेत असतां बायकोचा तो हट्ट पुरविण्याचा प्रसंग ओढवला. त्याने बायकोला सांगितले की हे सरकारी पैसे आहेत. त्यातले खर्च केल्यास तुरुंगवास भोगावा लागेल वगैरे. परंतु तिने तिकडे दुर्लक्ष करून सोनारा-कडून उधारीवर कंबरपट्टा करवून घेतला. नाइलाजाने पाटलाला सरकारी पैशाचा वापर करावा लागला. पंचायतीच्या नोक-रांना जेव्हा हे कळले तेव्हा त्यांनी पाटला-कडून एक हजार रुपये कर्ज मागितले. पाटलाला निरुपाय होऊन कर्ज द्यावे लागले.

त्यानंतर पंचायतीच्या अधिकाऱ्यांनी उरलेल्या पाच हजारात गावाच्या सुधा-रणेची कामे कशी पार पाडायची याची योजना केली. परंतु दहा हजाराहून कमी








रकमेत कामे पुरी होणे शक्य नव्हते. परंतु पाटलाकडे फक्त पाचच हजार उरले होते.

मध्यंतरी पाटलाच्या बायकोने एका माणसाला घरगडी म्हणून नेमले होते. तो पाटलाने खाटेखाली ठेवलेले पैसे उचलून पळून गेला. बातमी गावभर पसरली की नोकर दहा हजार रुपये चोरून घेऊन गेला.

जिल्हाधिकाऱ्याच्या कानावर ती बातमी जातांच त्याने पाटलाला बोलावून विचारले– "बाकी पांच हजार कोठे आहेत?"

पाटील म्हणाला– "नव्या नोकराने दहा हजाराची रक्कम चोरून नेली." त्याच्या तोंडातून ते वाक्य बाहेर पडताच त्याचा तो नोकर जिल्हाधिकाऱ्याच्या घरातून बाहेर आला.

पाटलाने त्याला विचारले– "काय रे, दहा हजार रुपये कोठे आहेत?"

अधिकारी व्यंग्य करीत म्हणाला– "पाटील, तुम्ही ते पैसे त्याची नजर पडेल अशा जागी ठेवले होतेत. वास्तविक सर्व रुपये त्याने चोरले हा आळ त्याच्यावर [illegible]यासाठी तुम्ही हे केलेत. परंतु तुम्हांला कल्पना देखील नसणार की हा तुमचा नोकर माझा मुलगा आहे. तुम्ही हे पैसे बरोबर खर्च करतां की नाही या गोष्टीवर नजर ठेवण्यासाठीच मी त्याला तुमच्या घरी नोकरी करायला पाठविले होते. तुम्हांला हवी होती तशी चोरी झाली खरी, परंतु त्याच बरोबर तुमचं बिंग बाहेर आले. तुम्ही ताबडतोब पाच हजार रुपये कोठून ते घेऊन या. गावाच्या सुधारणेचे काम माझा मुलगा पाहून घेईल."

पाटलाला सुटकाच नव्हती. त्यांनी आपले घर गहाण टाकून पांच हजार रुपये कर्जाऊ आणले व आपली मान सोडविली.

जिल्हाधिकाऱ्याने आपल्या खालच्या अधिकाऱ्यांना व नोकरांना बजावून सांगितले की आगलावी भुते कोण ते कळले का तुम्हांला? प्रजेचे पैसे स्वतःच्या फायद्यासाठी वापरणारेच वास्तविक आगलावी भुते होत.





# राजाची चूक

राजसेन नामक एका राजाला एकुलती एक मुलगी होती. ती काळी व कुरूप होती. म्हणून बरेच दिवस तिचे लग्नच होईना. म्हणून राजाची काळजी वाढत चालली होती.

शेवटी राजाने आपला मंत्री राहुल याला बोलवून आज्ञा केली की एका आठवड्याच्या आत मुलीकरितां चांगले स्थळ आणले पाहिजे आणि हे काम स्वतः केले पाहिजे. एका आठवड्याच्या आत एका गुणवान योग्य तरुणाला माझा जावई व्हायला तयार केले नाहीत तर भरल्या दरबारात शिरच्छेदाची शिक्षा दिली जाईल."

प्रधानाने रात्रंदिवस हिंडून फिरून राजाला जावई मिळवून देण्यासाठी खूप खटपट केली. परंतु काही फायदा झाला नाही. कारण राजाची मुलगी काळी व कुरूप असल्याचे सर्वांना माहीत होते. म्हणून कोणी तिच्याशी लग्नाला तयार होत नव्हता. मंत्री कमी वेळ होता तरी शेजारच्या राज्यात वरशोधनासाठी फिरून आला. परंतु तेथेदेखील एकही तरुण लग्नाला तयार होईना.

अशातऱ्हेने सहा दिवस लोटले. नवऱ्याला काळजीत पाहून प्रधानाच्या बायकोने कारण विचारले, तरी प्रधानाने खरी गोष्ट सांगितली नाही. परंतु अगदी नाइलाज होऊन शेवटी त्याने राजाचा हुकूम आणि त्याने सहा दिवस काढलेले कष्ट सर्व वृत्तांत सांगितला व म्हणाला– "उद्यापर्यंत योग्य जावई मिळाला नाही तर महाराज भरल्या दरबारात माझा शिरच्छेद करणार आहेत."

मंत्र्याची बायको धीर देत म्हणाली– "तुम्ही एवढी काळजी करण्याचे मुळीच कारण नाही. मी करते योग्य तो उपाय!"

    

तेव्हा मंध्याला जिवात जीव आल्यासारखे वाटले. तो निश्चिंतपणे जेवून बसून राहिला. परंतु बायकोने त्याला शेवटच्या घटकेपर्यंत तिचा उपाय काय तो सांगितला नाही.

दुसऱ्या दिवशी राजाचे नोकर मंध्याच्या घरी गेले आणि राजाज्ञा सांगून त्याला दरबारात घेऊन गेले. राजाने भरल्या दरबारात प्रधानाला विचारले–"प्रधान, तुम्ही राजकन्येसाठी चांगले स्थळ ठरविलेत का ?"

"महाराज, मी आपल्या परीने शिकस्त केली, परंतु योग्य वर मिळाला नाही." प्रधानाचे ते उत्तर ऐकून राजाने लगेच आज्ञा केली की प्रधानाचा शिरच्छेद करण्याची तयारी करावी.

इतक्यात प्रधानाची बायको जुने फाटके लुगडे नसून दरबारात एका तान्ह्या मुलाला घेऊन आली. राजाला ती प्रधानाची बायको आहे, हे माहीत नव्हते. राजाने तिला विचारले–"कोण आपण ? आपल्याला काय हवे आहे ?"

"महाराज, [illegible] माझ्या मुलाने रडूनरडून सर्व घर डोक्यावर घेतले आहे. मी पुष्कळ प्रयत्न केला, परंतु मुलाचे रडणे थांबत नाही. म्हणून माझे पती मला मारीत आहेत व ठार करण्याची धमकी देत आहेत." प्रधानाची बायको म्हणाली.

"मुलाला पोटाचा एखादा विकार असेल. एखाद्या वैद्याला दाखव. तो रडतो आहे त्याला तू काय करणार ? मी त्या मूर्खाला शिक्षा करतो." राजा म्हणाला.

ते ऐकून प्रधानाची बायको म्हणाली– "महाराज ! कोणास ठाऊक आपल्या मुलीचे लग्न जमत नाही त्याला कारण तिच्यातच काही वैगुण्य असेल. परंतु कारणास्तव प्रधानाला शिरच्छेदाची शिक्षा कां ? मी त्यांचीच बायको !"

ते ऐकून दरबारातले सर्व लोक हसू लागले. राजाला आपली चूक कळली. त्याने लगेच प्रधानाला मुक्त केले आणि त्याची क्षमा मागितली.



# स्वर्ग व नरक

सोमवर्मा नामक एका श्रीमंत माणसाने आपल्या आयुष्यात कधी कोणत्याही प्रकारचा दानधर्म केला नाही. शेवटी यमदूत जेव्हा त्याच्या शोधार्थ आले तेव्हा त्याला एक उपाय सुचला. तो यमदूतांना म्हणाला–"मी आपल्या सर्व संपत्तीतला अर्धा भाग आपल्या मुलाच्या नावी लिहून देऊन बाकी अर्धा दानधर्म करण्यासाठी आपल्या मृत्युपत्रात लिहिणार आहे. तुम्ही थोडा वेळ थांबा !"

"आम्हाला तो अधिकार नाही, यमधर्मालाच विचार." यमदूत म्हणाले.

सोमवर्मा आपल्या मुलांना म्हणाला–"मी जिवंत होऊन आपले मृत्युपत्र लिहिणार आहे, म्हणून माझा दाहसंस्कार करू नका." त्याने यमाकडे अवधी मागितला, तो त्याने दिला.

सोमवर्माच्या मुलांनी विचार केला की वडील जिवंत होऊन परत येतील तर अर्धे राज्य दान धर्म करून टाकतील व त्यांना अर्धेच उरेल. म्हणून त्यांनी दाहसंस्काराची तयारी केली. परंतु मध्यंतरी सोमवर्मा उठून बसला व रागावून त्याने सर्वच राज्य दानधर्म करायला म्हणून मृत्युपत्रात लिहिले. म्हणून त्याला स्वर्गप्राप्ती झाली.

